# वाचकांचे पान

**आमच्या वाचकांच्या आग्रहाला मान देऊन आम्ही हे पान सुरुं करीत आहोत. वाचकांचे 'चांदोबा' बद्दलचे अभिप्राय व त्यांत सुधारणा व्हावी म्हणून मौलिक सूचनांसाठी ही जागा राखून ठेवली आहे. आम्हाला परखड समीक्षा हवी आहे, अर्थात योग्य त्यावेळी कौतुकाची थाप पाठीवर मिळाली तर कुणाला नको असते? आपली पत्रें मुद्देसूद व थोडक्यांत लिहावीत, अक्षर सुवाच्य असावे, व आपले संपूर्ण नांव, पत्ता (पिनकोडसह) अवश्य लिहावा.**

**नुकतेच आम्हाला बंगलोरहून 'इन्फोसिस'च्या सौ. सुधाताई नारायणमूर्ती यांचे एक पत्र आले. त्या पत्रानेच या पानाची सुरवात करताना आम्हाला फार अभिमान वाटतो आहे.**

चंदामामामुळे मला गंधर्व, यक्ष, देव व राक्षस यांच्या वेगळ्या दुनियेची कल्पना करायला स्फूर्ति मिळाली आहे. निरनिराळ्या भागांतल्या लोककथामधून भारताच्या समृद्ध परंपरेची शिकवण आम्हाला मिळाली. माझ्या लहानपणी टीव्ही किंवा व्हिडियो नव्हता, त्यामुळे त्याकाळी वाचन ही एकमेव करमणूक होती. दर महिन्याला सुंदर कथा व रंगीबेरंगी चित्रांनी नटलेल्या चंदामामाची मी आतुरतेने वाट बघत असे. फक्त आपल्याच देशांतल्या गोष्टी नव्हेत, तर इतर अनेक देशांतल्या गोष्टींशी आमची ओळख चंदामामामुळे झाली.

चंदामामा हे नुसतेच चांगले वाचन नव्हते, तर त्याकाळांतली जीवनमूल्यें त्यांतून प्रतीत होत होती. उदा. ''सुईतून सुबत्ता'' या गोष्टींत कृतज्ञता व प्रामाणिकपणा यांचा परिणाम दाखवला होता. अशा कथा नुसत्याच नीतीकथा नव्हत्या, तर आमच्या मानसिक जडणघडणीत त्यांचा मोलाचा वाटा होता. माझ्याबरोबर अनेक वाचक याबाबतीत माझ्याशी सहमत होतील. कदाचित यांतलीच थोडीफार शिदोरी आम्ही तरुण पिढीलाही पोंचवली असावी.

इतक्या दशकांनंतर देखील आजही मी त्याच उत्सुकतेने चंदामामाची वाट बघते. तो वाचत असताना मी माझ्या बाळपणांत हरवून जाते. अरबी चोरांच्या कथा, वेताळ कहाण्या, तीन राजकन्यांची कहाणी, कांचिना कोटे सारख्या कित्येक गोष्टी मला चांगल्याच आठवतात.

त्यांतल्या गोष्टी अजूनही तशाच आकर्षक व रंगीन आहेत.





# लक्ष्मीपतीचे भाग्य

**लखनपुर** गांवात लक्ष्मीपती नांवाचा एक शेतकरी रहात होता. त्याची बायको आणि एक पंधरा वर्षाची मुलगी, एवढंच त्याचं कुटुंब होतं. आजोबा आणि वडिलांकडून मिळालेली पांच एकर सुपीक जमीन, एवढीच काय ती त्याची मालमत्ता होती. जवळच्या पर्वतातून खळाळत येणारा एक झरा त्याच्या शेतांमधून पुढे वाहात जात होता. पण तेथे तीन चार वर्षांपासून पाऊस न पडल्याने तो झरा जवळजवळ कोरडा पडला होता.

झऱ्याला भरपूर पाणी होते, तेव्हां इतर खेडुतां-प्रमाणेच तोही आपल्या शेतांतून पिके घेऊन आपल्या गरजा भागवत असे. आता पाण्याचीच कमतरता भासूं लागल्याने, गांवातील बरेचसे लोक मोलमजुरी करुन उपजीविका करावी, ह्या हेतूने गांव सोडून जाऊं लागले.

परंतु लक्ष्मीपती मात्र, ज्याच्याविषयी त्याने बरंच काही ऐकलं होतं, अशा दंडकारण्यांत सांपडणाऱ्या हिरेमाणकांविषयीचा विचार करुं लागला. मागच्या महिन्यांत घरासाठी आवश्यक सामान आणण्यासाठी तो शहरगावी गेला होता, तेव्हां वाटेत एका धर्मशाळेत तो थांबला होता.

त्याच वेळेला तिथे उतरलेले इतर प्रवासी ह्या हिरे माणकांविषयी आपापसांत बोलत होते. तेव्हां त्याने नीट लक्ष देऊन त्यांचे बोलणे ऐकले.

त्यांच्यातील एक प्रवासी दीर्घ सुस्कारा टाकत बोलला, ''कांही म्हणा, पण आपले नशीब मात्र जोरावर पाहिजे हं. अलीकडेच माझे दूरचे तीन नातेवाईक त्या दंडकारण्यात गेले, पण त्यांच्यातील फक्त एकालाच हिरे माणकं सांपडली. बाकीचे दोघे निराश होऊन घरी परतले.''

दुसऱ्या एका प्रवाशाने म्हटले, ''ज्यांना कोणाला स्वतःचं नशीब आजमावून पाहायचं असेल त्याने घर सोडून तेथे जायचे धाडस केले पाहिजे.''

बाकी प्रवाशांनीही त्याच्या बोलण्यास दुजोरा दिला. सगळ्यांचेच म्हणणं होते की 'कांही मिळवायचे असेल तर कांही तरी गमवावे लागते'. त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकल्यावर लक्ष्मीपतीने मनाशी एक निर्णय घेतला.

शंभु दास

घरी परतताच त्याने आपल्या बायकोला बोलावले आणि धर्मशाळेत ऐकलेल्या गोष्टींचा थोडक्यांत खुलासा करून म्हटले, "थोडे दिवसांसाठी तू आपल्या भावाच्या गांवी जाऊन तिथेच राहा. त्या हिरेमाणकांबाबत आपले नशीब आजमावून मी परत येतो."

लक्ष्मीपतीच्या बायकोला चांगलंच माहीत होतं की आपला पत्नी हट्टी आहे, म्हणूनच नवऱ्याच्या नकळत तिने आपल्या भावास ही बातमी कळवली. मेव्हण्याने लक्ष्मीपतीस समजावत म्हटले, "पंत, आपला निर्णय मला अजिबात योग्य वाटत नाही. भलताच मोह नि आशा शेवटी त्रासाला कारणीभूत होतात. दंडकारण्यात जायचा विचार सोडून द्या. इथे तीन चार वर्षे पाऊस पडला नाही, ह्याचा अर्थ असा नाही की याही वर्षी पाऊस पडणार नाही. तुम्ही निराश होऊ नका."

तरीसुद्धां आपल्या मेव्हण्याचे बोलणे न ऐकता लक्ष्मीपती दंडकारण्याकडे जाण्यासाठी निघाला. तेथे पोचल्यावर इतर कांही लोकांबरोबर हिरे माणके मिळवण्याचा प्रयत्न सहा महिन्यांपर्यंत करीत राहिला. परंतु तेथे त्याला कांहीच मिळाले नाही. शेवटी आजारी पडून तो घरी परतला.

त्याला बरे होण्यासाठी दोन आठवडे लागले. एवढ्यांत तिथे पाऊस पडायला सुरवात झाली. झरा पुन्हां खळाळत वाहू लागला. त्याच्या प्रवाहाबरोबर छोटे छोटे दगड, खडे वाहात येऊं लागले.

झऱ्याचे पाणी वाढतच गेले. त्यामुळे लक्ष्मीपतीच्या शेतांतही गुडघ्याएवढे पाणी सांठले. ह्या एवढ्या पाण्यांत नांगरणे शक्यच नव्हते. म्हणून त्याने शेताच्या कडेचा बांध तोडून टाकला. शेतांत प्रवाहाबरोबर येणाऱ्या छोट्या दगड धोंड्यांना तो बाहेर फेकूं लागला. अन् तेव्हां अचानक त्याला जाणवले कीं इकडे तिकडे विखुरलेल्या दगड गोट्यांत दोन खडे चमकत आहेत. ते दोन चकाकणारे खडे त्याने घरी नेऊन आपल्या मेव्हण्यास दाखवले. थोडा वेळ आपल्या तीक्ष्ण नजरेने बारकाईने निरीक्षण करीत त्याने म्हटले, "हे तर अशुद्ध रूपातील हिरे आहेत. पहा पंत, दुसरी तिसरीकडे कुठेच नाही. पण तुमचे भाग्य तुमच्या शेतांतच दडले आहे."





# थट्टा मस्करी

चारुलता आणि हेमलता एकमेकींच्या शेजारी रहात होत्या. दोघीही मध्यम वयाच्या होत्या. शिकल्या सवरलेल्या होत्या. दोघींचेही नवरे कुशल व व्यवहारचतुर असल्याने व्यापारांत भरपूर पैसा कमवीत होते.

जेव्हां दोघींचे नवरे आपापल्या कामावर जात, तेव्हां दोघीही भराभर घरकाम उरकण्याच्या मागे लागत. घरातली कामे आटपताच दोघीही जवळच्या ओट्यावर बसून गप्पाटप्पा करीत असत. वरवर पाहता दोघीही जिवलग मैत्रिणी आहेत असे वाटे. पण दोघीही एकमेकींची मस्करी करण्याची संधी सोडत नसत.

एक दिवस संध्याकाळी आरामांत बसून गप्पा मारताना, बोलता बोलता चारुलता आपल्या पतीविषयी म्हणाली, 'अलीकडे कांही दिवसांपासून माझा नवरा माझ्यावर पहिल्यासारखे प्रेम करत नाही, माझी कदरही करत नाही."

हेमलताने मनोमन विचार केला की हिला चिडवण्याची ही आयतीच संधी मिळाली आहे. म्हणूनच मनाशी कांही विचार करीत तिने म्हटले "असं आहे कां? नाहीतर बघ माझ्या नवऱ्याचे वागणं! तुझ्या नवऱ्याच्या वागणुकीच्या अगदी विरुद्ध. माझ्यावर ते पहिल्यापेक्षा जास्तच प्रेम करूं लागले आहेत. माझी अगदी चांगलीच कदर करतात. प्रत्येक दिवशी माझ्यासाठी कांही ना कांही भेटवस्तू आणतात." हे ऐकताच चारुलताने मोठ्या ठसक्यांत म्हटले, "हो तर! न आणायला काय झालं? तुझा नवरा तर जुन्यापुराण्या वस्तूंचाच व्यापारी आहे ना?

ह्यावर मात्र हेमलत्ता निरुत्तर झाली.





# स्वतःच निर्णय घ्यावा

लक्ष्मीपुरी नावाच्या एका छोटचाशा गावात राम, सोम आणि करण नावाचे तीन मित्र रहात होते. तिघेही शेतकरी होते. त्यांच्यातील राम आणि सोम मोठे हुषार होते. करण त्यांच्या सल्ल्यशिवाय छोटेसे कामही करत नसे. मग ते शेतीविषयी असो वा घराशी संबंधित, मित्रांचा सल्ला घेतल्याशिवाय तो कोणत्याच निर्णयाप्रत येत नसे. करण बालपणापासूनचा मित्र असल्यामुळे त्याच्या विश्वासानुसार योग्य असाच सल्ला राम आणि सोम देत व त्याला मदत करत असत.

एके वर्षी पीकपाणी चांगले झाले. त्यामुळे राम आणि सोमला राजधानीतील वसंतोत्सवात भाग घेण्याची इच्छा झाली. जेव्हां ही गोष्ट करणला समजली तेव्हां तो त्यांना जाऊन भेटला व त्याने त्यांच्याबरोबर जाण्याचा आग्रह धरला. त्या दोघांनी त्याला समजावले की "लांबचा प्रवास आहे. जेथे आम्ही जाणार आहोत ती जागा नवीन, अनोळखी आहे. अशीही शक्यता आहे की आम्हाला कांही अनपेक्षित संकटाना तोंड द्यावे लागेल. तुला हे सारे जमणार नाही." मित्रांनी त्याला अशा तऱ्हेने बरेच समजावले पण तो आपल्या निर्णयापासून जराही ढळला नाही. त्याने निश्चयी स्वरात म्हटले, "तुम्ही दोघे बरोबर असताना, मला कसली भीती? मी तुमच्याबरोबर येणारच." दुसऱ्याच दिवशी तिघेही राजधानी-कडे जाण्यास निघाले.

सलग तीन दिवसांच्या प्रवासानंतर तिघेही एका जंगलामधून जात होते. दोन मोठ्या पर्वतांमधून एक छोटीशी नदी वहात होती. नदी पलीकडे जाण्यासाठी तिघेही तिथे बांधून ठेवलेल्या एका नावेत चढले. थोडे पुढे जातात न जातात तोच नदीला पूर आला. कुठेतरी मुसळधार पाऊस झाला होता, ज्यामुळे नदीचे पाणी वाढतच चालले होते. घाबरुन तीनही मित्रांनी एकमेकांना घट्ट पकडून ठेवले. प्रवाहाच्या वेगामुळे नाव दूर कुठेतरी वहात गेली.

कोणास ठाऊक, नाव किती दूरवर वहात गेली. पण तिघांनी शुद्धीवर येऊन डोळे उघडले तेव्हां ते एका बेटावर पोचले होते. त्यांना कडकडून भूक लागली होती पण कुठे जायची शक्तीच त्यांच्या अंगात उरली नव्हती. इतक्यात रामला समोर एक आंब्याचे झाड दिसले. त्याला खूप आंबे लगडले होते.

राम आंबे तोडणारच होता, इतक्यात "माझ्या परवानगी शिवाय कोण आंबे तोडत आहे?" असं म्हणून एक भूत उडी मारत खाली उतरले.

भूताला पाहताच तिन्ही मित्र खूप घाबरले. भीतीमुळे ते नदीत उड्या मारणार एवढ्यात गडगडाटी हंसत भुताने म्हटले, "घाबरू नका. इकडे या, मी तुम्हाला त्रास देणार नाही."

घाबरत घाबरतच तिघेही भुताजवळ गेले. भुताने विचारले, "तुम्ही या बेटावर कसे काय आलात?" जे घडलं, ते तिघांनी सांगितलं. त्यांच्या परिस्थितीची दया येऊन भुताने त्यांना आंबे खायला दिले. भूक भागल्यावर तिघांनी त्याच्याविषयी कृतज्ञता व्यक्त केली त्यांच्या साधेपणावर खूश होऊन भुताने म्हटले, "तुम्ही इथून पायी पायी चालत कुठेच जाऊ शकणार नाही. म्हणून मी तुम्हाला प्रत्येकी एक एक वरदान देतो. पण एक अट आहे. तिघांनी एकसारखा वर मागता कामा नये. मागा, काय पाहिजे?"

"मला माझ्या बायको मुलांजवळ पोचते कर" रामने म्हटले. दुसऱ्या क्षणी तो त्याच्या घरी पोचला.

"वसंतोत्सवात भाग होण्यासाठी निघालो होतो. तेव्हां मला राजधानीला पोचव." सोमने वरदान मागितले. भुताने त्याला त्वरित राजधानीला पाठवले.

आता वर मागण्याची करणची पाळी होती काय वर मागावा ह्याचा निर्णय तो घेऊ शकला



शांता आपटे

नाही. बाकी दोघे आपापले वरदान घेऊन निघून गेले होते. करण मोठ्या पेचात सांपडला, की मागून मागायचा तर कोणता वर मागावा? अचानक त्याच्या डोक्यांत एक विचार चमकून गेला.

''मला कांही समजलं नाही की काय वर मागावा? ह्यासाठी मला माझ्या मित्रांचा सल्ला घेतला पाहिजे. म्हणून त्या दोघांना इथे बोलवा.''

दुसऱ्याच क्षणी भुताने त्या दोघांना तेथे हजर केले आणि ते स्वतः गायब झाले. दोन्ही मित्रांनी बरोबर ओळखले की असं का झालं असावं.

ते दोघेही करणच्या ह्या कृत्यामुळे दुःखी झाले आणि त्यांनी म्हटले, ''ह्यामुळेच आम्ही तुला आमच्याबरोबर घेऊन यायला तयार नव्हतो. तू पण घरी जाण्याचे वरदान मागून घ्यायचं होतस. एवढीही अक्कल नाही का तुला? सल्ला मागण्यासाठी म्हणून आम्हाला इथे बोलावून आम्हाला तू परत संकटात टाकलंस. आता इथून घरी कसं बरं पोचणार?''

थोड्याच वेळांत भूत तेथे प्रकट झाले अन् त्याने म्हटले, ''आपल्या मित्रांकडून सल्ला घेतलास?'' करण गप्प उभा राहिला. भुताला पाहून दोघे मित्र खूष झाले आणि त्यांनी भुताला सांगितले, ''प्रत्येक छोट्या छोट्या बाबतीत हा आमचा सल्ला मागत राहतो. प्रत्येक वेळी सल्ला मागणाऱ्या ह्याला आमच्या गांवातील वडाच्या झाडाखालील देवीच्या मंदिरासमोर नेऊन पोचव. तसंच आम्ही जे मागितलं त्याप्रमाणे आम्हाला तेथे पोचव. ही मदत जर आम्हाला करशील तर आम्ही जन्मभर तुझे ऋणी राहू.''

भुताने हंसून करणला म्हटले, ''सल्ला मागणे कांही चूक नाही. परंतु आपल्या चांगल्या वाईटाचा निर्णय आपण स्वतःच घेतला पाहिजे. बुद्धिहीन असल्याप्रमाणे प्रत्येक निर्णयासाठी आपण दुसऱ्यांचा सल्ला मागून स्वतःही संकटात सापडतो, आणि दुसऱ्यांनाही अडचणीत टाकतो.'' नंतर मात्र त्याने तिघांनाही त्यांनी इच्छिलेल्या स्थळी पोचवले.

आता मात्र करणला समजले की प्रत्येक बाबतीत दुसऱ्यांचा सल्ला मागणारा माणूस अडाणीच राहतो. 'माझ्या मूर्खपणामुळेच राम आणि सोम मला बरोबर नेऊ इच्छित नव्हते.' त्याने मनाशी निश्चय केला, ''आता यापुढे मी माझी स्वतःची बुद्धि वापरीन आणि प्रत्येक बाबतित स्वतःचा निर्णय स्वतः घेईन.''







# भयंकर घाटी

## 4

*(त्या विचित्र प्राण्यावर स्वार होऊन केशव डोंगरावर पळाला. तिथे एका गुहेत एका मांत्रिकाने कालभैरवाची तिथली मूर्ती दाखवली, त्याच्या डोळ्यांत, अरण्यांत जी गडबड चालली होती, तीही केशवला दिसली. एक भयंकर प्राणी, ज्याचे मस्तक मनुष्यासारखे होते आणि ज्याला वटवाघळासारखे पंख होते, तो प्राणी राजाच्या सैनिकांना पळवून लावत होता. त्यानंतर...)*

**ती** भेसूर आकृति पाहून, आणि राजसैनिकांना घाबरवून, त्यांना अरण्यांत सैरावैरा पळायला लावत होती, ते पाहून केशवला फारच आश्चर्य वाटले. असला माणूस असू शकतो हे त्याने कधीही ऐकलेले नव्हते.

पण असला भयंकर प्राणी मात्र तो आज प्रथमच पाहात होता. ते दृश्य खरंच होतं कीं मांत्रिकाने आपल्या मंत्रशक्तीने कांहीतरी भ्रम निर्माण केला होता? केशव चकित होऊन विचार करीत होता.

''वत्सा केशव, कालभैरवाची शक्ती पाहिलीस कां? आता तुझ्या पित्यावर कोणतेही संकट येणार नाही. राजाचे सैनिक मागे न पाहता ब्रम्हपुरला पळत सुटले होते. मी तुला अगोदरच सांगितलं होतं कीं तुझ्या पित्याचे रक्षण करणे ही माझी जबाबदारी आहे. आता तू तुझ्या खांद्यावरचे वस्त्र बाजूला कर. आणि संशयाचे निवारण कर.'' मांत्रिकाने सांगितलं.

केशवच्या मनांत मांत्रिकाविषयी कृतज्ञता

आपल्याला कांही त्रास देऊं शकणार नाही. इतकंच नव्हे, तर ज्या शक्ती मिळवण्यासाठी तो इतके प्रयत्न करतो आहे, त्याच शक्ती आपण मिळवूं शकूं. तो तुझा कसा उपयोग करणार आहे, ही गोष्ट....''

जयमल्लचे वाक्य संपण्यापूर्वीच आकाशांत वीज चमकली आणि प्रचंड गडगडाट झाला. आणि सारा डोंगर, एखादी नाव डगमगावी तसा हलायला लागला.

या स्फोटामुळे मोठेमोठे खडक खाली घसरायला लागले. ज्या खडकावर केशव व जयमल्ल इथे होते, तो हलायला लागल्याबरोबर ते दोघे तिथून पळाले. तेवढ्यांत गुहेतून ब्राम्हदंडी किंचाळत बाहेर आला.

अरण्याच्या दिशेने पाहात तो ओरडला, ''हा... हा... कालभैरवाची ही अफाट शक्ती आहे! माझ्या मंत्राचा प्रभाव आहे! डोंगर हलायला लागलाय. मी मनांत आणलं तर पक्षी होऊन मला आकाशांत उडता येईल. आकाशांतून मी विजांचा चमचमाट करीन. ढगांना गडगडायला लावीन. मी प्रलय माजवीन. ते पाहा, ते राजाचे सैनिक डोंगरावर चढून येत होते, ते आता जीव मुठींत घेऊन पळत सुटले आहेत. मंत्रांनी भारलेले हे दगड यमदूतांसारखे त्यांचा पाठलाग करीत आहेत. आता ते या डोंगराकडे चुकूनदेखील कधी वळून पाहाणार नाहीत. हा: हा: हा:!''

केशव आणि जयमल्लने डोंगराच्या पायथ्याकडे पाहिले. खरोखरीच, कांही राजसैनिक घोड्यावर, व कांही पळत जाताना दिसत होते. एखादा मोठा भूकंप व्हावा, त्याप्रमाणे मोठेमोठे दगड मैदानात हालताना दिसत होते. त्यांच्या माऱ्याखाली कांही घोडेस्वार आणि कांही पायदळांतले सैनिक जखमी होऊन विव्हळत पडले होते.

कांही वेळ केशव स्तब्ध होऊन उभा होता. तो भयंकर देखावा पाहून तो जणूं बधिर झाला होता. तितक्यांत मांत्रिक ब्राम्हदंडीने आज्ञा केली, ''शिष्या, आपल्या केशवला अंगावर डाग असणाऱ्या वाघांच्या गुहेसमोरच्या हत्तींच्या तलावांत स्नान करायला लावून घेऊन ये. आता आपल्याला सूर्यास्त झाल्यावर बरीचशी कामे करायची आहेत.''

***(अपूर्ण)***





वेताळ कथा

# यथार्थ चित्र

शब्दाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले, आपल्या खांद्यावर ते टाकून तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटलं, ''तुझा हा कोणता संकल्प आहे, कीं जो पूर्ण करण्यासाठी तू इतके जिवापाड कठोर परिश्रम करतो आहेस? कांही कांही राजे असे असतात कीं आपल्या अधिकाराच्या नशेंत ते गुंग असतात आणि अचानक कांहीतरी घिसाडघाईने निर्णय घेतात. त्यांच्या त्या निर्णयाच्यामागे कोणता हेतू असतो, ते कुणालाच समजत नाही. केवळ आपले नोकर-चाकर, यांच्याबाबतीतच नव्हे, तर स्वतंत्र बुद्धिमतेच्या गुणवंत, श्रेष्ठ कला-कारांच्याबाबतीतदेखील हे राजे



असा गैरव्यवहार करतात. केव्हां कुणाला शिक्षा करतील, आणि केव्हां एखाद्याचा सन्मान करतील, हे सांगता येत नाही. अशांपैकीच राजा उग्रसिंह हा एक राजा होता. आपल्याच अहंकारात बुडलेला आणि अविवेकी निर्णय घेणारा होता. तुला सावध करावे म्हणून मी त्याची कहाणी तुला सांगतो ती लक्षपूर्वक ऐक.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

उग्रसिंह हा जयंतपुरचा राजा होता. तो एक कुशल राज्यकर्ता तर होताच, परंतु तो नेहमी रागावलेला, चिडलेला असे, मग तो दरबारांत असो, नाहीतर अंतःपुरांत असो! लहानसहान चुकांसाठी तो लोकांना कडक शिक्षा देताना मागेपुढे पहात नसे. त्यामुळे राजाच्या सेवकांच्या मनांत सदैव एक भीती असे. कोणत्याही कारणासाठी त्यांना शिक्षा होऊं शकली असती.

एकदा उग्रसिंहाच्या मनांत आपले चित्र काढवून घेण्याची इच्छा झाली. ही बातमी वाऱ्यासारखी पसरली आणि अनेक चित्रकार राजधानीत येऊं लागले. पण तेवढ्यांत राजाने दुसरी घोषणा केली कीं जो कुणी त्याचे चांगले चित्र काढील त्याला हजार मोहोरा मिळतील. पण जर राजाला ते चित्र पसंत पडलं नाही, तर त्या चित्रकाराला दहा फटके मारले जातील. राजा नेहमीच रागावलेला असे, त्यामुळे चांगलेचांगले चित्रकारदेखील मागे फिरले.

नागवर्मा हा चित्रकार राजाचे चित्र काढायला तयार झाला. राजमहालाजवळच त्याच्या राहाण्याची सोय करण्यांत आली. रोज चित्र काढण्यासाठी राजा थोडा वेळ चित्रकाराला देत होता. नागवर्माने एकाग्रतेने कांही काळ काम केले आणि चित्र पूर्ण झाल्यावर ते तो दरबारांत घेऊन आला.

चित्रावरचा कापडी पडदा बाजूला केल्यानंतर राजाने चित्र पाहिले व नाखूष होऊन तो ओरडला, ''छी छी, हे कसलं चित्र? तू खरोखरीचा चित्रकार आहेस कां? हे माझं चित्र मुळीच वाटत नाही.''

इतर मानकऱ्यांचेही असेच मत पडले. इतक्या मोठ्या चित्रकाराने असं चित्र कसं काढलं याचे त्यांनाही आश्चर्य वाटले.

नागराजला बक्षीस मिळेल अशी खात्री होती, पण त्याला फटकेच खावे लागले. त्याचा अपमान होऊन त्याला दरबारांतून निघावे लागले.

कांही दिवसानंतर विजय नांवाचा एक चित्रकार राजाला भेटून म्हणाला, ''मी आपले चित्र बनवावे अशी इच्छा धरून आलो आहे. मला तशी परवानगी देण्याची कृपा करावी.''



''फालतू माणसांसमोर उभे राहून त्यांच्याकडून चित्र काढून घेण्याबद्दल मला अतिशय चीड आहे. जर तुझे चित्र चांगले झाले नाही, तर तुला दुप्पट शिक्षा होईल. म्हणजे दहा नव्हे, तर वीस फटके मारायची शिक्षा होईल. ही अट तुला मान्य आहे कां?'' राजाने गरजत विचारलं.

''होय, मान्य आहे महाराज.'' विजयने उत्तर दिलं आणि तो लगेच कामाला लागला. आठवडाभरातच त्याने चित्र बनवलं आणि दरबारांत ते राजाजवळ दिलं.

ते चित्र पाहून राजा फारच संतापला आणि म्हणाला, ''मी इतका क्रूर आहे कां? तुझी इतकी धिटाई?''

''क्षमा असावी महाराज, आपलं यथार्थ चित्र काढावं हा माझा एकमेव हेतू होता. एखादे हरीण पाणी पितानादेखील घाबरते आणि त्याला पाण्यांतही श्वापदेच दिसतात. वाघ शांतपणे जरी खाली बसला, तरी त्याचे डोळे लालसर दिसतात आणि त्याचे स्वरूप भयंकर दिसते. ही त्यांची सहज लक्षणें आहेत. कोणत्याही चित्रकाराने ही सहजलक्षणें कधीही विसरता कामा नयेत.'' विजय नम्रपणे म्हणाला.

''पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं तू मला इतकं क्रूर दाखवावंस. मनांत आणलं तर मी तुझा शिरच्छेद करूं शकतो.'' राजाने चडफडत म्हटले.

''ते मला माहीत आहे, महाराज. परंतु खरा कलावंत हा नेहमी खरं तेच सांगतो. जो सत्यावर विश्वास ठेवतो, त्याला कशाचीच भीती वाटत नाही. तरीसुद्धां, माझी एक लहानशी विनंती आहे. आपण जो कांही निर्णय घ्याल, त्याच्याआगोदर हे चित्र दरबारांतल्या सर्व सभासदांना दाखवण्याची



अनुमती द्यावी. कृपा करुन त्यांचेही मत आपण विचारावे.''

राजाने चित्र दाखवून सर्वांना उद्देशून प्रश्न विचारला, ''हे चित्र माझ्यासारखं आहे कां?''

राजा रागावून उभा राहिलेला होता, तसेच ते चित्र होते, म्हणून सभासदांना नाही म्हणता येईना. पण ते गप्प बसले होते, कारण होकार द्यायला ते घाबरत होते.

हे पाहून वृद्ध मंत्र्याने गंभीरपणे मत दिलं, ''महाराज, हे चित्र अशा प्रकारे चित्रित करावं कीं नाही, याच्या औचित्याबद्दल मी कांही सांगू शकत नाही, पण हे चित्र हुबेहुब आपल्यासारखे आहे हे मात्र खरे आहे. आपल्या चेहऱ्याप्रमाणे आपली ढब, चेहऱ्यावरचे भाव व व्यक्तिमत्व हे यांत अगदी बरोबर चित्रित केलेले आहे.'' मंत्र्याच्या सांगण्याला दुजोरा देण्यासाठी सभासदांनी टाळ्या वाजवल्या.



क्षणभर राजाला कांहीच सुचेना. त्याने लगेच विजयला हजार मोहोरा दिल्या आणि ते चित्र आपल्या खाजगी दालनांत ठेवून दिले.

रोज सकाळीं राजा झोंपेतून उठल्याबरोबर त्या चित्राकडे लक्षपूर्वक पाहायला लागला. त्या चित्रांत जसा तो रागीट व तुसडा दिसत होता, तसे न दिसण्याचा तो प्रयत्न करुं लागला. शांत राहाण्याचा व शांत दिसण्याचा प्रयत्न करुं लागला. कधी नाराजीने उठला तरी त्या चित्राची आठवण होऊन तो सौम्य व विनम्र होऊं लागला. त्याचा हरघडी उसळणारा राग आता मावळायला लागला. त्यानंतर त्याने विजयला पुन्हां बोलावले व आपले आणखी एक चित्र काढायला सांगितले.

तेव्हां विजयने त्याला उत्तर दिले, ''महाराज, आता आपले चित्र नागवर्माने काढायचे आहे, मी नाही. जर आपण संमती दिलीत तर तो आपले एक अप्रतिम चित्र चितारील. त्याने काढलेले पहिले चित्र आपण पाहावे, नीट न्याहाळून पाहावे. म्हणजे त्यांतले आपले शांत, गंभीर रूप, व चित्रकाराचे कौशल्य आपल्या ध्यानांत येईल.''

आपल्या कलावंत साथीदाराबद्दल विजयने जे प्रेम व आदर दाखवला, त्याबद्दल राजाने विजयचे अभिनंदन केले आणि नागवर्माचे चित्र मागवून घेतले.

नागवर्माची चित्रकारी पाहून राजाने त्याची मनापासून प्रशंसा केली व त्याला बोलावून घेऊन त्याची शाही चित्रकाराच्या पदावर नेमणूक केली व त्याचा सत्कार केला.

वेताळाची गोष्ट संपल्यानंतर त्याने विक्रमार्काला म्हटले, ''राजा उग्रसिंह प्रथम नागवर्मावर खूप रागावलेला होता, कारण त्याच्या दृष्टीने ते चित्र अत्यंत भिकार व राजाची मानहानी करणारे होते. पण नंतर मात्र त्याच नागवर्माला आपले चित्र काढायला राजाने बोलावले. त्यापूर्वी त्याला फटक्यांची शिक्षाही दिलेली होती हे आपण लक्षांत घेतलं पाहिजे. अशा नागवर्माला राजाने शाही चित्रकार म्हणून नोकरी दिली व त्याचा सत्कारदेखील केला. हे सारं तुला विचित्र वाटत नाही कां? त्याच्या बेफिकीर स्वभाव व अविचारीपणाची ही लक्षणे नाहीत कां? ह्यातून या दोघा कलाकारांमधे श्रेष्ठ कोण याचा निर्णय राजाला करता येईना, म्हणून त्याने दोघांचाही सत्कार करून टाकला, असंच ना? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनही जर तू गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील.''



विक्रमार्काने उत्तर दिले, ''राजा उग्रसिंह सुरवातीला संतापी होता हे खरं आहे, पण नंतर ज्या कांही घटना घडल्या, त्यामुळे राजाच्या स्वभावांत बदल झाला. विजयलादेखील कठोर शिक्षा देण्याची इच्छा होती. पण वयोवृद्ध मंत्री व इतर दरबारांच्या मानकऱ्यांचा अभिप्राय राजाला टाळता आला नाही. विजयला इनाम देणे त्याला भाग पडले. जेव्हां त्याने हळूंहळूं आत्मपरीक्षण करायला सुरवात केली, तेव्हां त्याच्या लक्षांत आले कीं चूक चित्रांत नव्हती; पण राजाचा स्वभाव व चेहऱ्यावरचे भाव तसेच होते. म्हणून राजाने आणखी एक चित्र बनवून घेण्याची इच्छा व्यक्त केली. जेव्हां त्याने नागवर्माचे चित्र मागवून घेतले आणि नीट निरखून पाहिले, तेव्हां त्याला दिसून आले कीं त्या चित्रांत अहंकार, दंभ, वगैरे अप्रिय भाव मुळीच नव्हते. दरबारी मानकऱ्यांनीदेखील राजाला कधी शांत, प्रेमळ शब्द बोलताना पाहिले नव्हते. म्हणून त्यांनीही त्या चित्राची स्तुती केली नाही. पण जेव्हां राजाचा शांत स्वभाव बनला, तेव्हां त्याचे स्वतःचे स्वाभाविक गंभीर, शांत रूप पाहून तो स्वतःच प्रसन्न झाला. म्हणून त्याने नागवर्माचा सत्कार केला. चांगुलपणा व मोठेपणा ओळखण्यासाठी, पाहाणाऱ्याच्या स्वभावांत देखील त्याचा थोडाफार अंश असावा लागतो, तरच ते शक्य होतं. जेव्हां राजा तापट आक्रस्ताळा होता, तेव्हां त्याला आपले धीरगंभीर, शांत चेहरा असलेले चित्र मुळीच आवडलेले नव्हते. आता राहिली चित्रकारांची कथा! ते दोघेही श्रेष्ठ आहेत. हुबेहुब चित्र काढण्यांत विजय कुशल आहे तर व्यक्तीमधले दोष वगळून, ते सुधारुन, चित्र चांगले करण्यांत नागवर्मा हुशार होता. म्हणून एका आदर्श राजाचे चित्र त्याने काढून उग्रसिंहापुढे ठेवले. दोन्ही चित्रकारांचा सन्मान करण्यांत राजाने आपली बुद्धिमत्ता व विवेक यांची ओळख करुन दिली. त्यांत कोणत्याही प्रकारचा अविचारीपणा नाही.''

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

**(काशीभट्ट शशिकांत यांच्या रचनेवर आधारित)**



बिहारमधील लोककथा

# उंदीर आणि मुंग्यांची राजपुत्राला मदत

प्रतापगड राज्यावर एके काळी महेंद्रप्रताप राज्य करीत होता. तो एक हुशार व लोकप्रिय शासक होता. त्याला प्रतापवर्मा नांवाचा एक मुलगा होता. हा राजपुत्र नम्र व दयाळू होता आणि म्हणूनच जनतेचा लाडका होता. त्याला प्राणी आवडत. तो नेमबाजींत प्रवीण होता, परंतु तो कधीही शिकार खेळायला गेला नाही.



एके दिवशी, तीन अनोळखी पुरुष दरबारांत आले. त्यांना कांही अद्‌भुत शक्ती प्राप्त होत्या असे ते म्हणत होते. त्यांचे अनुभव ऐकताना प्रतापवर्मा रोमांचित झाला. त्यांच्यापैकी एकजण धनुर्विद्येंत प्रवीण होता, दुसरा वाऱ्यासारखा जलद पळूं शकत होता आणि जे इतरांना दिसूं शकत नाही ते पाहाण्याची शक्ती तिसऱ्याला होती.

या अनोळखी लोकांबरोबर राजपुत्र बराच वेळ घालवत असे. त्यांच्या सहवासांत प्रवासाला जावे अशी त्याला इच्छा झाली. राजपुत्राने पित्याची परवानगी मागितली. सुरवातीला राजाला ही कल्पना रुचली नाही, कारण आपल्या राज्याबाहेर राजपुत्राने जावे हे त्याला मान्य नव्हते. पण त्या तिघांनी राजपुत्राचे आपण जिवापाड संरक्षण करूं अशी खात्री दिली, तेव्हां कुठे महेंद्रप्रतापने मुलाच्या इच्छेला मान्यता दिली. दुसऱ्याच दिवशी प्रतापवर्मा आपल्या नव्या मित्रांच्या सोबतीने प्रवासाला निघाला.

ते जात असताना वाटेत एक उंदीर पाण्याने भरलेल्या बिळांतून बाहेर येण्यासाठी धडपडत होता, तो राजपुत्राला दिसला. त्या चिखलांतून तो बाहेर यायचा प्रयत्न करी, पण दरवेळेला त्या निसरड्या



कांठावरुन तो परत पाण्यांत पडत होता. राजपुत्राला त्याची दया आली. त्याने त्या खड्ड्यांत एक बाण सोडला. उंदराने तो बाण दांतात पकडला आणि त्याच्या आधाराने तो पाण्याबाहेर येऊं शकला.



राजपुत्राच्या प्रेमळ चेहऱ्याकडे पाहात तो उंदीर म्हणाला, ''हे राजकुमार! माझा प्राण वांचवल्याबद्दल मी तुझा आभारी आहे. मी उंदीरराजा आहे - साऱ्या उंदरांचा राजा. आजपासून माझ्या राज्यांतले सगळे उंदीर तुला गरज पडेल तेव्हां तुझ्या मदतीला येतील. तू फक्त जमिनीवर आडवा पड आणि मला हांक मार. आम्ही सगळे आमच्या बिळांतून बाहेर येऊं.''

उंदीरराजाकडे पाहून राजपुत्राने हंसून मान डोलावली व तो पुढे निघाला. चौघे मित्र थोड्या अंतरावर गेले असताना प्रतापवर्माला मुंग्यांची एक रांग शिस्तीने जात असताना दिसली. अचानक जवळच्याच एका घरांतून कुणीतरी बाहेर आले आणि मुंग्यांकडे न पाहाता त्याने पाण्याचा हंडा आणून रिकामा केला. त्यांत बऱ्याच मुंग्या मेल्या व कांही वाहाणाऱ्या पाण्यांतून जीव वांचवण्याचा प्रयत्न करीत होत्या.

प्रतापवर्मा थांबला. त्याने जवळच्याच एका झाडाची कांही पाने तोडली आणि पाण्यांत अलगद सोडली. ज्या मुंग्या जिवंत होत्या त्यांना त्या पानांवर चढता आले. पाने वाहात वाहात जमिनीला टेकली तेव्हां मुंग्याही मातीत परत येऊं शकल्या. त्या थांबून म्हणाल्या, ''अरे राजकुमार! आम्ही तुझे हे उपकार कधीही विसरणार नाही. जेव्हां केव्हां तुला आमची गरज लागेल, तेव्हां तू फक्त टाळी वाजव, आणि आम्ही तुझ्याकडे येऊं.''

उंदीर राजाकडे पाहून राजपुत्राने हंसून मान डोलावली व तो पुढे निघाला.

दुसऱ्या दिवशी प्रतापवर्मा आणि त्याचे मित्र चंद्रपूर शहरांत पोंचले. तिथे रात्रीं मुक्काम करावा म्हणून ते सोईस्कर जागा शोधत होते. त्या दरम्यान त्यांना माहिती समजली कीं तिथला राजा चंद्रसेन हा एक दुष्ट व जुलमी राजा होता. त्याची मुलगी चंद्रमती ही अतिशय सुंदर होती. तिच्याशी विवाह करण्यासाठी अनेक राजपुत्र येत होते, त्यांना राजाने तीन कामे करायला सांगितली. ती पूर्ण झाली तर त्या राजपुत्राला चंद्रमतीचे



पाणिग्रहण करायची संमती चंद्रसेन देणार होता. त्या सगळ्या अयशस्वी राजपुत्रांना राजाने तुरुंगात टाकले. त्या राजपुत्रांचे वडील येऊन आपापल्या पुत्रांची सुटका करण्यास चंद्रसेन राजाला त्यांनी विनंती केली होती. पण चंद्रसेनने त्याला साफ नकार दिला. प्रतापवर्माने विचार केला कीं त्या राजपुत्रांना कैदेतून सोडवण्यासाठी तरी आपण प्रयत्न करायला हवा. राजकन्येशी विवाह करण्यांत त्याला कांही विशेष रस नव्हता.

दुसऱ्या दिवशी प्रतापवर्मा चंद्रसेन राजाला भेटायला गेला. राजा कांहीतरी अशक्य वाटणाऱ्या अटी घालेल याबद्दल आपल्याला कांहीच माहिती नसल्याचा त्याने बहाणा केला. आणि चंद्रमतीशी विवाह करण्याची इच्छा बोलून दाखवली. राजाने त्याच्या अटी सांगितल्या आणि मनांतून त्याला आसुरी आनंद झाला. कैदेतल्या राजपुत्रांच्या जोडीला हा आणखी एक राजपुत्र लौकरच गेला असता, असे राजाला वाटले.

प्रतापवर्माने पहिली अट विचारली, "हिमालयांत सुंदर पिवळी फुले फुलतात. ती फुले राजकन्येच्या केसात घालण्यासाठी तू घेऊन ये. पण ती फुले सूर्योदयापूर्वी इथे यायला हवीत. नाहीतर सूर्याच्या पहिल्या किरणाबरोबर त्यांचा रंग फिका पडतो." राजाने सांगितले.

आता हे काम तर अशक्य कोटीतले होते. हिमालयांत कोण जाऊन ही फुले शोधून काढील नि ती तोडून सूर्योदयापूर्वी आणून देईल? प्रतापवर्माने आपल्या मित्रांशी सल्लामसलत केली. ज्याला दिव्यदृष्टी होती त्याने ती फुले कुठे उगवतात ती जागा सांगितली. जो वायुवेगाने पळू शकत होता तो म्हणाला, "तू चिंता करुं नकोस, राजकुमार! मी तिथे जाऊन ती फुले तुझ्यासाठी घेऊन येईन!" तो लगेच निघाला. राजपुत्र व दोघे मित्र त्या विश्रामगृहांत वाट पाहात बसले होते. मध्यरात्रीपूर्वी एक मित्र राजपुत्राला म्हणाला, "आपला सहकारी त्या जागी पोंचला आहे आणि तो फुले घेऊन परत यायला आत्ताच निघतो आहे!"

तो मित्र फुले घेऊन आला आणि सूर्योदय होण्यापूर्वीच प्रतापवर्मा घाईघाईने राजवाड्यांत राजाला भेटायला गेला.



जरी चंद्रसेनाने त्याचे हंसून स्वागत केले, तरी राजपुत्राने हे अवघड काम पूर्ण केले याचा राजाला विषाद वाटला. पण हे काम प्रतापवर्माने कसे पूर्ण केले हे विचारण्याचे धाडस राजाला झाले नाही. नंतर राजाने दुसरी अट सांगितली. त्याने नोकरांना धान्याच्या बियाण्यांची तीन पोती आणायला सांगितली. ती राजवाड्याच्या अंगणात ओतली व त्यांत माती मिसळली. "आता हे बियाणं सकाळपर्यंत साफ करुन ठेव. तीन पोती भरून झाली पाहिजेत." राजाने आज्ञा केली.

ही अटदेखील अशक्य कोटीतली होती. प्रतापवर्माने क्षणभर विचार केला आणि त्याला चंद्रपुरच्या वाटेवरच्या मुंग्यांची आठवण झाली. त्याने तीनदा टाळी वाजवली आणि हजारो मुंग्या तिथे लौकरच जमल्या. काय करायचं होतं ते राजपुत्राने त्या मुंग्यांना सांगितले आणि तो आपल्या राहाण्याच्या ठिकाणी परत गेला. सकाळ होण्यापूर्वी तो परत राजवाड्यांत आला आणि तिथे त्या बियाण्याचा ढीग पाहून राजपुत्र खूष झाला.

लवकरच चंद्रसेन राजाही तिथे आला आणि त्याने सेवकांना ते बियाणे पोत्यांत भरायला सांगितले. शेवटला दाणा उचलेपर्यंत तिन्ही पोती गच भरलेली होती. राजाचा विश्वासच बसेना. पण हे कसं काय जमवलं, हे राजाला कांही विचारता येईना. "ठीक आहे, राजकुमार प्रतापवर्मा, तू निश्चितच हुशार आहेस, पण आता मी जे तिसरे काम करायला सांगणार आहे, ते तुला जमणे शक्यच नाही. राजवाड्याच्या भिंतीबाहेर एक जुने उंच झाड आहे, ते आंतून किडलेले आहे. उद्यां सकाळपर्यंत त्या झाडाच्या खोडाचा संपूर्णपणे भुगा झाला पाहिजे. मात्र ते झाड तोडायचे नाही!"

राजपुत्र राजवाड्याच्या लोखंडी फाटकापलीकडे गेला व त्याने ते झाड बघितले. तो जमिनीवर झोपला आणि त्याने हांक मारली, "उंदीर राजा, मला वांचवायला आता तूच ये." लौकरच शेंकडो उंदीर तिथे गोळा झाले आणि त्यांनी राजपुत्राने सांगितल्यावरुन झाड कुरतडायला सुरवात केली. राजपुत्र उठून तिथे सकाळी येऊन पाहतो तो काय, झाड तिथे नव्हतेच. त्याऐवजी लांकडी



चूर्णाचा ढीग मात्र तिथे दिसत होता. राजपुत्र राजवाड्यांत गेला आणि त्याने राजाला भेटायची अनुज्ञा मागितली. राजा बाहेर आला तेव्हां त्याने द्वाररक्षकांना बोलावून राजपुत्र जे सांगतोय त्याबद्दल खात्री करुन घेतली.

"राजकुमार प्रतापवर्मा, तू माझ्या तिन्ही अटी पूर्ण केल्या आहेस. तेव्हां आता मीही माझा शब्द पाळीन. उद्यां माझ्या मुलीशी, चंद्रमतीशी, तुझा विवाह होईल. तेव्हां त्यासाठी तू तयार रहा." चंद्रसेन राजा म्हणाला.

पण होकार देण्यापूर्वी प्रतापवर्माने कैदेत खितपत पडलेल्या सर्व राजकुमारांची सुटका झाली पाहिजे म्हणून आग्रह धरला. प्रतापवर्मा अशी मागणी करेल याची चंद्रसेनला अपेक्षा नव्हती. तो प्रतापवर्मावर फार नाराज झाला.

परंतु चंद्रमती व प्रतापवर्माचा विवाह मात्र अत्यंत थाटांत साजरा झाला. विवाहानंतर प्रतापवर्मा लगेच प्रतापगडला जाण्यासाठी निघाला. सोबत त्याचे तिघे मित्र होते. त्यांनाही चंद्रसेनने घोडे दिले होते. ते नूतन दांपत्याच्या पाठोपाठ जात होते.

पण दुष्ट चंद्रसेनाचा डाव कांही निराळाच होता. त्याने आपल्या कांही सैनिकांना प्रतापवर्माच्या मागून जायला सांगितले होते. दूर अंतरावर गेल्यावर सैनिकांनी प्रतापवर्मावर हल्ला करुन त्याला व त्याच्या तिघा मित्रांना पकडून आणायचे, व राजकन्येला सुखरूप परत चंद्रसेनच्या राजवाड्यांत घेऊन यायचे, अशी राजाची आज्ञा होती. प्रतापवर्मा इतका हुशार व वरचढ ठरला होता, ते चंद्रसेनला अजिबात आवडले नव्हते. कैदेतल्या अनेक राजकुमारांना सोडून देण्याची प्रतापवर्माची अट चंद्रसेनला बोचली होती.



जेव्हां राजाचा हा दुष्ट कावा प्रतापवर्माला समजला, तेव्हां तो व त्याचा धनुर्विद्येत प्रवीण असणारा मित्र, या दोघांनी मिळून सैनिकांशी निकराचा सामना दिला. या दोघांनी त्यांच्यावर बाणांचा वर्षाव केला. बहुतेक सैनिक मारले गेले किंवा प्राण वांचवायला पळून गेले. त्यानंतर प्रतापवर्माने आपल्या राजधानीकडे प्रवास चालू केला. मुलाने अशी रूपवती सून आणल्याबद्दल त्याच्या आईवडिलांना अतिशय आनंद झाला. त्यांनी ह्या सर्वांचे मोठ्या उत्साहाने स्वागत केले.



मोठ्यांच्या छोट्या गोष्टी -१

# विवेकानंद आणि हिंस्त्र जनावरे

*स्वामी विवेकानंद (१८६२-१९०२) यांचे मूळ नांव नरेंद्रनाथ होते. श्रीरामकृष्ण परमहंस यांचे ते सर्वांत प्रसिद्ध शिष्य होते. भारताच्या एकमेव अशा आध्यात्मिक सांस्कृतिक वारशाची भारतीयांना ओळख करुन देणे हे त्यांनी आपले ध्येय मानले. १८९३ मधे शिकागोला भरलेल्या सर्वधर्म परिषदेत त्यांनी मन हेलावून टाकणारे भाषण केले आणि पाश्चिमात्य जगाला भारताच्या ज्ञानसंपदेची जाणीव करुन दिली होती.*



आपले गुरु श्री रामकृष्णांचे निधन झाल्यानंतर तरुण विवेकानंदांनी भारतभर भ्रमंती केली व आपल्या गुरुचा आदेश लोकांपर्यंत नेला. एकदा वाराणसीजवळ ते एका निर्जन वाटेने एकटेच जात होते. अचानक माकडांचा एक दांडगा कळप त्यांच्या पाठोपाठ येऊं लागला. विवेकानंद पळत सुटले. पण त्या चपळ माकडांपुढे त्यांचा किती काळ टिकाव लागला असता? माकडे आणि ते यांच्यामधले अंतर कमीकमी होऊं लागले, आणि ते मनांतून खूप घाबरले. अचानक त्यांना धीर देणारा एक आवाज ऐकू आला. रस्त्याच्या कडेला एक साधुमहाराज बसलेले होते. त्यांनी विवेकानंदांना हांक मारुन म्हटले, "पळूं नकोस. त्या जनावरांना सामोरा जा!"

विवेकानंद झटकन थांबले. ते मागे वळले आणि धिटाईने ते जागच्याजागीच उभे राहिले. अचानक माकडेही थांबली. विवेकानंद त्यांच्याकडे एकटक बघत राहिले. तेव्हां ती हळूंहळूं पांगली व निघून गेली.

न्यूयॉर्कमधे एका भाषणांत त्यांनी हा प्रसंग श्रोत्यांना सांगितला. स्वामी विवेकानंद त्यावेळेला

म्हणाले, "तो एक खरोखरीच चांगला धडा मी शिकलो. संकटाशी सामना करा, त्याला धीटपणे सामोरे जा. त्या माकडांप्रमाणेच समस्याही आपल्या पाठीमागून सतत येत असतात. आपण त्यांच्यापासून पळत सुटता कामा नये. जर आपल्याला त्या संकटाचा परिहार करायचा असेल, तर आपल्या मनावर, विचारांवर विजय मिळवायला हवा. आपण अज्ञान, भीती आणि अशांतता यांच्यासमोर बेडरपणे उभे ठाकले पाहिजे. कारण भेकडांच्या हातून कधीही कांहीही साध्य होत नाही."

विवेकानंद नुसतेच शूर नव्हते, तर त्यांचा आपल्या मनावर पूर्णपणे ताबा होता. त्यांना कशाचीही भीती वाटत नसे. भारताचे भवितव्य उज्वल आहे याची त्यांना खात्री वाटत होतीच. पण अधूनमधून देशांतली दीन परिस्थिती व लोकांचा स्वार्थीपणा पाहून ते फारच निराश व उदासवाणे होत असत. अशाच विमनस्क मनस्थितीत असताना ते जंगलात शिरले. विचारांच्या नादांत ते दिवसभर भटकत राहिले. त्यांना कांहीही खायला मिळाले नव्हते. क्षणभर त्यांना जगण्याचीदेखील इच्छा नव्हती. सूर्यास्त झाला आणि ते एका झाडाखाली अंधारात लवंडले. आणि एकाएकी झुडुपांच्यामागून एक वाघ दबा धरुन बसलेला त्यांच्या दृष्टीस पडला. लौकरच तो वाघ त्यांच्या दिशेने पुढे येऊं लागला.



विवेकानंदांनी काय केलं असेल असं तुम्हाला वाटतं? ते घाबरले होते कां? ते पटकन झाडावर चढले कां? नाही. ते अत्यंत शांतपणे श्वास रोधून निजून राहिले. त्यांच्या मनांत विचार आला, "निदान ह्या प्राण्यासाठी मी चांगलं भोजन होईनच कीं!" आणि ते आपल्या अंतिम क्षणाची वाट पाहात पडून राहिले.

नवल म्हणजे वाघाने क्षणभर त्यांच्याकडे बघितले, आणि तो हळूंहळूं दुसऱ्या बाजूला निघून गेला. तरीही विवेकानंद लगेच उठले नाहीत. त्यांना वाटले, वाघाला अद्याप नीट भूक लागली नसेल किंवा तो आपल्या कुटुंबकबिल्यासह येत असेल. रात्रभर ते त्याच जागी स्वस्थपणे पडून राहिले.

वाघ कांही तिथे परत आला नाही.

योगी म्हणतात कीं जेव्हां तुमच्या मनांत यत्किंचितदेखील भीतीचा लवलेश नसतो, तेव्हां भीतीचे कारणच नाहीसे होते. *(एम्.डी.)*

# नाही कुंपण, नाही चोरी!




गुजरातमधल्या आणंद जिल्ह्यांत, पेटली या खेडेगांवातल्या घरांना कुंपणे नाहीत. फक्त रात्री दारे बंद असतात. तरीही, गेल्या २५ वर्षांत एकही गुन्हा या गांवात नोंदवलेला नाही. पोलिसांकडे तक्रार नाही, आणि वाद मिटवण्यासाठी कुणी कोर्टाची पायरी चढले नाहीत. एकदा दोघा रहिवाशांमधे चार झाडांच्यावरुन मतभेद झाला. गांवातल्या पंचायतीने दोन तासांतच या वादाचा निवाडा केला. दोन झाडे एकाला दिली, एक झाड दुसऱ्याला दिले आणि चवथे झाड दोघांच्या समाईक मालकीचे ठेवले! या गांवात अस्पृश्यता पाळली जात नाही. गांवातल्या वीस विहिरींचे पाणी कुणीही घेऊं शकतो; गांवातल्या तीन देवळांत जाऊन कुणीही प्रार्थना करुं शकतो. म्हणून राज्य सरकारने पेटली हे गांव "तीर्थग्राम" (यात्रा करण्याजोगे) म्हणून घोषित केले आहे.

# कालिदासाचे मंदिर

सर्वश्रेष्ठ संस्कृत कवी व नाटककार कालिदास हा पांचव्या शतकांतल्या उज्जैनीच्या विक्रमादित्य राजाच्या दरबारांतल्या नवरत्नांपैकी एक होता. कालिदासाच्या नांवाने ओरिसामधल्या केंद्रपारा जिल्ह्यांत बाबाकारपूर खेड्यांत एक मंदिर बांधलेले आहे.



त्या खेड्यांतला जमीनदार बलराम मांबारबर रे, हा संस्कृत पंडित होता. त्याने १८०२ साली हे कालिदासाचे मंदिर बांधले. त्या खेड्यांतले आणि आसपासच्या गांवातले लोक तेव्हांपासून कविकुलगुरुच्या ह्या दगडी मूर्तीला भजतात. या मंदिरात सर्व धार्मिक पूजाविधी नियमितपणे पार पडतात. हे मंदिर, श्रीश्रीकविकालिदास मंदिर म्हणून प्रसिद्ध आहे.



# घमेंडीचा परिणाम

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असताना बोधिसत्वांनी गुणवंत नामक वीणा वादकाच्या रूपाने जन्म घेतला. सोळावे वर्ष लागले, त्या वयांत साऱ्या जंबुद्वीपात त्याची बरोबरी करू शकणारा कोणी वीणावादक राहिला नाही. तेव्हां काशीराजाने आपल्या दरबारी त्याची नेमणूक केली.

त्यानंतर कित्येक वर्षांनी काशीचे काही व्यापारी व्यापार करण्याकरिता उज्जयिनी नगरात आले. गुणवंतच्या वीणेने काशी राज्यातील सर्व लोकांमध्ये त्याच्या वीणेची अभिरुची निर्माण झाली होती. त्यामुळे काशीच्या व्यापाऱ्यांनी उज्जयिनीच्या व्यापाऱ्यांना सांगितले - "आम्हाला वीणावादन ऐकावयाचे आहे. ह्या नगरातील प्रसिद्ध श्रेष्ठ अशा वीणावादकांना बोलावून त्यांचा कार्यक्रम आयोजित करावा. जो कांही खर्च होईल, तो सर्व खर्च आम्ही करू."

उज्जयिनीच्या कलाकारांमध्ये धनवंत नांवाचा सिद्ध वीणावादक होता. काशीच्या व्यापाऱ्यांचे मनोरंजन करण्याकरिता त्याच्या वादनाचा कार्यक्रम आयोजित करण्यास आला. धनवंत आपली वीणा घेऊन जिथे व्यापाऱ्यांची राहुटी होती तेथे आला. वीणेच्या तारा लावून घेऊन त्या छेडू लागला. खूप वेळ तो वाजवीत राहिला, परंतु काशीच्या व्यापाऱ्यांच्या चेहऱ्यावर कांहीच आनंद दिसला नाही. नंतर त्याने काही गाणी वीणेवर वाजविली. परंतु त्या गाण्याचा परिणाम सुद्धा व्यापाऱ्यांच्यावर झाला नाही.

शेवटी धनवंतने हताश होऊन विचारले - "काय हो, मी इतका वेळ वीणावादन करीत राहिलो. परंतु आपल्या कोणाच्याच चेहऱ्यावर आनंदाचे भाव प्रकट झाले नाहीत. आपल्याला माझे वीणावादन पसंत पडले नाही का?"

काशीच्या व्यापाऱ्यांना आश्चर्य वाटले.



त्यांच्यातील एका व्यापाऱ्याने म्हटले -

"अरे वा, आपण आतापर्यंत वीणा वाजवीत होता का? आम्हाला वाटले की आपण आपल्या वीणेच्या तारा जुळवीत आहात!"

दुसरा म्हणाला - "आम्हाला वाटले की, आपली वीणा बहुधा बिघडली असावी, तारा नीट जुळवता न आल्याने आपण त्या झंकाराने त्रासले असाल! माफ करावे."

ह्या संभाषणाने धनवंतचा चेहरा खिन्न झाला. म्हणाला - "आपण माझ्यापेक्षा खूप मोठ्या कलाकाराचे वीणावादन ऐकलेले असणार. त्यामुळे आपणाला माझे वीणावादन तितकेसे आवडले नाही. कृपा करून मला त्या कलाकाराचे नांव सांगावे."

"काय? आपण आमच्या काशी राज्यातील दरबारी वीणावादक गुणवंत याचे नांव ऐकले नाहीत का?" व्यापाऱ्यांनी विचारले.

"काय ते खूप मोठे वीणाविद्वान आहेत कां?" धनवंतने विचारले.

"त्यांच्या वीणावादनापुढे आपण त्यांच्यासमोर कोणत्याच रंगेत बसू शकत नाही." व्यापाऱ्यांनी सांगितले.

"तर मग, आजपासून मी आता त्यांच्या बरोबरीचा कलाकार म्हणून घेईपर्यंत विश्रांती घेणार नाही. तोपर्यंत आपल्याला मी केलेल्या कार्यक्रमाचे पैसे देण्याची अजिबात जरूरी नाही." असे उत्तर देऊन धनवंत त्याच दिवशी घरांतून बाहेर पडून काशी नगरांत गेला आणि बोधिसत्वाच्या घरी जाऊन पोहोचला.

बोधिसत्वाने धनवंतला विचारले - "मुला, तू कोण? कशाकरिता आलास?"

"महात्मन, मी उज्जयिनी नगरीचा रहाणारा आहे. माझे नांव धनवंत. आपल्याकडून वीणावादन शिकायला आलो आहे. आपला माझ्यावर अनुग्रह झाला तर आपल्या तोडीचा कलाकार म्हणून मी गणला जाईन." धनवंताने त्याला उत्तर दिले.

बोधिसत्वाने त्याला वीणा शिकवायचे मान्य केले.

धनवंत रोज त्याच्या घरी वीणा शिकायला, तसाच बोधिसत्वाबरोबर राजदरबारांत जाऊ लागला.

खूप वर्षे लोटली. एके दिवशीं बोधिसत्वाने धनवंतला म्हटले - "मी जे कांही शिकलो आहे, ते सर्वच्या सर्व मी तुला शिकवले आहे. आता तू आपल्या देशांत परत जाऊ शकतोस."

परंतु धनवंतच्या मनांत उज्जयिनीला जाण्याचा विचार नव्हता. कारण तिथे त्याच्या विद्येचा आदर करणारा कोणीही नव्हता. वीणावादनात जेव्हां तो निष्णात नव्हता, तेव्हां उज्जयिनीच्या रहिवाश्यांना तो निपुण वाटत होता. तेव्हां कोणत्यातरी कारणाने काशी राज्यांतल्या दरबारातील कलाकार व्हावं तेव्हाच त्याची प्रतिष्ठा होईल असे त्याला वाटले. आता बोधिसत्वाच्या बरोबरीने कला प्राप्त झाली आहे. बोधिसत्व म्हातारे होत आले आहेत. त्यामुळे काशीच्या दरबारात त्यांचे स्थान आपल्याला मिळाले पाहिजे, असा विचार मनांत करून धनवंत बोधिसत्वांना म्हणाला - "मी उज्जयिनीला परत जाण्याचा विचार करीत नाही. आपणाला माहितच आहे की आपल्या बरोबरीने मी ही कला प्राप्त केली आहे. तेव्हां आपणच मला राजदरबारातील वीणा वादकाची नोकरी देववावी."

दुसऱ्याच दिवशी बोधिसत्वाने राजाकडे ती गोष्ट सांगितली. राजाने विचार करून सांगितले - "धनवंत आपल्याकडे पुष्कळ वर्षे शिष्य म्हणून राहिला आहे, त्याला दरबारांतील एक विद्वान म्हणून ठेवून घेऊ. परंतु आपल्याला जो पगार मिळतो, त्यातील अर्धा पगार त्याला दिला जाईल. जर ह्या निर्णयाला तो सहमत असेल तर त्याने राजदरबारातील ह्या पदाचा स्वीकार करावा."

बोधिसत्वाच्या तोंडून ते ऐकताच खूष न होता, धनवंतचे मन द्वेषाग्नीने भडकले. तो विचार करू लागला. "मी गुणवंतपेक्षां कोणत्या गोष्टीत



कमी आहे? मला त्याच्या इतकाच पगार न देता अर्धा कां म्हणून देणार?''

धनवंत राजाकडे गेला आणि म्हणाला - ''महाराज, मी असे ऐकले की, आपण मला अर्ध्या पगारावर आपल्या दरबारातील जागेवर नेमत आहात. मी माझ्या गुरूच्यापेक्षा कोणत्याच विद्येत कच्चा नाही. तरी त्यांना जो पगार मिळतो तेवढाच पगार मला पण दरबारकडून मिळाला पाहिजे.''

राजा त्याच्या उत्तराने संतापला आणि म्हणाला - ''मी तुला गुणवंतच्या शिष्याच्या रूपाने पहातो. त्याच्या तोडीचा म्हणून मुळीच नाही. तेव्हां प्रत्यक्षांत तुझे वीणावादन मी जेव्हां ऐकेन, दोघांचे वादन बघेन. नि तेव्हांच कबूल करीन.''

''आपणाला पाहिजे तर माझी परीक्षा अवश्य घेऊन पहावी.'' धनवंत राजाला म्हणाला.

''ठीक! वेळ आल्यावर मी तुमच्या दोघांच्या-मध्ये जुगलबंदी ठेवतो. जर तुझे वादन गुरूच्या तोडीस तोड निघाले, तर मी तुला त्यांच्याएवढा पगार देववीन. नाही तर तुला राजदरबारांतून काढून टाकीन. तुला ह्या अटी मंजूर आहेत का?'' राजाने विचारले. धनवंतने त्या अटी मान्य केल्या.

त्यानंतर गुरु व शिष्य दोघांत अटीतटीचा सामना सुरू झाला. ते दोघे एक दुसऱ्याला जिंकण्याच्या ईर्षेने वीणा वाजवू लागले. त्यांत बोधिसत्वाच्या वीणेची एक तार तुटली. परंतु ते इतर तारांच्या सहाय्याने वीणा वाजवू लागले. ते पाहून धनवंतने आपल्या वीणेची एक तार जाणून बुजून तोडली. बोधिसत्वाच्या वीणेची आणखी एक तार तुटली, तेव्हां धनवंतने आपल्या वीणेची आणखी एक तार तोडली. असे होत होत बोधिसत्वानी वीणेच्या सर्व तारा तोडल्या. परंतु बोधिसत्वानी आपल्या मोडक्या वीणेवर गायला सुरवात केली. धनवंतला ते जमले नाही. दरबारी लोकांनी आनंदाने टाळ्या वाजवल्या.

धनवंतला तो अपमान मात्र मुळीच सहन झाला नाही. तत्क्षणी तो दरबारांतून बाहेर पडून निघून गेला व त्याच दिवशी तो उज्जयिनीला परत गेला.









# रामायण

महर्षी वाल्मिकींचा आश्रम तमसा नदीच्या किनाऱ्यावर होता. एके दिवशी नारदमुनी तिथे आले. वाल्मिकींनी शास्त्रोक्त विधीने त्यांची पूजा केली आणि विचारले, ''महात्मन्, या युगांत सकलगुणसंपन्न आणि महापराक्रमी असा एखादा पुरुष आहे कां?''

तेव्हां नारदांनी वाल्मिकींना श्रीरामकथा सविस्तर सांगितली. तोपर्यंत त्यांची स्नानाची वेळ झाली. नारद गेल्यानंतर वाल्मिकी आपला शिष्य भरद्वाज ह्याला घेऊन तमसेच्या कांठावर गेले.

तिथे त्यांना क्रौंच पक्ष्यांची एक जोडी दिसली. वल्कले नेसूनच ते पाण्यांत उतरले आणि त्या पक्ष्यांचा आनंद व उत्साह कौतुकाने पाहात राहिले. तेवढ्यांत एका भिल्लाने त्या नरावर आपला बाण सोडला. तो पक्षी तडफडत खाली पडला. ती मादी आर्त चित्कार करुन विव्हळू लागली. ते दृश्य पाहून वाल्मिकींच्या मनांत त्या पक्ष्यांबद्दल दया निर्माण झाली व त्या भिल्लाचा त्यांना राग आला. त्यांच्या तोंडून अभावितपणे एक श्लोक बाहेर पडला. त्यांत त्यांनी म्हटले होते, ''अरे कठोर मानवा, प्रेमांत मग्न असलेल्या दोन पक्ष्यांपैकी तू एकाला मारलेस. आता जन्मभर तू कधी सुखी व शांत असणार नाहीस.''

आपल्या तोंडून निघालेला हा श्लोक पाहून खुद्द महर्षींनाच आश्चर्य वाटले. आश्रमांत परत गेल्यानंतरही ते त्याचाच विचार करीत राहिले.

तितक्यांत ब्रह्मदेव त्यांना भेटायला आले. त्यांना पाहून वाल्मिकी चटकन उठले आणि त्यांनी साष्टांग नमस्कार घातला. व ते मौन पाळून



उभे राहिले. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाले, ''वाल्मिकी, माझ्या अनुग्रहामुळे तू आता कविता करायला लागला आहेस. यापूर्वी तू रामकथा ऐकली आहेस. ती कथा महाकाव्याच्या रूपांत तू रच; जोपर्यंत ही पृथ्वी आहे, तोपर्यंत ती कथा शाश्वत राहील. जोपर्यंत तुझा संचार उत्तमलोकांत राहील.'' असं सांगून ब्रह्मदेव अदृश्य झाले.

अशा रीतीने ब्रह्मदेवाच्या प्रोत्साहनाने प्रेरित होऊन वाल्मिकीने रामायणाची रचना केली. ती वाचणाऱ्या प्रत्येकालाच आनंद होऊं लागला.

वैवस्वत हा सूर्याचा पुत्र होता. इश्वाकु वैवस्वतचा पुत्र होता. वैवस्वत हा सातवा मनू झाला व त्याने अखंड कीर्ती मिळवली. त्याच्यानंतर इश्वाकूचे वंशज सूर्यवंशी म्हणून ओळखले जाऊं लागले.

त्यापैकी एक होता सगर. तो सहा चक्रवर्ती-पैकी एक होता. स्वर्गातून गंगा आणणारा भगीरथ या सगरचा नातू होता. सूर्यवंशी राजांनी अयोध्यानगरी ही आपली राजधानी केली व कोसल देशावर राज्य केले. वैवस्वत मनूने स्वतः अयोध्या नगरी वसवली होती.

शत्रूंना अभेद्य अशा या अयोध्येवर राजा दशरथ राज्य करीत होता. दशरथ महापराक्रमी व कुबेराच्या तोडीचा ऐश्वर्यसंपन्न होता.

त्याचे, दृष्टी, जय, जिय, सिद्धार्थ, अर्थ साधक, अशोक, मंत्रपाल व सुमंत असे आठ मंत्री होते. वसिष्ठ महर्षी त्यांचे कुलगुरु होते. वसिष्ठ व वामदेव त्यांचे पुरोहित होते. देशाच्या काना-कोपऱ्यांतल्या बातम्या त्यांच्या गुप्तचरांकडून त्यांना समजत होत्या. या मंत्र्यांच्या सहाय्याने राजा दशरथ उत्तमप्रकारे राज्य करीत होता. त्यांची प्रजा सुखी होती. कुणावर अन्याय होत नव्हता. सर्व वर्णांचे लोक आपापला धर्म पाळीत होते. राज्यांत कुणीही दीन, दुःखी नव्हता.

दशरथाला कांहीही कमी नव्हते. फक्त त्याला मूलबाळ नव्हते. म्हणून तो नेहमी काळजीत असे. एकदा त्याच्या मनांत आले कीं आपण अश्वमेध यज्ञ करुन देवतांना संतुष्ट करावे आणि संतान मिळवावे. आपल्या मंत्र्यांमधला प्रमुख असणाऱ्या सुमंतामार्फत त्याने वसिष्ठ, वासुदेव, सुयज्ञ, बाबालि वगैरे गुरु व श्रेष्ठ ब्राह्मण ह्यांना बोलावून घेतले व त्यांचा सल्ला विचारला. त्यांनाही हा अश्वमेध यज्ञाचा विचार आवडला.

ते सारेजण परत गेल्यानंतर सुमंतने दशरथाला म्हटले, ''महाराज, आपला विचार अत्यंत योग्य आहे. पण हा यज्ञ करण्याची शक्ती व महिमा केवळ



ऋष्यशृंगामधेच आहे. त्याच्यापेक्षां श्रेष्ठ असा आणखी कुणी ज्ञानी नाही. त्याची माहिती माझ्याकडून ऐकावी.'' आणि नंतर सुमंताने पुढील कथा सांगितली.

अंगदेशचा राजा रोमपाद दशरथ राजाचा मित्र होता. एकदा अंगदेशांत दुष्काळ पडला. रोमपाद काळजीत पडला. दुष्काळावर कोणता उपाय करावा यासाठी त्याने ब्राह्मणांना सल्ला विचारला.

ब्राह्मणांनी मत सांगितले, ''महाराज, ऋष्यशृंग हा विभांडक ऋषींचा पुत्र आहे. जिथे तो राहातो, त्या भागांत कधीही दुष्काळ पडत नाही. त्याला अंगदेशला आपण बोलावून घ्या. आपली कन्या शांता हिच्याशी त्यांचा विवाह केला, तर त्यांची कायम वास्तव्याची सोय अंगदेशातच करता येईल. आणि देशांत कधीही दुष्काळ पडणार नाही. देश नेहमी संपन्न व सदाहरित राहील.''

रोमपादाने आपले मंत्री व पुरोहित यांना बोलावून घेतले आणि त्यांना सांगितले, ''तुम्ही सर्वजण जा आणि ऋष्यशृंगाला इथे घेऊन या.''

हे ऐकून मंत्री व पुरोहित घाबरले, कारण ऋष्यशृंग तर अरण्य व तपस्या सोडून कुठेही जातयेत नव्हता. कुणीही बोलावलं तरी तो जात नसे. संतापून जाऊन त्याने शापवाणीही कदाचित् उच्चारली असती. त्याला अंगदेशांत घेऊन येण्यासाठी दुसरा एखादा मोहमयी उपाय योजायला हवा होता. पुरोहिताने विचार करून रोमपादला उपाय सुचवला.

''महाराज, ऋष्यशृंग बाळपणापासून अरण्यांत राहून वेदाध्ययन करत राहिला आहे. तो तपश्चर्येत मग्न असतो. पण त्याला रानावनांत



निसर्ग सौंदर्य बघायलाही खूप आवडते. तो त्या अरण्याच्याबाहेर कधीही आजवर गेला नाही. पण रानफुले, प्राणी, पक्षी पाहाण्यासाठी तो खूप हिंडतो. त्याला सांसारिक ज्ञान काडीमात्र नाही. स्त्रिया कशा असतात हे त्याला माहिती नाही. आपण जर कांही नृत्यांगनांना त्याच्याकडे पाठवलं तर कदाचित त्यांच्याकडे आकर्षित होऊन ते त्यांच्याबरोबर इकडे येईल.''

रोमपादने ह्या कल्पनेला संमती दिली. कांही नर्तकींना चांगल्या प्रकारे दागदागिने घालून, नटूनथटून ऋष्यशृंगाच्या आश्रमांत पाठवले. ऋष्यशृंग नेहमी पित्याची सेवा करीत असल्यामुळे आश्रम सोडून कुठेही जात नव्हता. परंतु एके दिवशी कांही कारणामुळे तो आश्रमाबाहेर आला. तिथे त्या नृत्यांगना गाणी गात नाचत नाचत त्याच्याजवळ आल्या. त्यांचे



सुंदर रूप, मनमोहक वस्त्रालंकार पाहून व मधुर गायन ऐकून ऋष्यशृंग आश्चर्यचकित झालाच, पण त्याशिवाय त्यांचे लाडिक हावभाव पाहून तो मोहित झाला.

त्या नर्तकींनी त्याला विचारले, ''आपण कोण आहात? आणि ह्या अरण्यांत आपण एकटेच कां फिरत आहात?''

''मी विभांडक महर्षींचा पुत्र आहे. आपण साऱ्याजणी आश्रमांत आलात तर मी आपली योग्य तऱ्हेने पूजा करीन.''

ऋष्यशृंगाने त्यांना सांगितलं. त्या त्याच्याबरोबर आश्रमांत गेल्या व त्याने दिलेली कंदमुळे व फळें त्यांनी खाल्ली. त्या नर्तकींनीदेखील आपल्यातर्फे कांही मेवामिठाई त्याला दिली व म्हटले, ''हीदेखील फळेंच आहेत. आपण खाऊन पाहावी. आता आमच्या तपश्चर्येसाठी आम्हाला परत गेले पाहिजे.'' असं म्हणून त्या तिथून निघून गेल्या.

ऋष्यशृंगाने ती पक्वान्नं खाल्ली. नेहमीच्या फळांपेक्षांही जास्त चवदार होती. दुसऱ्या दिवशी, त्या नर्तकींना पाहाण्यासाठी व त्यांना भेटण्यासाठी तो उत्सुकतेने त्याच जागी गेला. त्याला पाहून नर्तकी म्हणाल्या, ''महाराज, आपणही आमच्या आश्रमांत यावे. तिथे आपले स्वागत आम्ही आनंदाने करुं.''

ऋष्यशृंगाने आनंदाने संमति दिली आणि तो त्यांच्याबरोबर गेला. ऋष्टशृंगाने अंगदेशात प्रवेश केला आणि पावसाला सुरवात झाली. रोमपादाने ऋष्यशृंगाचे मनापासून स्वागत केले, त्याला साष्टांग प्रणिपात केला, आणि अशा प्रकारे त्याला आपल्या देशांत बोलावल्याबद्दल त्याची क्षमा मागितली. नंतर आपली मुलगी शांता हिच्याशी त्याचा विवाह केला. आता ऋष्यशृंग शांताबरोबर अंगदेशांत राहायला लागला.

सुमंताने ही कथा सांगितली, तेव्हां दशरथाला फारच आनंद झाला. वसिष्ठ महर्षींची अनुमती घेऊन, आपल्या राण्या व मंत्र्यांना घेऊन दशरथ अंगदेशाला गेला. रोमपादाने दशरथाचे भव्य स्वागत केले. नंतर त्याने मोठ्या आनंदाने आपली मुलगी शांता व जांवई ऋष्यशृंग ह्यांना दशरथाबरोबर अयोध्येला पाठवले.

ऋष्यशृंग अयोध्येला येऊन कांही दिवस लोटले. वसंत ऋतू सुरुं झाला. दशरथाने ऋष्य-शृंगाला विनंती केली, ''कृपा करुन आपण यज्ञाला सुरवात करावी आणि स्वत: त्याचे पौरोहित्य करावे.''



अश्वमेध यज्ञाची जोरदार तयारी सुरुं झाली. यज्ञ करणारे, वेदपठण करणारे सुयज्ञ, वाबालि, काश्यप, इत्यादि श्रेष्ठ ब्राम्हण आमंत्रित केले गेले. सरयू नदीच्या उत्तरेच्या तटावर यज्ञशाळा बांधण्यात आली.

एका शुभदिनी सुमुहूर्तावर दशरथ राजा यज्ञशाळेंत पोंचला. यज्ञाला सुरवात झाली. पहिला हविर्भाग इंद्राला अर्पण केल्यानंतर होम चालूं झाला.

अश्वमेध यज्ञ तीन दिवसांचा असतो. शास्त्रोक्त विधी संपल्यानंतर दशरथ राजाने यज्ञ करणाऱ्या ऋत्विजांना सारी भूमी दान दिली. पण ते राजाला म्हणाले, ''महाराज, ही भूमी घेऊन आम्ही काय करणार? त्याऐवजी आम्हाला रत्नें, सोने, गायी किंवा असं कांहीतरी दान म्हणून द्यावं.'' दशरथाने त्यांना दहा लाख गायी, शंभर कोटींचे सोने व चारशे कोटींची चांदी दान दिली.

ब्राम्हणांना हे जे दान मिळालं, ते त्यांनी ऋष्यशृंग व वसिष्ठ यांना समर्पित केलं. तेवढ्यांत एक दरिद्री ब्राम्हण तिथे आला आणि त्याने दशरथासमोर हात पसरले. दशरथाने लगेच आपल्या हातांतले कंकण उतरवले आणि त्या ब्राम्हणाला दिले. सर्व उपस्थित ब्राम्हणांनी दशरथाची प्रशंसा केली.

अश्वमेध यज्ञ पूर्ण झाला, आणि त्यानंतर ऋष्यशृंगाने दशरथाकडून पुत्रकामेष्टि यज्ञ करवला. सर्व देवीदेवता येऊन आपापल्या आसनांवर बसल्या. त्यावेळी देवतांनी ब्रम्हदेवाला सविस्तर सांगितलं कीं रावणासुराच्या हातून त्यांना खूपच त्रास होतो आहे.

ब्रम्हा त्यांना म्हणाले, ''दुष्ट रावणाने वरदान



मागितलं होतं कीं त्याचा मृत्यू देव, दानव, गंधर्व किंवा यक्षांच्या हातून होऊं नये. त्याच्या नजरेत असा पराक्रमी मानव कुणीही नव्हता. मानव हे त्याला अशक्त, नि:सहाय व साधेसुधे वाटत होते. माणसासारखा क्षुद्र प्राणी त्याला कांहीही करुं शकत नाही, अशी रावणाची ठाम समजूत होती. माणसापासून त्याला कुठलाही धोका नव्हता. म्हणून त्याने मानवापासून संरक्षण मागितले नाही. आता ऐक, दशरथाच्या राण्यांपैकी एकीचा पुत्र होऊन महाविष्णु जन्म घेणार आहेत, आणि मनुष्यरूपांत ते रावणाचा संहार करतील.'' ही भविष्यवाणी ऐकून देवता फारच आनंदित झाल्या.

तितक्यांत होमकुंडातून झगमगत्या प्रकाशांत एक दिव्यपुरुष प्रकट झाला. त्याच्या हातांत एक कलश होता. तो कलश सोन्याचा होता व त्याचे झांकण चांदीचे होते.



त्या दिव्य पुरुषाने दशरथाला म्हटले, "राजन्, या कलशांत देवतांनी बनवलेली खीर भरली आहे. प्रजापतीच्या आज्ञेनुसार मी ती घेऊन आलो आहे. ही खीर तुझ्या राण्यांना खायला दे. त्यानंतर त्या लौकरच गर्भवती होतील आणि पराक्रमी पुत्रांना जन्म देतील."

दशरथाने मोठ्या आनंदाने तो कलश आपल्या हातांत घेतला आणि त्या दिव्य पुरुषाला प्रदक्षिणा घातली.

त्या कलशांतली अर्धी खीर दशरथाने कौसल्येला दिली, उरलेल्या खिरीतला अर्धा भाग सुमित्रेला आणि अर्धा भाग कैकेयीला दिला. तिघींना खीर वाटून दिल्यानंतरही जी थोडीफार उरली, ती पुन्हां सुमित्रेला दिली. लौकरच तिन्ही राण्यांना दिवस राहिले.

एकीकडे महाविष्णू मानवरुपांत प्रकट होण्याची तयारी करीत होते, तर दुसरीकडे ब्रम्हाच्या आज्ञेनुसार देवतांनी कामरूपी वानरांची सृष्टी निर्माण केली.

देवेंद्रापासून वाली, सूर्यापासून सुग्रीव, कुबेरापासून गंधमादन, अश्विनीकमारांपासून मैंदद्विविद, विश्वकर्माकडून नल, अग्निकडून नील, वरुणापासून सुषेण, पर्जन्यापासून शरथ व वायुदेवापासून हनुमान, यांचा जन्म झाला. हे सर्व महाबलि वानर श्रेष्ठ होते. इतर देवतांच्या कृपेने हजारो वानर जन्मले. हे वानर ऋष्यमूक पर्वताजवळ राहायला लागले, आणि वाली, सुग्रीव यांना आपला राजा निवडून, व नल, नील, हनुमान, यांना आपले मंत्री बनवून, त्यांचा जीवनक्रम सुरळीत चालू झाला.

पुत्रकामेष्टि यज्ञ पूर्ण झाल्यानंतर बाराव्या महिन्यांत चैत्र शुक्ल नवमीच्या दिवशी पुनर्वसु नक्षत्रावर कौसल्याने रामाला जन्म दिला. पुष्य नक्षत्रावर कैकेयीने भरताला जन्म दिला, व आश्लेषा नक्षत्रावर भर दुपारी मध्यान्हकाळी सुमित्राने भरत व शत्रुघ्न यांना जन्म दिला.

अयोध्यानगरीच्या नागरिकांनी आनंदोत्सव साजरा केला. साऱ्या नगरीत नृत्यगायनाच्या फैरी झडूं लागल्या. राज्यांत आनंदाची लाट पसरली. गोरगरीबांना भोजन व वस्त्रें देण्यांत आली. वातावरणांत शीतल संगीताचे स्वर गुंजत राहिले. केवळ राजमहालांतच नव्हे, तर प्रत्येक प्रजाजनाच्या घरांत राजकुमारांचा जन्मोत्सव साजरा होत होता. दशरथाने ब्राम्हणांना भरपूर अन्नदान व गोदान केले.

चारी बालके हळूंहळूं मोठी होत होती. राम व लक्ष्मण जरी एका मातेचे पुत्र नव्हते, तरी ते दोघेजण सतत एकत्र असत. त्याचप्रमाणे भरत व शत्रुघ्नही एकत्र फिरत व जोडीने खेळत असत. चौघांनी वेदशास्त्रांचे अध्ययन केले. धनुर्विद्या शिकून ते पारंगत झाले आणि पित्याची सेवा-शुश्रूषा करीतच ते तारुण्यांत प्रवेश करते झाले. त्यांचे विवाह आता करायला हवेत म्हणून दशरथ राजा मंत्री व पुरोहितांशी सल्ला मसलत करूं लागला.

राजा ह्याविषयी विचारविनिमय करत असतांनाच द्वारपालाने येऊन सांगितलं, "महाराज, कुशिक वंशातले, गाधी राजकुमार विश्वामित्र महर्षी आपल्या दर्शनासाठी आले आहेत आणि द्वारापाशी आपली प्रतीक्षा करत आहेत."

दशरथराजा लगेच पुरोहितांना घेऊन विश्वामित्रांचे स्वागत करण्यासाठी गेला, त्याने महर्षींची पूजा केली व त्यांचे आदराने स्वागत केले.

विश्वामित्राने विचारले, "राजन्, तू आणि तुझी प्रजा ठीक आहे ना? शत्रूचे कांही भय तर नाही ना?" सर्वांची विचारपूस केल्यानंतर विश्वामित्रांनी वसिष्ठांशी बोलत राजभवनांत प्रवेश केला व त्यांच्यासाठी ठेवलेल्या खास आसनावर ते विराजमान झाले.

"महामुनी, आपल्या येण्याने आम्ही धन्य झालो आहोत. सांगावं, मी आपल्यासाठी काय करुं?" दशरथाने विचारले.

विश्वामित्र प्रसन्न होऊन म्हणाला, "राजन्, मी ज्या कामासाठी आलो आहे ते पूर्ण करून तू सत्यनिष्ठ राजा आहेस हे सिद्ध करुन दाखव. मी एक यज्ञ सुरुं केला, पण दोन पराक्रमी राक्षसांनी



माझ्या यज्ञाच्या वेदिकेवर रक्तमांस विखरून टाकले आणि माझा व्रतसंकल्प मोडून काढला. तुझा ज्येष्ठ मुलगा राम तू माझ्याबरोबर पाठव. मारीच व सुबाहू नांवाचे ते दोन्ही राक्षस माझ्या यज्ञांत विघ्न आणणार नाहीत याची काळजी राम घेईल."

हे ऐकून दशरथाचे मन विदीर्ण झाले, त्याच्या हृदयाचा थरकांप झाला. सिंहासनावरुन खाली उतरताना दशरथ कांपऱ्या स्वरांत म्हणाला, "महर्षी, राम अजून लहान आहे. त्याला अजून सोळाव वर्षदेखील पूर्ण झालेलं नाही. त्याचं धनुर्विद्येचं शिक्षण अद्याप पुरं व्हायचंय. तो राक्षसांशी कसा लढेल? माझी एक अक्षौहिणी सेना आहे. मी स्वतः येऊन त्या राक्षसांशी युद्ध करीन व त्यांना मारून टाकीन. पण त्यापूर्वी मला सांगा, ते राक्षस आहेत तरी कोण?"

विश्वामित्र सांगू लागले, “तुला रावण नांवाचा राक्षसांचा राजा माहीत आहेच. ब्रम्हाला प्रसन्न करुन त्याने अनेक अमोघ शक्ती मिळवल्या आहेत. तो विश्रावसचा पुत्र आहे. साक्षात कुबेराचा धाकटा भाऊ आहे. तेव्हां तो स्वतः या यज्ञांत विघ्न आणूं शकत नाही आणि म्हणून तो या बलदंड मारीच, सुबाहू यांना पाठवत असतो.”

“राक्षसराज रावण? त्याच्याशी मी काय लढत देऊं शकणार? आणि जे काम मला करता येत नाही, ते हा किशोरवयी राम कसा करुं शकेल?” दशरथाने आपली असमर्थता प्रगट केली.

विश्वामित्रांचे डोळे संतापाने लाल झाले. ते एकदम उठताउठता म्हणाले, “महाराज, हीच कां तुमची सत्यनिष्ठा? आपले वचन इतक्यांतच विसरलात! अपकीर्तिचा डाग सांभाळीत सुखी राहा.”

कुलगुरु वसिष्ठांनी दशरथ राजाला गंभीरपणे सांगितलं, “राजन्, जे करायला नको, ते आपण करता आहात. वचन मोडून आपण इश्वाकू वंशाला कलंकित करीत आहात. विश्वामित्र महर्षींना आपण नीट ओळखलं नाही कां? त्यांना अज्ञात असलेलं एकही शस्त्रअस्त्र अस्तित्वांत नाही. नवीन अस्त्रें निर्माण करण्याची शक्ती त्यांच्यामधे आहे. त्यांना राक्षसांना मारता येत नाही, म्हणून ते आपल्याकडे आले आहेत अशी आपली धारणा आहे कां? ते आपल्या पुत्रांसाठी एक नवी दिशा, नवीन कार्य घेऊन आलेले आहेत. विश्वामित्रांच्या सहवासांत राहून आपल्या राजकुमारांच्या विद्येत व ज्ञानांत पूर्णत्व येईल; त्याशिवाय त्यांना यशही मिळेल, कीर्ति मिळेल. आपले पुत्र सामान्य नाहीत. ते दिव्य पुरुष आहेत. विश्वामित्र आपल्या कोमलवयी कुमारांना घेऊन जायला आलेले आहेत. आपण निश्चिंत मनाने रामला त्यांच्याबरोबर पाठवावे. जोपर्यंत विश्वामित्र त्यांच्याबरोबर आहेत, तोपर्यंत त्यांना कुणीही कांहीही करुं शकणार नाही.”

वसिष्ठाने असा हितबोध केल्यामुळे राजा दशरथाला जरा धीर आला. त्याने राम व लक्ष्मणाला विश्वामित्रांच्या स्वाधीन केले. ते दोघेही विश्वामित्रांच्या मागोमाग जायला लागले. दोघांच्याजवळ धनुष्यबाण होते व हातांत खड्गही होते.







# बुद्धिमत्ता

रत्नाकर नंदनपुरातील एक फार मोठा व्यापारी होता. त्याचा एकुलता एक मुलगा होता अजितसेन. शीलवती ही चित्रावती नगरीतील एका गर्भश्रीमंताची, सुंदर, गुणवान आणि बुद्धिमान अशी मुलगी होती. या मुलीविषयी माहिती समजताच रत्नाकरने आपला मुलगा अजित सेन ह्याचे शीलवतीशी लग्न लावून दिले. शीलवतीच्या सौंदर्यावर व बुद्धिमत्तेवर अजित सेन मोहित झाला होता. पण रत्नाकर मात्र आपल्या सुनेवर योग्य लक्ष ठेवीत होता.

एक दिवस मध्यरात्री एक रिकामा घडा घेऊन शीलवती घरांतून बाहेर पडली. आणि बऱ्याच वेळाने रिकाम्या हाताने परत आली. हे पाहून रत्नाकरने विचार केला की त्याची सून जरा जास्तच धीट अन् साहसी आहे. अशा मुली दोन्हीकडील कुटुंबांच्या बदनामीस कारणीभूत होऊं शकतात. मग काय, दुसऱ्याच दिवशी रत्नाकरने आपल्या मुलास म्हटले “अरे बाबा, थोडे दिवस सुनेला तिच्या माहेरी पाठवून दे” अजितच्या मनांत तिला माहेरी पाठवायचे नव्हते, म्हणून त्याने त्याबाबत कांही विशेष उत्साह दाखवला नाही, पण त्याचबरोबर त्याने वडिलांना स्पष्टपणे विरोधही केला नाही.

त्यानंतर सुनेला माहेरी पाठवायची जबाबदारी रत्नाकरने स्वतःच घेतली अन् तिला बरोबर घेऊन तो घरातून निघाला. वाटेत त्यांना एक नाला लागला. रत्नाकरने सुनेस समजावले, की तिने चपला हातांत घेऊन नाला ओलांडावा. पण तिने मात्र चप्पल घालूनच नाला ओलांडला. सुनेने आपले बोलणे ऐकले नाही, ह्याचे त्याला वाईट वाटले, पण प्रत्यक्षांत त्याने उघडपणे कांही म्हटले नाही. थोडे पुढे गेल्यावर पीक कापणीला आलेले एक शेत पाहून रत्नाकरने म्हटले, “अरे वा! काय छान तरारुन पीक आलं आहे. ह्यावर्षी ह्या शेताच्या मालकास चांगलाच फायदा होणार.”

“सारं अन्नधान्य स्वतः खाऊन फस्त नाही केलं, तरच ना?” सुनेने एका क्षणांत म्हटले.

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



रत्नाकरला जरा आश्चर्य वाटले की त्याची सून अशी कशी विचित्र उत्तरे देते! पण लोक तर हिला हुषार अन् बुद्धिमान समजतात. ते दोघे पुढे जाऊं लागले. वाटेत एका नगरातून जाताना त्या शहराच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन रत्नाकरने म्हटले, ''वा, किती छान आहे हे शहर!''

''कोणी शत्रूने उध्वस्त नाही केलं तरच ना!'' शीलवतीने ठसक्यांत उत्तर दिले.

आणखी थोडा प्रवास केल्यावर, थकून जाऊन रत्नाकर विश्रांतीसाठी एका वटवृक्षाच्या सांवलीत बसला. शीलवती झाडापासून दूर जाऊन बसली.

रत्नाकरने विचार केली ''ही तर हट्टी अन् मूर्ख आहे. मोठ्या माणसांच्या कुठल्याच बोलण्याची ती पर्वा करत नाही. हिला एकदा माहेरी सोडलं कीं तिच्यापासून सुटका होईल.''

ह्यानंतर बैलगाडीतून थोडा पुढचा प्रवास करून ते एका गांवात आपल्या एका परिचितांकडे राहिले.

जेवण करून थोडी विश्रांतीही घेतली. रत्नाकर गाडींतच आडवा झाला, पण शीलवती मात्र गाडीच्या सांवलीत जाऊन बसली.

त्याच वेळी झाडावर बसलेला एक कावळा 'काव काव' करू लागला. ह्यावर शीलवती उद्गारली ''ए कावळ्या, कां उगीच ओरडतोस? एक चूक केल्यामुळे मला माझं घर सोडावं लागलं. आता दुसरी चूक केली तर आपल्या नवऱ्यास तोंड दाखवायलाही मला जागा उरणार नाही.''

हे बोलणे ऐकून रत्नाकर आश्चर्यचकित झाला. गाडीतून उतरून सुनेजवळ जात त्याने विचारले, ''सूनबाई, तुझ्या ह्या बोलण्याचा अर्थ काय?''

''मामंजी! आता काय सांगू? ज्याप्रमाणे सुगंधी असल्यानेच लोक चंदन उगाळतात, त्याप्रमाणे माझे खास गुणच जणूं माझे वैरी बनले आहेत. मला पक्षांची, तसेच जनावरांची भाषा समजते.'' शीलवतीने उत्तर दिले.

रत्नाकरला वाटले की कदाचित त्याची सून थोडी वेडसर असावी. पण शीलवती पुढे बोलतच राहिली ''कांही दिवसांपूर्वीच मध्यरात्रीच्या वेळीं एक कोल्ही ओरडत होती की नदीतून एका स्त्रीचे प्रेत वाहात चालले आहे. प्रेताच्या अंगावर बरेच दागिने आहेत. हे ऐकताच मी एक रिकामा घडा घेऊन नदीवर गेले. प्रेत पाण्यांतून बाहेर काढून त्यावरचे दागिने काढून घेऊन घड्यांत भरले. तो घडा जमिनीत एका ठिकाणी पुरला, अन् मग कोल्ह्यांना खायला मिळावं म्हणून प्रेत तेथेच टाकून आले. ह्या छोट्याशा चुकीमुळेच तुमच्या



मनांत माझ्याविषयी शंका आली आणि माझी ही अशी परिस्थिती झाली.''

हे उत्तर ऐकताच रत्नाकरला आश्चर्यही वाटले आणि त्याचबरोबर आपल्या सुनेची दयाही आली. शीलवतीने पुढे म्हटले ''हे पहा, माझ्यावर ह्या पशुपक्षांची मोठी कृपाच आहे. तो कावळा केव्हापासून ओरडतोय की ह्या, झाडाखाली मोठा खजिना पुरलेला आहे.''

त्याच क्षणी रत्नाकरने त्या झाडाखाली खड्डा खोदला. त्याला मोठाच खजिना सापडला. रत्नाकरच्या मनांत आपल्या सुनेबद्दल एकदम विश्वास अन् आदरभाव निर्माण झाला. त्याने शीलवतीला म्हटले, ''मुली! मी तुला नीट समजूं शकलो नाही. मला ह्याच खरंच फार वाईट वाटतं आहे. चल, आता घरी चल बरं.''

परतीचा प्रवास आरामशीर झाला. रस्त्यांत जेव्हां तेच वडाचे झाड दिसले तेव्हां रत्नाकरने विचारले, ''माहेरी जाताना तू वडाच्या झाडाच्या सांवलीत कां बसली नाहीस?''

सूनेने उत्तर दिले, ''वडाच्या झाडाच्या ढोलीत साप असतात अन् झाडावर बसलेल्या पक्षांची विष्ठा खाली पडते.'' रत्नाकरने हसून म्हटले, ''हो, तू योग्यच बोललीस.''

ह्यानंतर तेच शहर वाटेत लागले. तेव्हां शीलवतीने स्वतःच सांगितले 'ह्या शहरांत प्रवाशांच्या सोयीसाठी एकसुद्धा धर्मशाळा नाही. अगदी सहजासहजी कोणीही शत्रू हे शहर आपल्या कबजात घेईल.''

ह्यानंतर कापणीला आलेले शेत लागले, तेव्हां शीलवतीने म्हटले, ''ह्या शेतमालकाने जर शेतातील धान्य विकून, त्या पैशाचा सदुपयोग केला, तरच त्याला खरा फायदा होईल.''

आणखी थोडे दूर गेल्यावर तोच नाला वाटेत लागला. तेव्हां शीलवती म्हणाली, ''नाल्यांत दगड



धोंडे असतात तसेच अनेक जीवजंतूही; म्हणूनच पाण्यांतून जाताना नेहमी चपला घालूनच जावे." ह्यावर रत्नाकरने आपल्या सुनेच्या बुद्धिमत्तेची मनापासून प्रशंसा केली.

घरी परतताच रत्नाकरने घराची सारी जबाबदारी शीलवतीवर सोपवली. अजितसेनने मनोमन जाणले की शीलवती आता रत्नाकरच्या विश्वासास पात्र ठरली आहे.

त्याच वेळेला त्या देशाचा राजा नव्या मंत्र्याची नेमणूक करू इच्छित होता. त्याने देशातील अनेक बुद्धिमंताना आमंत्रण पाठवून बोलावले आणि त्यांच्याबरोबर तो विचारविनिमय करू लागला.

ह्याविषयीच खल चालू होता, त्यांच्या परीक्षा घेतल्या जात होत्या. अजितसेनही आपल्या पत्नीस घेऊन राजधानीला गेला, व राजाच्या धर्मशाळेत उतरला. राजाने अचानक सर्व पंडिताना विचारले, "राजाला जो लाथ मारेल, त्याला कोणती शिक्षा द्यावी?"

राजाकडून 'वाहवा' मिळवण्याच्या हेतूने सर्वच विद्वान अशी उत्तर देत होते की "अशा राजद्रोहास अगदी कडक शिक्षा दिली पाहिजे." कोणी म्हटले कीं अशा अपराध्याचे डोके उडवले पाहिजे.

अजितसेन सर्व प्रेक्षकांमध्ये बसून हे सर्व ऐकत होता. तत्क्षणी तो धावत पळत धर्मशाळेत पोचला अन् त्याने राजाचा प्रश्न शीलवतीस ऐकवला.

शीलवतीने अजितसेनला समजावून सांगितले 'अहो राजाला कोण बरं लाथ मारेल? एक तर शृंगारक्रीडेच्या वेळी प्रेमाने त्याची पत्नी किंवा त्याच्या मांडीवर खेळणारं छोटं मूल. ह्यांची शिक्षा हीच की त्यांच्यावर अजून जास्त प्रेम करावं."

अजितसेनने दरबारांत परत येऊन पाहिले की लोक निरनिराळ्या प्रकारची उत्तरे देत होते.

थोडया वेळानंतर सर्वच जण गप्प झाल्यावर अजितसेनने म्हटले, "महाराज! राजाला लाथ मारणाऱ्यांवर राजाने जास्तीत जास्त प्रेम करावे!"

बस! मग काय, अजितसेनला राजाचे मंत्री पद मिळाले. ह्यानंतर शीलवतीच्या मदतीने, राजाला वेगवेगळे पण योग्य सल्ले देणारा अजितसेन हा मोठा बुद्धिमान मंत्री म्हणून ओळखला जाऊं लागला.





















# गजलक्ष्मी

रंगनाथ एक जमीनदार होता. त्याचबरोबर शहरांत तो कांही व्यापारही चालवीत होता. लोक म्हणत कीं त्याच्या घरच्या नोकरांना तो चांगला पगार देत असे व त्यांची नीट व्यवस्थाही पाहात असे. त्याच्याकडे काम मिळवायला लोक उत्सुक असत.

प्रमोद रंगनाथकडे काम करीत होता. आपल्या भावाला मदत करण्यासाठी त्याला दूरदेशी जावे लागणार होते. प्रमोदच्या जागी तितकाच दक्ष असा चंद्र हा रंगनाथला योग्य वाटत होता.

प्रमोदची जागा चंद्रला द्यावी असा त्याने विचार केला. पण रंगनाथच्या पत्नीने त्यांत मोडता घालीत म्हटले, ''हे बघा, माणूस शोधायचं हे काम तुम्ही माझ्या भावावर, शिवच्यावर सोंपवा. तो अगदी नक्की चंद्रपेक्षां जास्त लायक माणूस शोधून आणील.''

ही बातमी समजल्याबरोबर रंगनाथचा मेव्हणा शिव, हा रंगनाथला भेटून म्हणाला, ''माझ्या ओळखीचा हरी हा प्रमोदपेक्षां कितीतरी पटीने जास्त चांगला आहे. त्याची कामाची पद्धत जरा वेगळी आहे. तो सर्वतोपरी लायक आहे.''

रंगनाथने लगेच म्हटलं, ''कोणताही निर्णय असा घाईघाईने घेता कामा नये. मी नोकरांना न सांगता त्यांची निरनिराळ्या प्रकारांनी परीक्षा घेत असतो. कांहीजण कांही कामें चांगली करतात, पण प्रमोदचे प्रत्येक काम व्यवस्थित व यशस्वी असते. म्हणून मला तो आवडतो. माझा त्याच्यावर जीव आहे.'' आणि त्याने प्रमोदच्या कामाविषयी आणखी कांही गोष्टी कौतुकाने सांगितल्या.

रंगनाथच्या शहरांतल्या कापडाच्या दुकानांत प्रमोद काम करीत होता. प्रमोदच्या हुशारीमुळे रंगनाथचा फायदा वाढत्या प्रमाणांत होता. जास्त पगाराची लालूच दाखवून अनेक व्यापाऱ्यांनी त्याला आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला. पण प्रमोद बधला नाही. त्याने त्यांचे प्रस्ताव साफ नाकारले होते. हे ऐकल्यावर रंगनाथला त्याची खात्री करून घ्यायची होती. खरी गोष्ट काय ते जाणून घेण्याची जबाबदारी त्याने आपला मित्र बापट ह्याच्यावर सोंपवली.

बापटने प्रमोदला भेटून विचारले, ''रंगनाथ तुला दरमहा हजार रुपये पगार देतो. मी तुला दोन हजार देईन. मी एक नवीन कापडाचे दुकान उघडणार आहे. तू त्यांत काम करायला येशील कां?''

प्रमोदने ''नाही'' अशाअर्थी मान हलवीत सांगितले, ''अहो, मला तीन हजार रुपये पगार द्यायलादेखील कांही लोक तयार आहेत. पण मी त्यांना नकार दिलाय.''

बापटने प्रमोदची कींव करीत म्हटले, ''आपल्या उत्पन्नापेक्षां कधी जास्ती दानधर्म करूं नये. मी तुला चार हजार रुपये देईन. तू जर रंगनाथकडेच कायम राहिलास तर आयुष्यांत तुझी उन्नति होणार नाही. आहे तिथेच कायमचा राहाशील.''

हे ऐकून प्रमोदने हंसतच उत्तर दिले, ''हे बघा साहेब, जो दूरदृष्टी ठेवतो, त्याच्यासाठी पगारापेक्षां त्याचा मालक महत्वाचा असतो. माझ्या मालकांचा व्यापार कमी व्हावा, त्यांचे नांव बदू व्हावे, म्हणून हे लोक मला आमिष दाखवतात. त्यांचा हेतू जेव्हां साध्य होईल तेव्हां ते मला बाहेरचा रस्ता दाखवतील. रंगनाथराव माझी अडचण असेल तेव्हां मला लागेल ती मदत करतील याची मला खात्री आहे.''

बापटने हा संवाद रंगनाथला सांगितला. रंगनाथ फारच खूष झाला. दुसऱ्याच दिवशी प्रमोदच्या धाकट्या बहिणीचे अचानक लग्न ठरले. लग्नाचा मुहूर्त तीन महिन्यानंतरचा होता, पण प्राथमिक



खर्चासाठी हजार रुपयांची ताबडतोब जरुरी होती. प्रमोदजवळ एवढी रक्कम शिल्लक नव्हती, म्हणून त्याने रंगनाथकडे याचना केली.

रंगनाथच्या मनांत आले कीं प्रमोदची पुन्हां एकवार परीक्षा घ्यावी. त्याने जरा निराशेचा सूर लावीत म्हटले, ''महिनाभर कुणालाही कर्ज द्यायचे नाही असा मी निश्चय केला आहे.'' आणि त्याने प्रमोदला दोन हजार रुपये हातांत देत म्हटले, ''मी हे पैसे कांही खास कामासाठी बाजूला लपवून ठेवले होते. ते जरा गुप्त काम आहे. दोन महिनेपर्यंत ही रक्कम तू तुझ्यापाशी सुरक्षित ठेव. त्यांतला एक पैसादेखील खर्च करायची चूक तू करूं नकोस!''

प्रमोद गप्प बसला आणि ती रक्कम घेऊन तो घराच्या वाटेला लागला; तेव्हां बापट पुन्हां त्याला रस्त्यांत भेटला आणि म्हणाला, ''मी ऐकलं कीं तुला पैशांची जरा निकड आहे. आणि रंगनाथ कांही



तुला मदत करायला तयार नाही. अजून नीट विचार कर आणि माझ्याकडची नोकरी घे."

प्रमोदने बापटला नखशिखान्त न्याहाळत उत्तर दिले, "मी वेळोवेळी माझा विचार बदलत नाही. एकदा जे ठरवतो, तेच करतो. माझ्या दृष्टीने रंगनाथराव एक चांगले मालक आहेत."

रंगनाथचे बोलणे ऐकून शिवने म्हटलं, "जर प्रमोद व्यापारांत इतका हुशार असला तर त्याची परीक्षा घेण्यामागचा तुमचा व बापटचा हेतू त्याला समजला नसेल कां? मला तर वाटतं तुम्ही त्याला चांगली बक्षिसी दिली असेल. तुमच्या चांगुलपणाचा तो व्यवस्थित फायदा घेणारा असेल बघा."

रंगनाथ हंसतच त्याला म्हणाला, "अरे, प्रमोदची गोष्ट सोडून दे. तू त्याच्या जागी जे माणूस सुचवतो आहेस, त्याची परीक्षा तू कशी घेतलीस?"

शिवने झटक्यांत उत्तर दिले, "वेगळ्या परीक्षेची कांही जरूरच नाही. माझी बायको सगळ्यांच्या घरी जाऊन माहिती काढत असते. गांवच्या चौकशा करीत बसायची तिला संवयच आहे. तुम्ही कोणाच्याही घरी जाऊन पाहा, प्रत्येक स्त्री आपल्या नवऱ्याबद्दल कांहीतरी कुरकुर करत असते. केवळ ती बायको आहे व त्याला सांभाळून घेते, म्हणूनच त्यांचा संसार सुरळीत चाललाय असं सांगत असते. पण हरीची पत्नी ही एकच स्त्री अशी आहे, कीं जी आपल्या नवऱ्याची बारेमाप स्तुति करत असते. हरी हा चांगला माणूस आहे, याचा यापेक्षां दुसरा जास्त खात्रीलायक पुरावा नकोच पाहायला!"

रंगनाथला आपल्या मेव्हण्याचे हे विश्लेषण कांही पटले नाही. तेव्हां रंगनाथच्या पत्नीने भावाची बाजू घेऊन म्हटले, "माझ्या भावाच्या सांगण्यावर तुमचा विश्वास नसेल तर तुम्ही त्याचीही जास्त मोठी परीक्षा घ्या."

रंगनाथने याविषयी प्रमोदचा सल्ला विचारला. त्याने थोडा वेळ विचार करुन सांगितले, "जेव्हां हरी घरांत नसेल तेव्हां आपण त्यांच्या घरी जाऊं या. हरीच्याबाबतीत त्याच्याच बायकोकडून आपल्याला हवी असलेली माहिती काढून घेऊं."

ते दोघे हरीच्या घरी गेले. प्रमोदने हरीच्या बायकोला सांगितलं, "मी रंगनाथरावांच्या कापडदुकानांत खूप वर्षे काम करतो आहे. मला आता माझ्या भावाकडे त्याच्या मदतीसाठी जाणे भाग पडते आहे, म्हणून मला ही नोकरी सोडावी लागते आहे. रंगनाथरावांची इच्छा आहे की माझ्या



जागी त्यांचा जवळचा नातेवाईक चंद्र याची नेमणूक करावी. तुम्हाला चंद्रची जी कांही माहिती असेल ती आम्हाला ऐकायची आहे, म्हणून आम्ही तुमच्याकडे आलो आहोत."

गजलक्ष्मीने खाकरून गळा साफ करीत म्हटले, "अहो, त्या चंद्रबद्दल मी काय हो तुम्हाला सांगणार? तो अगदी पक्का दारुडा, लांचखाऊ आणि खोटारडा आहे. हल्ली तर तो माझ्या नवऱ्याशी बोलतदेखील नाही." ती बेधडक सांगत होती.

"बरं झालं तुम्ही सांगितलंत ते! ही माहिती आमच्या चांगली उपयोगी पडेल." प्रमोदने म्हटलं आणि ते दोघेजण तिथून निघून गेले.

रस्त्यांत प्रमोद रंगनाथला म्हणाला, "मला वाटतं कीं गजलक्ष्मीचा नवराच दारुडा व लांचखोर असावा. चंद्र कसा आहे ते आपल्याला चांगलं माहीत आहे. त्यामुळे गजलक्ष्मीच्या बोलण्यांत मुळीच खरेपणा नाही हे स्वच्छ आहे."

"पण हरीला ही वाईट व्यसने असावीत असं तू कसं म्हणू शकतोस?"

"मालक, आपल्याला माहीतच असेल की जेव्हां पंडुराजाने आपल्या पुत्राला, धर्मराजाला विचारलं कीं त्याच्या माहितीतल्या लोकांपैकी चांगले कोण आहेत आणि वाईट कोण आहेत? तेव्हां धर्मराजाने लगेच उत्तर दिलं कीं सगळेच चांगले आहेत, कुणीही वाईट नाहीत. जेव्हां हाच प्रश्न दुर्योधनाला विचारला गेला, तेव्हां त्याने उत्तर दिलं, कीं त्याला कुणामधेही चांगुलपणा आढळला नाही." प्रमोदने सांगितलं.

रंगनाथने चटकन प्रमोदचा हात हातांत घेऊन म्हटले, "तुझ्याबाबतीत मला एक शंका आहे. तू इतका हुशार आहेस, तर स्वतःचा स्वतंत्र व्यापार कां सुरुं करीत नाहीस? माझ्याकडे कां नोकरी करतो आहेस?"

प्रमोदने हंसून म्हटले, "जमीन सगळीकडे सारखीच असते. पण कांही झाडांना फळें लागलात तर फुलझाडांना फक्त फुलेच येतात. कुणाची हुशारी व्यापारधंद्यात कामाला येते, तर माझी हुशारी चांगला धनी निवडण्यांत कामी आली आहे."

प्रमोदच्या संयमी वृत्तीची रंगनाथने प्रशंसा केली, आणि आठवडाभरांतच चंद्रला आपल्या कापडाच्या दुकानांत कामावर ठेवले.



दिसत होता कीं जणूं कांही तो मोठे काम करायला निघाला होता. आणि तरीही तो केशवचे रक्षण करणार होता, केशवचा हितकर्ता होता आणि केशववर कोणतेही संकट येऊं देणार नव्हता.

"तू म्हणाला होतास कीं आता आपण मित्र आहोत. पण जे संकट माझ्यावर येईल, त्यापासून मला कसं वाचवायचं आहे त्याचा विचार तू केला आहेस कीं नाही ते मला माहीत नाही." केशवने म्हटलं.

जयमल्लने वर डोंगराच्या शिखराकडे बघितलं. तिथे एका दगडावर रेलून ब्राम्हदंडी उभा होता व ह्यांच्याकडेच बघत होता. लागलीच जयमल्लने केशवला सावध करीत म्हटले, "इतक्या मोठ्याने बोलूं नकोस. त्याचे कान भारी तिखट आहेत. तुला संरक्षण देणे हे माझ्यासाठी फारच आवश्यक आहे. भयंकर घाटीमधे जायला कोण योग्य आहे, हे ब्राम्हदंडीकडून मला आजच समजलंय. तुझ्या खांद्यावरची सापाची खूण पाहून तो किती खूष झाला ते तू बघितलं आहेसच. मला वाटतं भयंकर घाटीत प्रवेश मिळण्यासाठी या खुणेचा कांहीतरी गहरा संबंध आहे. आणि हे रहस्य फक्त त्यालाच माहिती असा[illegible] रात्री [illegible] एखादी शा[illegible] देऊन तुझ्या [illegible] या भयंकर घाटीचा मार्ग व तिथल्या खजिन्याबद्दलची माहिती तो बदलून घेईल. ही माहिती मिळाली कीं मग आपण ब्राम्हदंडीला दुसऱ्या लोकांत पाठवून देऊं. तू अगदी घाबरूं नकोस."

"पण आपल्याअगोदर त्यानेच हालचाल करुन आपल्यालाचा परलोकांत धाडलं तर?" केशवने शंका प्रकट केली.

"तो असं कांहीही करणार नाही. आता तो धन व कीर्तीच्यामागे लागलेला आहे. त्यामुळे त्याचे सांकेतिक ज्ञान सध्यां लुप्त झालेले आहे, नाहीतर आपल्याला दोघांना असे एकत्र मिळून-मिसळून हिंडायला त्याने परवानगी कशी दिली असती?" जयमल्ल म्हणाला.

डोंगरावरुन ब्राम्हदंडी यांच्याकडे बघत होता. तो हंसत सहजपणे म्हणाला, "शिष्य जयमल्ल, येतायेता थोड्या बेलाच्या समिधा वगैरे घेऊन ये. काळभैरव भुकेने व्याकुळ झालेला आहे. उपासकांच्या या आराध्यदैवताला हजार वर्षांतून एकदाच भूक लागते." ***(अपूर्ण)***





वेताळ-कथा

# नास्तिकाची दैवी प्रार्थना

निश्चयाचा महामेरु विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले, ते खांद्यावर घेतले आणि त्याने स्मशानाकडे जाणारा मार्ग धरला. तेव्हां शवाच्या आंत लपलेल्या वेताळाने राजाला विचारलं, "राजन, या भयंकर ठिकाणी मध्यरात्री तू इतके कष्ट झेलतो आहेस हे पाहून मला नवल वाटते आहे. तसं पाहिलं तर कांही आस्तिक लोक धनाचा उपयोग दानधर्मासाठी करीत असतात. ते नंतर गरीब होतात. पण असेही नास्तिक असतात कीं ते दानधर्माबाबत कधीही विचार करीत नाहीत. ते पैसे सांठवीत बसतात आणि बघताबघता करोडपती बनतात. ते सर्व तऱ्हेची सुखे उपभोगतात. मी तुला असलेच



दोघे आस्तिक आणि नास्तिक पितापुत्र होते त्यांचीच गोष्ट सांगतो. थकावट दूर करण्यासाठी तू त्यांची गोष्ट लक्षपूर्वक ऐक.'' आणि वेताळाने पुढील कथा सांगितली.

भाग्यपुरमधे राहाणाऱ्या धनपालला वाड-वडिलांकडून भरपूर संपत्ती मिळाली. त्याचबरोबर त्याचे मन दयाळू, देवभक्तीत रमणारे असे होते. कुणीही गरजू मनुष्य त्याच्याकडून रिकाम्या हाताने कधीही परत जात नसे. त्याची पत्नी सुरुचि हिचीही परमेश्वरावर श्रद्धा होती, पण देवाच्या नावाने बेसुमार पैसे उधळण्याची आपल्या नवऱ्याची संवय मात्र तिला आवडत नव्हती. ती नेहमी त्याला सांगत असे कीं वाडवडिलांनी दिलेली संपत्ती जपून ती मुलांकडे सोंपवणे हे आपले कर्तव्य आहे. पण धनपालने कधी तिच्या सांगण्याकडे लक्ष दिले नाही.

त्याला श्रीपाल, गोपाल व गुणपाल असे तिघे मुलगे होते. धाकटे दोघे वडिलांच्या आज्ञेत होते. पण थोरला मुलगा मात्र आईच्या शब्दाला जास्त मान देत होता. संपत्तीची जपणूक करण्यासाठी तो लहानपणापासून देवधर्माविरुद्ध होता. त्याखेरीज तो फारच कंजूष होता.

एके दिवशी धनपाल पत्नीला म्हणाला, ''अग, पैसा कांही शाश्वत नसतो, तो संतोष देत नाही. मनुष्याला संतोष मिळतो ते तृप्ती असली की! ज्यांच्या मनांत देवभक्ती व दयाळू वृत्ती नसते, त्यांना कधीही संतोष मिळत नाही.''

सुरुचिने त्याचे बोलणे खोडून काढीत म्हटले, ''जेव्हां जवळ पैसा असतो, तेव्हां त्याचे मोल आपल्याला कधी समजत नाही. पण जेव्हां जवळ पैसा शिल्लक नसतो, तेव्हां नुसता चांगुलपणा उपयोगी येत नाही, साधी कांजीसुद्धां कुणी देत नाही.''

मुले वयांत येईपर्यंत धनपालजवळचे सारे धन खर्च झाले. फक्त वीस एकर जमीन तेवढी शिल्लक राहिली. त्याच्या घरखर्चासाठी शेतांतून मिळणारे उत्पन्न कांही पुरेसं नव्हतं. म्हणून त्याने शेताचा एक तुकडा विकावा अशी इच्छा बोलून दाखवली. तेव्हां सुरुचिने पतीला म्हटलं, ''आता मुले तरुण झाली आहेत. आपल्या संपत्तीचे चार वाटे करा, त्यांचा वांटा त्यांना देऊन टाका, आणि आपला जो हिस्सा आहे, त्याचं तुम्हाला जे हवं ते करा.'' तिने कडवटपणे म्हटलं.

धनपालने तिच्या सांगण्यानुसार केलं. त्याने





चार भागांत जमिनीच्या वांटण्या केल्या व मुलांना सांगितले, ''आपल्यापैकी प्रत्येकजण पांच एकर जमिनीचा मालक आहे. खर्चाच्याबाबतीत ज्यांना माझी पद्धत मान्य आहे त्यांनी माझ्याबरोबर राहावं. ज्यांना माझी पद्धत मान्य नसेल, त्यांनी वेगळे राहावे.''

दुसऱ्या व तिसऱ्या मुलाने पित्याबरोबर राहायचा निर्णय घेतला. पण थोरला मुलगा श्रीपाल वेगळा झाला. त्याला शेतीवर विश्वास नव्हता, म्हणून त्याने गांवातच एक लहान व्यापार सुरुं केला. दोन वर्षांतच तो लक्षाधीश बनला. कांही मित्रांनी त्याच्याकडे पैशाची मदत मागितली, पण श्रीपालने त्यांना कांहीही मदत द्यायचे नाकारले. म्हणून ते त्याला कृपण, कंजूष, म्हणूं लागले.

थोड्याच दिवसांत धनपालची जी थोडी जमीन होती, ती त्याने विकली. खायलादेखील पैसे शिल्लक राहिले नाहीत, तेव्हां त्याने दुसऱ्यांकडे मदत मागितली. पण कुणीही मदत केली नाही. त्यावेळी धर्मपालच्या लक्षांत आलं कीं आपल्या कुवतीबाहेर दान देणे चांगले नाही. जेव्हां कुठलाही मार्ग उरला नाही, तेव्हां तो सहपरिवार थोरल्या मुलाकडे जाऊन म्हणाला, ''तुझ्यांत जी दूरदृष्टी होती, ती माझ्यांत कधीही नव्हती. मला थोडे पैसे कर्जाऊ दे. तुझे भाऊ व मी मिळून कांहीतरी व्यापार सुरुं करूं आणि आमचे पोट भरत लौकरच तुझी रक्कम परत देऊं.'' त्यावर श्रीपाल पित्याला म्हणाला, ''आत्ता तुमच्या हातांत पैसा शिल्लक राहिला नाही, म्हणून तुम्ही



असं बोलता आहात. पैसे हातांत पडले कीं तुमची दानधर्माची संवय उफाळून येईल. म्हणून तुम्ही सगळेजण माझ्याकडे राहा. तुम्हाला कोणत्याही गोष्टींची कमतरता भासणार नाही. पण माझी एक अट आहे. जोपर्यंत तुम्ही इथे राहाल, तोपर्यंत तुमच्यापैकी कुणीही देवाची पूजा किंवा दानधर्म करायचा नाही.''

मुलाची ही सूचना ऐकून धनराज चिडून म्हणाला, ''जोपर्यंत मी जिवंत आहे, तोपर्यंत भक्ती, पूजा केल्याशिवाय, मी राहूं शकणार नाही.'' आणि तो इतरांसह तिथून जरा रागावूनच बाहेर पडला.

श्रीपाल जरी नास्तिक होता तरी त्याने वडिलांचा आदर केला, कुटुंबाचे नीट आदरातिथ्य केले, याबद्दल धनपालला मनांतून समाधान वाटले



होते. पण रोख रक्कम देऊन त्यांना मदत देण्याचे नाकारले, हेही दुःख धनपालला टोंचत होते. हा अपमानास्पद धक्का त्याला सहन झाला नाही, आणि तो आजारी पडला. नीट औषधोपचार करणे शक्य आले नाही, म्हणून धनपालची प्रकृति दिवसेंदिवस खालावत चालली.

अशा परिस्थितीत अंगद नांवाचा एक रामभक्त त्या गांवात आला. तो रामाचे गुणवर्णन सतत करुं लागला, नि गांवकऱ्यांच्या मनांत विश्वास निर्माण झाला. तो ज्या घरी जाईल, तिथें सर्व चांगलेच होत राहाते, अशी त्यांची श्रद्धा बसली.

गोपाल व गुणपालला जेव्हां हे समजलं, तेव्हां त्यांनी अंगदला आपल्या घरी बोलावले. तिथे खाटेवर पडलेल्या धनपालला पाहून अंगद म्हणाला, ''तू रामाला दुखवलं आहेस, म्हणून आज तुझी ही दुर्दशा झालेली आहे.''

धनपालने दीनवाण्या नजरेने नुसते त्याच्याकडे पाहिले, व म्हटले, ''माझा थोरला मुलगा नास्तिक आहे. त्याच्या चुकीची जबाबदारी पिता म्हणून माझीच आहे. यां चुकीचे परिमार्जन मी कसे करुं ते तुम्हीच सांगा.''

गुणपालच्या खांद्यावर प्रेमाने थोपटत अंगदने म्हटलं, ''तुझ्या थोरल्या मुलाने देवभक्ती जरी कधी केली नसली, तरी त्याने देवाला कधी दूषण दिले नाही. तो कंजूष आहे हे खरं, पण त्यामुळे त्याने कधीही कुपात्री दान केले नाही. म्हणून तुमची सर्वांची पुण्याई त्याच्या पदरी जमा झालेली आहे.''

सुरुचि अंगदला म्हणाली, ''आपण जसे सांगाल, तसे भविष्यांत आम्ही पालन करुं. पण अगोदर माझ्या पतिराजांची प्रकृति कशी सुधारेल त्याच्यासाठी उपाय सांगावा.''

''तुझ्या पतिराजांना बरे होण्यासाठी हीरक-भस्म सेवन करावे लागेल. पण ते तयार करण्या-साठी एक लाख रुपयांचे हिरे आणायला लागतील.'' अंगदने सांगितलं.

त्याचे शब्द ऐकून सुरुचि, गोपाल, गुणपाल स्तंभित झाले. आहे त्या परिस्थितीत एक लाख रुपये कुठून आणायचे? त्यांचे मन ओळखून अंगदने सुचवलं, ''पैसे जमा करणे शक्य नसेल तर दुसरा एक उपायदेखील आहे. तुमच्यापैकी कुणीही एकजण धनपालच्या प्रकृतिला आराम मिळावा म्हणून एक संपूर्ण रात्रभर रामाच्या मंदिरात मनःपूर्वक प्रार्थना करायची. त्यांची प्रकृति नक्की सुधारेल, प्रार्थना करणारे घरांतले असोत किंवा गांवकऱ्यांपैकी कुणीही असला तरी चालेल. पण रात्रभर जागून मनोभावे प्रार्थना मात्र केली पाहिजे.''

गोपाल, गुणपाल यांनी त्या रात्रीं राममंदिरात जाऊन, वेगवेगळ्या ठिकाणी बसून पित्याच्या स्वास्थ्यासाठी प्रार्थना केली. दुसऱ्या रात्री सुरुचिने जाऊन रात्रभर प्रार्थना केली. पण त्याचा कांहीही परिणाम दिसला नाही. गांवकऱ्यांपैकी कित्येक लोकांनीही प्रार्थना केली. पण धनपालच्या प्रकृतिमधे काडीमात्र सुधारणा झाली नाही.

अशा स्थितींत श्रीपाल अंगदला भेटला व म्हणाला, ''माझ्या वडिलांबद्दल मला खूप प्रेम व आदर आहे. मी तुम्हाला लाख रुपये देतो. तुम्ही हीरकभस्म तयार करा आणि त्यांना बरे करा.''

अंगदने हंसून उत्तर दिले, ''तू कृपण आहेस. ही रक्कम जर मनःपूर्वक देणार असलास तरच माझे हीरकभस्म प्रभावी ठरेल. त्यासाठी तुला रात्रभर रामाच्या मंदिरात राहावं लागेल. परमेश्वरा-विषयी संपूर्ण श्रद्धा ठेवून प्रार्थना करावी लागेल, तरच तुझे वडील ठीक होण्याची शक्यता आहे.''

श्रीपालने या प्रस्तावाला होकार दिला. पण गांवकऱ्यांनी त्याला मंदिरात येण्यासाठी मज्जाव केला. त्यांनी एका नास्तिकाला मंदिरात येऊं दिले नाही. रात्र झाली. तेव्हां त्यांनी मंदिराचे दरवाजेही बंद केले.

श्रीपाल मंदिरासमोर उभा राहून प्रार्थना करायला लागला. तो देवाला म्हणाला, ''हे राम, असं म्हणतात कीं पित्याची आज्ञा पालन करण्यासाठी तू वनांत निघून गेलास. जर हे सत्य असेल तर माझ्या पित्याच्या प्रकृतिला आराम मिळावा



म्हणून मला तुझ्या मंदिरात प्रवेश मिळायला हवा आहे.''

दुसऱ्याच क्षणीं मंदिराचे दरवाजे आपोआप उघडले. श्रीपाल मंदिरात गेला आणि श्रीरामाच्या मूर्तीसमोर उभा राहून तो प्रार्थना करुं लागला.

सकाळ झाली तेव्हां धनपालला खूपच हुशारी वाटायला लागली व तापही उतरला. साहजिकच, सगळ्यांना आनंद वाटला. श्रीपाल भेटल्यावर धनपालने प्रेमाने त्याला मिठी मारली.

वेताळाने ही गोष्ट सांगून विक्रमार्काला विचारलं, ''राजन, परमभक्त धनपालने आपली सारी संपत्ती घालवली, आणि नास्तिक असणारा श्रीपाल लखपती झाला. हे विचित्र वाटत नाही कां? धनपालची पत्नी व तिच्या दोघा मुलांनीही मंदिरात जाऊन प्रार्थना केली होती, पण त्याचा उपयोग झाला नाही. पण एका नास्तिकाने केलेली प्रार्थना सफल झाली. हे तुला विचित्र, अस्वाभाविक वाटत नाही कां? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील.''

वेताळाची शंका दूर करण्यासाठी विक्रमार्काने उत्तर दिले, ''देवभक्ती आणि आर्थिक परिस्थितीचा कांहीही संबंध नसतो. पूर्वजन्मीचे कर्म हे त्याचे कारण असते. धनपालची पत्नी आणि त्याचे दोघे मुलगे यांचे जे हाल होत होते, त्यामुळे त्यांचा देवावरचा विश्वास उडाला. त्याचमुळे, त्यांनी केलेली प्रार्थना निष्फळ ठरली. संकटाच्या काळांत गांवकऱ्यांनी त्यांना मदत केलेली नव्हती. त्याकारणाने त्यांची प्रार्थनाही निष्फळ ठरली. आता राहिली श्रीपालची गोष्ट! पित्याचा खर्चिक स्वभाव पाहून त्याची समजूत अशी झाली होती कीं देवभक्ती म्हणजे खर्चाचीच वाट! असा तो नास्तिक बनला. पण त्याचे आपल्या पित्यावर फार प्रेम होते, आदरभाव होता, म्हणूनच तो हीरकभस्म तयार करण्यासाठी अंगदला एक लाख रुपये द्यायला तयार झाला. मन शुद्ध असले कीं आणि सत्कार्य करण्यासाठी माणूस जेव्हां पुढे येतो, तेव्हां त्याची प्रार्थना परमेश्वर अवश्य ऐकतो. श्रीपालच्या बाबतीत अगदी हेच घडले.''

राजाचे मौन भंगल्यामुळे वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(''वसुंधरा'' यांच्या रचनेवर आधारित)*





# पुतळ्याला अभिषेक

फेब्रुवारीच्या दुसऱ्या आठवड्यांत कर्नाटकांतल्या हासन जिल्ह्यांतल्या श्रवणबेळगोळा इथे चारी दिशांच्या मार्गांतून असंख्य लोक येणार आहेत. गोमटेश्वर श्रीबाहुबलीच्या पुतळ्यावर ८६वा महामस्तकाभिषेक होणार आहे. हा उत्सव दर बारा वर्षांतून एकदा साजरा होतो. जैनपंथाचे लोक या उत्सवाला आवर्जून उपस्थित राहातात. साऱ्या जगांतून सुमारे तीस लाख भक्त या क्षेत्रांत हजर राहातील असा अंदाज आहे. श्रीबाहुबलीचा पुतळा ५७ फूट (१७.५ मीटर) उंच असून, एकाच दगडांत कोरलेला हा जगांतला सर्वांत मोठा पुतळा आहे.

जैनपंथ हा वर्धमान महावीर याने स्थापन केला. महावीर हा शेवटचा व चोविसावा तीर्थंकर होता. पहिला तीर्थंकर, आदिनाथ ऋषभदेव हा राजा होता. त्याला संन्यास घ्यायची इच्छा झाली. म्हणून त्याने अर्धे राज्य थोरल्या राजपुत्राला, भरतला दिले, व अर्धे राज्य बाहुबली या धाकट्या मुलाला दिले. भरताने स्वतःला चक्रवर्ती म्हणवून घेण्यास सुरवात केली. त्याला बाहुबलीने विरोध केला. त्यांच्या मंत्र्यांनी सामोपचाराची बोलणी केली व युद्ध टळले, पण दोन्ही भावांनी आपसांत लढाई करण्याचे मान्य केले. बाहुबली त्या युद्धांत जरी जिंकला, तरी त्यानेही राज्यत्याग केला व तो वनांत गेला. तिथे त्याने एक वर्षभर अन्नपाणी न घेता तप केले, आणि लौकरच त्याला मोक्षपद मिळाले.

अनेक वर्षांनंतर, दहाव्या शतकांत गंगवंशाच्या राजवटीत दुसऱ्या राचमल राजाचा चामुंडराय हा प्रधान होता. त्याने एकदा आपल्या आईला पौडनपुरा या गांवी नेले. तिथे पूर्वी बाहुबलीचे राज्य होते. या दोघा मायलेकांच्या स्वप्नांत तिथली कुष्मांडिनीदेवी आली, आणि तिने त्यांना तिथल्या चंद्रगिरी टेकडीवरुन दक्षिणेकडच्या इंद्रगिरी टेकडीवर बाण सोडायला सांगितले. दुसऱ्याच दिवशी चामुंडरायने आपला सोनेरी बाण इंद्रगिरीच्या रोखाने सोडला, आणि त्याला त्या टेकडीवर बाहुबलीची आकृति कोरलेली दिसली.



त्याने त्या दगडातून एक पुतळा कोरायला सुरवात केली. नंतर ते काम अनेक शिल्पकारांच्या संघाने पूर्ण केले. चामुंडरायने पहिला मस्तकाभिषेक १३ मार्च, ९८१ या दिवशी केला. त्याला 'गोमटा' म्हणजे देखणा असे म्हणत. म्हणून गोमटचाचा ईश्वर असा तो पुतळा गोमटेश्वर म्हणून ओळखला जाऊं लागला.

या पुतळ्याला भारतातल्या सर्व नद्या व सरोवरांच्या पाण्याने, तसेच शहाळ्याचे पाणी, उसाचा रस, मध, दूध, हळद, चंदनाचे गंध, फुले व रत्ने, यांनी अभिषेक केला जातो.

थोरांच्या गोष्टी (२)

# पराजयांत विजय

इ.पू. ३२६ हे वर्ष भारताच्या इतिहासांतले एक महत्वाचे पान आहे. ग्रीसमधल्या मॅसेडॉनचा धाडसी व महत्वाकांक्षी तरुण अलेक्झांडर, त्याला पराक्रमी अलेक्झांडर म्हणत (इ.पू. ३५६-३२३), त्याने भारतावर स्वारी केली. त्याला भारताच्या सीमेवरुनच परत जावे लागले असते; पण तक्षिलाचा अंभी राजा ह्याने अलेक्झांडरचे एखाद्या लाडक्या पाहुण्यासारखे स्वागत केले. अंभी कांही मोठा दिलदार किंवा आतिथ्यशील नव्हता, पण शेजारच्या पुरुराजाचा पराभव व्हावा अशी त्याची तीव्र इच्छा होती. कारण झेलमच्या कांठावरचे पुरुचे राज्य सुखसमृद्धीने नांदत होते.

दुष्ट व अविचारी अंभीने इतर कांही राजांनाही निमंत्रण केले आणि त्यांच्यासह आक्रमण करणाऱ्या अलेक्झांडरचे स्वागत केले. इतर लहान राज्यांचे ते राजेही अंभीच्या निमंत्रणाला मान देऊन आले, पण शूर व स्वाभिमानी पुरु मात्र त्याला अपवाद ठरला.

त्या काळीं राजेमहाराजे हे लढाईमधे हत्तींचा वापर करीत. या महाकाय व शिकवलेल्या हत्तींशी सामना कसा द्यायचा, हे कांही ग्रीक लोकांना ठाऊक नव्हते. पण अंभीने त्यांना हत्तींच्यापुढे कोणती अस्त्रे वापरायची, आपला बचाव कसा करायचा, किंवा त्यांना पळवून कसे लावायचे, या सर्व युद्धांतल्या गुप्त गोष्टी शिकवल्या.

त्यानंतर अलेक्झांडरने झेलमकडे आपला मोर्चा वळवला व त्याचे सैन्य नदीकांठावर आले. नदी ओलांडण्यासाठी



सैनिक नावेतून पुढे गेले कीं पुरुराजाचे सैनिक त्यांच्यावर बाण सोडीत. खळाळत्या प्रवाहांतून सैन्य पुढे जाऊं शकत नव्हते. तरीसुद्धां अलेक्झांडरने दीर्घकाळ थांबल्यानंतर नदी ओलांडण्याचे नाटक केले. त्यांत त्याचे बरेच सैनिक मारले गेले. पण तो एक पवित्रा होता. नदीच्या कांठावरुन जरा पुढे कांही अंतरावर पाणी जास्त खोल नव्हते. ती जागा अंभीने पाहिली होती. पुरुराजा समोरुन येणाऱ्या नावा नष्ट करण्यांत गुंतला होता, त्याच वेळेला शत्रूची मोठी सेना दुसऱ्या ठिकाणी नदी पोहूनच ओलांडण्याच्या प्रयत्नांत होती.

उंचनिंच व धडाडीचा पुरुराजा आपल्या सेनेचे नेतृत्व करीत होता, दिवसभर रणकंदन चालू होते. पण अलेक्झांडरला अंभी व इतर राजांची सेनाही मदत करीत होती. पुरुचे वीस हजारापेक्षां जास्त सैनिक मारले गेले. आणि शेवटी मावळत्या सूर्यासमोर एकटा पुरुराजा त्याला पकडायला येणाऱ्या सैनिकांशी घोड्यावरुन लढत देत होता. त्याचे धैर्य व निष्ठा पाहून अलेक्झांडर चकित झाला. त्याने अंभीला पुरुकडे पाठवले व शरण येण्यास सांगितले. अंभी चांचरतच पुरुजवळ गेला. पुरु त्याच्यावर जोराने ओरडला, "अरे विश्वासघातकी भेकडा, चालता हो इथून!" आणि अंभी मागच्यामागे परत फिरला.

पुरु गंभीररीत्या जखमी झाला होता. त्याच्या शरीरावरुन व कपाळावर नऊ जागांतून रक्ताचे ओघळ वहात होते. तरीही त्याच्या चेहऱ्यावर हतबल झाल्याच्या खुणा नव्हत्या.

अलेक्झांडरच्या सेनाधिकाऱ्यांनी पुरुला घेरले व त्यांच्या राजाकडे नेले. या दुर्दैवी राजाला पाहून अलेक्झांडरला हंसू येईल व तो स्वतःच पुरुचा शिरच्छेद करील असा त्यांचा अंदाज होता. कारण अलेक्झांडरने आपल्या शत्रूंवर कधीच दयामाया दाखवली नव्हती. तो अत्यंत निर्दय होता. एकदा



त्याचा एक आवडता मित्र आजारी पडला. वैद्यांनी त्याला थंडगार मद्य प्यायचे नाही आणि मांसाहारावर ताव मारायचा नाही असे पथ्य सांगितले. पण त्या रुग्णाने हा सल्ला मानला नाही आणि तो मेला. अलेक्झांडरने सगळ्या वैद्यांनाच ठार मारले! आपल्या मेलेल्या मित्राच्या आत्म्याला



ही लढाई हारलाच नसता.

"पुरुराज, आता आपली लढाई संपलेली आहे आणि तू असहाय्य आहेस. मी तुझ्याशी कसं वागावं असं तुला वाटतं?" अलेक्झांडरने विचारलं.

"अलेक्झांडर, तू जर खरोखरीचा कर्तव्यदक्ष राज्यकर्ता असलास, तर दुसऱ्या राजाला कसं वागवावं हे तुला ठाऊक असायला हवं!" पुरुराजाने उत्तर दिले.

"खरंच आहे ते! एका राजाला जो सन्मान मिळायला हवा तो तुलाही मिळाला पाहिजे. तुझी आणखी कांही इच्छा आहे?" पुरुच्या उत्तराने प्रभावित झालेल्या त्या शत्रूराजाने विचारले.

"कांहीही इच्छा नाही, कारण जर मला राजासारखाच सन्मान मिळणार असेल, तर मला जे हवं ते त्यांत असेलच." पुरूने स्वाभिमानाने उत्तर दिले. अलेक्झांडरला या उत्तराचे अप्रूप वाटले. त्याने पुरुचे राज्य बळकावले नाही.

सोबत मिळावी, म्हणून त्याने त्या खेड्यांतल्या सर्व नागरिकांची हत्या केली. ही झाली त्याच्या निर्दयपणाची कांही उदाहरणे!

पर्शियावर स्वारी करुन तो देश जिंकताना त्याने अनेक राजामहाराजांना नमवले होते. पण पुरुसारखा निर्भय नि बाणेदार राजा त्याने अद्याप पाहिलेला नव्हता. शक्य असतं तर पुरु त्याच्याशी एकट्याने लढायला तयार झाला असता. अलेक्झांडर आपल्या या महत्वाच्या बंद्याकडे कौतुकाने पाहात राहिला. त्याला माहित होतं कीं अंभीराजाची फितुरी व मदत नसती तर पुरुराजा

पुरुने दाखवलेले असामान्य धैर्य, संयम, आणि राजपदाचा मान राखण्याची वृत्ती पाहून अलेक्झांडर भारावून गेला होता. निघडेपणा आणि असे उत्तमोत्तम गुण असणारा माणूस शत्रूवर देखील प्रभाव पाडू शकतो.

एकमेकांचा दिलदारपणा पाहून अलेक्झांडर व पुरु प्रसन्न होते. पण अंभी मात्र निराश झाला.

*(एम्.डी.)*



# चांदोबा प्रश्नावली - १

**बरोबर उत्तर देणाऱ्यांपैकी एकाला रु.२५०/- दिले जातील.**

**अचूक उत्तरे देणाऱ्यांची संख्या एकापेक्षां जास्त असेल तर बक्षिसासाठी सोडत काढण्यांत येईल व पांच विजेत्यांना समान रक्कम वाटून दिली जाईल.*

**या अंकापासून एक आकर्षक प्रश्नावली वाचकांना देण्याचा आम्ही निश्चय केला आहे. या प्रश्नावलीमधले सारे प्रश्न जानेवारी ते डिसेंबर २००५ या दरम्यान प्रकाशित झालेल्या चांदोबाच्या अंकांतल्या गोष्टीवर आधारलेले आहेत. तुम्ही या गोष्टी वाचल्या असतील व लक्षांत असतील, तर तुम्ही या प्रश्नांची उत्तरे लगेच देऊं शकाल. लक्षांत नसतील तर बारा महिन्यांचे अंक समोर ठेवा आणि पहा. तुम्हालाही असे करण्यांत गंमत वाटेल.**

त्यासाठी १. उत्तरे लिहा. २. तुमचे नांव व वय (फक्त १६ वर्षांखालील वाचकांसाठीच); पिनकोडसहित संपूर्ण पत्ता लिहावा. ३. वर्गणीदार असलात तर तो क्रमांक लिहावा. ४. पाकिटावर चांदोबा-प्रश्नावली-१ असे लिहा व आमच्या पत्त्यावर पाठवा. ५. फेब्रुवारीअखेरपर्यंत आपली प्रवेशिका आम्हाला मिळाली पाहिजे. ६. एप्रिलच्या अंकात निकाल जाहीर केला जाईल.

१. जागतिक वारसा ठरलेले आपल्या देशांतले कोणते प्रसिद्ध रेल्वे स्टेशन आहे?

२. "घुबडाला अंधार फार आवडतो. आळस आणि अज्ञानाने भरलेले जीवन तू जगतो आहेस. तू अंधार नव्हे, घोर अंधार आहेस. म्हणूनच घुबडाने तुझा आसरा घेतला." हे वाक्य कोणत्या कथेमधे आहे?

३. ३५० वर्षांपूर्वी आपल्या देशांतले एक सुप्रसिद्ध स्मारक बांधले गेले. ते कोणते आहे?

४. जूडो, कराटे, कुंगफूने युद्धकलेच्या हावभावांना पुष्टि दिली. अशीच एक केरळ प्रांतातली युद्धकला आहे! ती कोणती आहे?

५. ज्या घरांत राहातात, त्याला आपले घर मानणे, ज्या लोकांच्यामधे राहातात, त्यांना आपले मानून आत्मीयतेच्या भावनेने त्यांच्यासाठी परिश्रम करणाऱ्यांना नेहमी चांगलेच फळ मिळते - हे सत्य सांगणारी एक सुंदर गोष्ट आहे. त्या गोष्टीचे शीर्षक सांगू शकाल?

६. हे चित्र कोणत्या कथेतले आहे?





# याचना

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असताना बोधिसत्वांनी गांवातल्या विजयगुप्त नांवाच्या एका ब्राह्मण कुटुंबात जन्म घेतला. त्यांचे वडील खूप गरीब होते. ते आपल्या एक एकर जमिनीत शेतीभाती करून कशीबशी उपजीविका चालवीत असत.

विजयगुप्त जेव्हां मोठा झाला, तेव्हां त्याने आपल्या आईवडिलांना सुखी ठेवण्याचे ठरविले. त्याने कोणत्याही परिस्थितीत शिक्षण संपादन करून राजदरबारात नोकरी मिळवायचा निश्चय केला. त्या परिस्थितीतसुद्धां तो आपल्या वडिलांना शेतात मदत करी. परंतु एक एकर जमिनीत कितीसे धान्य मिळणार? हा सर्व विचार करून विजयगुप्त आपल्या वडिलांना म्हणाला - ''बाबा, मी तक्षशिला येथे जाऊन कांही विद्या संपादन करावी म्हणतो.'' वडिलांनी त्याला परवानगी दिली.

विजयगुप्त तक्षशिला येथे जाऊन पोहोचला. तेथे एका गुरूची सेवा-सुश्रूषा करून त्याने विद्या संपादन केली व आपल्या गांवी परत आला. तेव्हां त्याचे वडील दोन बैलांना घेऊन सकाळपासून संध्याकाळपर्यंत शेतांत राबत असलेले त्याला दिसले. ते पाहून विजयगुप्तने विचार केला की आता एक क्षणभरसुद्धां वेळ वाया न जाऊ देता दुसऱ्या दिवशीच तो काशीला निघाला व तिथे त्याने राजदरबारांत नोकरी मिळविली.

त्यानंतर थोड्या दिवसांनी विजयगुप्तच्या वडिलांच्या दोन बैलांपैकी एक बैल मेला. कित्येक वर्षे तो बैल त्यांच्या कुटुंबाची सेवा करीत आला होता.

त्यामुळे विजयगुप्तच्या वडिलांना आपला एक हातच तुटला असे वाटले. त्या परिस्थितीत त्यांनी विचार केला की मुलगा राजदरबारात नोकरी करीत आहे. राजाला सांगून तो आपल्याला एक बैल देववील. ते काशीला गेले व आपल्या मुलाला भेटले.

सर्व गोष्टी ऐकून-घेऊन विजयगुप्त आपल्या वडिलांना म्हणाला - ''बाबा, तुम्ही व आई आता म्हातारे झाला आहात, कशाला त्रास करून घेता? तुम्ही दोघे माझ्याजवळ येऊन रहा व आराम करून आपले दिवस घालवा.

परंतु त्यांच्या वडिलांना ते मान्य झाले नाही. ते हट्ट करून म्हणाले - ''मला जन्मभूमी सोडून जाणे पसंत नाही. माझे मरण आपल्या जन्मभूमीतच झाले पाहिजे. तू एक बैल मिळवून देऊ शकलास तर शेतीभाती करून मी माझे आयुष्य मजेत घालवू शकेन. तेथे मला जे स्वास्थ मिळते, ते इथे मिळू शकणार नाही!''

विजयगुप्त कांही दिवसापूर्वीच राजदरबारांत नोकरीला लागला होता. तेव्हां त्याच्याकडे बैल खरेदी करण्याइतके धन नव्हते. त्याचबरोबर राजाकडे मागणेसुद्धां बरोबर दिसणार नव्हते. कारण राजाला मनांतून वाटेल की नुकताच कांही दिवसापूर्वीच हा नोकरीला लागला आहे आणि लगेच आपल्यासमोर हात पसरून मागतो आहे.''

हा विचार करून विजयगुप्त आपल्या वडिलांना म्हणाला - ''बाबा, जर का मी राजाकडे एक बैल मागितला तर ते ''तुला बैल कशाला पाहिजे?'' असे विचारतील आणि दुसरे मी राजदरबारात नोकरी करणारा, राजाकडे मागणे चांगले दिसणार नाही. तेव्हां आपणच जाऊन त्यांना विनंती करा की आपल्याला एक बैल त्यांनी द्यावा. माझी खात्री आहे की ते आपल्याला एक बैल देतील.''

परंतु विजयगुप्तच्या वडिलांना ती गोष्ट कांही आवडली नाही. तो आपल्या मुलाला अधिकार-



वाणीने म्हणाला, ''मुला, मी एक शेतकरी आहे, नांगर सोडून दूसरे काही मला माहित नाही. कुठे राजा? आणि कुठला दरबार? आणि कुठे मी? दरबारांत माझ्या तोंडून शब्द बाहेर पडणार नाहीत. राजाबरोबर कशा तऱ्हेने बोलावे, कशा तऱ्हेने वागावे, हे सर्व मला माहीत नाही. तेव्हां तूच माझे काम करो तरी करून दे.''

''तर मग मी एक उपाय सांगतो. मी एक श्लोक लिहून देतो तो एकदोन दिवसांत पाठ करून राजदरबारांत जाऊन आपण तो राजाला ऐकवा. तेव्हां तुमचे काम नक्की होईल! असे सांगून विजयगुप्ताने आपल्या वडिलांच्यात धैर्य आणले. त्यानंतर त्याने श्लोक लिहून देऊन तो आपल्या वडिलांच्याकडून पाठ करवून घेतला.

द्वे में गोणा, महाराज,
येहि खेत्तं कसामसे;
तेंसु ऐको मतोदेव,
दुतियं देहि खत्तिय ।।

याचा अर्थ असा आहे - "महाराज माझ्या-जवळ दोन बैल होते. त्यांच्या मदतीने मी माझी शेतीची कामे चालवीत होतो. प्रभो, त्यातील एक बैल मेला. तेव्हां महाराज, मला दुसरा बैल द्यावा."

म्हाताऱ्या बापाने मोठ्या कष्टाने तो श्लोक पाठ केला. एके दिवशी विजयगुप्त आपल्या वडिलांना घेऊन राजदरबारात आला. आपल्या मुलाने सांगितल्याप्रमाणे म्हाताऱ्याने राजा व मंत्र्यांना नमस्कार केला व हात जोडून विनयपूर्वक उभा राहिला.

"तू कोण आहेस? काय पाहिजे आहे?" राजाने विचारले. म्हाताऱ्याने ताबडतोब पाठ केलेला श्लोक म्हणून दाखविला. परंतु घाबरल्यामुळे त्या श्लोकात थोडासा फेरबदल झाला.

द्वे में गोणा, महाराज,
येहि खेतं कमामसे;
तेसु एको मतोदेव,
दुतियं गण्ह खतिय ।"

हा श्लोक ऐकून सर्व दरबारी लोक हसू लागले. विजयगुप्ताने लाजेने आपली मान खाली घातली कारण त्याच्या वडिलांनी घाबरून जाऊन मला दुसरा बैल देववा, असे सांगण्याऐवजी, सांगितले - "माझ्या दुसऱ्या बैलाला घेऊन टाका."

ह्यावर राजाने हंसून विचारले - "तुम्ही आपल्या बैलाला मला देण्याकरिता कां आपल्या घरातून एवढे दूरवर आलांत?"

"महाराज, पाहिजे तर आपण त्या बैलाला घेऊन टाका, कारण काय, तर त्यामुळे एवढा सारा गोंधळ निर्माण झाला आहे." असे सांगून म्हाताऱ्याने राजाला सर्व गोष्ट ऐकविली. विजय-गुप्तच्या चांगुलपणाची स्तुती करीत राजा खूष झाला. कारण त्याच्या दरबारांत जे लोक होते, ते सर्व लहानसहान गोष्टी घेऊन राजाकडे घेऊन याचना करणारे होते, परंतु विजयगुप्त असा नव्हता. त्याच्यावर खूष होऊन राजाने आठ बैलाच्या जोड्यांना खूप सजवून त्या विजय-गुप्तच्या वडिलांना दान केल्या.







# रामायण

विश्वामित्र ऋषीबरोबर राम आणि लक्ष्मण अयोध्येहून निघाले. ते सरयू नदीच्या दक्षिणे-कडील कांठावर येऊन पोंचले.

विश्वामित्र ऋषींनी मोठ्या प्रेमाने रामाच्या पाठीवर हात फिरवला आणि ते म्हणाले -

"बाळ! जाऊन आचमन करून ये. मी तुला बल व अतिबल नांवाच्या दोन शक्ति देणार आहे. या दोन शक्तींचा लाभ झाला तर तुला कधीं थकवा वाटणार नाहीं, व तूं कधीं आजारी पडणार नाहींस. तुझे रूप सदैव असेच राहील. तू या मंत्राचा जप करीत राहिलास तर कुणीही तुझ्याहून अधिक बुद्धिमान, चतुर किंवा सुंदर होणार नाही. तुला भूक व तहान यांची बाधा होणार नाही. तुझी कीर्ति जगभर होईल व तुला प्रत्येक कामांत यश मिळेल."

विश्वामित्र मुनींची आज्ञा होतांच रामाने हातपाय धुऊन संध्या केली व तो विश्वामित्र मुनींजवळ येऊन बसला.

त्यांनी त्याला बल व अतिबल या दोन शक्तींचा विधिवत मंत्र दिला. तीन प्रहर उलटून गेल्यामुळे त्या दिवशीं सर्वांनी सरयू नदीतीरावरच ती रात्र काढण्याचे ठरविले.

पहाटे विश्वामित्र मुनींनी दोघा राजकुमारांस जागे केले. ते स्नान-संध्यादि आटोपून विश्वामित्र ऋषींबरोबर पुढे निघाले व सरयू आणि गंगा या दोन्ही नद्यांच्या संगमस्थानी येऊन पोंचले. असे सांगतात कीं, त्या जागी शंकराने आश्रम स्थापन केला होता. तेथे तो तप करीत असे.

याच जागी कामदेवानें शंकराचा तपोभंग



केला व शंकराने आपला तिसरा डोळा उघडल्या-बरोबर कामदेव भस्म होऊन गेला. तेव्हांपासून त्या आश्रमांत शंकराचे शिष्यमुनि राहूं लागले. कामदेवाचे अंग म्हणजे शरीर ज्या जागी भस्म झाले, त्या जागेची आठवण म्हणून त्या जागेला अंगदेश हें नांव पडलें.

विश्वामित्र ऋषींनी तो जुना इतिहास रामलक्ष्मणांना सांगितला. त्यांनी ती रात्र तेथेच विश्रांति घेण्याचे ठरविले.

दुसऱ्या दिवशी एका तरीत बसून ते गंगापार गेले. गंगापार एक दाट रान होते. तेथे मनुष्यवस्ती नव्हती. निरनिराळा श्वापदे ठिकठिकाणी दिसत होती व त्यांचे भयंकर आवाज ऐकूं येत होते. झाडी तर इतकी दाट होती कीं, दिवसादेखील रात्रीसारखा काळोख वाटे.

ते वन पाहून रामाला खूपच आश्चर्य वाटले. त्याने नवलाने विश्वामित्र मुनींना विचारले - "मुनिवर! या वनाचे नांव काय?"

विश्वामित्र मुनींनीं त्या वनाची गोष्ट दोघांना सविस्तर सांगितली.

"त्या प्रांतांत एका काळी मलदमू व करूशमू नांवाचे दोन देश होते. दोन्ही देश धनधान्यपूर्ण व समृद्ध होते. परंतु आता ताटका नांवाची एक यक्षिणी व तिचा मुलगा मारीच हे या दोन्ही देशांचा नाश करीत आहेत. त्यांच्या भीतीने कोणी या देशाकडे फिरकत देखील नाही. ताटका एक साधारण स्त्री नसून तिच्या अंगांत सहस्र हत्तींचे बळ आहे. म्हणून हे समृद्ध देश आज ओसाड पडलेले आहेत."

तें ऐकून रामाने विश्वामित्रांना विचारले, "मुनिवर! असे सांगतात कीं, यक्ष जातीच्या लोकांच्या अंगात बळ फार कमी असते. मग या ताटकेच्या अंगांत इतके बळ कोठून आले, व ती इतकी भयंकर कशी काय झाली?"

त्यावर विश्वामित्र ऋषींनीं ताटकेची गोष्ट रामलक्ष्मणांना सांगितली.

"सुकेतु नांवाचा एक यक्ष होता. त्याने पुत्र-प्राप्तीसाठीं तपश्चर्या केली. ब्रह्मदेव प्रसन्न झाला. दोन्हीं सुकेतूने पुत्रप्राप्तीसाठी तपश्चर्या करीत आहे असें सांगितले. ब्रह्मदेवाने त्याला पुत्रप्राप्तीचा वर दिला नाही. पण एका कन्येचा वर दिला व असेहि सांगितले की, जरी मुलगी असली तरी तिच्या अंगांत सहस्र हत्तींचे बळ येईल."



ब्रह्मदेवानें दिलेल्या वराप्रमाणें सुकेतूला कन्या झाली. हळूं हळूं ती मोठी झाली. तिचे अप्रतिम रूपलावण्य पाहून अनेक यक्ष कुमारांनी तिला मागणी घातली.

सुकेतूने सुंद नामक एका तरुण यक्ष कुमाराशी तिचे लग्न लावून दिले. त्यांना मारीच नांवाचा एक मुलगा झाला. तो महापराक्रमी निघाला. तो इंद्राची सुद्धां बरोबरी करूं लागला. परंतु त्याला आपल्या पराक्रमाचा गर्व झाला होता.

एकदा अगस्ती मुनि तपश्चर्या करीत असताना सुंदने विघ्न आणले. म्हणून रागाने अगस्ती मुनींनी त्याचा वध केला. अर्थातच ताटका व मारीच दोघांना अत्यंत राग आला व ते अगस्ती ऋषींना खायला धांवले. तेव्हां अगस्ती ऋषींनीं त्यांना शाप दिला कीं, "दोघे राक्षस व्हा!"

त्याप्रमाणे मारीच राक्षस झाला व त्याची आई ताटका पण एक राक्षसीण झाली. तिचे सर्व सौंदर्य हरपले, ती कुरूप झाली व एक भयंकर रूप धारण करून ती नरहत्या करूं लागली.

ताटका अगस्ती मुनींच्या वाटेला जाऊं शकली नाहीं. परंतु तिने सर्व प्रदेश उध्वस्त करून टाकला. आजपावेतो तिच्या भीतीने या देशांत पाऊल टाकायलादेखील कुणी धजत नाही. रामा! तू तिचा वध करून या प्रदेशाचा उद्धार कर. ती स्त्री असली तरी इतकी दुष्ट आहे, कीं तिचा वध केल्याने तुला मुळीच पाप लागणार नाही."



त्यावर राम हात जोडून नम्रपणे म्हणाला, "मुनिवर! आमच्या वडिलांची आम्हाला अशी आज्ञा आहे की, आपल्या आज्ञेबाहेर आम्ही कांही करूं नये. आपल्या आज्ञेप्रमाणे मी ताटकेचा वध करावयास तयार आहे."

असें सांगून रामाने धनुष्यावर दोरी चढवून ती एकदांच ओढली.

धनुष्याच्या दोरीचा टणत्कार ऐकून ताटका व रानांतील प्राणी हा आवाज कोठून येत आहे, ते पाहूं लागले.

आवाजाच्या दिशेने ताटका धांवत धांवत, विश्वामित्र मुनींबरोबर राम लक्ष्मण जिथे उभे होते तिथे आली.

तिला पाहून राम लक्ष्मणाला हळूं आवाजांत म्हणाला - "लक्ष्मणा! पाहिलेस हिचे अक्राळ-



विक्राळ रूप! शूरवीर देखील हिला पाहून भिऊन पळून जातील. तरी पण तिचा वध करावेसे मला वाटत नाही. ती स्त्री आहे. तिचे नाक व कान कापून तिला कुरूप करून सोडून द्यावे.''

रामाचे ते शब्द तिच्या कानावर पडतांच ती रागाने राम लक्ष्मणांना धरण्यासाठी पुढे आली. रामाने तिचे दोन्ही हात छाटून टाकले. लक्ष्मणाने तिचे नाक व कान कापून टाकले. पण ती मायावी राक्षसीण राक्षसी हास्य करीत पुढे येऊं लागली. हात, नाक व कान पुन्हां तिच्या अंगाला जाऊन चिकटले.

तेव्हां विश्वामित्र मुनि म्हणाले - ''रामा! अरे ही राक्षसीण! हिच्यावर दया दाखविल्याने काम भागणार नाही. ती जिवंत राहिली तर काय काय उपद्रव करील कोणास ठाऊक? म्हणून संध्याकाळच्या आंत तिचा वध कर. सकाळी व संध्याकाळी या राक्षसांचे बळ वाढते हे तुला माहीतच असेल.''

तें ऐकून रामाने एक शक्ति सोडली. ती तिच्या छातींत लागली व ताटका जमिनीवर धडामदिशी आदळली. त्या हबक्याने सारी पृथ्वी हादरली. थोडा वेळ जमिनीवर तडफडून ती गार झाली.

ताटका मेलेली पाहून विश्वामित्र ऋषींनी आनंदाच्या भरांत रामाला शाबासकी दिली आणि ते त्याला म्हणाले,

''रामा! आज तूं ह्या राक्षसिणीचा वध करून सर्व ऋषी व मुनींना खूष केले आहेस. तुझ्या हातूनच राक्षसांचा संहार होईल!''



दुसऱ्या दिवशी सकाळी स्नानसंध्यादि आटोपल्यावर विश्वामित्र ऋषींनी रामाला बोलाविलें व पूर्वेकडे तोंड करून उभे रहावयास सांगितलें. नंतर त्यांनी मंत्र म्हणून रामाला अनेक अस्त्रें दिलीं. ती अस्त्रें रामापुढे हात जोडून उभी राहून विनम्रपणे त्याला व म्हणाली - ''आम्ही आपले दास आहोत! आज्ञा व्हावी!''

तेव्हां रामाने त्यांना स्पर्श करून स्वतःच्या मनांत रहावयास सांगितले.

नंतर विश्वामित्र ऋषींनीं रामाला अस्त्रांचा उपसंहार कसा करावयाचा हे देखील शिकविले आणि त्यानंतर तिथे पुढे गेले.

कांही अंतर चालून गेल्यावर एका पर्वताच्या पायथ्याशीं एक सुंदर तपोवन दिसले. ते पाहून रामाने विचारले,

''ह्या तपोवनांत कोणाचा आश्रम होता? हे फार रम्य असे स्थान आहे.''

विश्वामित्र ऋषी त्या आश्रमाची गोष्ट सांगू लागले -

''बली नांवाचा एक पराक्रमी चक्रवर्ती होऊन गेला. त्याने त्रिलोक जिंकून स्वर्गावर स्वारी केली तेव्हां विष्णूने वामनाचे रूप घेऊन अवतार घेतला. बलीनें जो यज्ञ चालविला होता तेथे तो गेला व तीन पावले जमीन मागितली. बली चक्रवर्ती, दानी, व उदार होता. त्याने कबूल केल्यावर वामनाने दोन पावलांत अखिल ब्रह्मांड व्यापून टाकले व तिसरे पाऊल ठेवायला जागा मागितली. ती नव्हती म्हणून बलीराजाने आपले डोके पुढे केले. वामनाने त्यावर आपला पाय ठेवून बलीला पाताळलोकांत पाठविले. तो वामन व त्याचे



वडील कश्यप याच आश्रमांत रहात असत. म्हणूनच मी देखील आपला आश्रम येथेच स्थापन केला.

राक्षस माझ्या यज्ञांत विघ्न घालीत आहेत. म्हणून आता त्यांचा संहार करणे हे तुझे काम आहे.''

त्या आश्रमाचें नांव सिद्धाश्रम होते. रामालक्ष्मणाबरोबर विश्वामित्र ऋषींनीं आश्रमांत प्रवेश केल्याबरोबर आश्रमांतले ऋषी त्यांच्या दर्शनासाठी जमा झाले. त्यांनीं विश्वामित्र ऋषींची पादपूजा करून रामलक्ष्मणांचा सर्व प्रकारे सत्कार केला.

रामलक्ष्मणांनी कांही वेळ विश्रांति घेतली. नंतर ते विश्वामित्र ऋषींना म्हणाले -

''महामुनि! यज्ञ आरंभ करावा. यज्ञाच्या रक्षणाचा भार आमच्यावर आता आहे!''

दुसऱ्या दिवशी यज्ञ आरंभ झाला. विश्वामित्र ऋषि समाधिस्थ बसले होते. रामलक्ष्मणांनी हात जोडून विचारले-

''मुनिवर! राक्षस केव्हां येतील?''

यज्ञ मंडपांत बसलेले ऋषी त्यांना उत्तरादाखल म्हणाले -

''विश्वामित्र ऋषी समाधिस्थ आहेत. म्हणून ते आता कांहीही बोलणार नाहीत. आजपासून सहा दिवस लागोपाठ राक्षसांच्या हातून यज्ञाचे रक्षण करावे.''

रामलक्ष्मणांनी रात्रंदिवस जागरूक राहून लागोपाठ पांच दिवस यज्ञाचे रक्षण केले. सहावा दिवस उजाडला.

यज्ञ चालू होता. एकाएकी आकाश गडगडले. सुबाहु, मारीच वगैरे राक्षस आपले सैन्य घेऊन येत असलेले रामाला दिसले. रामाने मारीच राक्षसावर एक अस्त्र सोडल्याबरोबर तो समुद्रांत जाऊन पडला.

नंतर रामानें आग्नेयास्त्र सोडून सुबाहूला ठार केले व वायव्यास्त्र सोडून इतर राक्षसांचा संहार केला.

अशा तऱ्हेने विश्वामित्र ऋषींचा यज्ञ निर्विघ्नपण पार पडला. त्यांनी रामाच्या शौर्याची स्तुति करून त्याला आशीर्वाद दिला. *(पुढे चालू)*







# अपात्र दान

एका गांवात गंगाराम आणि दुर्गादास हे दोघे धान्याचे व्यापारी होते. कित्येक वर्षापासून ते दोघेजण समजूतदारपणे धंदा करीत होते. गांवातल्या भावांमधे भांडण झाली तर लोक या दोघांचे उदाहरण देत म्हणत, ''अरे, तुम्ही लोक गंगाराम आणि दुर्गादास यांना पाहून कांहीतरी धडा कां घेत नाही?''

हे दोघे मित्र दरवर्षी संक्रांतिच्या दिवशी आपला फायदा वांटून घेत असत. त्यावेळी गंगाराम आपल्या हिश्यांतून तीनशेपासष्ट रुपये वेगळे काढून ठेवायचा. दुर्गादासने मात्र त्याला कधी विचारले नाही कीं ''बाबा, तू हे पैसे असे पोटळीमधे बांधून कां ठेवतोस? याचं कारण काय? मला कां ते सांगत नाहीस?'' आणि तो गप्प राहिलेला पाहून गंगारामला देखील आश्चर्य वाटे.

दरवर्षी त्या गांवच्या शीवेवर जत्रा भरत असे. त्यावेळीं त्या जत्रेत जुगार आणि मद्यपानाला ऊत येत असे. जत्रेच्या मैदानापासून थोड्या दूर अंतरावर एक डोंगर होता. वर एक विहीर होती. तिच्या चारी बाजूला उंच उंच झाडे होती. ती जागा प्रवाशांना विसावा घ्यायला आणि शिदोरी खाण्यासाठी फारच सोयीस्कर होती. गंगाराम सर्वांची नजर चुकवून त्या विहिरीपाशी जायचा, आणि तीनशेपासष्ट रुपयांची ती पोटली विहिरीजवळ टाकून परत यायचा. ते रुपये कोण येऊन घेऊन जात होते हे मात्र त्याला कधीच कळलं नाही.

पण एका वर्षी त्याच्या मनांत आलं, कीं आपलं हे गुप्त दान कुणाच्या हातांत पडतंय ते तरी पाहावं. गंगाराम विहिरीजवळून निघाला आणि परत वळून त्याच जागी आला. कुणीतरी डोक्यावर पंचा पसरून तोंड झांकून, झाडांच्या मागे भराभरा जाताना त्याला दिसला. गंगारामने ठेवलेली रुपयांची पोटळी गायब झाली होती.

त्या पंचाधारी माणसाचा गंगारामने पाठलाग

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



केला. शेवटी त्याला समजले कीं तो माणूस दुसरा कुणी नाही, तर दुर्गादासच होता.

''अरे मित्रा, मला वाटलं होतं कीं माझे रुपये कुणा गरीबाच्या हाती लागतील आणि त्याला मदत होईल. पण हे पैसे तर तुझ्याकडे आले!''

दुर्गादासने हंसून उत्तर दिले, ''मित्रा, जेव्हां तू ही रक्कम फेकलीस, तेव्हां ते रुपये कुणाच्याही हातांत जरी पडले तरी त्याच्याशी तुला काय करायचंय?''

''मी हे पैसे स्वतःहून कां टाकतो, हे जर तुला समजलं ना, तर तू असं बोलणार नाहीस!'' असं म्हणून गंगारामने आपली कथा सांगितली.

''माझ्या लहानपणीच माझे आईबाबा वारले. मी गरीब होतो. लहानपणी मला अनेक तऱ्हेची कामें करावी लागली. एकदा दुष्काळ पडला, आणि गांवकरी गांव सोडून जायला लागले. त्याच वेळी इथे ही जत्रा भरते तशी जत्रा होती. तो संक्रांतिचा दिवस होता. मी चार दिवसांचा उपाशी होतो. मागून कुणीही मला कांहीही दिलं नाही. एका मिठाईच्या दुकानांतून लाडू चोरताना मी पकडला गेलो आणि खूप मार खाल्ला. भुकेने मी कळवळलो होतो आणि हताश होऊन मी मरायचे ठरवले. या विहिरीवरच मी उडी मारायला आलो होतो. तिथे कांठावर चढणार तेवढ्यांत माझ्या पायाला कांहीतरी बोचलं. पाहिलं तर लाल खडा बसवलेली एक सोन्याची आंगठी होती ती! झालं, माझ्या मनांत जगायची तीव्र इच्छा निर्माण झाली. ती अंगठी विकून मी एक दुभती म्हैस विकत घेतली. त्यांतून मिळालेल्या पैशांतून एक बैलगाडी खरेदी केली. त्यानंतर तुझ्याशी परिचय व मैत्री झाली. धान्याच्या व्यापारांत आपण दोघेही यशस्वी झालो. म्हणून ज्या दिवशी ही अंगठी मला मिळाली, त्या संक्रांतिच्या दिवशी ह्याच विहिरीजवळ मी गुप्तपणे तीनशेपासष्ट रुपये ठेवून परत जातो.''

ही कथा ऐकून दुर्गादास त्याला म्हणाला, ''तुझा विचार खूप चांगला आहे रे! पण तुझे पैसे ज्याचया हातांत पडतात, त्याची बुद्धि भ्रष्ट होण्याची शक्यतादेखील आहे. पाहिजे तर आपण प्रत्यक्षच पाहूं या कीं!'' आणि गंगारामबरोबर तो पुन्हां विहिरीजवळ गेला. आणि दोघेही एका झाडावर चढून बसले.

दुर्गादासने एक लहानशी थैली काढून विहिरीलगत फेकली. थोड्या वेळानंतर तिथे एक भगवी वस्त्रे धारण केलेला, पांढऱ्याशुभ्र दाढीचा एक साधू येऊन पोंचला. त्याने शिदोरीचे गांठोडे विहिरीच्या कांठावर ठेवले. हाततोंड धुवायला म्हणून त्याने तिथली बादली उचलली, आणि त्याला दुर्गादासने फेकलेली थैली दिसली.

साधूचे मन विचलित झाले. आपले पठण बंद करून त्याने चारी दिशांना चोरट्या नजरेने पाहिले. कुणीही आसपास दिसत नव्हते. हे पाहून त्याने ती थैली आपल्या झोळींत टाकली, आणि तो स्वतःशीच मोठ्याने बोलायला लागला, ''इतक्या वर्षानंतर या असल्या भिकार जिण्यांतून सुटका झाली म्हणायची. आता मी लग्न करुन सुखाने नांदेन!'' असं म्हणून शिदोरी खायचे विसरून तो साधू तिथून निघून गेला.

गंगारामच्या तोंडून शब्द आले, ''सर्वसंग-परित्याग करणाऱ्या साधूला ह्या वयांत लग्न करावेसे वाटते आहे!''

दुर्गादासने गंगारामला गप्प बसण्याची खूण केली आणि एक चांदीचा रुपया थैलीतून काढून विहिरीच्या दिशेने फेकला.

थोड्या वेळानंतर दोघे जुगारी एकामेकाला शिव्या देत विहिरीजवळ आले.

''अरे, मी एक दुभती म्हैस विकत घ्यावी म्हणून घरांतून पैसे आणले होते. तुझ्या नादाला लागून ते सगळे रुपये हारलो बघ. हातांत कवडीदेखील शिल्लक राहिली नाही. कोणत्या तोंडाने मी आता घरी परत जाऊं? त्याच्यापेक्षां या विहिरीत उडी मारुन मी जीवच देतो!''

असं म्हणत त्यांच्यापैकी एकजण विहिरीजवळ आला. दुसरा इसम त्याला थांबवण्याचा खूप प्रयत्न करीत होता. तेवढ्यांत पहिल्या इसमाला तिथें पडलेले चांदीचे नाणे दिसले. पटकन ते उचलून तो म्हणाला, ''चांगल्या मुहूर्तावर हा रुपया हातांत



आलाय. कदाचित हा मला माझे हारलेले सारे रुपये परत देईल. कुणास ठाऊक?'' आणि तो जुगार-खान्याच्या दिशेने धावत सुटला.

''त्यांत माझाही अर्धा हिस्सा आहे बरं कां!'' असं दुसरा इसम ओरडत पहिल्याच्या पाठोपाठ जाऊं लागला. गंगाराम दुर्गादासला म्हणाला, ''मित्रा, हे रे काय? जुगारांत हा सगळे रुपये हारला होता, पण एक रुपया हातांत मिळाल्याबरोबर हा पुन्हां तिकडेच वळला कीं रे!''

दुर्गादास गप्प होता. थोड्या वेळानंतर तिथे एक लांकूडतोड्या लांकडाची मोळी पाठीवर घेऊन येताना ह्या दोघांना दिसला. दुर्गादासने लहानशी रुपयांची थैली काढून लांकडूतोड्या व विहीर, यांच्यामधोमध फेंकली.

लांकडूतोड्या स्वत:शीच बडबडत चालला होता. ''आता मी ही लांकडे केव्हां विकणार, आणि घरी पोचून माझी कांजी केव्हां बनवणार?'' त्याने बादलीने पाणी ओढले, पोटभर पाणी पिऊन, हातपाय धुवून तो बाजाराच्या दिशेने गेला.

''अरे, हे काय? रस्त्यांत रुपयांची थैली पडलेली होती, पण त्याचे लक्ष तिकडे गेले नाही, आणि तो पुढे निघूनही गेला.'' गंगाराम आश्चर्याने उद्गारला.

''पाहिलंस, तुझे हे गुप्त दान अपात्र व्यक्तींच्या हाती पडून त्यांचे नुकसान करते आहे. बिनकष्टाचे धन मिळाले, तरी त्याची किंमत समजणारे फार थोडे लोक असतात. उतारवयांतल्या साधूला संसारात शिरायची ओढ लागली. त्या थैलीत दगड आहेत हेही त्याला समजले नाही. त्याचे ध्यान ऐहिक सुखांमागे लागले होते. त्याचप्रमाणे तो एक रुपया बघून तो जुगारी हरखून गेला. खरं तर कष्ट केल्यानंतर माणसाचा स्वभाव सुधारतो. तो अचानक लाभलेल्या धनाची फारशी पर्वा करीत नाही. लांकूडविक्याला आपल्या श्रमांचे फळ मिळावे एवढीच अपेक्षा होती.'' दुर्गादासने गंगारामला समजावले.

''म्हणजे आजपर्यंत माझे गुप्तदान मातीला मिळाले कीं काय?'' गंगारामने विचारले.

''मुळीच नाही. ते धन मी सुरक्षित ठेवलेले आहे. त्या पैशांतून आपल्या दोघांच्या नांवाने आपण एक शाळा बांधायचीय.'' दुर्गादासने कल्पना मांडली.





शांतिपुरांत नव्या राजाच्या स्वागताची तयारी झाली आहे. सेनापतीने केलेल्या बंडाळीनंतर राजा बेपत्ता होतो. राणी व त्यांचा एक वर्षाचा बालक गुप्त मार्गाने राजवाड्यांतून पळून जातात. बाळाला जयानंद मुनींच्या स्वाधीन करून राणी मरण पावते. जयानंद त्याचे नांव आर्य ठेवतात. लौकरच आर्यला राज्याभिषेक होईल अशी आशा व्यक्त केली जाते आहे.

# आर्य

## अज्ञात राजकुमाराचे रहस्य



चित्र : गांधी अव्वा









# वाचकांचे पान

**माहीमच्या डॉ. नियति चितालिया लिहितात :**

मी माझ्या मुलाच्यासाठी तीन वर्षे संस्कृत चंदामामा घेत होते. तो दहावी पास झाला आणि कॉलेजमधे आता त्याला संस्कृत विषय नाही. म्हणून माझ्याकडे असलेले ३६ अंक मी संस्कृत टीचर्स ट्रेनिंग स्कूलच्या वाचनालयाला दिले म्हणजे ते इतर विद्यार्थ्यांना वाचायला मिळतील. त्यानंतर मी इंग्लिश चंदामामा वाचते. मला तो वाचताना खूप आनंद होतो.

**नीलमणी भाटिया (लेखक व चित्रकार, नवी दिल्ली) :**

जुन्या काळाची नव्याशी सांगड घालण्याची कसरत चंदामामाने चांगल्या तऱ्हेने सांभाळली आहे. चंदामामा ही आपल्या मुलांसाठी योग्य भेटवस्तू आहे. आभाळांतल्या चंदामामाप्रमाणे हाही अक्षय चमकत राहो, ही सदिच्छा!

**ज्योतीरंजन बिसवाल, दुर्गापूर :**

मेच्या संपादकीय लेखांत तुम्ही बरोबर लिहिले होतेत, की आपल्या देशाच्या स्वातंत्र्यलढ्यांत आहुती देणाऱ्या वीरांना आपण बिसरलो आहोत. त्यांची आठवण करून देण्यांत शिक्षक व प्रसारमाध्यमे यांनी पुढाकार घेतला पाहिजे. राष्ट्रपित्याच्या आदर्शवादावर सध्याच्या तरुण पिढीचा फारसा विश्वास नाही, याची खंत वाटते. चंदामामा मात्र देशभक्तीची ज्योत मनांत उजळण्याची व वडीलधाऱ्या मंडळींचा मान राखण्याची शिकवण आपल्या पानांमधून देण्याचे महत्कार्य करतो आहे हे स्तुत्य आहे.

**टोरॉंटो, कॅनडाहून अरविंद विजयराघवन म्हणतो :**

मी चौथ्या ग्रेडमधे शिकतो आहे. गेली दोन वर्षे मी चंदामामा वाचतो आहे. सगळ्या गोष्टींतून तात्पर्य चांगले समजते. भारतीय संस्कृतिबद्दल मला खूप माहिती मिळाली, कारण मी हजारो मैल दूर आहे. ह्या मासिकांतल्या मुलांनी लिहिलेल्या गोष्टी व विनोद मला आवडतात.





# मनाचे परिवर्तन

**गणपतीवर्मा** हा गिरीपुरचा राजा होता. त्या राज्यांतल्या रामवर या लहान शहरांत रमण हा कपड्यांचा व्यापारी होता. त्याच्या घरी त्याची पत्नी, एक मुलगा धनशेखर, शांतामणी नि चिंतामणी या दोन मुली होत्या. थोरल्या मुलीचे लग्न राजधानीमधे नोकरी करीत असणाऱ्या एखाद्या चांगल्या तरुणाशी करावे अशी रमणची फार इच्छा होती.

कांही दिवसानंतर, रमणला एका स्थळाची माहिती समजली. तो तरुण राजधानीमधे राजाच्या जामदारखान्यावर पहारेकरी होता. त्याचे नांव दिवाकर होते आणि तो दिसायला देखणा होता.

तो खूप हुशार आणि धाडसी होता. रमणला कळलं कीं त्याला राजधानीबाहेरच्या एखाद्या सुंदर मुलीशी लग्न करायचं आहे.

रमण राजधानीला गेला, दोन तीन दिवस तिथे राहिला, आणि त्याने दिवाकरची बरीच माहिती गोळा केली. नंतर तो स्वतः त्याला भेटला आणि त्याच्या नोकरीबद्दलही रमणने नीट चौकशी केली. दिवाकरचे बोलणेचालणे व वागायची पद्धत रमणला आवडली. रमणने आपल्या मुलीबद्दलची माहिती दिवाकरला सांगितली. हा संबंध जर त्याला योग्य वाटला तर त्याने रामवरला येऊन मुलगी पाहावी असे रमणने सुचवले.

एका आठवड्यानंतर दिवाकर रामवरला आला. जेव्हां तो रमणच्या घराजवळ पोंचला, तेव्हां एक तरुणी तिथे रांगोळी घालत होती, ती त्याला दिसली. तीच बहुतेक थोरली मुलगी असेल असे त्याला वाटले. घरांत तो शिरल्यावर रमणने त्याचे स्वागत केले आणि घरांतल्या मंडळींशी ओळख करून दिली. तितक्यांत धाकटी चिंतामणी तिथे मुसमुसत आली.

"काय ग झालं चिंतामणी? रडायला काय झालं तुला?" रमणने काळजीच्या सुरांत विचारले.

भवानी दास



"मी फळांच्या दुकानातून परत येत होते तेव्हां त्या द्वाड लंच्छूने भर रस्त्यांत सर्वांच्या-समोर माझी टर उडवली" तिने डोळे पुसून सांगितले.

"तो अगदी खोडसाळ आणि बाभरट आहे. त्याचा बाप गजराज तर अट्टल चोर आहे. पोरी, असल्या दुष्ट लोकांपासून नेहमी दूर रहावे. आणि फळें घ्यायला तू तरी एकटी बाजारांत कां गेलीस?"

"तिला कांहीही सांगून उपयोग नाही. एक दिवस तिला उपाशी कोंडून ठेवा म्हणजे तिचं डोकं आपोआप ठिकाणावर येईल." शेजारीच उभा असलेला थोरला भाऊ धनशेखर बहिणीकडे रागाने पाहात उद्गारला.

चिंतामणी रडतच तिथून घरांत गेली. दिवाकर म्हणाला, "रमणरावजी, मी निघतो आता." "ती माझी धाकटी मुलगी. तिला अजून कुठे नि काय बोलावं ते नीट समजत नाही. पण माझी थोरली मुलगी तुम्ही पाहिलीत, ती तुम्हाला पसंत आहे कां?" रमणने संकोचाने विचारले.

"कोणताही निर्णय घेण्यापूर्वी मला जरा सवड हवी. मला दूरवर जायचंय. अंधार लौकर पडेल. तेव्हां मी आत्ता निघालो तर बरंच!" असं म्हणून दिवाकर घरांतून बाहेर पडला.

जेव्हां तो वडाच्या झाडापाशी पोंचला तेव्हां राजधानीला जाण्यासाठी एक बैलगाडी तिथे उभी होती. तो त्या गाडीत बसला. गाडीमधे तिघेजण अगोदर बसलेले होतेच. बैलगाडी निघाली. जेव्हां गाडी जोरांत जाऊं लागली तेव्हां बैलांच्या गळ्यांत बांधलेल्या काशाच्या घंटांचा छान आवाज येऊं लागला.

अंधार जास्त वाढला तेव्हां गाडीवानाने एक कंदिल पेटवला आणि गाडीच्या खाली लटकवला. एक प्रवासी म्हणाला, "दिवसा प्रवास करायला वेळ मिळत नाही, आणि रात्री प्रवास करताना चोरांची नेहमीच भीती असते. पण काय करणार? काम तर करावेच लागते ना!"

दोन तासांचा प्रवास झाल्यानंतर गाडी जंगलातून बाहेर आली. वाटेत एक धष्टपुष्ट माणूस उभा राहिला होता. त्याच्या हातांत तलवारसुद्धा होती. त्याला बघून गाडीवाला भिऊन थरथर कांपायला लागला व ओरडूं लागला, "हा गजराज डाकू आहे, पळा, पळा!" असं म्हणत त्याने गाडी थांबवली.

गजराज लांबलांब टांगा टाकीत गाडीच्या-जवळ आला आणि दरडावून बोलला, "माझ्या



तावडीतून कुणीही सुटत नाही. तुमच्यापाशी जितके पैसे, दागिने आहेत, ते सगळे काढा!"

गाडींत बसलेल्या तिघा प्रवाशांनी घाबरून आपापले पैसे, अंगावरचे सोनेनाणे काढून ठेवायला सुरवात केली, पण दिवाकरने मात्र गाडीतून खाली उडी मारली.

गाडीवाल्याचा चाबूक त्याने चटकन हिसकावून घेतला आणि तो गरागरा फिरवीत ओरडून म्हणाला, "अरे ओ गजराज, शेवटी माझ्या हातांत सांपडलास बरा! केव्हांपासून मी तुला शोधतो आहे. राजाने तुला पकडायची आज्ञा दिलेली आहे आणि आज ती पाळायचा योग आलाय. निमूटपणे स्वाधीन हो, नाहीतर अत्यंत कडक शिक्षा होईल. पळून जायचा प्रयत्न करशील तर जंगलात आमचे सैनिक पसरलेले आहेत. तेच तुला मारतील आणि तुझ्या शरीराचे तुकडेतुकडे करुन कोल्ह्याकावळ्यांना खायला घालतील."

गजराजने जेव्हां ऐकलं कीं जंगलात सैनिक आहेत, तेव्हां तो कांही क्षण भांबावला. काय करावे ते त्याला सुचेना. त्या संधीचा फायदा घेऊन दिवाकर त्याच्यावर झेपावला आणि त्याच्या हातावर चाबकाचा फटकारा मारला. त्याच्या हातांतली तलवार खाली गळून पडली. तितक्यांत ते तिघे प्रवासीदेखील मदतीला धांवले. सर्वांनी मिळून गजराजला पकडले, त्याचे हातपाय बांधून त्याला बैलगाडीत घातले.

दुसऱ्या दिवशी मुसक्या बांधलेल्या स्थितींत गजराजला दिवाकरने ओढतच राजाच्या दरबारांत नेले. राजाला संपूर्ण किस्सा सांगितला. गजराजने खाली मान घालून आपले सारे अपराध कबूल केले.





राजा म्हणाला, "गजराजच्या अत्याचारा-बद्दल आणि अन्यायाबद्दल मी बरेच दिवस ऐकतो आहे. जनतेच्या तक्रारी माझ्या कानावर आलेल्या आहेत. हा जंगलात लपला होता, म्हणून आम्ही ह्याला आजपर्यंत पकडूं शकलो नाही. दिवाकरने ह्याला पकडून शाबित केले कीं तो खूपच कल्पक व धाडसी आहे. मी त्याचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. आणि अशाच प्रकारे त्याने गजराजच्या मुलाला पकडून माझ्यासमोर हजर करावे अशी मी त्याला आज्ञा देतो आहे."

दिवाकर कांही सैनिकांना बरोबर घेऊन रामवरला गेला, आणि त्याने मोठ्या चतुराईने गजराजच्या मुलाला, लच्छूला पकडले आणि राजाच्यासमोर हजर केले. राजाने बापलेकांना जन्मठेपेची शिक्षा दिली. दिवाकरची तडफ व हुशारी पाहून राजा अतिशय खूष झाला आणि त्याने पहारेकऱ्यांच्या खात्याचा प्रमुख म्हणून दिवाकरची नेमणूक केली.

रमणला जेव्हां ही सविस्तर हकीकत समजली, तेव्हां आपल्या भावी जांवयाच्या साहसाबद्दल तोही फारच खूष झाला. रमण दिवाकरला भेटायला राजधानीला गेला. त्याने दिवाकरला पुन्हां विवाहाबद्दल विचारले. त्यावर दिवाकरने उत्तर दिले, "मला क्षमा करा. मी आपल्या मुलीशी विवाह करूं शकणार नाही."

रमणने निराशेने विचारले, "कां? तुम्हाला माझी मुलगी चांगली वाटत नाही कां?"

"असं कांही नाही. हे त्याचं कारण नाही." दिवाकर म्हणाला.

"आता राजाची कृपा झालेली आहे, तुमची प्रतिष्ठा वाढली आहे. म्हणून तुम्ही एखादं मोठं स्थळ शोधणार असाल, होय ना?"

"नाही, नाही, मुळीच नाही." दिवाकरने ठामपणे उत्तर दिले "तर मग माझ्या मुलीशी लग्न करायला कां नकार देता आहात, त्याचं कारण तरी सांगा!" रमणने पुन्हां विचारले.

"त्याचं खरं कारण आहे तुम्हा पितापुत्राचा स्वभाव! त्या दिवशी मी तुमच्या घरी आलो होतो त्यावेळी तुमची धाकटी मुलगी तुमच्याकडे एका बाह्यात मुलाबद्दल तक्रार घेऊन आली होती. पण तुम्ही दोघांनी, बापलेकांनी तिची फारशी दखल घेतली नव्हती. त्या मुलाला कोतवालाकडे न्यायला हवं होतं. त्या ऐवजी तुम्ही उलट मुलीलाच रागावला होतात. तिलाच चूक ठरवलंत. अशा भेकड कुटुंबाशी नातेसंबंध जोडावा असं मला वाटत नाही, माझं मन त्याला राजी होत नाही." दिवाकरने जरा रागावून म्हटलं.

"हे बघा, समजा, तुम्ही राजाच्या पदरी कामावर नाही आहात, एका कन्येचा सामान्य बाप आहात; तरच तुम्हाला या समस्येचे उत्तर सांपडेल. ज्या दिवशी ज्या तरुणाने माझ्या मुलीची छेड काढली, तो गजराजचा मुलगा होता. आमच्या गांवातल्या बऱ्याच लोकांनी त्याच्याविरुद्ध राजाकडे तक्रारी केल्या होत्या. पण त्याचा कांहीही उपयोग झाला नाही. तुम्हीच विचार करा; जर आम्ही त्या मुलाविरुद्ध कांही केले तर त्याचा काय परिणाम झाला असता? केळीच्या पानावर कांटा पडला काय, आणि कांट्यावर केळीचे पान पडले, तरी काय, पानच फाटणार ना? नुकसान केळीच्या पानाचंच होत असतं. त्यावेळी तशा परिस्थितींत आपल्या मुलीलाच घरांत राहायला सांगावं, याशिवाय पर्याय नव्हता. परिस्थितीपुढे हात टेकावे लागले तर तो भेकडपणा होत नाही. यावर नीट विचार करा आणि नंतर मला तुमचा निर्णय कळवा." असं सांगून रमण गांवी परत गेला.

दिवाकरने रमणच्या बोलण्यावर बराच विचार केला. रमणचे बोलणे पटणारे होते, खरे होते. सरकारी कर्मचाऱ्यांना जे धाडस दाखवता येते, ते सर्वसामान्य माणसांना जमत नाही. म्हणून त्या पितापुत्रांना सर्वस्वी दोष देणे योग्य नाही. दिवाकरने लागलीच शांतामणीशी विवाह करायला होकार दिला आणि पहिल्याच सुमुहूर्तावर त्यांचे लग्न लागले.



मी या अरण्यांत राहतो आणि केवळ कंदमुळांवर निर्वाह करतो.'' म्हातारा म्हणाला.

''तसं असेल तर आम्ही तुला कांहीही करणार नाही याची खात्री बाळग. मी ब्रम्हापुरच्या राजाचा अंगरक्षक आहे. जर कुणी शत्रूची माणसे इथे असली तर त्यांना संपवायला मी इथे आलो आहे. पण मला सांग, तुला डोंगरावर जायची वाट ठाऊक आहे कां?'' अंगरक्षकाने विचारलं.

म्हाताऱ्याने आपला हात त्याला दाखवीत म्हटलं, ''जशा माझ्या हातावरच्या रेषा मी ओळखतो, तशा या डोंगरातल्या वाटा मला माहीत आहेत.''

''अरे वा, अगदी योग्य वेळी भेटलास की! तर मग आता पुढे होऊन आम्हाला मार्ग दाखव. तुझी आत्ताच ओळख झाली बघ, नाहीतर महाराजांकडून तुला भरपूर इनाम मिळवून दिलं असतं.''

अंगरक्षक म्हणाला. म्हाताऱ्याला मात्र डोंगरावर जायची घाई झालेली होती. तो डोंगराकडे वळला.

अंगरक्षकाने त्याच्या हातांतली तलवार पाहिली. त्या
कंदमुळांच्यावर जगणारा, तुला तलवार कशाला हवी?''

''मी पूर्वी ब्रम्हापुर राजाच्या पदरी सैनिक होतो. हा आजचा राजा नव्हे, त्याचा पिता! तेव्हांपासून ही तलवार माझ्याबरोबर असते.'' म्हाताऱ्याने अभिमानाने सांगितलं.

हे ऐकून सैनिक आपापसांत कुजबुजू लागले. अंगरक्षकाने त्याच्याकडे बघत त्यांना हळूंच सांगितले,

''आपल्या जीवाला मुळीच धोका नाही. मला तो चांगला वाटला, म्हणून तर मी त्याला वाट दाखवायला सांगितले. जर त्याने कांही गडबड केलीच तर मागून वार करुन मी त्याचा गळा कापीन.''

म्हाताऱ्याने हे बोलणे व्यवस्थित ऐकले, पण त्याला कांहीही ऐकूं आले नाही असे त्याने दाखवले. तो डोंगराची वाट चढायला लागला.

(अपूर्ण)





वेताळ-कथा

# रत्नमाला

निश्चयाचा पक्का असलेला विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, ाने झाडावरुन शव खाली उतरवले णि खांद्यावर घेतले. नंतर नेहमी-प्रमा त्याने स्मशानाची वाट धरली. तेव्हां तांत लपलेल्या वेताळाने म्हटलं, ''राजन्, असं वाटतं कीं तू एखाद्या मांत्रिकाचा अपमान केला असावास आणि संतापून जाऊन त्याने तुला शाप दिला असेल. नाहीतर अर्ध्या रात्री तू इतके अनंत प्रकारचे कष्ट कां सहन करतो आहेस, ते समजत नाही संन्यासी आणि बैरागी सद्गृहस्थांच्या घरांत अतिथी बनून येतात. त्यांच्यापैकी कांहीजण मंत्रतंत्रामधे जाणकार असतात. पण हे समजण्यांत गौरव नावाचा एक तरुण अयशस्वी झाला, त्याच्यामुळे तो शापग्रस्त झाला. बैराग्याने दिलेल्या शापामुळे त्याला फारच त्रास भोगावा लागला. तुझा



थकवा दूर करण्यासाठी त्याची ही कहाणी ऐक.''
आणि वेताळाने राजाला पुढील गोष्ट सांगितली.

सिरीपुरमधे श्रीनिवास हा एक प्रमुख व्यापारी होता. त्याची पत्नी सुजाता ही विनयशील, सुशील व सर्वगुणसंपन्न होती. दोन्ही मुलांतला मोठा मुलगा भैरव शांत स्वभावाचा होता आणि दुसरा मुलगा गौरव हा अगदी रुक्ष आणि बाभरट होता.

एके दिवशी एक बैरागी त्यांच्या घरी आला आणि त्याने जेवण वाढायला सांगितले. सुजाताने त्याला स्वादिष्ट भोजन दिले. भैरवने नम्रपणे त्याची सेवा केली. पण गौरवने त्याच्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. उलट तो म्हणाला, ''एका भिकाऱ्याचे इतके कौतुक कशासाठी करायला हवं?''

बैरागी नाराज होऊन उठला. तो त्याला म्हणाला, ''अन्न मागणाऱ्यावर इतका राग काढू नकोस. कदाचित तुलाही कधीकाळी भविष्यांत भीक मागावी लागेल.''

''आमच्या घरांतले जेवण तू जेवून मलाच शाप देतो आहेस होय? तुझ्यासारख्या दुष्ट लोकांची मी मुळीच काळजी करत नाही. आदरातिथ्य करण्याची तुझी लायकीच नाही.'' असं म्हणून गौरव तिथून निघून गेला.

श्रीनिवास, सुजाता व भैरव यांना बैराग्याचे शब्द ऐकून भीती वाटली त्यांनी गौरवच्या वतीने क्षमेची भीक मागितली. बैरागी हंसतच म्हणाला, ''सांगा, तुम्हाला काय हवंय?''

''आम्हाला कांहीही नको. गौरवचा हा उर्मटपणा कमी कसा होईल, त्याचा कांहीतरी उपाय सांगावा.'' सुजाताने नम्रपणे विचारलं. बैरागी तिला म्हणाला, ''गौरवसारखा दुष्ट तुमच्यासारख्या सुशील घरामधे कसा निपजला, याचंच आश्चर्य वाटतंय. त्याला त्याच्या मार्गाने जाऊं दे. त्याची चिंता तुम्ही करूं नका. सांगा, तुम्हाला काय हवंय?''

''आमची एकमात्र इच्छा हीच आहे की गौरवचं भविष्य चांगलं असावं.'' तिघांनी म्हटलं.

त्यावर बैराग्याने सांगितलं, ''त्याची वक्र बुद्धी आत्ता ठीक करण्याची शक्ती माझ्यामधे नाही.'' आणि एक प्रदीर्घ श्वास घेऊन त्याने आपल्या सदऱ्याच्या बाहीमधून एक चमकणारी रत्नमाला बाहेर काढली. ती श्रीनिवासच्या हातांत देत सांगितले, ''ही माला शक्तिशाली आहे. ही तुमच्या देवघरांत सुरक्षितपणे ठेवून द्या व तिची रोज पूजा करीत जा. ही तुमचे रक्षण करील. पण जर ही कुणा अयोग्य व्यक्तीच्या हातांत गेली किंवा ही कुणाला दान दिली गेली तर हिचा कांहीही उपयोग होणार नाही.''

गौरव सुधारेल या आशेने श्रीनिवासने बैराग्याच्या समक्षच ती माला देवघरांत ठेवली. त्या सर्वांना



आशिर्वाद देऊन बैरागी निघून गेला.

कांही महिने उलटले. एक दिवस श्रीनिवासने दोन्ही मुलांना जवळ बोलावून सांगितले, ''मी आता म्हातारा होत चाललोय. मला आता मनाला, शरीराला विश्रांति हवीशी वाटते. यापुढे व्यापारधंदा भैरव सांभाळेल. गौरव थोरल्या भावाला जी लागेल ती मदत करीत राहील.''

वडिलांचा हा निर्णय गौरवला मुळीच पसंत पडला नाही. त्याला वाटलं कीं पित्याने त्याच्यावर अन्याय केला आहे व मोठ्या भावाला झुकते माप दिले आहे. गौरवने साफ सांगितलं कीं तो यापुढे घरांत राहाणार नाही. पित्याने थोडे पैसे द्यावेत म्हणजे तो स्वतःच व्यापार सुरुं करणार होता. दुसरा कांही मार्ग नव्हता. म्हणून श्रीनिवासने त्याला थोडी रक्कम दिली. ती घेऊन गौरव घरांतून बाहेर पडला; त्याने अनेक व्यापार करण्याचा प्रयत्न केले पण त्याला कुठेच यश मिळालं नाही. बघताबघता सगळी रक्कम त्याने घालवली.

गौरव घरी परतला. त्याने वडिलांना सांगितलं, ''माझं व्यापारांत पूर्ण नुकसान झालंय. आता माझ्याजवळ फुटकी कवडी देखील शिल्लक नाही. थोरल्या भावाचा व्यापार चालू आहे, पण त्यांत कांही मोठेपणा नाही. मी व्यापारांत हरलो, त्यांत माझी नालायकीदेखील नाही. हे सारं कांही त्या पूजेतल्या रत्नमालेच्या प्रभावामुळे झालंय. ती रत्नमाला तुम्ही मला द्या. जोपर्यंत माझं सुरळीत चालत नाही, तोपर्यंत ती मी माझ्याजवळ ठेवीन.''

''अरे, रत्नमाला जर देवघरांतून काढली तर अरिष्ट येईल. त्या बैराग्याने काय सांगितलं होतं ते आम्ही तुला त्यावेळी सांगितलं होतं, तरीसुद्धां तू त्या मालेसाठी आग्रह धरतो आहेस. आता स्पष्ट



समजलं कीं तुझी बुद्धिच चांगली नाही.'' श्रीनिवास नाराजीने म्हणाला.

हे शब्द ऐकून गौरव चांगलाच चिडला. त्या रात्री जेव्हां सारेजण झोंपले होते, त्यावेळी त्याने थोडी रक्कम व ती रत्नमाला घेतली आणि तो निघून गेला. दुसऱ्या दिवशी सकाळी तो एका दुसऱ्या गांवी पोंचला. ते जिल्ह्याचे गांव होते, आसपासच्या तालुक्यांसाठी ते चांगले मध्यवर्ती गांव होते.

गौरवला वाटले की ते गांव कापडाच्या व्यापारासाठी चांगले ठरेल. म्हणून त्याने एक घर भाड्याने घेतले. जवळच्या नगरांत जाऊन भरपूर उंची कपडे खरेदी केले. एका बैलगाडीवर सारा माल लादून तो आपल्या नव्या गांवी परत येत होता. त्यावेळी अचानक विजा चमकूं लागल्या आणि मुसळधार पाऊस सुरुं झाला.

अर्ध्या वाटेवर तीन चोरांनी गाडी थांबवली, गाडीवान व गौरवला तलवारीसुऱ्यांचा धाक दाखवून



त्यांनी गाडी आडवाटेला नेली. गाडीतला सारा माल त्यांनी लुटला. आपल्या दुर्दैवाला बोल लावीत गौरव घराकडे परतला. पण तो समोर असतानाच वीज कोसळली आणि त्याच्या घरावर पडली. त्याच्या डोळ्यादेखत घराची राखरांगोळी झाली. या दोन दुर्घटना घडल्या, त्या केवळ त्या रत्नमालेच्या प्रभावामुळेच, असे गौरवला वाटले. विषारी नागासारख्या मालेच्या विळख्यांतून सुटका कशी करावी याचा तो विचार करु लागला. तेवढ्यांत त्याला जळत्या घरासमोरच तो बैरागी दिसला. बैराग्याने गौरवला म्हटले, "अरे पापी माणसा, तुझा उद्धटपणा आता तुझा शाप बनला आहे. आजपासून तू गांवोगांवी भटकशील आणि भीक मागून आपले पोट भरशील. जी मुलगी निस्वार्थीपणे पण मनापासून तुझ्याशी लग्न करण्याचे वचन देईल, तिला तू ही रत्नमाला दे, म्हणजेच तुला या मालेपासून त्रास होणार नाही."

तेव्हांपासून गौरव गांवोगांवी भिक्षा मागत हिंडायला लागला. एखादी सुंदर तरुण मुलगी दिसली तर तिला तो आपली कहाणी सांगायचा व तिने लग्नाचे वचन दिले तर ती रत्नमाला तिला द्यायचे कबूल करायचा. दोघीतिघी मुली त्या मालेच्या लोभाने लग्नाला तयार झाल्या. त्याने ती रत्नमाला त्यांना दिली, पण ती लगेच त्याच्या हातांत परत आली. असाच फिरत फिरत तो मारकापुरला पोंचला.

तिथे देव नांवाचा एक इसम होता. त्याचे आईवडील त्याच्या लहानपणीच मेले होते. काबाडकष्ट करुन त्याने आपल्या धाकट्या बहिणीचे, शिवानीचे पालनपोषण केले. त्या भावंडांचे एकमेकांवर फार प्रेम होते.

त्या गांवात देवकी नांवाची एक देखणी मुलगी होती. ती चारपांच घरी घरकाम करुन पैसे मिळवीत होती. तिला कुणीही नातलग नव्हते. एखाद्या श्रीमंत माणसाशी लग्न करावे व ऐषारामांत राहावे, ही तिची इच्छा होती. हे देवला जेव्हां समजलं, तेव्हां त्याला आपली प्रेमभावना व्यक्त करायला संकोच वाटला. शिवानीला भावाची इच्छा माहीत होती. ती देवकीला भेटली व म्हणाली, "माझ्या भावाचे तुझ्यावर प्रेम आहे. मी तुला बहिनी मानते. माझा भाऊ देवमाणूस आहे, आणि तू देवीसमान आहेस. तू त्याच्याशी लग्न कर."

"देवी रत्नमाला वापरतात. मलाही तशी एक माळ आणून दे ना, म्हणजे मी तुझ्या भावाशी लग्न करीन." देवकीने लगेच उत्तर दिलं.

"रत्नमाला मिळवण्यासाठी मी कितीही कष्ट करीन. पण ती विकत घ्यायला खूपच पैसे लागतील ना?" अपराधी स्वरांत शिवानी बोलली.



नेमका त्याच वेळेला भिक्षा मागायला आलेला गौरव तिथे पोंचला. त्याने या दोघींचे बोलणे ऐकले. शिवानीकडे निरखून बघत तो म्हणाला, "पैसे न मागता जर मी तुला एक रत्नमाला दिली, तर तू माझ्याशी लग्न करशील कां?" असं बोलून त्याने झोळींतून रत्नमाला काढली.

ती पाहिल्याबरोबर शिवानीचे डोळे चमकले. कोणताही विचार न करता तिने 'हो' म्हटलं. गौरवने ती रत्नमाला तिच्या हातांत दिली आणि ती तिच्या हातांतच राहिली. शिवानीने ती देवकीच्या गळ्यांत बांधली.

गौरवने आनंदून जाऊन म्हटले, "बरं झालं, मी आता बैराग्याच्या शापातून मुक्त झालो. त्यांनी सांगितल्याप्रमाणे माझ्याशी लग्न करायला मनापासून होकार देणारी मुलगी मला मिळालीय."

आपल्या बहिणीला शोधत देव तिथे आला. तेव्हां त्याला कळलं की गौरव एका चांगल्या कुटुंबातला आहे. त्या बैराग्याच्या शापामुळे त्याची अशी दशा झाली होती. दुसऱ्याच दिवशी गौरव-शिवानी व देव-देवकीचे विवाह झाले."

वेताळाने ही गोष्ट सांगून राजाला विचारले, "राजन्, बैराग्याने श्रीनिवासला सांगितलं होतं की या रत्नमालेमुळे तुमच्या परिवाराचे भलेच होईल. पण झालं अगदी उलट. त्या परिवारांतलाच गौरव, शापामुळे भिकारी झाला आणि दारोदार भटकत राहिला. ही कांही परिवाराची उन्नती नाही. त्या रत्नमालेमुळे गौरवचे तरी काय भले झाले? त्या मालेचा फायदा झाला तो देवचाच! माझ्या या शंकांची उत्तरे तुला माहिती असूनही जर तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील."

विक्रमार्क उत्तरला, "बैराग्याने गौरवला जो शाप दिला, त्यांत विचित्रपणा असा आहे की त्या रत्नमालेमुळे गौरवलाच लाभ झाला असे नव्हे, तर इतरांचेही भले झाले. अनंत प्रकारचे कष्ट सोसून नंतर श्रीनिवासच्या घरांतल्या रिवाजानुसार तो वळणावर आला. तो शिवानीचा पती झाला. हे शिवानीच्या दृष्टीने चांगलंच होतं. देवला हवी होती तीच सहचरी मिळाली. म्हणून आपण निर्धोकपणे म्हणू शकतो कीं बैराग्याच्या शापाने सर्वांचेच कल्याण झाले."

राजाचे मौन भंग करण्यांत वेताळ सफल झाला म्हणून तो शवासहित पुन्हां गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*('वसुंधरा'च्या रचनेवरुन)*



हिमाचल प्रदेशांतली एक लोककथा

# वसंतऋतू केव्हां येईल?

लाहौल व स्पिटी नदी यांना जोडणारी कुंझमला ही खिंड आहे. जवळच्याच खोऱ्यांत चंदनताल हे सरोवर आहे. हिंवाळ्यांत हा तलाव पार गोठून जायचा. उन्हाळ्यांत पर्वतांच्या रांगांवर हिरवीगार झाडी व गवत असे, ते अप्रतिम दिसे. चंद्रतालच्या पाण्यांत पर्वतांच्या बर्फाच्छादित शिखरांचे प्रतिबिंब सुंदरच दिसायचे. जवळच्या खेड्यांतले गुराखी त्यांच्या मेंढ्या घेऊन येत. त्या प्राण्यांना त्या हिरवाईतून परत मेंढवाड्यात जाण्याची इच्छा नसे. म्हणून बहुतेक गुराखी हिंवाळ्याची चाहूल लागेपर्यंत तिथेच राहात.



चंद्रतालजवळच्या हंसी खेड्यांत नीमा राहात होता. त्याचा भाऊ व वहिनी दोल्मा ह्यांच्याबरोबर तो राहात होता. दोल्मा एक भांडकुदळ, कजाग स्त्री होती. कडाक्याच्या थंडीतदेखील ती नीमाला लांकडे फोडायला आणि पाणी आणून भरायला सांगायची. ती बोलभांड होती आणि दिवसभर नीमाला कामे सांगून त्याच्याकडून ती करवून घ्यायची. दोल्मा त्याला म्हणायची, "तू लग्न कर, म्हणजे तुझी बायको तुला व मला कामांत मदत करील. नंतर तुला पाहिजे तितका वेळ विश्रांति घेत बैस!"

नीमा उन्हाळा सुरुं होण्याचीच वाट पाहात बसायचा. कारण त्यावेळी डोंगरांच्या उतरणीवरचे कोवळे हिरवे गवत शोधत मेंढ्या चरायच्या. दोल्मा त्याला धान्य व इतर अन्नसामुग्री देत असे. मेंढ्या मजेत हुंदडत असत. नीमा गुरांना मोकळे सोडून तिथलीच एखादी गुहा स्वतःसाठी निवडून घेई. कोंपऱ्यांत आपले सामान टाकले कीं मेंढ्यांसाठी तो एक कोंडवाडा बनवायचा. त्यानंतर मात्र तो गुहेसमोर पडलेल्या, वाळलेल्या पानांवर, आरामांत झोपायचा. मुलकिला पर्वतराजीवरुन जाणारे येणारे ढग पाहात तो दिवसभर आराम करीत बसे. संध्याकाळ व्हायच्यापूर्वी तो मेंढ्या गोळा करुन आणी, आणि त्यांना कोंडवाड्याकडे घेऊन आंत सुरक्षित ठेवीत असे. नंतर तो आपली भाकरी खायला बसे आणि चटईवर पडला की चंद्रतालामधून येणाऱ्या परीराणीबद्दल त्याचे विचार चालू होत. लोक परीराणीबद्दल नेहमीच कौतुकाने बोलत असत.

ती पौर्णिमेची रात्र होती. तलावाजवळच एक शेकोटी पेटवून नीमा तिथे बसला होता. त्याला झोंप येत नव्हती. सरोवराच्या पाण्यावर पडलेले पूर्णचंद्राचे प्रतिबिंब न्याहाळण्यांत तो गुंगला होता. त्याला एका स्त्रीचा आवाज ऐकूं आला असे उगीचच वाटले. त्याने मागे वळून पाहिले. कुणीही नव्हते. तो पाण्याकडे पाहूं लागला, आणि त्याला सरोवराच्या कांठाजवळ पांढरा शुभ्र अंगरखा घातलेली एक सुंदर तरुणी दिसली.

ती हळूंहळूं नीमाजवळ आली. तिने कुज-बुजल्यासारख्या बारीक आवाजांत म्हटले, "मी चंद्रतालची परी आहे. मी तुला इथे खूप दिवस बघते आहे, आणि मला तुझ्याशी मैत्री करायची आहे. तुझं नांव काय? तू खूप देखणा आहेस."

"मी हंसी गांवचा नीमा." नीमाने आपली ओळख सांगितली. "उन्हाळ्यांत मी माझ्या मेंढ्यांना घेऊन इथे येतो. मी चंद्रतालच्या परीबद्दल खूप गोष्टी ऐकलेल्या आहेत, पण आजपर्यंत तिला कुणीही पाहिलेलं नाही." नीमाने रुंद हास्य केले.

"नीमा, तू जेव्हां इथे येतोस ना, तेव्हां तो माझ्यासाठी वसंतऋतू असतो, आणि तू परत जातोस तेव्हां हिंवाळा सुरुं होतो. तुला इथे झोंपलेला



असा मी आनंदाने पाहात बसायची. तुला माहिती नसेल, पण मी या पाण्याबाहेर फक्त रात्रींच येऊ शकते, आणि आज प्रथमच तू मला जागा दिसलास. तुझ्याजवळ येऊन बोलायचं मी धाडस केलं आहे. नीमा, तू माझ्या-बरोबर येशील कां?" त्या परीने मोठ्या विनयाने पण प्रेमाने विचारले.

नीमाच्या तोंडून शब्दच फुटेना परीने निःसंकोचपणे त्याचा हात धरला आणि ती तलावाकडे चालायला लागली. तिने पाण्यांत पाऊल टाकले, आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे नीमालाही पाण्यावरुन चालायला येऊं लागलं. तिने त्याचा हात पकडलेला होता ना! ते सरोवराच्या मध्यभागी पोंचले, तेव्हां परीने अंगरख्याच्या चोरखिशांतून



जादूची काठी बाहेर काढली आणि वरखाली हालवली. पाणी दुभंगले आणि तिथे पायऱ्या दिसूं लागल्या. त्या पायऱ्या उतरून दोघेही खाली एका भव्य, देखण्या राजवाड्यांत शिरले. त्या राजवाड्याच्या भिंतींवर हिरे चमकत होते. रात्री चांदण्या चमचमतात ना तसेच!

सोनेरी रंगाची गुळगुळीत जमीन जणू सोन्याची ताटेच असावीत अशी दिसत होती. शेकडो पऱ्या आनंदाने नाचत, हंसत, तिथे जमल्या आणि त्यांनी त्यांना आंतल्या दालनांत नेले. ज्या परीने नीमाला तिथे नेले, ती त्यांची राणी होती, हे नीमाने ओळखले. इतर पऱ्यांनी त्याला रेशमी वस्त्रें नेसायला दिली. एकीने सुंदर सुगंधाचा फवारा त्याच्यावर शिंपडला. त्यांनी सोन्याच्या ताटांत फळफळावळ आणली आणि सोनेरी चषकांतून एक गोड सरबत दिले. परीराणीच्या हातांत कुणीतरी नाजूक पंखा दिला. फुलपांखराच्या पंखांचा तो बनवलेला होता. राणीने नीमाला वारा घातला आणि लौकरच त्याला झोंप लागली; पहांट होताच त्याला जाग आली आणि परीराणीने त्याला वरती सरोवराच्या कांठापर्यंत आणले. रात्रीं पुन्हां येण्याचे आश्वासन देऊन ती परत गेली आणि नीमाही कोंडवाड्यांतल्या गुरांना मोकळे सोडण्यासाठी धांवला.

परीराणी रोज रात्री येऊन त्याला तिच्या राजवाड्यांत घेऊन जाई व पहांटे परत वरती जमिनीवर आणून सोडत असे. उन्हाळ्याचे दिवस असे जात होते. पण आता त्याल नवीच शंका सतावायला लागली. हिंवाळा आल्यानंतर काय होईल?

एका दिवशी त्याला थंडगार बोचरे वारे जाणवले. जमिनीवर जरासे बर्फ होते आणि संध्याकाळपर्यंत सरोवराचे पाणी गोठले होते. त्या रात्री त्याने परीराणीला सांगितले कीं आता त्याला गांवी परत जावे लागेल. कारण आता मुलकीन डोंगरांवर मेंढ्यांसाठी फारच थोडे गवत शिल्लक राहिलेले होते. त्याने जर गुरे खोऱ्यांतल्या घरांत नेली नाहीत, तर ती जिवंत राहिली नसती.

परीराणी उदासवाणी झाली. तिने त्याला आर्जवाने विचारले, ''नीमा, वसंतऋतू सुरुं झाला आणि फुले पुन्हां उमलायला लागली कीं तू परत इकडे येशील असे मला वचन दे. मी या लांबलचक



हिंवाळ्याच्या दिवसांत तुझी वाट पाहीन. आपल्या या भेटींच्याबद्दल तू कुणालाही सांगणार नाहीस असेही मला वचन दे.''

नीमाने तसे तिला वचन दिले. परीराणी पाण्यांत परत गेली तेव्हां ती दिसेनाशी होईपर्यंत तो कांठावर तिच्याकडे एकटक पाहात राहिला. क्षणार्धात ती दिसेनाशी झाली. त्याने एक मोठा उसासा टाकला आणि तो कोंडवाड्याकडे परत वळला. त्याने मेंढरांना मोकळे सोडले, आणि आपले सामान व मोठा सोटा घेऊन तो गांवाच्या वाटेला लागला. गार वारे वाहू लागले होते, म्हणून मेंढ्या भराभरा चालूं लागल्या.

त्यावर्षी, थंडीच्या दिवसांत दोल्नाला आपला दीर निराळाच वाटला. तो एकटाच स्वतःशी विचार करीत बसलेला असे. कांही विचारले तरी लगेच उत्तर देत नसे. सुदैवाने, तिने त्याला फारशी कामे सांगितली नाहीत.

हिंवाळा संपला नव्हता, तरी रोज सकाळी उठून नीमा बाहेर जाऊन क्षितिजाकडे बघत राही. पर्वताच्या शिखरांमधून सूर्य उशीरा उगवत होता. अजून गवत तपकिरीच होते आणि झाडांवर मुळीसुद्धां पालवी नव्हती. फुले यायला तर अजून बराच अवकाश होता.

एके दिवशी डोंगरकपारीत जाण्याची तयारी नीमा करीत होता, ते दोल्नाला दिसले. त्याने तिच्याकडे शिदोरी व इतर सामान मागितले. ती चकित होऊन म्हणाली, ''नीमा! अजून उन्हाळा यायला बराच अवकाश आहे. पर्वतावर अद्याप बर्फाचा थर आहे. मेंढरे मरतील. बर्फ वितळायला अजून एकदोन आठवडे तरी नक्कीच लागतील.''

त्याने थोडा वेळ तिला कांहीच उत्तर दिले नाही. दोल्नाला वाटलं कीं त्याला जरा जागं करावं. ती म्हणाली, ''नीमा, इकडे ये आणि मला थोडी लांकडं फोडून दे.''

नीमा शेगडीच्या उबेत बसला होता, तो तिथून हालला नाही. तो विचारांत गढला होता. ती चिडून ओरडली, ''नीमा, अरे तू कोण समजतोस स्वतःला? स्पिटीचा गंधर्व कीं काय? आणखी आपल्याला मी चांदीच्या पेल्यांतून गरमागरम कढण प्यायला आणून देऊं कीं काय?''

आजपर्यंत नीमाने वहिनीला कधीही उलट उत्तर दिले नव्हते. पण आज मात्र तो संतापला. ''तू कढण देणार कां मला? भुताच्या कांजीसारखं असतं ते! याकसुद्धां त्याला तोंड लावणार नाही. शी!''



दोल्माला हा चाबकाचा फटकारा वाटला. "मी जे जेवण देते ते तुला आवडत नाही कां? तू असा बोलतो आहेस कीं जणू कांही चंद्रतालची परीच तुला सोन्याच्या पेल्यांत सरबत देत होती!"

"तेच तर झालं मागच्या उन्हाळ्यांत! ती रोज रात्री येऊन मला घेऊन जायची आणि सकाळी परत आणायची. माहिती आहे कां तुला?" आणि अचानक त्याने परीराणीला दिलेले वचन आठवले. त्यांच्या भेटीबद्दल कुणालाही सांगायचे नव्हते.

"असं होय? मग जा की परत त्या परीबाईकडे!" दोल्मा ताडकन म्हणाली पण लगेच तिने जीभ चावली. आपण ह्या गरीब दिराला असं तोडून बोलायला नको होतं असं तिला वाटलं. पण काय होतंय ते लक्षांत येण्यापूर्वीच नीमा घरांतून बाहेर पडला.



तो जवळच्या एका प्रार्थना-मंदिरात शिरला. त्या मठांत बसून त्याने बराच वेळ प्रार्थना केली. यंदा वसंतऋतू लौकर यावा म्हणून त्याचे देवाला विनवले.

नंतर तो घरी परत गेला. वहिनीला हवी असलेली लांकडे त्याने फोडून दिली. तो आवाज ऐकून दोल्मा बाहेर आली आणि नुसतीच हंसली.

रोज सकाळी नीमा घरांतून बाहेर येई व पर्वतांवर कुठे हिरव्या पानाची कोंवळी पालवी दिसते आहे कां ते डोळे फाडफाडून बघत बसे. त्याला सांगितलेली सगळी कामे तो मुकाट्याने करीत होता. कामे संपली कीं तो मठांत जाई आणि मनांतला एकच प्रश्न विचारी, "हे देवा! वसंतऋतू केव्हां रे येईल?"

अखेरीस हिंवाळा संपला व वसंतऋतू आला. नीमाने दरसालप्रमाणे मुलकिला पर्वतराजीकडे मेंढ्यांना नेले. त्याने ती ठराविक गुहा साफसूफ केली, कोंडवाडा बांधून तयार केला, आणि रात्रीच्यावेळी तो परीराणीची वाट बघत तळ्याच्या कांठावर बसून राही. पण ती आली नाही. त्याने आठवडाभर तिची वाट बघितली. ती त्याच्यावर रागावली होती कां? पण ते त्याला कसं कळणार?

कांही दिवसानंतर तो अतिशय अस्वस्थ झाला. "जर ती मला भेटायला येणार नसेल, तर मी कां तिला भेटायला जाऊं नये?" नीमाने हळूंच सरोवराच्या पाण्यांत पाय ठेवला आणि तो चालायला लागला; तो कांही सरोवराच्या मध्यापर्यंत पोंचला नाही. पण त्यानंतर मात्र तो कुणालाही कधीही दिसला नाही. *(एम.डी.)*



# चंदामामा प्रश्नावली - २



**बरोबर उत्तर देणाऱ्यांपैकी एकाला रु.२५०/- दिले जातील.**

**अचूक उत्तरे देणाऱ्यांची संख्या एकापेक्षां जास्त असेल तर बक्षिसासाठी सोडत काढण्यांत येईल व पांच विजेत्यांना समान रक्कम वाटून दिली जाईल.*

***या प्रश्नावलीत विचारलेले सर्व प्रश्न २००५ मधे जानेवारी ते डिसेंबर या अंकांत असलेल्या गोष्टींवर आधारित आहेत. तुम्ही त्या वाचलेल्या आहेत. जर तुम्हाला त्या आठवत असल्या तर तुम्ही लगेच उत्तरे देऊं शकाल. लक्षांत नसतील तर बाराही अंक पुन्हां नजरेखालून घाला. म्हणजे उत्तरे शोधताना मजा वाटेल.***

<u>त्यासाठी :</u> १. उत्तरे लिहा. २. आपले नांव, वय (१६ वर्षांखालील मुलांसाठीच ही स्पर्धा आहे) व पिनकोडसहित पत्ता. ३ वर्गणीदार असलात तर तो क्रमांक. ४. पाकिटावर चंदामामा-प्रश्नावली-२ असे लिहून आमच्या पत्त्यावर पाठवा. ५. मार्चअखेरच्या आंत तुमची प्रवेशिका आम्हाला मिळाली पाहिजे. ६. मेच्या अंकात निकाल जाहीर केला जाईल.

१. संस्कृत भाषेत रामायणाच्या किती आवृत्ती आहेत?

२. धरित्री दिवस, जलदिनोत्सव हे केव्हां साजरे होतात?

३. "संकटातून माणसाला सावरणारे असते धैर्य; कोणत्याही परिस्थितीत धीर न सोडता जिवंत राहून महान बना." गुरुच्या या उपदेशानुसार वागणाऱ्या युवराजाचा तरुण सल्लागार कोण होता? त्या युवकाचे नांव काय होते? तो कोणत्या कहाणींत आहे?

४. जग हे पांच दोषांनी पीडित आहे. त्याची पांच कारणे आहेत, ती कोणती आहेत?

५. "लायहरोबा" हे काय आहे ते माहिती आहे कां?

६. अधिकाराच्या घमेंडीत असलेले दुर्बलांना त्रास देतात. अशा घमेंडखोरांना सूचना दिली जाते कीं शेवटी त्यांची हार निश्चित आहे, त्यांचे गर्वहरण हे होईलच. एक प्राचीन ग्रीक लोककथा हे तात्पर्य सांगते. त्या गोष्टीचे व त्या नायकाचे नांव काय?

७. खालील चित्रांतली तीन पात्रे कोण आहेत?





# फलदायी देशाटन

जयदेव हा विशालदेशाचा राजा होता. विक्रम हा राजाचा मुलगा होता. त्याचा राज्याभिषेक झाला, तेव्हां त्याने पित्याला सांगितलं, "राजाची जबाबदारी स्वीकारण्यापूर्वी मी आधी देशाटन करायचा निश्चय केला आहे. मला आपण आशीर्वाद द्या आणि आपली संमति द्या."

जयदेव म्हणाला, "वेषांतर करुन लोकांच्यात मिळून मिसळून वागणे, त्यांची सुखदुःखे जवळून पाहाणे, आणि त्याच्यासाठी देशांत भ्रमंति करणे ही पूर्वापार चालत आलेली पद्धत आहे. पण त्यांत संकटे येण्याचा धोका असतो. त्यापेक्षां तू युवराज म्हणूनच साऱ्या देशभर फिरून ये ना! ते जास्त चांगलं!"

विक्रमला पित्याचा सल्ला मानवला नाही. "पिताश्री, मी वेषांतर करुन गेलो तरच मला जनतेची सुखदुःखे कळतील. जर मी युवराज म्हणून हिंडलो, तर घाबरून लोक खरी वस्तुस्थिती सांगणार नाहीत. ती जाणून घेऊन त्यांचे भले करणे हे माझे कर्तव्य आहे. आपल्यासारखाच एक चांगला राज्यकर्ता म्हणवून घ्यायची माझीही फार इच्छा आहे. मला आपण वेष पालटून जायची अनुमती द्यावी." आणि पित्याची अनुमती घेऊन विक्रम देशाटनासाठी निघाला.

त्याच्यासोबत मंत्र्याचा मुलगा विवेकशर्मा हाही निघाला. दोघांनी सामान्य नागरिकांप्रमाणे वेषभूषा केली आणि घोड्यावर स्वार होऊन ते निघाले. दूरवरच्या एका भागांत ते महिनाभर राहिले. जिथे कुठे ते जात, तिथे त्यांची चांगली व्यवस्था होत होती. आपल्या पित्याचे राज्य चांगले आहे, लोक प्रवाशांचा आणि अनोळखी लोकांचादेखील आदरसत्कार करतात हे पाहून विक्रमला आनंद झाला.

आणखी एक महिना उलटल्यावर विक्रम व विवेकशर्मा राजधानीला परत यायला निघाले. वाटेत अरण्य होते. तिथे त्यांना पोंचायला संध्याकाळ झाली.

मार्कंडेय शास्त्री

विक्रमने एका दगडावर उभे राहून आसपास पाहिले. "इथून थोड्या अंतरावर एक इमारत दिसते आहे. ते बहुतेक ओसाड घर असेल नाहीतर एखादे जीर्ण मंदिर! आज रात्रीं आपण तिथेच मुक्काम करु या." विक्रम म्हणाला.

दोघेही तिथे गेले. खरोखरीच ते एक लहानसे मंदिर होते. त्याचे दार बंद होते. दाराच्या दोन्ही बाजूला दोन ओट्या होत्या. दोघेही तिथे बसणार, तेवढ्यांत तिथे एक गाडी आली आणि मंदिरासमोर थांबली. त्यांतून एक थाळी घेऊन पुजारी खाली उतरला.

तो मंदिरात गेला, त्याने मंत्रपठण करुन देवीला नैवेद्य दाखवला, आणि बाहेर येऊन ह्यांची चौकशी केली. दोघांनी जेव्हां आपण प्रवासी आहोत असं सांगितलं, तेव्हां तो हंसायला लागला.

पुजारी त्यांना म्हणाला, "या मंदिरातल्या देवीचे नांव चंदना आहे. या अरण्यांत चंदनाची भरपूर झाडे आहेत. या अरण्यावर राजगुरुंचाच अधिकार चालतो. इथून अर्ध्या घटकेच्या आंत आपण आमच्या गांवी पोहोचूं शकूं. आज रात्री माझ्याच घरी आपण मुक्काम करावा. आमच्या राजगुरुचे धाकटे बंधू या मंदिराचे धर्मकर्ता आहेत. मी राजगुरुंच्या काकांचा मुलगा आहे. राजनीतिशास्त्राचा अभ्यास मी पूर्ण केलेला आहे. महाराजांकडे जाण्यापूर्वी मला इथे पुजारी पण दिले आहे."

पुजाऱ्याच्या इच्छेनुसार विक्रम आणि विवेकशर्मा मंदिराच्या आंत गेले. रक्तचंदनाच्या लांकडापासून बनवलेली देवीची मूर्ती फारच छान



दिसत होती. युवराज आणि विवेकशर्मांने भक्तिभावाने डोळे मिटून नमस्कार केला, आणि पुजाऱ्याचे शब्द ऐकून त्यांनी चकित होऊन डोळे उघडले. पुजारी म्हणत होता. "ही चंदनमाता भावी महाराज व मंत्रीमहाशयांना आशिर्वाद देते आहे." नाराजीने विक्रम पुजाऱ्याला म्हणाला, "तुम्ही हे काय बोलता आहात?"

त्यावर पुजाऱ्याने निर्भयपणे म्हटले, "महाराज, माझ्यावर रागावूं नये. मी राजनीतिशास्त्राचा अभ्यास केला आहे हे आपल्याला सांगितलंच आहे. मला दरबारांत जागा मिळवण्याची इच्छा आहे. आपण देशाटन करायला निघालेले युवराज व मंत्रीजींचे चिरंजीव आहात हे मी सहज ओळखूं शकलो. आपली वागण्याची पद्धत राजस आहे. असल्या उत्तम घोड्यांवर स्वार होऊन आपण आला आहात तेही माझ्या कल्पनेला पुष्टि देते.



पुजाऱ्याच्या बोलण्याचे त्यांना आश्चर्य वाटले. पुजारी पुढे नम्रपणे म्हणाला, "देशाटनाचा मुख्य हेतू असतो निरीक्षण! नंतर त्यातले चांगले वाईट निवडून, ओळखून, त्याचा वापर राज्य-कारभारांत कसा आणि किती आणायचा, ह्याचा निर्णय विचारपूर्वक करता येतो. देश जाणून घेण्यासाठी आपण देशाटन करायला निघाला आहात. महाराजांची नजर आपल्यावर निश्चित असणार. आपल्या नकळत, आपण संकटात सापडल्यास, मदतीची आवश्यक ती व्यवस्था त्यांनी केली असणारच. लोकांनी आपल्याला ओळखलं, तरीदेखील ते अनोळखी व्यक्तींसारखा आपल्याशी व्यवहार करतात. माझ्याप्रमाणेच इतरही अनेक लोकांनी आपल्याला ओळखलं असेल."

विक्रमने होकारार्थी मान डोलावीत म्हटले, "प्रथम मला वाटलं होतं कीं तुम्ही साधे पुजारी आहात. आता वाटतंय कीं आपल्याकडून शिकण्यासारखे बरेच विषय असतील. मी आणि विवेकशर्मा कांही दिवस तुमच्या गांवात राहू."

त्यानंतर पुजारी गाडीतून व हे दोघे घोड्यावर बसून पुजाऱ्याच्या गांवी पोंचले.

घरासमोरच्या पिंजऱ्यात दोन पोपट होते त्यांनी युवराज व मंत्र्याच्या मुलाचे स्वागत करून म्हटले, "यावे, यावे, आपले स्वागत असो." आणि नंतर त्यांनी ओरडून सांगितले, "माँजी, गुरुजी दोन अतिथींना घेऊन घरी आले आहेत."

"आपल्या गुरुजींची ही कांही नवी कां रीत आहे? रात्रीच्यावेळी जे कुणी मंदिरात विश्राम करतात, त्यांना ते बरोबर घेऊन नेहमीचे येतात. पोपटांना बोलायला शिकवलं खरं, पण आजपर्यंत चार एकर जमीन कांही विकत घेतली नाही त्यांनी!" असं बडबडत ती बाहेर आली.

विक्रम व विवेकशर्माला बघून ती थबकली, आणि तिने कांही विचारण्यापूर्वीच विक्रम तिला म्हणाला, "पोपटांना बोलायला शिकवण्याचं कौशल्य ह्यांच्यात भरलेलं आहे. हे महान गुरु आहेत. आम्ही यांच्याकडे राजनीति शास्त्राचा अभ्यास करण्यासाठी आलो आहोत. आपल्या घरी राहून हा अभ्यास करायला आपण परवानगी द्यावी."

त्यावर गुरु पत्नी हंसायला लागली व म्हणाली, "पुजारीजी राजगुरुंचे चुलत बंधू आहेत. आपल्याला राजाच्या दरबारांत एक ना एक दिवस जागा नक्की मिळेल अशी त्यांना आशा आहे. पण तसं होईल असं कांही दिसत नाही. आपल्यासारखे शिष्य मिळवून त्यांना शिकवलं असतं, तर आजपर्यंत थोडफार कांहीतरी कमावलं असतं. पुजारी होऊन राहाण्याची जरुरी नसती पडली! ह्यांना नक्की माहिति आहे कीं राजगुरु कांही त्यांना दरबारांत जागा देणार नाहीत. कारण त्यांना प्रतिस्पर्धी निर्माण होईल याची भीती मनांत आहे ना राजगुरुंच्या! त्यांचं पद सुरक्षित राहावं म्हणून ते काळजी घेणारच. अशा माणसावर हे विश्वास ठेवतात, त्यांच्याकडून तुम्ही हो काय शिकणार?"

"राजनीति" विक्रम व विवेकने एकदम म्हटले.

पुजारीणबाई मोठ्याने हंसली व नंतर म्हणाली, "महाराज नेहमी आपला विचार घेतात. आणि सल्ला विचारतात, त्यांच्या आश्रितांचा विचार घेतात. आणि प्रजा देखील त्यांना श्रेष्ठ समजते, आणि आपली ताकद विसरून जाऊन त्यांच्या पायावर लोळण घेते. म्हणून अशी माणसे गुणवंतांना राजाला भेटूं देत नाहीत. वटवृक्षाच्या छायेंतल्या रोपट्यासारखे त्यांना छायेंतच खुरटत ठेवतात आणि त्यांची वाढ होऊं देत नाहीत. माझ्या पतीची तर तीव्र इच्छा आहे कीं गुणवंतांना उत्तेजन देणारा राजा तयार करावा. तेवढ्यासाठीच त्यांनी राजनीतिशास्त्राचा अभ्यास केला. पण त्यांची कांही दरबारांत वर्णी लागली नाही. तेव्हां, ते काय तुम्हाला राजनीति शिकवणार?"

पत्नी पोटतिडीकेने बोलत होती आणि पुजारी मंदहास्य करीत युवराज व विवेककडे बघत होता.

विक्रम तिला उत्तरादाखल म्हणाला, "आम्ही देशाटन करायला निघालो आहोत. आम्ही कोण आहोत ते आपण जाणलं असेलच. देशाटनाचा काय हेतू असायला हवा ते तुम्ही आम्हाला समजावून सांगितलेलं आहेत. आपले आमच्यावर फार मोठे उपकार आहेत. प्रतिभावंतांची ओळख आणि त्यांना दरबारांत स्थान देणे व त्यांचा सल्ला घेणे आवश्यक आहे हे तुम्ही आम्हाला शिकवलंत. मी पुजारीजीसारख्या गुरुजींच्या मदतीने राजनीति शिकेन, त्यांचा सल्ला माझ्या कारभारांत अवश्य घेईन."

त्यानंतर विक्रमने केवळ फक्त ह्या पुजाऱ्यालाच नव्हे, तर इतर क्षेत्रांतल्या गुणवंतांना बोलावून दरबारात त्यांना मानाचे स्थान दिले.



मोठ्यांच्या जीवनांतल्या कांही घटना (३)

# शत्रूला जिंकण्याचा राजमार्ग

मॅसेडोनियाचा किंग फिलीप (इ.स.पू. ३८२-३३२) हा जगज्जेत्या अलेक्झांडरचा पिता म्हणूनच जास्त ओळखला जातो. एकीकडे त्यावेळच्या सर्व ग्रीक राजांमधे तो सर्वात श्रेष्ठ होता, आणि दुसरीकडे त्याची ज्ञानलालसा अफाट होती. सुप्रसिद्ध तत्ववेत्ता ॲरिस्टॉटल याला



त्याने आपल्या मुलाचा शिक्षक म्हणून नेमले होते हा त्याच्या ज्ञानाविषयीच्या भावनेचा पुरावा होता.

त्याच्या राज्यांतल्या एका कोपऱ्यात आर्चिडियस नांवाचा एक उमराव होता. तो फिलिपराजावर फार टीका करीत असे. ही त्याची खोड राजाला अनेकदा त्याच्या अधिकाऱ्यांनी मित्रांनी व गुप्तहेरांनी सांगितली होती. सर्वांनी अर्चिडियसला राजाचा शत्रू ठरवला होता.

एकदा अर्चिडियसच्या प्रांतात राजाचा मुक्काम पडला. राजाने त्याला बोलावून घेतले. "मी आज माझ्या शत्रूचा नायनाट करीन." राजाने आपल्या सहकाऱ्यांना व अधिकाऱ्यांना सांगितले.

"तो अगदी योग्य ठरेल, महाराज." त्यांनी मान डोलावली.

"ठीक तर. माझ्या शत्रूला संपवायचा माझा बेत आहे." राजाने आपला मनोदय जाहीर केला.

आर्चिडियसला दुसरा मार्ग नव्हता. तो राजाच्या दूतांबरोबर गेला आणि राजासमोर हजर झाला. घरांतून निघताना, त्याने आपल्या कुटुंबियांचा अश्रूपूर्ण नयनांनी निरोप घेतला होता. आपला वध होईल कीं काय, अशी त्याला दाट शंका होती, पण इतरांना मात्र आता तो जन्मभर तुरुंगातच सडत राहील अशी अपेक्षा होती. राजासमोर त्याला नेण्यांत आले. राजाने सर्व उपस्थित मंडळींना बाहेर जाण्याचा आदेश दिला.

राजाचे अंगरक्षक बाहेर वाट बघत उभे होते. राजाच्या खुणेनुसार शत्रूला मृत्यूदंड किंवा जन्मठेपेच्या शिक्षेसाठी तुरुंगात न्यायला ते सज्ज होते.

घटकाभरानंतर, सारेजण चकित झाले. फिलिपराजा व आर्चिडियस दोघेही एकत्र हंसून बोलत बाहेर आले.

राजाने आपल्या अधिकाऱ्यांपैकी कांहीजणांना सांगून आर्चिडियसला सन्मानाने त्याच्या घरी परत नेण्यास फर्मावले. राजाने आर्चिडियसला अनेक भेटवस्तू प्रेमाने दिल्या. "महाराज, हे काय? आपण तर शत्रूला संपवून टाकणार असा निश्चय केला होतात ना?" एका सरदाराला अगदी विचारल्यावाचून राहावेना.



"अर्थातच! मी शत्रूचा नायनाट अवश्य केला. तुम्हाला आता लौकरच कळेल कीं मी शत्रूला नुसता संपवला नाही, तर एक मित्रही मिळवला. आर्चिडियस हा एक चांगला माणूस आहे. तो माझ्याविरुद्ध जरूर होता, पण कांही अफवा, कांही गैरसमज व कांही माझी कृत्ये त्याला कारणीभूत होती. मी अफवांचे निराकरण केले, गैरसमज दूर झाले, माझ्या कृत्यांबद्दल मी खुलासा केला आणि माझ्या चुका कबूल केल्या. खरी परिस्थिती समजल्यानंतर त्याच्यामधला माझा वैरी मावळला; त्याचप्रमाणे त्याची समजूत पटल्याने त्याला माझ्याविषयी आपुलकी निर्माण झाली. एक राज्यकर्ता म्हणून मला कांही वेळा कठोर व्हावं लागतं, इच्छेविरुद्ध कटू निर्णय घ्यावे लागतात हे त्याला समजलं."

अखेरीस राजा हंसून म्हणाला, "एका शत्रूला ठार मारलं तरी अनेक नवीन शत्रू निर्माण होतात. पण शत्रूला बदलून त्याचा मित्र बदलला कीं अनेक मित्र तर मिळतातच, त्याशिवाय शांतता निर्माण होते."

फिलिप जरी राजा होता तरी त्याने आपल्या कृतीने दाखवून दिलं कीं शत्रूला जिंकण्यासाठी हडेलहप्पी लढाऊ मार्गापेक्षा समजूतदारपणा व सहानुभूतीचा मार्ग हा राजमार्ग ठरतो. *(एम्.डी.)*



# नारायण पांडेची वाचासिद्धी

माधव पांडे हा गदानगरमधे राहात होता. तो व त्याची पत्नी जानकी हे दोघेही रामाचे भक्त होते. त्यांचा मुलगा नारायण पांडे हा गुरुकुलांत राहून शिक्षण घेत होता.

माधव पांडे रामकथा सांगून निरूपण करीत असे. कित्येक लोक दररोज या कथा ऐकायला नेमाने येत असत. व संतुष्ट होऊन घरी परत जाताना कांही ना कांही दक्षिणा ठेवत असत. त्यांत माधव आपला घरखर्च भागवत होता.

गीर्वाणी नगरपालाला माधवची रामकथा ऐकायची होती. एके दिवशी त्याने माधवला बोलावणे पाठवले व त्याला सांगितले, ''तुमची कथा ऐकायची फार इच्छा आहे. दररोज तुम्ही सभागृहांत यायचं आणि श्रोत्यांना तुमची कथा ऐकवायची. जेवढे पैसे तुम्ही मागाल ते द्यायला मी तयार आहे.''

माधव पांडेने म्हटलं, ''यजमान, आपण धन देऊन रामकथा ऐकायला तयार आहात. जर मी आपल्या सभागृहांत येऊन कथा सांगितली तर मी पैशासाठी हे काम करतोय असा अर्थ होईल. पण मी माझ्या घरी भक्तिभावाने ऐकायला येणाऱ्या भाविक श्रोत्यांसाठी रामकथा सांगतो. आपली इच्छा असेल तर आपण माझ्या घरी यावं. मी आपल्याकडे प्रतिफळ मागणार नाही.''

गीर्वाणी नाराज होऊन उठला. त्याला कांही करता आले नाही. माधव पांडेच्या मुलाने, नारायण पांडेने आपला शिक्षणक्रम समाप्त केला, आणि सरकारी नोकरी मिळेल या आशेने तो गीर्वाणीला भेटला. गीर्वाणीने खूष होऊन त्याला म्हटले, ''तुझे वडील फक्त रामायणांतल्याच कथा सांगतात. तू उपनिषद, वेद, अष्टादशपुराणे, महाकाव्ये, नाटके यांतल्या कथा रोज माझ्या सभागृहांत लोकांना सांगायच्या, हेच तुझे नवीन काम! लोक तुझ्या वडिलांकडे न जाता तुझ्या कथा ऐकायला यायला हवेत. म्हणजे मी तुला एक मोठी रक्कम बक्षीस देईन.''

नारायण म्हणाला, ''रसाळपणे कथाकथन करावे ही माझीही तीव्र इच्छा आहे. पण आपण मला माझ्या वडिलांच्याबरोबर स्पर्धा करायला सांगता आहात, हे मला योग्य वाटत नाही.''

''मला एवढंच वाटतं कीं तू फक्त विद्वत्तेच्या बाबतीत वडिलांशी स्पर्धा कर. तुझ्या कमाईवर तू स्वतः खूष होशील आणि तुझ्या मातापित्यालाही अगदी सुखांत ठेवशील. त्यांत अनुचित काय आहे?'' गीर्वाणीने विचारले.

नारायणला हा विचार योग्य वाटला. तो घरी परत आल्यानंतर त्याने हाच विषय आपल्या वडिलांना सांगितला, तेव्हां माधव पांडे मुलाला म्हणाला, ''जे तुला योग्य वाटेल तेच कर. फक्त पैशालाच सगळे महत्व मात्र देऊं नकोस.''

नारायण पांडे गीर्वाणीच्या कचेरीत काम करूं लागला. गीर्वाणीने त्याची बरेमाप स्तुती केली. त्यामुळे नारायण पांडेच्या पौराणिक कथा ऐकायला लोक बहुसंख्येने यायला लागले. गीर्वाणीने त्याला मोठी रक्कम बक्षीस दिली आणि त्याचा सन्मान केला.

त्याच गांवात नारायण पांडेने मोठे घर खरेदी केले. लक्ष्मी नांवाच्या एका सुंदर मुलीशी त्याने लग्न केले आणि तो आरामांत राहूं लागला.

परंतु यामुळे माधव पांडे मात्र संतुष्ट झाला नाही. हळूहळू त्याच्याकडे येणाऱ्या श्रोत्यांची संख्या मात्र कमी होत गेली. तो काळजींत पडला. अशा वेळी एका रात्रीं त्याला स्वप्नांत श्रीरामाचे दर्शन झाले, व त्याला आदेश मिळाला, ''चक्रपुरांतले माझे मंदिर ओसाड पडले आहे, तू तिथे जा आणि माझी पूजाअर्चना चालू ठेव.''

आणि माधव जागा झाला. सकाळी उठल्यानंतर त्याने लोकांना विचारून चक्रपुरची माहिती गोळा



केली. ते गांव गदानगरपासून बरेच लांब होते. पर्वताच्या रांगांमधे ते गांव बसले होते. तिथली जमीन शेतीसाठी चांगली होती. पण तिथे पाऊस कमी होता. प्यायच्या पाण्याचीही पंचाईत होती. म्हणून तिथले गांवकरी तो प्रदेश सोडून दुसरीकडे कामधंदा शोधत गेले. आता त्या गांवात कांही आदिवासी राहायला लागले होते. रामाच्या मंदिराची देखभाल करायला कुणीही नव्हता.

माधव पांडे चक्रपुरला पत्नीसह राहायला गेला. जेव्हां आदिवासींच्या मुखियाला माधवच्या तिथे येण्याचे कारण समजले, तेव्हां त्याने माधव पांडेला सांगितलं, ''तुम्ही दोघांनी जर त्या ओसाड मंदिरात पूजा केलीत तर एक आठवडाभर आम्ही तुमची सारी व्यवस्था करूं. त्या दरम्यान जर कांही चमत्कार घडला तर तुम्ही इथे अवश्य राहावे. नाहीतर आम्ही तुम्हाला इथे राहूं देणार नाही.''

महर्षि



माधव पांडे आणि जानकी राममंदिरात गेले. त्यांनी मंदिर साफसूफ करून आधी दिवा लावला आणि नीट पूजा केली. त्या रात्री ते तिथेच झोपले. स्वप्नांत श्रीरामाने माधवला सांगितले, ''तुझ्या श्रद्धाभक्तीवर मी प्रसन्न झालो आहे. तुला जे हवंय ते माग.''

माधवने श्रीरामाला वंदन करून नम्रपणे म्हटले, ''या आठवड्यांत इथल्या गांवकऱ्यांना आपला महिमा दाखवावा.''

''ठीक आहे, तू झोपून उठशील तेव्हां तुझ्या जवळच चंदनाची एक सुबक काठी दिसेल. प्रथम तू ती उजव्या हातांत घे. तेव्हां पुढे काय करावे ते तुला आपोआप समजेल. नंतर ती डाव्या हातांत घे. तुला जे कांही हवे असेल, तसे घडत राहील. ही चंदनाची काठी फक्त तुझ्या वारसांच्याच उपयोगी पडेल.'' एवढे सांगून श्रीराम अंतर्धान पावले.

उठल्यानंतर माधव पांडेला शेजारी एक चंदनाची लहान टिपरीसारखी काठी दिसली. त्याने त्या स्वप्नाबद्दल जानकीला सांगितले. जवळच्या तलावावर जाऊन दोघांनी स्नान केले. माधव पांडेने चंदनाची काठी हातांत घेऊन म्हटले, ''हे मंदिर अगदी नवीन संगमरवरी दगडांचे व्हावे.'' आणि त्याने डोळे मिटले.

बघताबघता त्या पडक्या मंदिराचे रूप बदलले, आणि त्याजागी एक सुंदर पांढऱ्या दगडांचे देखणे मंदिर दिसूं लागले. तो चमत्कार पाहून सारे गांवकरी व आदिवासी माधवच्या पाया पडले. माधव तिथेच राहायला लागला.

त्यानंतर हळूंहळूं गदानगरमधेही परिस्थिती पालटली. नारायण पांडेने कथाकथनावर भरपूर कमाई केल्याची बातमी दूरवर पसरली. आणि त्या गांवात नर्तकी कलाकार येऊन पोंचल्या. त्यांचे संगीत व नृत्य जास्त आकर्षक ठरले, आणि नारायणच्या जुन्या गोष्टी ऐकण्यांत गांवकऱ्यांना रस वाटेनासा झाला. त्याचे उत्पन्न कमी होत गेले. ही गोष्ट त्याने गीर्वाणीला सांगितली.

गीर्वाणी त्याला म्हणाला, ''तू तुझ्या वडिलांचा एकटाच मुलगा आहेस. तेव्हां इथे कशाला राहातोस? जा की आपल्या पित्याकडे चक्रपूरला आणि तिथेच कायमचा राहा ना!'' गीर्वाणीच्या स्वरांत टवाळी व उपहास पुरेपूर भरला होता.

नारायणच्या लक्षांत आले कीं आता गीर्वाणीच्या मनांत आपल्याविषयी आपुलकी किंवा सद्भावना उरलेली नाही. तो दुसऱ्याच दिवशी पत्नीला घेऊन चक्रपुरला गेला. मुलाला व सुनेला पाहून माधव व जानकीला फारच आनंद झाला. माधवने मुलाला



एका बाजूला बोलावून चंदनाच्या काठीची कथा सांगितली, आणि म्हटले, ''साक्षात् श्रीरामानेच तुला इथे आणले आहे. तुझ्या मनांत रामाविषयी प्रेम व आदराची भावना असूं दे. जेव्हां तुझी योग्यता वाढेल, तेव्हांच या मंदिराची जबाबदारी मी तुझ्यावर सोंपवीन.''

चंदनाच्या काठीची गोष्ट नारायणने आपल्या पत्नीला, लक्ष्मीला, सांगितली. ती ऐकून तिच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला. नारायण या मंदिराचा पुजारी व्हायलाच हवा, असे तिच्या मनाने घेतले. तिला एक औषधी वनस्पती माहिती होती. ती खाणारा माणूस किमान महिनाभर आजारी पडून अंथरुण धरीत असे, आणि त्यानंतर त्याची प्रकृति आपोआप सुधारत असे. तिने ती औषधी सासऱ्याला खाऊं घातली. माधव पांडे लगेच आजारी पडला आणि त्याला उठवस करता येईना. तो पलंगावर निपचित पडून होता.

वैद्यांनी येऊन त्याची चिकित्सा केली. ''हा आजार कांही धोक्याचा नाही, झाला कांही औषधही नाही. फक्त पाण्यांत भिजूं देऊं नका म्हणजे झालं.''

वडील आजारी पडल्यामुळे नारायण त्या राममंदिरात पुजारी झाला या संधीचा फायदा घेता यावा म्हणून लक्ष्मी नारायणला म्हणाली, ''तुमच्या वाचा सिद्धीचा अनुभव लोकांना द्या आणि त्यांची वाहवा मिळवा.''

तिच्या सांगण्यानुसार नारायणने पहिल्याच दिवशी दर्शनाला आलेल्या भाविकांना सांगितले, ''माझ्यामधे वाचासिद्धी आहे. तुम्हाला जे हवे असेल ते मागून पहा.''

कांही लोकांनी धंदाउद्योग वाढावा अशी इच्छा



व्यक्त केली, कांहींनी पैशाची मागणी केली. ज्यांना जे हवे होते, ते मिळत गेले. परंतु अचानक लक्ष्मी आजारी पडून तिला धनुर्वात झाला. या आजाराचे कारण काय असावे, ते पाहाण्यासाठी नारायणने ते चंदनाचे लाकूड हातांत घेतले तर त्याच्या अंगाची आगआग होऊं लागली. तो अगदी कासावीस झाला त्याच वेळी गांवातले सारेजण एकत्र होऊन नारायणला भेटायला आले. ते म्हणाले, ''आपल्या वडिलांनी नेहमी आमचे कल्याणच चिंतले. ते अजूनही आजारी आहेत. त्यांची अवस्था आम्हाला बघवत नाही. जोपर्यंत आपल्या वडिलांची प्रकृति पूर्ववत होत नाही तोपर्यंत आमच्या गांवात पाऊस पडूं नये अशी आमची प्रार्थना आहे.''

आणि खरंच गांवात दुष्काळ पडला. तळीं, विहिरी आटल्या, आणि लोकांचे हाल पुन्हां सुरू झाले. ते नारायणकडे परत आले आणि त्यांनी

आपल्याला वांचवावे म्हणून विनंती केली. नारायण वडिलांकडे गेला आणि अजाणतेपणाने त्याचा हातून हा जो अपराध घडला, त्याबद्दल त्याने क्षमा मागितली. त्याने चंदनाची काठी वडिलांच्या हातांत ठेवली. माधवला जेव्हां सारी हकीकत काठीमुळे समजली, तेव्हां तो नारायणला म्हणाला, "पोरा, पश्चात्तापाएवढे दुसरे कोणतेही प्रायश्चित्त मोठे नसते. तुझ्या मनांत स्वार्थाऐवजी श्रीरामाची मूर्ती राहू दे. तू निःस्वार्थीपणे तुझे कर्तव्य करीत जा." आणि त्याने ती चंदनी काठी मुलाजवळ दिली.

नारायणने ती काठी हातांत धरली आणि त्याच्या अंगाची जी आग होत होती, ती थांबली. तेव्हां तो तिथे जमलेल्या लोकांना म्हणाला, "माझे वडील बरे व्हावेत म्हणून तुम्ही सारेजण प्रार्थना करता आहात. जोपर्यंत त्यांना बरे वाटत नाही, तोपर्यंत पाऊस पडणार नाही. त्यांना बरे व्हायला किमान महिनाभर तरी लागेल. तोपर्यंत त्यांना गांवापासून जरा लांब जाऊं दे. म्हणजे हवापालट होऊन ते बरे होतील व नंतर इथेही पाऊस पडेल."

लोकांना हे पटले. नारायण स्वतः आईवडिलांना घेऊन रामापुरला गेला. जेव्हां तो एकटा चक्रपुरला परत आला, तेव्हां पावसाला सुरवात झाली. लोकांनी नारायणची खूपच प्रशंसा केली. ते म्हणूं लागले, "तुझी वाचासिद्धी खरोखरीच अद्भुत आहे. यापुढेही राममंदिराचा पुजारी म्हणून तूच राहा."

एका महिन्यानंतर नारायणची पत्नी लक्ष्मी बरी झाली. ते दोघेही रामापुरला गेले. तिथे पांडेची प्रकृतिही आता चांगली सुधारली होती. नारायणने वडिलांच्या पायाला हात लावून नमस्कार केला व तो म्हणाला, "मी पितृद्रोही आहे. मी देवाची पूजा करण्यास योग्य नाही. तुम्ही आता चक्रपुरला चला आणि मंदिराची पूजाअर्चना याची सारी जबाबदारी तुम्हीच सांभाळा!"

माधवने मुलाला प्रेमाने जवळ घेतले व सांगितले, "पोरा, तुझ्यांत वाचा सिद्धी आहे. जोपर्यंत स्वार्थ आपला फणा उभारत नाही, तोपर्यंत ती सिद्धी कायम राहील. तुला स्वार्थापासून सुटका हवी असेल तर त्यासाठी स्वानुभव लागेल. श्रीरामाच्या कृपेने तो तुला अवश्य मिळेल. यापुढे तू सावध राहा आणि विचारपूर्वक वागत जा. आता तू देवाची पूजा करण्यास सर्वस्वी योग्य आहेस." असा आशिर्वाद माधवने नारायणला दिला.







# चहाडखोर

काशी येथे ब्रह्मदत्त राज्य करीत असताना बोधिसत्वांनी मगध देशाच्या एका गांवात माघ नामक एका क्षत्रिय कुटुंबात अवतार धारण केला. खेडेगांवातील उलाढालींसंबंधी विचारविनिमय करण्यासाठी सुमारे पन्नास प्रमुख गांवकरी दररोज वडाच्या पारावर एकत्र जमत असत. वास्तविक त्या गांवातील बरेचसे लोक बऱ्यावाईटाचा विचारच करीत नसत. म्हणून ते नेहमी चोरी, दरोडे, आणि वाटमारी करण्यांतच भूषण मानीत असत. कोणी त्यांना पकडलेच तर गांवच्या पाटलाला लांच देऊन ते आपली सुटका करून घेत.

पारावरची जागा तशी स्वच्छ नव्हतीच, उलट जास्त घाणेरडी होती. तिथे नेहमी कचरा, पाचोळा पडलेला असे. ते पाहून माघने स्वतःला बसण्यासाठी थोडीशी जागा धुऊन पुसून स्वच्छ केली, परंतु त्या जागेवर एक गांवकरी येऊन बसला. म्हणून माघने आणखी थोडी जागा आपल्यापुरती साफ करून घेतली. ती जागाही आणखी एकाने बळकावली.

हळूंहळूं माघने थोडा थोडा करीत सर्व पारच स्वच्छ करून टाकला. तो कोणावर रागावला नाही की चिडला नाही. त्यानंतर त्याने त्या जागी एक मांडवही टाकला. त्यामुळे सर्व गांवकऱ्यांना तेथे बसायला सोयीचे झाले.

थोड्याच दिवसांत सर्व गांवकऱ्यांचे लक्ष माघकडे गेले व त्यांच्या मनावर माघच्या सौजन्याची छाप बसली. माघच्या मार्गदर्शनाखाली गांवातली सर्वजण लोकोपयोगी कामे करू लागले. सर्वांनी मिळून गांवातल्या उत्सवासाठी एक मोठा मांडव घातला. पिण्यासाठी थंड पाण्याची तजवीजही त्यांनी केली.

हळूंहळूं गांवकऱ्यांच्या मनावर माघच्या पंचशील सिद्धांताचा पगडा बसू लागला. ते सर्व मिळून रस्त्यावरचे खांचखळगे बुजवू लागले व रस्त्यांची साफसफाई करू लागले. रस्त्याने



जाणाऱ्या गाड्यांना अडथळा होऊ नये, यासाठी रस्त्यावर येणाऱ्या झाडांच्या फांद्या तोडून फेकून देऊं लागले. जागोजागी शेतीसाठी पाणीपुरवठा व्हावा म्हणून बांध घालून तलाव बांधू लागले. चिखलातून तेथे जाण्यायेण्यासाठी बांध घालून ठेवू लागले. या सर्व कामात माघच त्यांचे मार्गदर्शन करी.

त्या गांवाचा एक पाटील होता. गांवातल्या दारुड्या, जुगारी, खुनी वगैरे लोकांकडून त्याला चांगली मिळकत होती. कोणी गोडीगुलाबीने पैसे दिले नाहीत तर त्यांना कोणत्या तरी गुन्ह्यांत अडकवून त्यांच्यावर दंड लावी. परंतु माघच्या हातांत गांवाचे नेतृत्व आले तेव्हांपासून पाटील-बुवांची प्राप्ती कमी झाली.

म्हणून गांवाच्या पाटलाने राजाकडे जाऊन निवेदन केले - "महाराज, आपल्या गांवात सर्वत्र अराजक पसरले आहे. माघ नांवाच्या एका तरुणाने गांवातल्या सर्व तरुणांना सांगून त्यांच्या हातांत लाठ्या कुऱ्हाडी, कुदळी आणि पहारी देऊन, गांवात गस्त घालायला सुरवात केली आहे. जिकडे जावे तिकडे हेच लोक दिसतात. गांवकऱ्यांना स्वतःच्या जिवाची धास्ती बसली आहे. आपल्या कानावर ही गोष्ट घालणे आपले कर्तव्य समजून मी हे धाडस केले आहे. याउपर आपली मर्जी!"

राजाने त्या गांवाची परिस्थिती पाहून जरूर तर बंडखोरांना धरून आणण्यासाठी पाटलाच्या बरोबर कांही शिपायांना पाठविले. शिपाई गांवाच्या वेशीजवळ पोचले असतील त्यावेळी त्यांना माघ आपल्या अनुयायांसह दिसला. सर्वांच्या हातांत पहारी, फावडी, कुदळी, कुऱ्हाडी, विळेकोयते, वगैरे हत्यारे होती.

शिपायांनी चौकशी वगैरे करण्याच्या भानगडीत न पडतां सर्वांना अटक केली, आणि राजासमोर नेऊन उभे केले. राजाने प्रत्येकाच्या हातांत एक ना एक हत्यार पाहिले.

सर्व हत्यारे शेतीच्या कामाला लागणारीच होती. तरी राजाला वाटले की या हत्यारांचा वापर हे लोक गांवातल्या लोकांना दहशत बसावी म्हणून करीत असणार. पाटलाने तक्रार केली ती खरी असावी असे राजाला वाटले, म्हणून राजाने कांही चौकशी वगैरे केल्याशिवायच हुकूम सोडला की "या सर्वांना हत्तीच्या पायांखाली देऊन मृत्युदंड द्यावा."

माघ व त्याच्या सर्व अनुयायांना हत्तीच्या पायाखाली तुडविण्यासाठी उभे करण्यात आले व एका मस्तवाल हत्तीला त्यांच्या अंगावर सोडण्यात आले, परंतु तो हत्ती त्यांच्या अंगावर गेलाच नाही. कांही अंतर चालून गेल्यावर जागच्या जागी थबकला. त्यानंतर आणखी एक हत्ती आणण्यात आला. तो हत्ती माघ व त्याच्या अनुयायांना पाहून पळूनच गेला.

ती गोष्ट राजाला कळविण्यांत आली. परंतु राजाला वाटले की माघ व त्याच्या अनुयायांच्या गळ्यांत किंवा हातांत मंत्रवलेले गंडे बांधलेले असावेत. म्हणून राजाने सर्वांची झडती घेऊन त्यांचे गंडे वगैरे काढून टाकण्यास व त्यानंतर हत्तीला त्यांच्या अंगावर सोडण्यास सांगितले.

सर्वांची झडती घेण्यात आली. परंतु त्यांच्या अंगावर गंडे नसल्याचे कळले. तेव्हां राजाने त्या



सर्व तरुणांना आपल्यासमोर हजर करण्यास सांगितले.

राजाने माघ व त्याच्या अनुयायांना विचारले - "हत्ती तुमच्या अंगावर यायला कां भितो आहे? तुम्ही कोणत्या मंत्राचा जप करीत होतां? तुम्हाला मंत्रातंत्राची माहिती आहे का?"

माघ पुढे येऊन म्हणाला - "महाराज, आपण विचारलेले बरोबर आहे. आम्हाला एक मंत्र चांगला माहीत आहे. त्याहून मोठा मंत्र जगात दुसरा नाही."

"तो मंत्र कोणता?" राजाने विचारले.

"आमच्यापैकी एकही व्यक्ती हिंसा करीत नाही. दुसऱ्याकडून बळजबरीने आम्ही एकही वस्तू घेत नाही. आम्ही खोटे बोलत नाही. प्राण्यांवर आम्ही दया करतो, दान देतो. रस्ते व तलाव बांधतो. धर्मशाळा बांधतो, विहिरी खणतो. अहिंसा व सेवा हाच आमचा मंत्र आहे, तीच आमची शक्ती आहे." माघ म्हणाला.

ते उत्तर ऐकून राजा चकित झाला. तो म्हणाला-

"पण मी ऐकतो की तुम्ही वाटमारी करता. प्रजेला धमकावून त्यांच्याकडून पैसे उकळता. हे सर्व खोटे आहे कां?"

"महाराज, आपण कोणाची तरी खोटी तक्रार ऐकून विश्वास ठेवलात व खऱ्या गोष्टीची चौकशी केली नाही. म्हणून आपला असा गैरसमज झाला." माघ म्हणाला.

"तुमच्या हातांत हत्यारे पाहून आम्हाला चौकशी करण्याची गरज भासली नाही." राजा म्हणाला.

"महाराज, या हत्यारांचा उपयोग वाटेत येणारी झाडेझुडुपे तोडण्यासाठी होतो. तलाव खणण्यासाठी, धर्मशाळा बांधण्यासाठी इतर हत्यारांचा उपयोग होतो." माघ म्हणाला.

त्यानंतर राजाने खरी परिस्थिती जाणून घेतली. शेवटी पाटलाने लावलेला आरोप खोटा आहे, हे कळले व त्याचा चहाडखोरपणा व लांचखाऊपणा उघडकीला आला. राजाने पाटलाने जमविलेले पैसे सरकारी खजिन्यांत जमा करविले व ती रक्कम माघला देऊन गांवाची व्यवस्था पाहण्याचे कामही त्याला व त्याच्या अनुयायांना सोंपविले. शिवाय राजाने आपले ते दोन्ही हत्ती माघला त्याच्या कामासाठी दिले.







# रामायण

**विश्वामित्र ऋषींचा यज्ञ निर्विघ्नपणे पार पडला. त्या रात्री रामलक्ष्मण निश्चिंतपणे झोपू शकले.** सकाळी उठल्यावर स्नानसंध्यादि दैनंदिन नित्यकर्मे आटोपून त्यांनी विश्वामित्र ऋषींना वाकून नमस्कार केला.

विश्वामित्र ऋषींच्या आश्रमांतले सर्व ऋषी व मुनी त्यांच्याकडे आले होते. त्यांनादेखील रामलक्ष्मणांनी नमस्कार केला. नंतर श्रीरामचंद्राने नम्रतापूर्वक विश्वामित्र ऋषींना विचारले - "मुनिवर! सेवायोग्य कांही कार्य असेल तर आपली आज्ञा व्हावी."

विश्वामित्र ऋषी त्यांना म्हणाले -

"ज्या कामासाठी म्हणून मी तुम्हां उभयतांना बोलावून घेऊन आलो होतो, ते माझे काम आता संपले आहे. आपण सर्व आज मिथिला नगरीस जाणार आहोत. मिथिलेचा राजा जनक महाज्ञानी आहे. त्याच्या दर्शनास जावे असा आमचा विचार आहे. जनक राजाकडे शंकराचे एक जुने धनुष्य आहे. जनकाने श्रद्धा व भक्तिपूर्वक त्या धनुष्याची आजवर पूजा केली. जनकाच्या पुण्याईने म्हणा, किंवा शंकराचे ते धनुष्य आहे म्हणून म्हणा, त्या धनुष्यांत एक विशेष रहस्य आहे. त्याला कोणी उचलूंच शकत नाही. मग त्याच्यावर दोरी चढवून बाण मारणे तर अगदी अशक्यच. आजपर्यंत देव, दानव आणि मानव, सर्वांनी अनेक प्रकारे प्रयत्न करून पाहिला. परंतु त्यांच्यापैकी एकाला देखील यश मिळाले नाही. जनक राजाचे ते धनुष्य तुम्हाला ही तिथे पहायला मिळेल. आपण सर्वच बरोबर जाऊं."

विश्वामित्र ऋषींनी निघण्यापूर्वी सिद्धाश्रमाला



तीन वेळां प्रदक्षिणा घातली व त्याच्या रक्षणाची पण उत्तम व्यवस्था केली. दिवसभर पायी प्रवास केल्यावर विश्वामित्र ऋषि रामलक्ष्मणासह सोन नदीच्या काठी आले. सर्वांनी तेथे स्नान केले, संध्या केली व सर्वजण एका झाडाखाली येऊन विश्रांतिसाठी बसले. रामाने विश्वामित्र ऋषींना विचारले -

"मुनिवर! वनावृत्त नांवाचा देश कोठे आहे? त्याची थोडीशी माहिती आपण आम्हाला सांगावी."

त्या प्रश्नाचे उत्तर म्हणून विश्वामित्र ऋषींनी त्या देशाचे वर्णन केले. त्याबरोबर त्यांना आपल्या पूर्वजांचे वर्णनसुद्धां करावे लागले. विश्वामित्र म्हणाले -

"पूर्वी ब्रह्मदेवाचा कुश नांवाचा एक पुत्र मोठा तपस्वी होऊन गेला. त्याचे वैदर्भी नांवाच्या राजकन्येशी लग्न झाले होते. त्याला चार मुले होती - कुशांब, कुशनाभ, अधूर्तयश आणि वसु.

"क्षत्रिय धर्माला अनुसरून कुशने आपल्या मुलांना जमिनीचे वांटे करून दिले आणि त्यांना बजावून सांगितले कीं, क्षत्रिय धर्माप्रमाणें प्रजेला पुत्रासारखे मानून न्यायाने राज्य करावे. त्यानंतर प्रत्येकाने आपल्या राज्याची राजधानी म्हणून एकेक सुंदर नगर वसविले. कुशांबने कौशांबी नांवाची, कुशनामने महोदय नांवाची, अधूर्तयशाने धर्मारण्य नांवाची आणि वसूने गिरिव्रज नांवाची राजधानी स्थापना केली. आपण आतां आहो तो देश याच चौघा भावंडांचा आहे.

"या देशांच्या चारी बाजूला पांच पर्वतांच्या रांगा आहेत. सोन नदीचा उगम याच पर्वतांतून झाला आहे. या नदीमुळेच या देशांतली जमीन सुपीक व सस्यश्यामला आहे. या नदीचा उगम पूर्वेकडे होतो व ही पश्चिमेकडे वाहाते.

"चौघा भावंडापैकीं कुशनाभ याच्या बायकोचें नांव घृताची होते. त्यांना शंभर मुली होत्या. सर्व एकीहून एक सुंदर. एकदां त्या मुली आनंदाने वनविहार करीत असताना एकाएकी वायुदेव प्रगट झाला. त्यांचे सौंदर्य पाहून तो मोहित झाला व त्याने त्यांच्याशीं विवाह करण्याची इच्छा दर्शविली. तो त्या मुलींना म्हणाला -

"माझ्याशी लग्न केल्यास तुम्हाला कधींही वार्धक्य येणार नाही, व अमरत्व मिळेल. तुम्हाला



या मर्त्यलोकांत राहण्याची गरज राहणार नाही. नंदनवनांत विहार करावयास मिळेल."

अर्थातच मुली चकित झाल्या. त्यांनी त्याला नम्रपणे उत्तर दिले, "आमचे आई वडील आमचे पति म्हणून ज्या पुरुषाची निवड करतील, त्यांच्याशीच आम्ही लग्न करणार."

ते उत्तर ऐकून वायूला राग आला व त्याने त्या सर्वांना शाप दिला. शापाच्या प्रभावाने त्या सर्व गिड्ड्या व खुज्या दिसू लागल्या. रडतरडत त्या आपल्या वडिलांकडे गेल्या.

मुलींनीं राखलेली कुलमर्यादा पाहून कुशनाभला आनंद झाला. शापाच्या प्रभावामुळे त्या गिड्ड्या दिसूं लागलेल्या पाहून मात्र कुशनाभला फार वाईट वाटले. पण तो त्यांना धीर देत म्हणाला -

"भिऊं नका. देव साक्षी आहे. तो तुमचा खास उद्धार करील." आता कुशनाभ काळजीत पडला.

त्यांना अविवाहित ठेवून तरी कसे चालणार? म्हणून त्याने कांपिल्यपूरचा राजा ब्रह्मदत्त याच्याकडे जाऊन त्याच्याशी त्यांचा विवाह करून दिला. ब्रह्मदत्ताने स्पर्श केल्याबरोबर त्यांना स्वस्वरूपाचा लाभ झाला.

"मुलींचे लग्न करून दिल्यावर व त्यांना पुन्हां स्वस्वरूप मिळाल्यावर कुशनाभला आनंद झाला. पण पुत्रसंतान नाही याबद्दल त्याला काळजी वाटू लागली. त्याने पुत्रकामेष्टी यज्ञ केला. त्याला एक मुलगा झाला. त्याचे नांव त्याने गाधि असे ठेवले.



कुशनाभने आपल्या मुलाला उत्तम शिक्षण दिले व त्याला गादीवर बसवून स्वतः वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केला. गाधिराज एक धर्मपरायण राजा होता. हे गाधिराजच माझे वडील. मला सत्यवती नांवाची एक बहीण होती. तिचे रुचीकशी लग्न झाले. ती पतिव्रता होती. गाधिराज कुशिक याच्या नांवानेच मला कौशिक असेही नांव मिळाले. माझ्या बहिणीच्या नांवाने कौशिकी नांवाची एक नदी देखील आहे. बहिणीचा मला फार लळा होता. म्हणून मी हिमालयांत कौशिकी नदीकांठी राहातो. यज्ञ करण्यासाठी म्हणून मला सिद्धाश्रमांत वास करावा लागला. बोलता बोलता मध्यरात्र उलटण्याची वेळ आली पहा! आतां तुम्ही दोघे जाऊन झोंपा."

प्रवासाचा थकवा वाटत असल्यामुळे



दोघांना छान झोंप लागली. सकाळीं विश्वामित्र मुनींनी त्यांना जागे केले तेव्हां दोघे उठले. स्नानसंध्यादि आटोपून विश्वामित्र ऋषींबरोबर सर्व पुढल्या प्रवासाला निघाले.

दुपारच्या सुमारास ते गंगा नदीच्या तीरावर येऊन पोंचले. त्यांनी गंगास्नान केले. दुपारचे जेवण झाल्यावर एका झाडाखाली बसून त्यांनी विश्वामित्र ऋषींना गंगानदीची कथा सांगावयास विनंति केली. विश्वामित्र ऋषींनी गोष्ट सांगायला सुरवात केली-

"हिमवन्त नामक पर्वतराजाला दोन मुली आहेत. एकीचे नांव गंगा व दुसरीचे उमा. पर्वत राजाजवळ विनंती करून देव गंगेला स्वर्गलोकी घेऊन गेले. उमाचा विवाह शंकराशी झाला. पुढे सगर राजाचा नातू भगीरथ याने आपल्या पितरांचा उद्धार करण्यासाठी अखंड तपश्चर्या करून गंगेला पृथ्वीवर आणले."

विश्वामित्र ऋषींनी गंगावतरणाची व कार्तिकेय याच्या जन्माची गोष्ट राम-लक्ष्मणांना सविस्तर सांगितली. ती रात्र सर्वांनी गंगेच्या दक्षिण तीरावरच काढली. सकाळी नावेत बसून ते गंगापार गेले. तेथे त्यांना एक मोठे नगर दिसले. त्या नगराचें सौंदर्य पाहून रामाने त्या नगराचा वृत्तांत वर्णन करून सांगण्यास विनंति केली. विश्वामित्रांना राम म्हणाला -

"मुनिवर! येथे हल्ली कोणाचे राज्य आहे? तो कोणत्या वंशाचा राजा आहे? ह्या नगराची स्थापना कोणी केली?"

या प्रश्नाचे उत्तर म्हणून विश्वामित्र ऋषींनी प्रथम देव व दानव यांनी समुद्राचे मंथन कसे केले व त्यांतून रत्नांबरोबर विष कसे निघाले, व नीलकंठ शंकराने ते पिऊन सर्वांचे रक्षण कसे केले, अमृत निघाल्यावर देव दानव भांडूं लागलेले पाहून विष्णूने मोहिनीचे रूप घेऊन ते अमृत कसे देवांना पाजले, वगैरे समुद्रमंथनाचा वृत्तांत अथपासून इतिपर्यंत वर्णन करून सांगितला.

दैत्यांचा संहार विष्णूच्या कारस्थानामुळे झाला. त्यानंतर पुढे देव दानवांचे युद्ध झाले आणि त्यांत राक्षसांचा पराभव झालेला पाहून त्यांची आई दिति, तिचे पति कश्यप यांच्याकडे गेली आणि म्हणाली -

"इंद्राचा देखील वध करूं शकेल असा पुत्रलाभ आपण मला करून द्यावा."



कश्यप तिला आशिर्वाद देऊन म्हणाला - "तू एक हजार वर्षे श्रद्धा व भक्तीपूर्वक तपश्चर्या केलीस तर तुझ्या इच्छेप्रमाणें तुला मुलगा होईल. तो त्रिलोक जिंकून इंद्राचा वध करील."

दितीला आनंद झाला व तिने कुशप्लव स्थानी तपश्चर्या सुरू केली. इंद्राला ही गोष्ट कळली व तो तिच्याकडे येऊं लागला. तो तिची सेवा करूं लागला. पाणी, समिधा, कंदमुळे व फळफळावळ आणून तिला देऊं लागला.

अशी नऊशे नव्वद वर्षे लोटली. फक्त दहाच वर्षे बाकी उरली. दहा वर्षांनी तिला जो मुलगा होईल तो इंद्राचा वध करील, ही गोष्ट पण ठरलेली होती. एके दिवशीं दितीने इंद्राला बोलावून त्याच्या आशीर्वाद दिला -

"बाळ! तूं मला पंख्याने वारा घालीत आहेस व सर्व प्रकारे माझी सेवा करीत आहेस. मला जो मुलगा होईल त्याने तुझ्याशी मैत्री करावी असे मी त्याला सांगेन."

असे सांगून ती उशीकडे पाय करून उलटी झोंपी गेली. त्यामुळे तिची सर्व तपश्चर्या व्यर्थ झाली. इंद्र याच संधीची वाट पहात होता. त्याने तिच्या पोटांत प्रवेश करून तिच्या पोटांत वाढणारा शत्रूचा पिंड पाहून आपल्या वज्रायुधाने त्याचे सात तुकडे करून टाकले. त्यामुळे दितीला सात मुले झाली.

"रामा! दिति या प्रदेशांत तप करीत असे आणि इंद्राने येथे तिची सेवा केली होती. पुढे इथे ईक्ष्वाकु नांवाचा एक राजा झाला. त्याला विशाल नांवाचा मुलगा होता. त्याने या जागी एका नगरीची स्थापना केली. त्याच्या नांवावरून या



नगरीचें नांव वैशाली असे पडले. त्याचा वंशज सुमती राजा तेथे राज्य करीत आहे.''

सुमती राजाला विश्वामित्र ऋषी राम-लक्ष्मणांबरोबर आपल्या राज्यांत आले आहेत हे कळले. तो त्यांच्या दर्शनास आला. विश्वामित्र ऋषींनी राम-लक्ष्मणाचा परिचय करून दिल्यावर सुमती राजाच्या आग्रहास्तव सर्वांनी राजाचे आतिथ्य स्वीकारले. दुसऱ्या दिवशी राजाचा निरोप घेऊन त्यांनी पुढला प्रवास सुरू केला.

मिथिलेच्या अगदी जवळ एक जुनाट आश्रम दिसला. रामाने त्याची कथा सांगायला आग्रह केला. विश्वामित्र म्हणाले -

''गौतम मुनी व त्यांची पत्नी अहल्या या आश्रमांत रहात असत. गौतम मुनि स्नानाला गेले असतं इंद्र गौतम मुनींचे रूप घेऊन आला. तरी अहल्येने इंद्राला ओळखले. परंतु ती मोहाला बळी पडली. इंद्र आश्रमांतून परत जात असतां गौतम मुनि आले. त्यांनी इंद्राला ओळखले व त्याला शाप दिला. त्यांनीं अहल्येला देखील शाप दिला. अहल्येला पश्चात्ताप झाला व तिने पतीची माफी मागितली. पण गौतम मुनि तिला म्हणाले - ''दिलेला शाप परत घेणे मला शक्य नाही. परंतु योग्यवेळी तुला मुक्ति मिळेल.'' ती वायुभक्षण करून याच आश्रमांत अदृश्य रूपे समाधिस्थ होऊन रहात आहे. गौतम मुनींनी तिला सांगितले आहे कीं रामाचें दर्शन व स्पर्श झाल्यास तूं शापमुक्त होशील. म्हणून रामा! चल, आपण या आश्रमांत प्रवेश करूं. तुझ्या दर्शनाने ती शापमुक्त होईल.''

विश्वामित्र ऋषींच्या आज्ञेप्रमाणे राम त्यांच्याबरोबर आश्रमांत गेला. रामाच्या दर्शनाने अहल्या शापमुक्त झाली. तिने रामाचा चरणस्पर्श केल्यावर थोड्या वेळाने गौतम मुनि पण आश्रमांत परत आले. तो प्रसंग खरोखर अवर्णनीय असाच होता. गौतम मुनि व अहल्येने विश्वामित्र ऋषींचे आभार मानले. दोघांनीं रामाचे पण आभार मानले.

त्यानंतर विश्वामित्र ऋषि रामलक्ष्मणाबरोबर पुढे निघून यथावकाश मिथिलेला येऊन पोंचले.

*(अपूर्ण)*







# ताईताचा महिमा

एक दिवस सकाळीच नगरात एक जाडा माणूस आला. त्या जाड्या माणसाने आपल्या अंगाभोवती एक काळे वस्त्र गुंडाळले होते. त्याला बघून मुले घाबरून पळून गेली. बायकांनी घराचे दरवाजे लावून घेतले. मोठ्या मुश्किलीने आपल्या शरीराचा तोल सांभाळत तो ओरडायला लागला, ''ताईताचा महिमा पहायचा असेल तर लवकर इकडे या.'' तो जादूगार आहे, असे समजून लोकांनी त्याच्याजवळ जायची हिंमत केली नाही.

परंतु माधव नांवाच्या एका माणसाला ताईताचा महिमा जाणण्याची इच्छा झाली. त्याने त्या जाड्या माणसाजवळ जाऊन विचारले, ''अरे बाबा, मला ह्या ताईताचा महिमा तर दाखव.''

त्या जाड्या माणसाने माधवकडे नखशिखांत पाहिले व म्हणाला, ''माझ्याबरोबर चल.'' तो जाडा माणूस माधवला शहराच्या बाहेर घेऊन गेला. त्याने आपल्या कमरेला बांधलेला ताईत काढला. तेव्हां त्या मोठ्या कमरेच्या मापाचा ताईत एका लहानखुऱ्या माणसाच्या कमरेच्या बांधण्याइतपत लहान झाला.

''हाच कां ताईताचा महिमा?'' माधव रागावून म्हणाला.

''अरे, अजून तर तुला ह्याचा महिमा पहायचा आहे! मी ह्याला तुझ्या कंबरेला बांधून निघून जातो. मी जेव्हां तुझ्या नजरेपासून दूर जाईन. तेव्हां तुला ह्याचा महिमा कळेल. जर कां तुला ह्या ताईतापासून तुझ्या शरीराची सुटका हवी असेल तर तो तुला दुसऱ्याच्या कमरेला बांधावा लागेल.'' असे म्हणून त्या जाड्या माणसाने माधवच्या कंबरेला तो ताईत बांधला आणि लवकरच काढता पाय घेऊन तो नजरेआड झाला.

जेव्हां माधवने आपल्या शरीराकडे नजर फिरवली, तेव्हां त्याला आपण बेशुद्ध होत चाललो आहोत, असे वाटू लागले. कारण माधव आता चांगलाच जाड झाला होता.

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



ज्या दिशेने तो माणूस गेला त्याच दिशेने माधव पळू लागला. गल्लीचा नाका पार केल्यावर त्याला काळे वस्त्र परिधान केलेला एक बारीक माणूस दिसला. माधवला आत्ता ताईताचा महिमा चांगलाच लक्षांत आला. गांवकरी म्हणाले, ''आम्हाला पहिल्यांदाच वाटलं होतं की त्याच्यात कांहीतरी गडबड आहे! तो भिकार ताईत तोडून फेकून दे.''

त्या लोकांचे ऐकून माधवने ताईत काढून फेकून दिला. परंतु दुसऱ्याच क्षणीं तो ताईत माधवच्या कमरेला येऊन चिकटला. आणि तो ताईत जळायला लागला. माधवने जेव्हां तो काढून टाकायचा प्रयत्न थांबवला, तेव्हांच तो जळायचा थांबला.

आता माधवच्यापुढे एक मोठीच समस्या आली होती. महिनाभरासाठी सांठवलेले धान्य दोन दिवसांसाठीसुद्धा पुरेनासे झाले. त्याच्याजवळ जे कांही होते, ते त्याने खाण्याचे पदार्थ खरेदी करण्याकरता विकून टाकले. त्याला वाटले की आता मरणाशिवाय दुसरा कुठलाच मार्ग नाही. तो गांवाच्या बाहेर जाऊन मरणाची वाट बघू लागला.

दुपारच्या वेळी जवळच्या गांवातून एक बारीक हडकुळा माणूस वडाच्या झाडाखाली विश्रांतीसाठी थांबला. माधवच्या बलदंड शरीराकडे पाहून तो म्हणाला, ''महाशय, माझे नांव शंकर आहे. शरीर जाडजूड बनवण्यासाठी तुमच्याकडे कांही उपाय आहे का? माझ्या या सुकड्या शरीराकडे पाहून कोणीही मला आपली मुलगी द्यायला तयार होत नाही.''

हे ऐकल्यावर माधव उत्साहाने म्हणाला, ''हा सगळा ताईताचा महिमा आहे.''

माधवने आपल्या ताईत काढला आणि शंकरच्या कमरेला बांधत त्याला समजावलं, ''मी तुझ्या नजरेआड झालो कीं तुला ह्याचा महिमा कळेल. जर का तुला ह्या ताईतापासून शरीराची सुटका हवी असेल तर तुला दुसऱ्याच्या कमरेला बांधावा लागेल. तू हा काढून फेकू नकोस. नाहीतर हा तुला जाळून टाकेल.'' हे समजावून माधव निघून गेला.

ह्यानंतर शंकरने आपल्या शरीराकडे पाहिले तर त्याचे डोके गरगरु लागले. त्याचे शरीर खूप जाड झाले होते. त्यानंतर तो आपल्या गांवी पोहोचला, पण त्याच्या त्या जाड शरीराकडे पाहून त्याला कुणीही आपली मुलगी दिली नाही. त्याच्यापुढेही खाण्याचा प्रश्न निर्माण झाला.



त्याने भगवी वस्त्रे परिधान केली, आणि तो दारोदारी भीक मागत आपले दिवस काढू लागला.

एक दिवस शंकरने कोणाच्यातरी घरचा दरवाजा वाजवला. त्या घरात एक ब्रम्हचारिणी राहत होती. ती दिसायला कुरुप असल्याने तिचे लग्न होत नव्हते.

तिने दार उघडल्यावर भगवी वस्त्रे परिधान करून उभ्या असलेल्या शंकरला पाहिले व विचारले, ''स्वामी, सुंदर दिसण्याकरता कांही उपाय आहे कां?''

त्या स्त्रीचे म्हणणे ऐकल्यावर शंकरचे डोके जरा जास्त जोराने काम करायला लागले. तो म्हणाला, ''कां नाही? एक ताईत आहे ना?''

''मग तो ताईत मला द्यायची कृपा करा'', ब्रम्हचारिणी म्हणाली.

शंकरने पटकन ताईत काढून तो ब्रम्हचारिणीच्या कमरेला बांधला व म्हणाला, ''मी गेल्यानंतरच तुला ह्या ताईताचा महिमा कळेल. जर कां तुला ह्यांतून सुटका हवी असेल तर हा दुसऱ्याच्या कमरेला बांधावा लागेल. त्याशिवाय दुसरा कुठलाही उपाय नाही,'' हे सांगून त्याने तेथून पळ काढला.

ती ब्रम्हचारिणी खूप आनंदाने घरी गेली व आपले रूप पाहाण्यासाठी ती मोठ्या आरशासमोर उभी राहिली. आपले रूप पाहून तिला धक्का बसला. कारण त्या आरशांत तिला तिच्या शरीराचा पाव हिस्सादेखील दिसत नव्हता. ती फरशीवर पडून संध्याकाळपर्यंत तशीच रडत राहिली.

आसपासची मंडळी येऊन तिला भेटू लागली.



त्यांतच राजकुमारीची दासी पण होती. ब्रम्हचारिणीला पाहून ती जोरांत हंसली व म्हणाली, ''राजकुमारीला हंसून चार वर्षे झालीत. आता तुला पाहून ती जरूर हंसेल.'' त्यानंतर ती दासी ब्रम्हचारिणीला घेऊन राजकुमारीकडे गेली.

राजकुमारी एका पारावर चिंतामग्न होऊन बसली होती. भुतासारख्या वाटणाऱ्या ब्रम्हचारिणीला नखरे करत, मुरडत चालताना पाहून ती हंसायला लागली.

''इतक्या वर्षानंतर तू मला हंसवू शकलीस. तुझ्यांत असा काय खास महिमा आहे?'' राजकुमारीने ब्रम्हचारिणीला विचारले.

''हा महिमा माझा नाही कांही, या ताईताचा आहे.'' ब्रम्हचारिणीने उत्तर दिले.

''जरा दाखव तरी तो ताईत! मी परत देते तुला.'' राजकुमारीने विचारले.

"हा आपल्या कमरेला बांधून पहावा, मग कळेल," असे म्हणत ब्रम्हचारिणीने आपला ताईत काढून राजकुमारीच्या कंबरेला बांधला आणि ती म्हणाली, "जेव्हां आपण दुसऱ्या कोणाच्या कंबरेला हा बांधाल, तेव्हांच आपण आपले शरीर ह्यांतून सोडवूं शकाल." असे म्हणून ती घाईघाईने आपल्या घरी गेली.

ब्रम्हचारिणी गेल्यानंतर लगेच राजकुमारी पालखीत बसून राजमहालाच्या दिशेने गेली. थोडे दूर गेल्यावर भोयांना वाटले की पालखी खूप जड होत चालली आहे. त्याचवेळी पालखीत बसलेली राजकुमारी जोरजोरात ओरडायला लागली. भोई घाबरले आणि त्यांच्या हातातून पालखी खाली पडली, आणि मोडली.

मोडलेल्या पालखीतून राजकुमारी बाहेर आली व भुतासारखी उठून उभी राहिली. दासींनी मोठ्या मुश्किलीने तिला चालवत अंतःपुरात नेले. आपल्या वडिलांना पाहून राजकुमारी ओक्साबोक्शी रडायला लागली. आणि तिने त्यांना सर्व कहाणी सांगितली.

राजाने चिडून ताईत काढून लांब फेकला. पण दुसऱ्याच क्षणीं ताईत परत येऊन राजकुमारीच्या कंबरेला चिकटला आणि आगीच्या ज्वालांप्रमाणे तिचे शरीराची आग होऊं लागली. तिची अवस्था पाहून राजाला तिची दया आली आणि राजाने स्वतःच तो ताईत घातला. राजकुमारी पहिल्यासारखी बारीक झाली, पण राजा मात्र जाडाजूडा झाला.

दुसऱ्या दिवशी राजाने ब्रम्हचारिणीला बोलावणे पाठवले. तिच्याकडून हा ताईत तिला कोणी दिला ह्याचा शोध घेतला. त्याने मग शंकरमार्फत माधवचा पण पत्ता शोधून काढला, परंतु माधवला ताईत देणाऱ्याचा कांही राजाला शोधून काढतां आला नाही. शेवटी राजाने घोषणा केली की जो माणूस हा ताईत बांधून घेईल, त्याच्या खाण्यापिण्याचा, कपडे लत्ते, राहाण्याचा, सारा प्रबंध केला जाईल.

तेव्हां एक माणूस ताईत बांधून घेण्याकरता पुढे आला. माणूस ज्याने माधवच्या कंबरेला ताईत बांधला होता तोच हा माणूस होता. तो परत जाडाजुडा झाला व राजमहालात राहून राजकुमारीचे आरामांत मनोरंजन करूं लागला.





# अजिंक्य गरुड - २

चित्रे : गांधीअप्पा

1

चंद्रपुरीचे राजे महेन्द्रदेव घोषणा करतात कीं माजी प्रधान मंत्र्यांचा मुलगा आदित्य त्यांचा उत्तराधिकारी होईल. त्यांची अशीही इच्छा आहे की आदित्यने त्यांच्या दत्तक मुलीशी, अरुणाशी विवाह करावा. हे सर्व जेव्हां घडलं, तेव्हां आदित्य नुकताच सर्प देशांत विजयी होऊन परतला होता. तिथे नागबंधु - हा मांत्रिक आगींत जळून खाक झाला आणि त्याचे गुंफामंदिरही नष्ट झाले होते. दोघे दुष्ट जुलमी ओरेकल आणि रवींद्रदेव बंदी झाले होते. सेनापती नरेंद्रदेवाची इच्छा होती कीं त्याचा मुलगा रविंद्रदेव हा राजाचा उत्तराधिकारी बनावा. आपल्या मुलाला वांचवण्याच्या प्रयत्नांत तो मगरींच्या तडाख्यांत सांपडला व त्याचे दोन्ही पाय निकामी झाले होते. चंद्रपुरींत पुन्हां शांतता प्रस्थापित झाली. तरीसुद्धां बहुतेक लोकांना माहीत नव्हतं कीं बंडाळी करण्याचा कांही विरोधकांचा प्रयत्न चालूं आहे. ह्या षड्यंत्राचा खलनायक कोण होता? ज्याचे कुलदैवत गरुड आहे असा आदित्य पुन्हां एकदा स्वतःला अपराजित सिद्ध करूं शकेल कां? येणाऱ्या चित्रांतून हे सादर केले जाईल.

# वाचकांची पत्रे

सर्व बालमासिकांमधे मला आकर्षित करणारे मासिक म्हणजे 'चंदामामा'. वाचकांना ते वेगळ्याच अद्भुत विश्वांत घेऊन जाते. न पाहिलेल्या, न ऐकलेल्या गोष्टींनी भरलेले हे मासिक खरोखरच एक वरदान आहे. गेली पंचवीस वर्षे मी हे वाचतो आहे. कांही काळ याचे प्रकाशन स्थगित झालेले होते; पण पुन्हां हे आपला प्रकाश दाखवायला लागले आहे, हे आम्हा वाचकांचे भाग्यच आहे. हा चंदामामा जगांत अक्षय राहो ही माझी मनःपूर्वक इच्छा!

***- जी. जॉन केनेडी, हैदराबाद***

'चंदामामा' हे भारतीय साहित्याच्या आकाशांतले ध्रुव नक्षत्र आहे. त्याच्या विलक्षण व खास स्वरूपाबद्दल वाचक नेहमीच त्याची प्रशंसा करतात. एक वाचक म्हणून मी हे लिहितो आहे. नित्यनव्या वेताळ कथा, लोकप्रिय धारावाही मालिका या उत्कंठा उत्पन्न करतात. विविध देशांतल्या गोष्टी व माहिती आमच्या ज्ञानांत भर घालते. जातक कथा व पुराणकथाही रोचक असतात. भविष्यांत आपण पंचतंत्र व अरबी कथाही प्रसिद्ध कराव्यात असे मी सुचवतो. 'चंदामामा'ची शानदार वाटचाल यापुढेही अशीच चालू राहावी अशी माझी प्रार्थना आहे.

***- महर्षी, अलाहाबाद***

आमच्या लहानवयांत अभ्यासाच्या पुस्तकांत लपवून आम्ही 'चंदामामा' मोठ्या उत्साहाने वाचत होतो. जरा मोठे झाल्यानंतर वेताळाच्या गोष्टी, जातक कथा व इतर मनोरंजनाची सामुग्री मी नीट बाइंड करून सर्व अंक माझ्या पुस्तकालयांत सुरक्षित ठेवले आहेत. लहानपणी वाचलेल्या अर्ध्या आण्याचा राजा, 'जागते रहो' गोष्टी, आजही मला आवडतात. आकाशांत चमकणाऱ्या चांदोबावर ससा आहे, कीं सूत कातणारी म्हातारी आहे, ते कांही मला माहीत नाही. पण चंदामामा हे महत्वपूर्ण मासिक आहे एवढं मात्र नक्की! या वयांतही मला हे मासिक आनंद देते. दर महिन्याला वाचायची उत्कंठा वाढतच जाते. मनाला शांतता मिळते. घरांतल्या सर्वांना ज्ञान व मनोरंजनाचा आनंद मिळतो.

***- दुर्गा, वर्धा***

चंदामामाच्या प्रकाशकांचे व वाचकांचे साठ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल मी मनःपूर्वक अभिनंदन करतो. वाचकांच्यासाठी ज्या स्पर्धा ठेवल्या जातात, त्यांत तुम्ही कोणत्या वर्गात शिकता आहात? आपले वय काय? हे आवर्जून विचारले जाते. मोठ्या वयाचे वाचक असू नयेत कां? देशभरांत हे मासिक सर्वांचे मन वेधून घेते, हे सर्वांचे मासिक आहे.

***- वासुदेव भट्ट, कारवार***





# पंगु बुद्धी

गिरिधर हा गिरिव्रजपुर देशाचा राजा होता. तो दरवर्षी एका प्रसिद्ध व्यक्तीचा सत्कार करत असे. मंत्री योग्यवेळी देशांतल्या प्रसिद्ध व्यक्तींची यादी करून राजाला देत असत. त्यांतली जी व्यक्ती राजाला योग्य वाटेल, तिचा राजा सत्कार करत असे.

परंतु त्या वर्षी मंत्र्यांनी दिलेल्या प्रसिद्ध व्यक्तींच्या यादीतली एकही व्यक्ती राजाच्या मनांत भरली नाही. तेव्हां मंत्री राजाला म्हणाले,

''महाराज, या वर्षी आम्हाला अशी कोणतीही प्रसिद्ध व्यक्ती सापडली नाही जी आपल्याला योग्य वाटेल. सामान्य कलाकार, विद्वान यांची यादी करण्याचा हुकूम व्हावा. आम्ही ती त्वरित बनवून देऊ.''

राजाने ही विनंती धुडकावून म्हटले, ''विद्वान तर खूप लोक असतात, पण मी अशा विद्वानांचा चाहता आहे, कीं ज्यांच्यामधे कांही असामान्य गुण आहेत. अशा व्यक्ती विरळ असतात. पण कोणत्याही परिस्थितीत मी अयोग्य माणसाचा सत्कार करणार नाही.'' राजाने स्पष्ट शब्दांत आपले मत मांडले.

असा पंधरवडा गेला. एक दिवस राजा आपल्या परिवाराबरोबर शिकारीला निघाला. दुपारपर्यन्त मोठ्या धामधुमीत शिकार सुरु होती. पण हळूहळू सगळे दमून मागे रेंगाळायला लागले. राजा मात्र वेगाने जंगलात पुढे गेला, आणि रस्ता चुकला. आपण वाट चुकलो आहोत हे त्याच्या लगेच लक्षांत आले. पण त्यांची चिंता न करता आपली तहान भागविण्यासाठी पाण्याच्या शोधांत तो तसाच पुढे गेला.

पाणी कुठे दिसेना. पण त्याला एके ठिकाणी एक आश्रम दिसला. तहान भागवण्याच्या आशेने तो आश्रमांत शिरला. पण तेथील दृष्य पाहून तो तहानभूक सर्व कांही विसरला.

लक्ष्मी गायत्री



त्या आश्रमात जितकी मंडळी होती, ती कुठल्या ना कुठल्या स्वरुपांत अपंग, विकलांग होती. परंतु कुणाच्याही चेहेऱ्यावर त्याचे दुःख नव्हते. विकलांग असून त्याचा त्रास त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता. त्यांच्यात एक आत्म-विश्वास दिसत होता. कुणी टोपल्या विणत होते तर कुणी चटया. कांहीजण कापड विणत होते. हे सगळे बघता बघता राजाला आपल्या तहानेची आठवणच राहिली नाही.

इतक्यांत आतून एक सुंदर तरुण बाहेर आला आणि आदराने म्हणाला, "आपण कोण? आपल्याला काय पाहिजे?"

राजाने आपण कोण आहे हे न सांगता तहान भागविण्यासाठी पाणी मागितले. थंड पाणी पिऊन तहान भागल्यावर, युवकाने दाखवलेल्या जागेवर बसून कुतूहलापोटी त्याने युवकावर प्रश्नांचा भडिमार केला.

हंसतच तो तरुण म्हणाला, "तुमच्या सर्व प्रश्नांच्या उत्तरादाखल मी तुम्हाला ही गोष्ट सांगतो ती ऐका."

मग तो सांगू लागला, "इथून जवळच रेपल्ली नांवाचे एक गांव आहे. पंडित नारायणशास्त्री तिथे रहातात. कृष्णशास्त्री हा त्यांचा एकुलता एक मुलगा आहे. तो सर्व विद्यात पारंगत आहे आणि सुंदर आहे. पण ह्यामुळे तो गर्विष्ठ झाला आहे. तो स्वतःला असामान्य व्यक्ती मानू लागला. त्याचे हे वागणे त्याच्या वडिलांना अजिबात आवडले नाही.

त्यांनी त्याला पुष्कळ समजावून पाहिले की असा गर्व करणे चांगले नाही. विनय हाच पंडिताच्या पांडित्याचा अलंकार आहे. त्याचे वडील समजावून थकले, पण कृष्णशास्त्र्याच्या स्वभावात कांही बदल झाला नाही.

तेथूनच जवळच्या बलभद्रपुरच्या जमीन-दारांनी राज्योत्सवाच्या संदर्भात नवीन कवींच्या स्पर्धेची घोषणा केली. ही घोषणा ऐकताच कृष्णशास्त्रीने मनाशी निश्चय केला की ही स्पर्धा तोच जिंकेल आणि त्याचा सत्कार होईल. ह्या विचारांतच तो घोडागाडीतून राजधानीकडे निघाला.

गाडी थोडी दूर गेली असेल तोच कृष्ण-शास्त्रीला एक काळा तरुण दिसला. त्याला चालता येत नव्हते. चालताना खूप त्रास होत



होता. गाडी दिसताच त्या तरुणाने गाडी थांब-वण्यासाठी हात केला.

कृष्णशास्त्री कांही बोलण्या अगोदरच गाडीवान दया येऊन त्या युवकाला म्हणाला, "पायाला लागलं कां?"

तरुण हंसत दोघांकडे बघत म्हणाला, "कांटा बोचला होता. कांटा तर निघाला पण बोच तशीच आहे. मला बलभद्रपुरला जायचे आहे. जर आपणही तिकडेच जात असला तर मला आपल्या गाडीत जागा देऊं शकता?"

त्याचे बोलणे ऐकून कृष्णशास्त्रीने त्याला नीट न्याहाळले. त्याच्या चेहेऱ्यावर हुषारी दिसत होती. त्याने गंभीर स्वरांत त्या तरुणाला गाडीत बसायला सांगितले.

युवक गाडीत बसला. कृष्णशास्त्रीने त्याचे नांव विचारताच तो म्हणाला, "मी थोडा बहिरा आहे. कृपया मोठ्याने बोला."

तिरस्काराने त्याच्याकडे बघत तो जवळ जवळ ओरडलाच, "मी विचारतो आहे की आपलं नांव काय?"

युवक हंसून म्हणाला, "माझं नांव जगन्नाथ आहे. बलभद्रपुरच्या जमीनदारांकडे जी स्पर्धा होणार आहे, त्यांत भाग घेण्यास मी जात आहे."

त्याचे उत्तर ऐकून कृष्णशास्त्रीच्या चेहऱ्यावर एक बेफिकीरपणा आला.

गाडी बलभद्रपुरच्या वेशीवर येताच "इथे एक नरसिंह नांवाचे सुप्रसिद्ध वैद्य आहेत. त्यांच्या-



कडून पायाला, हाताला औषध लावून येतोच." असे म्हणत तो तरुण खाली उतरला.

दुसऱ्या दिवशीच कवितांची स्पर्धा सुरु झाली. कृष्णशास्त्रीने प्रथमच आपली कविता ऐकवून जमीनदाराची वाहवा मिळवली होती. नंतर आणखी चारपांच कवींनी आपल्या कविता ऐकवल्या. एवढ्यांत जगन्नाथ एका वृद्धाला घेऊन तिथे आला.

त्या वयोवृद्ध माणसाला बघताच जमीनदाराने स्वतः त्यांचे स्वागत केले. आणि "हे वैद्य शिरोमणी धन्वंतरी नरसिंह" अशी त्यांची सर्वांना ओळख करुन दिली.

तेव्हां बाजूला उभ्या असलेल्या जगन्नाथकडे बघत नरसिंह जमीनदारांना म्हणाले, "ह्याचं नांव जगन्नाथ आहे. काल दुपारी लंगडत माझ्याकडे



आला. पायांत कांटा गेला होता. वेदनेने तडफडत होता. म्हणून औषध लावलं. इकडल्या तिकडल्या गप्पा मारताना कळलं की हा कविता स्पर्धेत भाग घेण्यासाठी आला आहे. मी गमतीत त्याला म्हटलं की औषधावर एक कविता ऐकव तर खरं.''

तेव्हां याने तावडतोब एक कविता ऐकवली, त्याचा सारांश आहे, सर्व वैद्य औषध देतात, पण प्रेमाने, मायेने दिलेले औषध अमृतापेक्षा गुणकारी आहे. एवढंच नाही तर ते औषध भविष्यांतल्या रोगांचे पण निवारण करते. आजचे हे वैद्य असेच असल्यामुळे मला औषध नाही तर अमृत मिळाले आहे. आणि यांत कुठलीही अतिशयोक्ती नाही. आता अशी कविता ऐकल्यावर जगन्नाथला कसं सोडणार? म्हणून बरोबर घेऊन आलो आहे.''

जमीनदार टाळ्या वाजवत म्हणाला, ''वा! वा! जगन्नाथ, आता आपल्या कवितेने आम्हाला धुंद करुन टाका.''

वैद्य नरसिंह जमीनदाराला म्हणाले, ''एका आजारात याला बहिरेपण आलं आहे. लौकरच मी ह्याच्यावर उपचार करुन याला बरा करीन.''

जमीनदार म्हणाला, ''बहिरा असला म्हणून काय झालं? मनुष्याला शारीरिक व्यंग असले तर हरकत नाही, पण त्याची बुद्धी चांगली हवी.''

त्यानंतर जगन्नाथने आपल्या सुमधुर कवितांनी श्रोत्यांना अगदी मंत्रमुग्ध केले. त्याच्या कविता ऐकल्यावर कृष्णशास्त्रीसकट सर्व कवींना त्यांच्या कविता शुष्क व नीरस वाटू लागल्या. कृष्णशास्त्रीला वाटले की जगन्नाथने नुसत्या काव्यांतच नाही तर मानवतेबद्दलपण त्याला धडे दिले. त्याचे मन आता गर्व सोडून विनयशीलतेकडे हळूंहळूं वळूं लागले.

स्पर्धेनंतर जमीनदाराने जगन्नाथचा सत्कार करुन त्याच्या इच्छेप्रमाणे त्याला राजकवीच्या पदावर नियुक्त केले.

विश्रांतीच्या वेळी कृष्णशास्त्री जगन्नाथला भेटून म्हणाला, ''गाडीत प्रवास करताना मी आपल्याला बेफिकीरीने वागवले. मनांत आपली हेटाळणी केली. त्याकरिता आपण मला क्षमा करा. आपण एवढे श्रेष्ठ कवी आहात याची मला कल्पना नव्हती.''

जगन्नाथ शांत स्वरात म्हणाला, ''अपंग व्यक्ती श्रेष्ठ असेल तरच तिचा मान ठेवला पाहिजे, असे समजणे चुकीचे आहे. जे असा विचार करतात, ते बुद्धीने अपंग असतात.''

जगन्नाथचे शब्द कृष्णशास्त्रीला चाबकाच्या फटक्याप्रमाणे लागले. तो एक क्षण गप्प राहिला, आणि नंतर म्हणाला,

''आपल्याला माहीतच आहे की कधी कधी विष सुद्धा अमृताचे काम करते. आपले कांही बोलणे मला विषासारखे वाटले, पण माझी खात्री आहे की पुढे जाऊन तेच शब्द अमृताचे काम करतील. आणि ज्या मानसिक आजाराने मी ग्रस्त आहे, त्यापासून मला मुक्ती मिळेल. मला आता समजले आहे की शारीरिक व्यंगापेक्षा मानसिक व्यंग कितीतरी पटींनी वाईट आहे. तो एक मानसिक रोग आहे. मला आपला निरोप घेण्याची परवानगी द्या.'' असे म्हणून हात जोडून तो निघून गेला.

त्यानंतर त्याने आपल्या गांवाच्या वेशीवर एक आश्रम स्थापन केला. त्यांत त्याने अपंगांना आश्रय दिला. त्यांच्यात जगण्याची उमेद निर्माण केली. त्यांना उदरनिर्वाहासाठी धंद्याला योग्य असे शिक्षण देण्यास सुरवात केली.

गोष्ट संपवून युवक म्हणाला,

''महाशय, मीच तो कृष्णशास्त्री. चार वर्षांपूर्वी मी हा आश्रम स्थापन केला. जगन्नाथने या आश्रमाची माहिती मिळवली. आता मनांत येईल तेव्हां ते इकडे येतात. तेच माझे गुरुदेव आहेत. वेळोवेळी तेच आम्हाला मार्गदर्शन करत असतात. हा आश्रम मी त्यांच्या प्रेरणेनेच स्थापन केला. एकदा मी त्यांच्याशी अत्यंत बेफिकीरीने वागलो होतो. त्याबद्दल प्रायश्चित म्हणूनच मी याची स्थापना केली. आणि त्यांना मी माझे गुरु मानतो.'' कृष्णशास्त्रीचे म्हणणे राजाने लक्ष देऊन ऐकले होते.

आनंदाच्या उकळ्या फुटून तो म्हणाला, ''मी या देशाचा राजा गिरिधर आहे. मी दरवर्षी माझ्या राज्यांतल्या एका असामान्य व्यक्तीचा सत्कार करतो. परंतु यावर्षी माझ्या मंत्र्यांना अशी कोणी व्यक्ती मिळाली नव्हती. म्हणून मला खूप काळजी वाटत होती. पण आज मला अशा दोन असामान्य व्यक्ती मिळाल्या आहेत ज्यांचा याच वर्षी नाही, तर आयुष्यभर मी गौरव करत राहीन. आणि हे माझे सौभाग्य आहे.''



होता. तो त्यातून शुद्धीवर आला. त्याने चारी बाजूला नीट न्याहाळून बघितले व नवीन जागी आल्यासारखा व कांही समजत नसल्यासारखा तो उद्गारला, ''मी कुठे आहे? मी कोण आहे? मांत्रिकाने त्याच्याजवळ जाऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हटले, ''तू केशव आहेस. महामांत्रिक ब्राम्हदंडीच्या गुहेत तू आहेस. तो बघ उपासकांचा कल्पद्रुम.. उन्मत्त भैरव.''

केशवने गुहेत सर्वत्र नजर फिरवली. आणि आश्चर्याने बघत त्याने आठवण्याचा प्रयत्न केला. हळूं हळूं त्याची स्मृति जागृत होऊं लागली. त्याने ब्राम्हदंडी व जयमल्लाला ओळखले आणि कालभैरवाच्या मूर्तीकडे बघून तो म्हणाला, ''कालभैरवाच्या डोळ्यांतली चमक जरा कमी झाल्यासारखी वाटते आहे. सारं कांही विचित्र वाटतंय. काय झालं जयमल्ल?'' त्याने मागे वळून जयमल्लला विचारलं.

जयमल्ल कांही बोलणार तेवढ्यांत मांत्रिकाने त्याला थांबवून विचारले, ''कांही नाही केशव, मी जरा बेसावध होतो. कोणा क्षुद्र मांत्रिकाने माझ्यावर वार केलेला आहे. तू भिऊं नकोस. मी त्या मांत्रिकाचा कालभैरवाला बळी देणार आहे. तो आमचे का[illegible]

''गुरु, आ[illegible] शत्रू आपल्याला शोधत डोंगर चढून येतो आहे. आपण कुठेतरी पळून जाऊं या. मार्ग दाखवावा.'' जयमल्ल म्हणाला.

''पळून जायचं? ते शक्य नाही. हा महामांत्रिक ब्राम्हदंडी शत्रूला घाबरुन पळून जाणार? शिष्या, अरे तू काय बोलतो आहेस? तुला माझी मंत्रशक्ती माहीत नाही. मी राजाच्या सैनिकांना घाबरत नाही किंवा त्यांच्या बरोबरच्या त्या फालतू मांत्रिकालाही घाबरत नाही. काल भैरव माझे रक्षण करील... मी इथूनच त्या मांत्रिकाला मारुन टाकीन. त्याने अगोदर माझ्यावर हल्ला केलेला आहे, मी त्यालाच चांगला धडा शिकवीन. तुम्ही दोघेजण मात्र दूर कुठेतरी जाऊन लपून बसा.'' असे म्हणून ब्राम्हदंडी कालभैरवाच्या मूर्तीजवळ गेला.

केशवने आपले धनुष्यबाण उचलले. त्यानंतर तो व जयमल्ल गुहेतून बाहेर पडले आणि दगडांच्या नि झाडांच्या मागून लपत-छपत हत्तींच्या झऱ्याच्या दिशेने पळायला लागले. (क्रमशः)





वेताळ कथा

# शरनिधीचे बुद्धिबळ

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ आला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि खांद्यावर घेतले. तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ म्हणाला, ''राजन, मध्यरात्रीची वेळ आहे, सगळीकडे नीरव शांतता पसरली आहे. तरीही न घाबरता मला वाहून नेतो आहेस. दमण्याचे नाव नाही. अरे, तुझा मौल्यवान वेळ कशाला वांया घालवतोस? मला असं वाटतंय की शेवटी तुझे कष्ट वाया जातील. कांही लोकांना कांही खेळ विशेष आवडतात. शरनिधि राजाला बुद्धिबळ फार आवडत असे. या खेळांत एकदा त्याने एका गंधर्वावर विजय मिळवला. अटी



प्रमाणे जिंकल्यावर त्याला पुन्हा तारुण्य प्राप्त होणार होते. पण विजय मिळूनसुद्धां त्याने ही सुसंधी आपल्या हातून निसटूं दिली, त्याची गोष्ट सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक." आणि वेताळ शरनिधीची गोष्ट सांगू लागला.

शरनिधी हा मधुवनावर राज्य करत असे. बुद्धिबळ हे त्याला आपल्या प्राणांपेक्षाही प्रिय होते. दरवर्षी आपल्या राजधानीत तो बुद्धिबळ स्पर्धा घेत असे.

शरनिधीची पत्नी प्रभावती देवी आणि वैजयंती व मेघना या त्याच्या दोघी मुलींना देखील बुद्धिबळाची विशेष आवड होती.

एका पौर्णिमेच्या रात्री वैजयंती आणि मेघना उद्यानात बसून बुद्धिबळ खेळण्यांत अगदी गुंगून गेल्या होत्या. त्याचवेळी आकाशांत विहार करणाऱ्या समीर नावाच्या यक्षाने त्यांना पाहिले. उत्कंठेपोटी त्याने आपला रथ तिथे उतरविला. वैजयंती जिंकताच प्रत्यक्ष अवतरुन तो म्हणाला, "वैजयंती, तू उत्कृष्ट खेळलीस."

अकस्मातपणे समोर उभ्या राहिलेल्या गंधर्वाला पाहून दोघी बहिणी घाबरुन गेल्या. स्वतःला सावरत प्रथम वैजयंती म्हणाली, "या उपवनात कुणा परक्याला येण्यास बंदी आहे. इथे विशेष पहारा असताना आपण येथे कसे आलात?"

"मी एक गंधर्व असून माझे नांव समीर आहे. बुद्धिबळ हा माझा आवडता खेळ आहे. चांदण्यात आकाशांत विहार करत असताना आपल्याला खेळत असलेले बघून भूमीवर उतरल्याशिवाय मला राहवले नाही. तुमची हरकत नसल्यास तुम्हा दोघींपैकी एकीशी मी बुद्धिबळ खेळू इच्छितो."

मान डोलवून वैजयंतीने आपली इच्छा दर्शविली. लगेच खेळ सुरु झाला. बघता-बघता गंधर्वाने वैजयंतीला हरविले. आणि तो मेघनाला म्हणाला, "तुम्ही पण खेळणार का?"

आपण हरूं हे माहित असूनही तिने गंधर्वा-बरोबर खेळण्याची इच्छा दर्शविली. कारण तिला असे वाटत होते की ही एक अविस्मरणीय अशी सुवर्णसंधी आहे.

खेळ सुरु झाला. मेघना अतिशय विचारपूर्वक चाली खेळत होती. पण दहा चालीतच गंधर्वाने तिला हरवले आणि तो खो खो हसू लागला. जणूं



कांही त्याला असे सुचवायचे होते की माझ्यासमोर तुमच्यासारख्या नवशिक्यांची काय पत्रास?

"पुढच्या पौर्णिमेस ठीक याचवेळी मी परत येईन. पुन्हा एकदा खेळू." असे म्हणून तो रथाकडे वळला.

दोन्ही राजकन्या अंतःपुरात उशिरा आलेल्या पाहून महाराणीने विचारले, "परत यायला एवढा उशीर का झाला? याचा अर्थ असा की इतका वेळ उपवनात बुद्धिबळ खेळत होता?"

मेघना म्हणाली की, "हो, एक गंधर्व आमच्या दोघींबरोबर बुद्धिबळ खेळला." आश्चर्याने राणी प्रभावतीने वैजयंतीला विचारले "अग, हे खरंच कां?"

"हो आई, मेघना खरंच सांगते आहे. तो असं म्हणाला की पुढल्या पौर्णिमेला परत येऊन बुद्धिबळ खेळीन." वैजयंती आईची शंका दूर करत म्हणाली."

इतक्यात राजा शरनिधी तिथे आला. राणीने सगळी हकीगत त्याला सांगितली. शरनिधि अचंब्याने म्हणाला,

"याचा अर्थ गंधर्व पुन्हा इथे येणार." आणि तो आपल्या विचारांत गढून गेला.

पुढील पौर्णिमेच्या दिवशी पहिल्या प्रहरात वैजयंती, मेघना चंद्रशिळेवर बसलेल्या होत्या. राजा, राणी चमेलीच्या कुंजामागे उभे राहून गंधर्वाची वाट बघत होते.

थोड्याच वेळात गंधर्व उपवनांत आपल्या



रथांतून उतरला. लताकुंजाकडे दृष्टिक्षेप टाकीत तो राजा व राणीला उद्देशून म्हणाला, "शरनिधी, महाराणींबरोबर लताकुंजामागे लपण्याची काय गरज आहे? तुमची हरकत नसेल तर मला तुमच्याबरोबर देखील बुद्धिबळ खेळायचे आहे. आपण खेळाल?"

गंधर्वाने स्वतः बोलाविल्यामुळे शरनिधी खूष होऊन पुढे आला. राजा आणि समीर शिळेवर समोरासमोर बसले. प्रभावती देवी, वैजयंती, मेघना कडेला बसल्या होत्या.

"स्पर्धा कुठलीही असूं दे. पैज लावल्यावरच खरी मजा येते. तुमचे काय म्हणणे आहे?" सोंगट्या ठीक करत गंधर्व म्हणाला. शरनिधीने मजेत गंधर्वाला विचारले, "मग डावाला काय लावायचे?"



तेव्हां गंधर्व म्हणाला, ''जर मी पैज हरलो तर माझ्या सामर्थ्याने या उतारवयांत तुम्हाला पुन्हां तारुण्य प्राप्त करुन देईन. जर तुम्ही हरलात तर तुमच्या मुलींपैकी एकीचा विवाह माझ्याशी करुन द्या. बोला, ही अट मान्य आहे तुम्हाला?''

राजा विचारांत पडला. जर तो हरला तर गंधर्व त्याचा जांवई होईल. आणि जिंकला तर त्याचे वृद्धत्व जाऊन त्याला पुन्हा यौवन प्राप्त होईल. 'मी हरलो अथवा जिंकलो, दोन्ही बाजूंनी माझाच फायदा होणार आहे'' या विचाराने राजा खूष झाला.

त्यावेळी दोघी राजकुमारी पण हाच विचार करु लागल्या. आपल्या वडिलांना गंधर्वाने हरविल्यावर तो कुणाचा स्वीकार करेल? राणी गंभीरपणे दुसराच विचार करत होती. आपल्या म्हाताऱ्या होणाऱ्या पतीने गंधर्वाला हरवून जर यौवन प्राप्त केले, तर तो आपल्याकडे दुर्लक्ष करेल. आणि कुण्या दुसऱ्या स्त्रीशी लग्न केलं तर? ती काळजीत पडली.

एवढ्यांत एक चमत्कार झाला. आकाशांतून आणखी एक रथ बागेत उतरला. सगळे अवाक् होऊन त्या रथाकडे पाहात असताना त्यांतून एक अतिशय सुंदर तरुणी खाली उतरली.

शरनिधी राजाने तिला डोक्यापासून पायां-पर्यंत न्याहाळत आश्चर्याने विचारले ''देवी, आपण कोण हे कळेल का?''

''मी या गंधर्वाची पत्नी आहे. हे ज्या सौंदर्यवतीशी विवाह करण्यास इतके उत्सुक आहेत, ती आहे तरी कोण? हे पहाण्यासाठी मी येथे आले आहे.'' कुत्सितपणे ती म्हणाली.

राजाने एक निर्णय घेतला व तो गंधर्वाला म्हणाला,

''ठीक आहे. खेळ सुरुं करुं. पण एक अट आहे. बुद्धिबळाच्या या खेळांत जय-पराजय कुणाचाही होवो, पण त्यामुळे मला वा माझ्या कुटुंबास त्रास होता कामा नये. हे आपल्याला मान्य आहे?''

गंधर्वाने एकवार आपल्या पत्नीकडे पहिले व शरनिधीला म्हणाला,

''आपण काय विचार करत आहात हे मला समजले आहे. वचन देतो की मी आपल्याला कुठलाही त्रास होऊं देणार नाही.''

खेळ चालू असताना अधून मधून गंधर्व आपल्या पत्नीकडे तिरप्या नजरेने पहात होता. गंधर्वपत्नीने शरनिधीला खेळांत अप्रत्यक्षपणे मदत केली. गंधर्वाचा पराजय झाला.

दुःखी गंधर्व शरनिधीला तारुण्य देणारा मंत्र उच्चारणार, तेवढ्यांत राजा म्हणाला, ''मला हे तारुण्य नको आहे.''

गोष्ट सांगून वेताळ विक्रमार्क राजाला म्हणाला,

''हे राजन, शरनिधीच्या वागण्यांत एक अनिश्चितता दिसते. राजा बुद्धिबळात हरला किंवा जिंकला तरी त्याचाच फायदा होईल, असे गंधर्वाने आश्वासन दिले, हे त्याचे भाग्यच. पण जेव्हां पैज जिंकूनही यौवन स्वीकारण्यास नकार दिला, हा त्याचा मूर्खपणा नव्हे कां? राजा पराजित होता, तर आपल्या एका मुलीचा त्याला गंधर्वाशी विवाह करुन द्यायला लागला असता. माझ्या या शंकांची उत्तरे माहित असूनही तू गप्प राहिलास तर तुझ्या शिराची शकले होतील.''

वेताळाचे शंकानिरसन करण्यासाठी विक्रमार्क उत्तरादाखल म्हणाला, ''हे खरं आहे की शरनिधी राजा कमकुवत मनाचा होता. हरलो-जिंकलो तरी फायदा आपलाच आहे, यांतच त्याला आनंद होता. परंतु खेळ सुरु होण्यापूर्वी गंधर्वाच्या मनांतला सुप्त हेतू त्याच्या पत्नीने उघड केला. तेव्हां शरनिधिला कळले की तो हरुन जर त्याच्या एका मुलीला गंधर्वाशी विवाह करावा लागला तर केवढा अनर्थ होईल! तसंच गंधर्वाच्या वराने त्याला तारुण्य प्राप्त झालं तर भविष्य-काळांत कितीतरी अडचणी येतील. तो बुद्धिमान असल्याने पुढील संकटांचा त्याला बरोबर अंदाज आला. जर तो मुलींच्या वयाचा झाला तर त्या त्याला आपला पिता कसा मानतील? महाराणी वृद्धत्वाकडे झुकलेली आणि तो तरुण, तर जग हंसणार नाही कां? म्हणून शरनिधीने घेतलेल्या निर्णयात ना कांही चूक आहे ना कांही मूर्खपणा. उलट ह्यांत त्याची श्रेष्ठ बुद्धिमताच व चातुर्य सिद्ध होते.

राजाच्या मौनभंगामुळे वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

***- शांतकुमार यांच्या कथेवर आधारित***






# आपला राष्ट्रीय पक्षी

**मो**र पक्षी हे भारताचे वैशिष्ट्य आहे. असं सांगतात कीं जगज्जेता अलेक्झांडरने जेव्हां इ.पू. ३२६ मधे भारतावर स्वारी केली तेव्हां त्याने प्रथम मोर पाहिला. त्याला तो इतका आवडला कीं त्याने ग्रीसला परत जाताना कांही मोर बरोबर नेले.

संस्कृतमधे मोराला एक शब्द आहे, त्याचा अर्थ "हजार डोळ्यांचा जीव" असा आहे. मोराची लांब निळी मान, डोक्यावर पंख्यासारखा तुरा आणि अत्यंत सुंदर पिसांची शेपूट, यामुळे मोर (त्याच्या मादीला लांडोर म्हणतात) हा सर्वांत सुंदर पक्षी आहे.

प्रत्येक पिसावर अर्धचंद्राकृति 'डोळा' असतो. मोराने शेपटी उंचावली की तिचा पंख्यासारखा पिसारा फुलवला जातो. जणूं कांही हजारो डोळे तुमच्याकडे बघत असतात असं वाटतं.

मोराची पिसे वर्षातून एकदा झडतात व नवीन पिसे येतात. ही पिसे जमवून त्यांचे सुरेख पंखे बनवतात.



सम्राट शाहजहानच्या मयूर सिंहासनावर रत्नखचित मोर जडवलेले होते. तो अमूल्य ठेवा नादीरशाहने इराणला नेला.

भारतीय पुराणांत, कृष्णाच्या मुकुटावर मोरपीस असल्याचा उल्लेख आहे. शंकराचा पुत्र कार्तिकेय याचे वाहन मोर आहे.



उत्तर प्रदेशांतली एक लोककथा

# जमीनदार व त्याची कट्यार



सेठ गिरिधारीलाल हा कालीवन गांवचा जमीनदार होता. त्याची भलीमोठी शेती होती. त्यासाठी त्याने बरेच शेतमजूर कामावर ठेवले होते. तो तसा कंजूष शेटजी नव्हता, पण पैसे देताना मात्र तो कंजूषी करीत असे. तो मजुरांना सगळे पैसे देत नसे. किंवा या ना त्या कारणाने पैसे देण्यास वेळ लावत असे.

बिचारे मजूर दुसरीकडे कुठे काम मिळणार नाही, हे जाणून कांही न बोलता कामावर राहात असत. लबाड शेटजी एखादा शुभ दिवस किंवा सण असेल त्या दिवशी मजुरांना बोलवून त्यांच्या पगाराचा कांही हिस्सा तो त्यांना देत असे. तो हे करत असे, म्हणजे त्यांनी कांही तक्रार करु नये. आणि त्यांच्या बाजूने ते कांही न बोलता गुपचूप घरी जात असत, त्यांना थोडे समाधान असे की आजचा दिवस तरी पूर्ण जेवण जेवता येईल. आणि केव्हांतरी तरी शेटजी त्यांची संपूर्ण बाकी चुकती करील. त्यांना माहित होतं की कांही झालं तरी तो कांही गरीब होणार नाही. त्याच्याकडे जरुरीपेक्षां पुष्कळ पैसा होता.

एक दिवस गिरिधारीलाल गुरं खरेदी करण्यासाठी महिन्याच्या बाजाराला निघाला. घरच्या गाई आटल्यासारख्या झाल्या होत्या. त्याला, त्याच्या बायकोला आणि दोन मुलांना पुरेल, एवढे दूध देत नव्हत्या. बाजारांत त्याने दोन दुभत्या गाई भाव करुन घेतल्या. त्याला वाटले हा सौदा चांगला झाला. आणि एकदम त्याच्या लक्षांत आले की पैशाचा बटवा तर तो



घरी विसरलाय. तो विचारांत पडला. त्याला तो सौदा हातचा जाऊं द्यायचा नव्हता.

पण हे देखील माहित होते की गुरांचा व्यापारी दुसऱ्या दिवसापर्यन्त वाट बघणार नाही. तो गाई विकून टाकेल किंवा दुसऱ्या बाजारात घेऊन जाईल. शेटजींना माहित होते की कसेही पैसे जमवून आजच त्या गाई विकत घेतल्या पाहिजेत.

गिरीधारीलाल सावकाराच्या शोधांत हिंडला. त्याला बाजाराजवळच एक सावकार सापडला. पण त्याला कोणीतरी जामीन हवा होता किंवा तारण वस्तू हवी होती.

त्यावेळी त्याच्याकडे सोन्याची मूठ असलेली कट्यार होती. त्याच्या आजीने ती त्याला बक्षिस दिली होती. तो बाहेर जाताना चोरांच्या भीतीने ती नेहमी स्वतःजवळ ठेवीत असे.

सावकाराने ती तारण म्हणून घेऊन त्याला हवे असलेले पैसे दिले. पैसे परत फेडून कट्यार कांही दिवसातच परत घेऊन जाईन, असे सांगून गिरीधारीलाल तेथून निघाला. बाजारांत जाऊन गाईंसाठी पैसे देऊन, एका माणसाला जेवणाच्या बोलीवर मदतीला घेऊन गाई घरी घेऊन आला.

गिरिधरलाल त्या आठवड्यांत किंवा त्याच्या पुढल्या आठवड्यांतही सावकाराकडे गेला नाही. सावकाराने दोन महिने शांतपणे त्याची वाट पाहिली. पण शेटजींचा कांही पत्ता नव्हता. तो ती कट्यार हातांत घेऊन विचार करुं लागला. काय करावे? ही विकून त्याबद्दल मुद्दल आणि व्याज वसूल होईल एवढी किंमत मिळेल कां? खरंतर सावकाराकडून अशी कट्यार कोण विकत घेईल? आणि कुणाला विचारलं तर या गोष्टीचा गवगवा होईल, आणि त्याची पत जाईल.

म्हणून त्याने कट्यारीबद्दल मौन बाळगायचे ठरविले आणि आपल्या नोकराला जमीनदाराकडे पाठवले. जमीनदार भेटला नाही आणि वाट बघत उगाच वेळ घालवण्यात अर्थ नाही, म्हणून तो



नोकर परत आला. थोड्या दिवसांनी परत त्याने नोकराला गिरिधारीलालकडे पाठवले. त्यावेळी त्याला

''जमीनदार झोपलेत व आत्ता त्यांना उठवता येत नाही'' असे सांगण्यात आले.

सावकाराने अजूनही शांतपणा सोडला नाही. आत्तापर्यन्त नोकराकरवी पाठवलेले निरोप ऐकून आता तरी गिरिधारीलाल कर्जाचे पैसे चुकते करुन आपली कट्यार परत घेऊन जाईल, म्हणून त्याने अजून थोडे दिवस वाट बघितली आणि मनाशी एक बेत पक्का केला. जेव्हां त्याचा न्हावी सुखराम केस कापण्यासाठी घरी आला तेव्हां सावकाराने त्याला गिरीधरलालने त्याच्याकडून कर्ज घेऊन ते कसे परत दिले नाही, हे सांगितले.

तसेच त्याबद्दल तारण म्हणून दिलेली सोन्याच्या मुठीची कट्यार कशी सापडत नाहीये, हेही सांगितले.

सावकार असेही म्हणाले, ''जमीनदार कट्यार सोडवून घ्यायला आले नाहीत, तर बरंच होईल. म्हणजे पैसे घ्यायला लागणार नाहीत, आणि कट्यार द्यायला लागणार नाही.''



सावकाराला माहित होते की न्हावी बातम्या पुरविण्यांत पटाईत असतात. लवकरच पुष्कळ लोकांना शेटजींचे न फेडलेले कर्ज आणि घरातून गायब झालेल्या कट्यारीविषयी माहिती मिळेल. आणि बरोबर तसंच झालं. जेव्हां सुखराम गिरिधारीलालकडे केशकर्तनासाठी गेला तेव्हां ही बातमी त्यांच्या कानी घालायला तो विसरला नाही.

आत्तापर्यन्त सावकाराचे कर्ज आपण अजूनही फेडले नाही याची गिरिधारीलालला कांहीही लाज वाटत नव्हती. पण आता त्याला वाटले, कीं आत्तापर्यन्त सर्वांना ही बातमी कळली असणार, तेव्हां आता सावकाराला सांगावे की ''पैसे परत हवे असतील तर माझी कट्यार परत दे.''

त्याने सावकाराकडे जाताना जरुर तेवढे पैसे स्वतःजवळ ठेवले. त्याची खात्री होती की त्याला एक पैसाही जास्त द्यावा लागणार नाही.

ज्या वेळी सावकाराने कट्यार चोरीला गेल्याचे गिरिधारीलालला सांगितले तेव्हां त्याने

खूप आरडाओरडा करुन म्हटले, ''सावकार तारण म्हणून कट्यार ठेवेल असा कुणाचा विश्वास बसेल कां?''

त्याच्या सोन्याच्या मुठी विषयी कांहीही न बोलता, सावकाराकडे तुच्छतेने बघत जोरजोरांत हंसून जमावाचे लक्ष वेधत तो आणखी उंच स्वरांत म्हणाला, ''सावकाराकडून कट्यार कोण चोरणार?''



जेव्हां भरपूर लोक जमले असं त्याने बघितलं, तेव्हां तो सावकाराला म्हणाला, ''तू एकदा घरांत का शोधून बघत नाहीस?'' त्याला असं वाटत होतं की सावकार आंत शोधून बाहेर येऊन म्हणेल,

''तुम्ही कर्ज परत फेडू नका. आपण हा व्यवहार इथेच मिटवूं.

सावकार दीनपणे आत गेला आणि बराच वेळ बाहेर आला नाही.

गिरीधारीलाल अधूनमधून खिशांतून आपला पैशांचा बटवा बाहेर काढत होता म्हणजे लोकांना कळावे की तो नक्की पैसे देणार आहे आणि तो किती प्रामाणिक आहे.

अचानक सावकार बाहेर येऊन त्याला म्हणाला,

''शेटजी, मला तुमची कट्यार सापडली! ही काय! मी नीट जपून ठेवली होती पण कुठे ठेवली ते आठवत नव्हते. ही घ्या. आता मला पैसे देता कां? म्हणजे हा खूप दिवस लांबलेला व्यवहार एकदाचा पूर्ण होईल.'' शेवटच्या शब्दांवर मुद्दामच जोर देत तो म्हणाला. म्हणजे लोकांनाही हे समजेल.

गिरिधारीलालला आता कर्जाची रक्कम आणि त्यावरचे व्याज देण्यावाचून गत्यंतरच नव्हते. थोड्या वेळाने खाली मान घालून तो तिथून निघाला. त्याची टर उडविणाऱ्या लोकांकडे तो मान वर करुन पाहू शकला नाही. पण गिरिधारीलाल चांगला धडा शिकला.

त्याच्या लाजिरवाण्या परिस्थितीचा जर कुणाला फायदा झाला असेल तर त्याच्या शेतमजुरांनाच; त्यांना तावडतोब त्यांचा पगार मिळाला.





# व्यापार-व्यापारी

कमलापूर नांवाचे एक छोटे गाव आहे. तिथे रमाकांत नांवाचा मोठा प्रसिद्ध सोनार होता. तो अकस्मात मरण पावला. आता त्याचा मुलगा रंगनाथ हाच संपूर्ण व्यापार आणि मालमत्तेचा वारस बनला. त्याला व्यापारांत रस नव्हता. त्यामुळे तो तिकडे अजिबात लक्ष देत नसे. केव्हांही बघा, चैनीत, करमणुकीत वेळ घालवत असे. जमाखर्चाच्या बाबीत अजिबात लक्ष घालत नसे. त्याचं त्यांत कांही घेणेदेणेच नसावे, असा धंदा तो करीत असे.

एक दिवस रंगनाथ आपल्या आंब्याच्या बागेत फिरत असताना दागिने घडविण्याच्या कामाचा प्रमुख तिथे येऊन म्हणाला, ''मालक, असं कानावर आलंय की कोणी दूरचा व्यापारी इथे एक नवे दागिन्याचे दुकान उघडतो आहे. विचार करा की अशा परिस्थितीत आपलं कसं होणार? आपण त्याच्यासमोर टिकाव धरुं शकूं कां? त्यामुळे आपल्या धंद्याचे नुकसान नाही का होणार?''

रंगनाथ कुत्सितपणे हसून म्हणाला, ''आपल्याकडे कुशल कारागीर आहेत. आपण जे दागिने बनवतो, ते घ्यायला मोठ्या संख्येने लोक येतच रहातात. तेव्हां या नव्या व्यापाऱ्याची जरासुद्धां काळजी करु नका. तो आपलं कांहीही बिघडवूं शकणार नाही.''

एक महिन्यांत नव्या व्यापाऱ्याने आपले दुकान सुरुं केले. तीन चार महिन्याच्या आंतच तो श्रेष्ठ व्यापारी समजला जाऊं लागला. मोठ्या संख्येने लोक त्याच्या दुकानांत दागिने घेण्यास जाऊं लागले.

यामुळे रंगनाथचे उत्पन्न कमी होऊं लागले. आता दुकानात काम करणाऱ्यांचा पगार देणे सुद्धा अशक्य होऊ लागले.

रंगनाथला वाटले की आता या शहरात राहाणे



योग्य नाही. कारण इथे त्याला कोणी मान देत नाहीत. तसंच वेळोवेळी त्याचा अपमान करायलाही लोक मागेपुढे पहात नाहीत. एका रात्री, आपल्या बायको मुलांना तिथेच ठेवून तो गुपचूप घर सोडून निघून गेला. त्याला स्वतःलाच माहीत नव्हते की तो कुठे निघालाय, आणि त्याला कुठे जाऊन पोहोचायचे आहे! दुसऱ्या दिवशी दुपारपर्यन्त तो चालतच राहिला. शेवटी दमून तो एका झाडाखाली बसला. त्याने डोळे मिटून घेतले.

त्याच वेळी शेतांची पहाणी करुन जमीनदार सूर्यभूपती बग्गीतून परत चालला होता. त्याने रंगनाथला नीट निरखून बघत मनाशी विचार केला, ''याचा वेष पाहून कुठल्यातरी संपन्न घरचा दिसतो. कदाचित् एकदम तब्येत बिघडली असावी.'' त्याने नोकराना सांगून अतिथीगृहात त्याला नेण्याची व्यवस्था केली.

नोकरांनी रंगनाथची चौकशी केली. पण खूप थकला असल्यामुळे तो नीट बोलूं शकला नाही. त्यांनी त्याला बैलगाडीतून अतिथीगृहात नेले. तो भुकेला आहे हे पाहून त्याला जेऊं घातले. पण तो नोकरांच्या प्रश्नांना उत्तर देत नव्हता आणि तो कोण आहे हेही सांगत नव्हता.

त्या रात्री चोरांच्या एका टोळीने जमीनदाराच्या घरांत घुसायचा प्रयत्न केला. पहारेकऱ्याचा ओरडा ऐकून जमीनदार सूर्यभूपती आणि कांही नोकर जागे झाले. जमीनदाराने, सुरक्षित ठेवलेल्या हत्यारांच्या खोलीतून ढाल-तलवारी भाले वगैरे काढून तो स्वतः चोरांशी लढला. थोड्या वेळच्या धुमश्चक्रीत कांही लोक जखमी झाले. जेव्हां चोरांच्या लक्षात आले की आपलं काही चालत नाही तेव्हां ते पळून गेले.

अतिथीगृहासमोर उभे राहून रंगनाथ हे सर्व पाहात होता. या गोष्टीचे त्याला मोठे आश्चर्य वाटले. दुसऱ्या दिवशी सकाळी तो जमीनदाराकडे गेला आणि नमस्कार करत म्हणाला, ''साहेब, तुमच्या घराच्या रक्षणासाठी कितीतरी नोकर-चाकर आहेत. पण तुम्ही स्वतः चोरांशी लढाई केली. हे आपल्याला शोभत नाही. हे आपल्या तोडीचे काम नाही. आपण संकटात सापडून जखमी झाला असतात.''

जमीनदार हंसत म्हणाला, ''रक्षणाला नोकर आहेत म्हणून मी काय चोरांपासून दूर राहूं? लपून बसूं? हे अगदी चुकीचे आहे. आपलं काम आपण त्यांच्याबरोबरीने केलं पाहिजे. त्यांतून जो काही फायदा होईल, त्यांतला एक हिस्सा त्यांना दिला पाहिजे. कुठल्याही जमीनदाराने किंवा व्यापाऱ्याने या नियमाचे पालन केले पाहिजे.''

जमीनदाराच्या उत्तराने रंगनाथ खडबडून जागा झाला. त्याच्या लक्षांत आले की दागिन्यांचा चांगला चालणारा व्यवसाय असूनही स्वतःच्या निष्काळजीपणामुळे तो या लीनदीन अवस्थेला येऊन पोचला आहे. आपलं काम सर्वस्वी नोकरांच्यावर सोडणे मूर्खपणाचे आहे. त्याच्या हातून केवढी मोठी चूक झाली आहे. स्वतःची ओळख देत तो म्हणाला, ''आपल्यामुळे आज मला एक जीवनसत्य, व्यापाराचे तत्व समजले आहे. आता निरोप घेण्याची परवानगी द्या.''

त्याचे बोलणे ऐकून जमीनदार खूष झाला. त्याने रंगनाथला थोडे पैसे, सोने आणि बरोबर दोन नोकर देऊन मानाने त्याची पाठवणी केली.

रंगनाथ कमलापूरला पोचला. जमीनदाराने दिलेल्या धनातून त्याने पुन्हां दागिन्यांचा व्यापार सुरु केला आणि बघता बघता तो एक मोठा कुशल सराफ म्हणून ओळखला जाऊं लागला. लोक आता म्हणूं लागले की आपल्या वडिलांसारखाच तोही एक मोठा समर्थ व्यापारी आहे.



## लहान विद्यार्थी



चीनमधल्या लायोनिंग प्रांतातल्या पान्जिन शहरांत राहणाऱ्या झांग झिन्यांगने तियानजिन शहरांतल्या एंजिनियरींग कॉलेजमधे अधिकृतरित्या प्रवेश मिळवला. त्यासाठी त्याने प्रवेशपरीक्षेत ५०५ गुण मिळवले - प्रवेशासाठी लागणाऱ्या गुणांपेक्षां त्याला ४७ गुण जास्त मिळालेले होते. दहा वर्षांचे वय असलेला झांग झिन्यांग हा चीनमधला सर्वात लहान कॉलेजविद्यार्थी आहे. सहा वर्षांचे प्राथमिक शालेय शिक्षण त्याने दोन वर्षातच संपवले, तीन वर्षांचा माध्यमिक शालेय अभ्यासक्रम त्याने दोनच वर्षात पुरा केला आणि तो २००४ साली कॉलेजांत दाखल झाला. वर्गांतल्या सर्वसाधारण मुलांच्या मानाने तो बराच लहान आहे म्हणून तो तासाला बसताना त्याच्या वडिलांना त्याच्याबरोबर बसायला कॉलेजने परवानगी दिलेली आहे. त्याला शिकवणे हे एका प्रकारचे आव्हान ठरेल, विशेषतः त्याच्या अचाट ग्रहणशक्तीला सतत ज्ञान पुरवणे हे कठीण काम होईल, असे कॉलेजचे एक अधिकारी म्हणाले.

## विक्रमी वृक्षारोपण

तमिळनाडमधल्या नागापट्टणम जिल्ह्यांतल्या दोन किनारपट्टीच्या गांवातले लोक त्यांची खेडी सुनामीच्या तडाख्यांतून कशी वांचली ते सांगताना अजून थकत नाहीत. त्यांनी २००२ मधे हजारो सुरूंची झाडे लावली होती आणि त्यामुळे ती खेडी वांचली. नलवेदपट्टी खेड्यांत तर २३ तासांत ८०,८४४ रोपे लोकांनी लावली. गांधीजयंतीच्या दिवशी नलवेदपट्टी व पुष्पवनम या खेड्यांतल्या लोकांनी ४७ एकरांत २४ तासांत २५४,४६४ रोपे लावली. या उपक्रमांत सुमारे ३०० शेतकऱ्यांनी भाग घेतला, आणि १ ऑक्टोबरला दु. ३.४० वाजता सुरूं झालेला कार्यक्रम दुसऱ्या दिवशी ३.४० वाजता आटोपला. हा जागतिक विक्रम पाहायला स्वतंत्रपणे निरीक्षक आलेले होते.







# चतुर सून

सदानंद सरस्वतीचा एकुलता एक मुलगा होता. त्याचे वडील लहानपणीच गेले असल्याने तिने त्याला मोठ्या लाडांत वाढवले होते. तो पंचवीस वर्षाचा झाला होता, पण अजून त्याला कांहीही काम येत नव्हते. त्याने कांही शिक्षणही घेतले नव्हते.

सरस्वती चिडक्या स्वभावाची होती. ती नेहमी रुसलेली असायची. शेजाऱ्यांशी तिचे अगदी जुजबी संबंध होते. छोटयामोठ्या गोष्टींवरुन सुद्धा ती त्यांच्यावर ओरडत असे. तोंडाला येईल तसे बोलत असे. आणि फायदेशीर आहे म्हणून कंजूसपणाने वागत असे.

म्हणून तिच्याकडे थोडी मालमत्ता असूनही, कुठलाही पिता सदानंदला आपली मुलगी द्यायला तयार नव्हता. शेवटी आपल्यापासून दूर असलेल्या गांवच्या एका गरीब मुलीशी तिने आपल्या मुलाचे लग्न केले.

नव्याने सासरी आलेल्या सुनेने, भवानीने, आपल्या सासूचा स्वभाव व्यवस्थित ओळखला होता. सरस्वती भवानीलाच सर्व काम करायला लावत असे. कधी कधी तिच्याबद्दल तक्रारही करत असे, की ती घरातले काम व्यवस्थित करत नाही. तिची खरडपट्टीही काढत असे.

सदानंदला माहित होते की त्याची आई त्याच्या बायकोला नोकरांपेक्षाही वाईट वागवते आहे, पण घाबरुन तो गप्प बसत असे. इकडे सरस्वतीला अशी भीती वाटत असे की मी सुनेला त्रास दिला नाही, खूप काम करायला लावले नाही, तर ती नवऱ्याला आपल्या मुठीत ठेवेल आणि त्याच्यावर हक्क गाजवायला लागेल.

असेच दिवस जात होते. थंडीत घराच्या परसदारी असलेल्या वालपापडीच्या वेलाला भरघोस शेंगा आल्या होत्या. भवानीला वालपापडी फार आवडत असे. त्याची भाजी ती

पार्वती रघुराम



आवडीने खात असे. पण सरस्वती फक्त मुलगा आणि स्वतःपुरतीच भाजी बनवत असे. सुनेसाठी एक घासदेखील शिल्लक ठेवत नसे.

लवकरच सरस्वतीच्या बहिणीच्या मुलाचे लग्न ठरले. तिला लग्नाला जावेच लागणार होतं. जाण्याअगोदर आपल्या सुनेला बोलवून ती म्हणाली, "सगळ्या शेंगा तोडून पिशवीत नीट भरुन ठेव. मी परत आल्यावर बाजारांत जाऊन त्या विकीन. लक्षात ठेव. एक सुद्धा कमी शेंग दिसली तर तुझी धडगत नाही." असे तिला बजावून मुलाला बरोबर घेऊन ती बहिणीकडे जाण्यास निघाली.

सासू आणि नवरा गेल्याबरोबर भवानीने सारी वालपापडी तोडली. ते दोघे परत येईपर्यन्त रोज वालपापडीची भाजी बनवून अगदी पोटभर खाली. चौथे दिवशी रात्री सरस्वती परत आल्यावर तिने बघितलं की पिशवीत फक्त मूठभर पापडी होती. ती खूप रागवली आणि मुलाला बोलवून म्हणाली, "तुझी बायको चोरटी आहे. आज तिने वालपापडी चोरली. उद्या आणखी काय चोरेल काय माहिती? कदाचित् घरातल्या सगळ्या किंमती वस्तू चोरेल. हिला कुठल्याही परिस्थितीत घरांत ठेवता कामा नये. हे तर सापाला दूध पाजण्यासारखं होईल. हिला आत्ताच्या आत्ता इथून घेऊन जा आणि गांवाच्या वेशीवरच्या देवीच्या देवळाजवळ सोडून ये. या इतक्या गारठ्यांतून ती जर वाचली तर काय करायचे ते उद्या पाहू."

सदानंदने आईची समजूत घालायचा प्रयत्न केला, पण तिच्या संतापलेल्या चेहेऱ्याकडे बघून तो गप्प बसला. भवानीला बरोबर घेऊन देवीच्या देवळाशी सोडून आला. बिचाऱ्याला आपल्या अशा वागण्याचे फार वाईट वाटत होते.

दहा-पंधरा मिनिटे सुद्धा झाली नसतील पण भवानीला ती कडाक्याची थंडी कांही सहन होईना. तिला माहिती होते की जवळच देवीचे एक उजाड मंदिर आहे. थंडी पासून सुटका व्हायला ती त्या देवळात गेली. इतक्यांत कोणाच्यातरी पावलांचा आवाज आला, म्हणून ती देवीच्या मूर्तीमागे लपून बसली.

हळूंहळू चार चोर तिथे आले. गर्भगृहासमोर बसून चोरीचे दागिने आपसांत वाटण्यावरुन वादावादी करुं लागले.

एका चोराने अर्धे दागिने घेऊन, "हे माझ्या



बांट्याचे आहेत." असं सांगितलं. "असं कसं? तिसरा हिस्सा मला मिळायला पाहिजे." अजून एक चोर म्हणाला.

"सगळ्यांना बरोबर सारखा वाटा मिळायला पाहिजे." आणखी एकाने कडक आवाजात सांगितले.

भवानी हे सगळं ऐकत होती. तिला आपल्या अंगात देवी संचारल्यासारखं वाटूं लागलं. ती म्हणाली, "मग माझा वाटा कुठाय? सावधान, गळे कापून रक्त पिईन." बस, दुसऱ्या क्षणीं चोर "देवीचा कोप झालाय." असं म्हणत पळूं लागले.

भवानीने एक वेडं धाडसच केलं होतं. तिला वाटलं, तिने जे काही केलं ते फार धोक्याचं होतं. तिला हे सगळं स्वप्नातल्यासारखं वाटलं. जे झालं ते बऱ्यासाठीच असं समजून तिने ते दागिने घातले. सासूला काय उत्तर द्यायचे हे देखील तिने ठरविले आणि सकाळ होताच ती घरी परतली.

तेव्हां सरस्वती घरासमोर सडा घालत होती. भवानीला पाहून ती अवाक् झाली. मग स्वतःला सावरत म्हणाली, "कोण आहेस तू? भवानीच ना? मी लहानपणी मंदिरातल्या कामाक्षी देवीला पाहिलं होतं. तू अगदी तशीच दिसते आहेस."

सासूला चकित झालेले बघून हंसून भवानी म्हणाली "सासूबाई, कामाक्षीदेवीच्या कृपेनेच हे सगळे दागिने देवीच्या मंदिरात मिळाले. थंडी आणि अंधेरामुळे मी देवीच्या मूर्तीमागे बसले. थोड्याच वेळात पूर्ण मंदिर प्रकाशाने झगमगू



लागले. दोन सवाष्णी प्रगटल्या आणि मला दागिने देऊन म्हणू लागल्या, "आम्ही देवीच्या दासी आहोत. हे दागिने तुलाच आहेत. देवीचा प्रसाद समज." दागिने समोर ठेवून त्या अंतर्धान पावल्या. जेव्हां आश्चर्याने मी या दागिन्यांकडे पाहू लागले तेव्हां देवी माझ्या कानांत म्हणाली, "भवानी, जगांत सगळ्या अनर्थाचं मूळ गरीबीत असतं. तू एका गरीब कुटुंबात जन्मलीस म्हणून तुला इतके कष्ट सहन करावे लागले. कोण कोण तुला काय म्हणालं, रागवलं, मला सगळं माहित आहे. तुझ्या सासूने तुसडेपणा सोडला, चांगलं वागूं लागली, तर मी तुला प्रसन्न झाले, तशी मी तिच्यावर पण प्रसन्न होईन." चतुरपणे ती म्हणाली.

भवानी हे बोलली, तेव्हां सरस्वतीला वाटूं

लागलं की आपण पण देवीच्या मंदिरात जाऊन असेच दागिने मिळवावे. त्या रात्री अंधार पडल्यावर ती देवीच्या देवळांत गेली. दोन्ही हात जोडून नमस्कार करत म्हणाली, ''आई, आजपासून मी माझा राग सोडून देते. मी सुद्धां कोणी श्रीमंत बाई नाही. माझ्या सुनेवर दया दाखवलीस तशी माझ्यावर पण कृपा करुन मला दागिने दे.''

सरस्वती आणखी कांही बोलणार एवढ्यांत बाहेर कुणाचीतरी चाहूल लागली. सरस्वतीला कळले की कुणीतरी आंत येतंय. म्हणून ती मूर्तीमागे लपली. हे तेच चोर होते. ते काल रात्री इथे आले होते. तो देवीचाच आवाज होता की नाही, हे पडताळण्यासाठी ते आले होते.

एका चोराने देवीला नमस्कार करीत म्हटलं, ''आई, चोरी हा आमचा पेशा नाही. पोटासाठी छोट्या-मोठ्या चोऱ्या करत रहातो. कालच्या सारखेच दागिन्याच्या वांटणीसाठी तुझ्या पायाशी आलो आहोत. तुला जर यापुढे आम्ही चोरी करुं नये, असं वाटत असेल तर तसं जोरात सांग.''

सरस्वती लगेच मोठ्यांदा म्हणाली, ''अरे, दागिने तिथेच ठेवा आणि चालूं लागा. असं केलं नाही तर तुम्हाला सर्वांना खाऊन टाकीन.''

एका चोराने प्रतिध्वनित् आवाज ओळखला आणि मूर्तीच्या मागे गेला. तिथे त्याने सरस्वतीला पाहिले आणि त्याला राग आवरेना. तो तिचे दोन्ही हात पकडून खेचत बाहेर घेऊन आला. घाबरलेल्या सरस्वतीने सुनेने आणलेल्या दागिन्यांबद्दल सांगून टाकले.

गमावलेले दागिने परत मिळविण्यासाठी चोर सरस्वतीला तिच्या घरी घेऊन आले. भवानीला आधीपासूनच कल्पना होती की आपली सासू असं कांहीतरी करेल, म्हणून तिने जमीनदाराच्या नोकरांना घरी बोलवून ठेवले होते. नोकरांनी चोरांना पकडले आणि भवानीकडून ते दागिने घेतले.

भवानीचा चतुरपणा व इमानदारीवर खूष होऊन जमीनदारांनी तिला खूप बक्षिसे दिली. तिच्या नवऱ्याला नोकरी पण दिली. त्या दिवसापासून सरस्वती चुकूनसुद्धा आपल्या सुनेविरुद्ध कांही बोलत नसे. ती स्वतःच्या मुलीसारखे तिला वागवूं लागली.





# चंदामामा प्रश्नावली – ३



**बरोबर उत्तर देणाऱ्यांपैकी एकाला रु.२५०/- दिले जातील.**

*या प्रश्नावलीत विचारलेले सर्व प्रश्न २००५ मधे जानेवारी ते डिसेंबर या अंकांत असलेल्या गोष्टींवर आधारित आहेत. तुम्ही त्या वाचलेल्या आहेत. जर तुम्हाला त्या आठवत असल्या तर तुम्ही लगेच उत्तरे देऊं शकाल. लक्षांत नसतील तर बाराही अंक पुन्हां नजरेखालून घाला. म्हणजे उत्तरे शोधताना मजा वाटेल.*

**अचूक उत्तरे देणाऱ्यांची संख्या एकापेक्षां जास्त असेल तर बक्षिसासाठी सोडत काढण्यांत येईल व पांच विजेत्यांना समान रकम वाटून दिली जाईल.*

<u>त्यासाठी</u> : १. उत्तरे लिहा. २. आपले नांव, वय (१६ वर्षांखालील मुलांसाठीच ही स्पर्धा आहे) व पिनकोडसहित पत्ता. ३ वर्गणीदार असलात तर तो क्रमांक. ४. पाकिटावर चंदामामा-प्रश्नावली-२ असे लिहून आमच्या पत्त्यावर पाठवा. ५. अेप्रिल महिन्याच्या अखेरपर्यंत आपली प्रवेशिका आम्हाला मिळाली पाहिजे. ६. जूनच्या अंकात निकाल जाहीर केला जाईल.

१. अकरा वर्षापर्यंत तो इतरांसारखाच होता. त्यानंतरच्या आठ वर्षांत तो झपाट्याने वाढला. त्याच्या या उंचीमुळे त्याला नाना प्रकारचे कष्ट झेलावे लागले. त्याचे नांव काय?
२. गुलाम वंशाचा संस्थापक कोण होता?
३. ''मूर्ख लोक असा हत्तीच नव्हे, तर कोणतीही मूल्यवान वस्तू घालवून बसतात. मूर्ख लोक आपला अविचार इतरांसमोर स्वतःच व्यक्त करतात.'' महावताचे हे शब्द कोणत्या गोष्टींत आहेत?
४. कोणत्या राजकुमाराने आपल्या ज्ञानसंपदेच्या बळावर आपल्या दोन्ही भावांना जलराक्षसीच्या कचाट्यांतून बांचवले?
५. जैन धर्माच्या दोन शाखा कोणत्या आहेत?
६. झोराष्ट्रियनांच्या प्रार्थना-स्थळाचे नांव काय आहे?
७. सुप्रसिद्ध भारतीय चित्रकार एम्.एफ्. हुसेन यांना १०१ कोटी रुपयांचे पारितोषिक आधी दिले गेले आणि त्यांच्यावर १०० चित्रें काढण्याची जबाबदारी टाकण्यांत आली. मुंबईच्या एका व्यापाऱ्याने ही किमया केली. त्यांचे नांव तुम्हाला ठाऊक आहे कां?

८. हे चित्र कोणत्या गोष्टीतले आहे?





# दुर्दैवी

सारंगधर राज्यात आंजनेय शर्मा नावाचा एक दैवज्ञ ज्योतिषी रहात होता. जन्मकुंडली मांडण्यात त्याच्या तोडीचे दुसरे कुणीही नव्हते. आजूबाजूच्या गांवांतून कित्येकजण आपली जन्मकुंडली तपासायला त्याच्याकडे येत असत.

शर्मानि एक दिवस सवडीच्या वेळी त्या राज्याच्या राजाची कुंडली बघितली. हिशोब मांडला. त्याचा बारकाईने अभ्यास केला. कशीही पाहिली तरी कुंडली चांगली नव्हती.

विक्रम राजा एक चांगला राज्यकर्ता म्हणून प्रसिद्ध होता.

राज्य करण्यांत तो वाकबगार होता. प्रजेच्या गरजा माहिती करून घेऊन प्रजेने मागण्याच्या अगोदरच तो त्या पूर्ण करीत असे. त्याचा वारस राजकुमार अजून लहानच होता.

शर्माला असे वाटले की एक नागरिक म्हणून आपले कर्तव्य आहे की ही गोष्ट राजाला सांगून त्याला संकटातून वाचवावे. तसं केलं नाही तर तो राजद्रोह ठरेल. म्हणून तो घोड्यावर स्वार होऊन राजधानीकडे जायला निघाला.

तीन दिवसाच्या प्रवासानंतर आंजनेय शर्मा राजवाड्यांत पोहोचला. पण तिथल्या द्वारपालांनी त्याला आंत जाऊ दिले नाही.

''मी आंजनेय शर्मा ज्योतिषी आहे. माझे राजाला त्वरीत भेटणे जरुरीचे आहे. मला त्यांना भेटू द्या.'' त्याने द्वारपालांना विनंती केली.

''आपण काय काम आहे ते प्रथम सांगितले तरच आम्ही आपल्याला आत प्रवेश देऊ शकतो.'' द्वारपाल म्हणाले.

''ते काम अतिशय गुप्त आहे. मी फक्त राजालाच ते सांगू शकतो.'' शर्मा स्पष्टपणे म्हणाला.

तेवढ्यात सेनापती तिथे आला. आंजनेय शर्माला पाहून तो म्हणाला, ''हे कोण आहेत? यांचा वेष कांही वेगळाच आहे.''

द्वारपालाने झालेली हकिगत सांगितली. शर्माला निरखून बघत सेनापती म्हणाला, ''शर्मा, ज्या कामासाठी तू इथे आला आहेस ते सर्वांसमोर सांगण्यासारखे नसले, तर तू ते माझ्या कानात सांग.''

आंजनेय शर्मा ठासून म्हणाला, ''क्षमा करा, पण हा विषय मी फक्त राजाकडेच बोलू शकतो. कारण ही अगदी गुप्त गोष्ट आहे.''

''मी राजाचा सेनापती आहे. अशी कुठलीही गुप्त गोष्ट नसते. जी मला माहित नाही. आपण मला सांगू शकता.'' सेनापती गंभीरपणे म्हणाला.

आंजनेय शर्मानि सेनापतीच्या कानात हळूंच काहीतरी सांगितले. ते ऐकून चमकून त्याने विचारले, ''हे तुला कसं माहिती?''

''हे एक शास्त्र आहे, शास्त्र.'' शर्मा म्हणाला.

''तू इथेच थांब. मी परवानगी घेऊन येतो.'' असं म्हणून सेनापती राजवाड्याच्या आंत गेला व ही गोष्ट त्याने मंत्र्याच्या कानात सांगितली. मंत्री काळजीत पडले.

''ही गोष्ट राजाला सांगायची कां?'' सेनापतीने अधीरपणे विचारले.

''अजिबात नाही. पहिल्यांदा त्याला कैदेत टाका. आधी त्याच्याकडून सर्व माहिती काढून घेऊ.'' मंत्र्याने आज्ञा केली.

बिचारा आंजनेय शर्मा राजाच्या भेटीची वाट बघत होता. तो स्वप्न पहात होता की ही बातमी ऐकून राजा त्याचा मान करेल. त्याला पुष्कळशा



भेटवस्तू देईल. परंतु सैनिकांनी त्याला तुरुंगात टाकले. शर्मानि त्यांच्या खूप विनवण्या केल्या. पण त्याचे कांही न ऐकता ते विचारत राहिले ''बोल, हे तुला कसे कळले? तुझ्याबरोबर अजून किती राजद्रोही आहेत?'' ते त्याला तऱ्हेतऱ्हेने त्रास देऊ लागले.

एक तासाने सेनापती आंजनेय शर्माला भेटायला आला. त्याला बघताच शर्मा जोरात रडत म्हणाला,

''काय माझे दुर्दैव? मी राजाला त्रासातून वांचवायला आलो होतो तर तुम्ही लोकांनी मलाच इथे अडकवून ठेवले आहे. मी राजाची जन्म कुंडली तपासून फार मोठी चूक केली. मी गप्प बसायला हवे होते. आता मी शहाणा झालो आहे. तुम्ही जर मला सोडून दिले तर मी या क्षणी माझ्या गांवी

"वियोगी"

निघून जाईन. हे माझं कमनशीब आहे. त्याला मीच जबाबदार आहे.''

''हे बघ शर्मा, उगाच तुझी कर्मकहाणी उगाळू नकोस. खरं सांग की तुमच्या राजद्रोह्यांच्या टोळीत खरे किती लोक आहेत? काय काय डावपेच ठरविले आहेत? ताबडतोब सांग.'' सेनापती रागावून म्हणाला.''

''आपण माझ्यावर विश्वास ठेवा. मी कोणतेही पाप केले नाही. की माझ्या हातून कांही चूक झालेली नाही. मी राजद्रोह कसा करीन?'' नमस्कार करीत तो केविलवाण्या स्वरांत म्हणाला.

सेनापतीचा शर्मावर विश्वास बसला नाही. त्याने सैनिकांना सांगितले की ''जोपर्यन्त हा खरं बोलत नाही, तोपर्यन्त याला चांगले झोडपून काढा आणि सत्य वदवून घ्या.''

दुसऱ्या दिवशी विक्रम राजा राजवाड्याबाहेर फेरफटका मारीत असताना कुण्या परक्याने त्याला बाण मारला व तो पळून गेला. यामुळे राजा मरण पावला.

राजाच्या मृत्यूची बातमी कळताच राज-ज्योतिषी मंत्र्यांना म्हणाले, ''राजाच्या कुंडलीत असा योग आहे की जो राजाला संकटापासून वाचवायला जाईल, तो स्वतःच मृत्युमुखी पडेल. हे मला माहिती होते. मी विचारच करत होतो की राजाला कसे सावध करावे, इतक्यांत ही दुर्घटना घडली.''

मंत्री गंभीर होत म्हणाले ''आंजनेय शर्मा सच्चे राजभक्त आहेत. हे न कळल्याने आपण त्यांना फार त्रास दिला. त्यांचा सन्मान करणे हे आपले प्रथम कर्तव्य आहे.'' त्यांनी सेनापतीला बोलवणे पाठवले आणि आंजनेय शर्मांना घेऊन येण्याची आज्ञा दिली.

सेनापती तुरुंगाकडे गेले. थोड्या वेळाने सेनापती परत येऊन म्हणाले, ''मंत्रीवर, आंजनेय शर्मा ह्यात नाहीत. हृदयविकाराने ते मृत्यू पावले. महाराजांच्या निधनाअगोदरच ते मरण पावले. वाईट वाटते की त्यांनी महाराजांची जन्मकुंडली बघितली पण स्वतःची जन्म कुंडली पहायला मात्र विसरले.''







# गुरुची विद्या गुरुस फळली!

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता त्याच्या-कडे पिंगळ नांवाचा एक राजपुरोहित होता. त्याच्या देहाचा रंग पिंगट होता. त्याच्या डोक्याला टक्कल पडलेले होते. व तोंडाचे बोळके झालेले होते. त्यावेळेला बोधिसत्व नक्कारिय नावाने पिंगळ-जवळ विद्याभ्यास करीत होता.

राजपुरोहित पिंगळ याला एक मेहुणा होता. त्याचाही रंग पिंगट होता. त्याच्या डोक्यालाही टक्कल पडलेले होते. व तोंडाचे बोळके झालेले होते. तोसुद्धां पिंगळच्यासारखाच प्रतिभावान होता. ते दोघे मेहुणे स्वतःला दुसऱ्यापेक्षा मोठा मानत आलेले होते. ह्याच कारणाने दोघांचे परस्परांशी फार वितुष्ट होते. पिंगळने आपल्या मेहुण्याची मान कित्येक वेळा खाली करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो यशस्वी झाला नाही.

शेवटी पिंगळने आपल्या मेहुण्याचा कांटाच काढून टाकण्याची योजना आंखली. त्याने राजाकडे जाऊन निवेदन केले ''महाराज, आपली काशीनगरी सर्व भारतांत श्रेष्ठ आहे. आपण सर्व राजांच्यामध्ये थोर आहात, असं असता आपल्या किल्ल्याच्या तटाच्या निर्मितीमधे दोष असणे ही चिंतेची गोष्ट होय. आपल्या किल्ल्याच्या दक्षिणद्वारामध्ये कांहीतरी चूक राहून गेलेली आहे. ती आपल्या देशाला अशुभ आहे. त्यामुळे आपल्या देशाची अपकीर्ती सुद्धां होण्याची शक्यता आहे. तरी तो दोष घालविण्यासाठी लवकरांत लवकर कांहीतरी उपाययोजना केली पाहिजे.''

''ह्याकरिता आम्हाला काय करावे लागेल?'' राजाने पिंगळला विचारले.

''ते दार प्रथम पाडून टाकावे लागेल. त्यानंतर चांगले शुभ असे लांकूड आणून एक दार बनवावे लागेल. नंतर राज्यांतील एका ब्राह्मणाचा बळी देऊन शुभ मुहूर्तावर नवीन द्वार उभे करावे लागेल.'' पिंगळने सुचविले.

राजाने पिंगळच्या सूचनेला मान्यता दिली. राजाची आज्ञा घेऊन पिंगळने दक्षिणेकडचे दार



काढून टाकले व त्या जागी बसवायला नवीन दार तयार करविण्यात आले.

त्यानंतर पिंगळ राजाकडे गेला आणि विनयपूर्वक म्हणाला, "महाराज, नवीन दार तयार झाले आहे. त्याच्या मुहूर्तमेढीसाठी उद्याचा दिवस उत्तम आहे, तेव्हां आवश्यक असलेला बळी देऊन ते दार स्थापन करण्याची अनुमती द्यावी."

बळी देण्याकरिता कोणकोणत्या गोष्टीची जरूरी आहे? काय करावे लागेल?" राजाने विचारले.

"महाराज, पिंगट रंग, डोक्याला टक्कल सर्व दांत पडलेल्या, अशा ब्राह्मणाचा बळी द्यावा लागेल. ह्या दाराचे रक्षण करणाऱ्या शक्तीच्या मनाची तृप्ती व्हावी, यासाठी अशा तऱ्हेच्या ब्राह्मणाचे रक्त व मांस अर्पण करणे आवश्यक आहे. नंतर तेथेच त्या ब्राह्मणाला पुरून त्याच्यावर ते दार उभे केले पाहिजे." पिंगळ म्हणाला.

"ठीक आहे! अशाच ब्राह्मणाचा शोध काढून त्याला मागवून घेऊन ते दार उभे करवून घ्या." राजाने संमती दिली.

ते ऐकून पिंगळला स्वर्ग दोन बोटे उरल्यासारखे झालें. वैऱ्याला मारण्याकरिता राजाने आपल्याला चांगली संधी दिली आहे. त्याला अतिशय आनंद झाला तो घरी येऊन आपल्या बायकोला म्हणाला - "ऐक. उद्या तुझ्या भावाचे आयुष्य संपलेले असेल. बघत रहा. मी उद्या एका नवीन दाराच्या समारंभाला जाणार आहे तेथे एक बळी देणार आहे." असं सांगून त्याने फुशारक्या मारायला सुरुवात केली.

"माझ्या भावाचाच बळी कां म्हणून द्यायचा? ह्याला राजा कसा कबूल झाला?" पिंगळच्या बायकोने विचारले.

"मी राजाला तसे थोडेच सांगितले? मी अमुक एक माणसाचा बळी देणार आहे म्हणून सांगितले नाही. मी फक्त असे सांगितले की, पिंगट रंगाचा, बोळक्या तोंडाचा, ब्राह्मण पाहिजे म्हणून ते राजाने मान्य केले. मी राजाला उद्याच सांगतो की, बळी द्यावयास हाच ब्राह्मण योग्य आहे. माझ्या म्हणण्याला कोण नकार देईल?" पिंगळ म्हणाला.

त्यानंतर पिंगळच्याबरोबर त्याच्या बायकोने वाद घातला नाही. तिने गुप्तपणे जाऊन आपल्या भावाला सारा वृत्तांत सांगितला व प्राण वाचविण्या-करिता सकाळी उठून गांव सोडायला सांगितले.

जेव्हां पिंगळच्या मेहुण्याला आपल्याला मारण्याकरिता योजलेली युक्ती समजली, तेव्हां त्याने गावातील त्याच्यासारख्या दिसणाऱ्या आणखी दोघांना घेऊन पहाटेच गाव सोडले.

दुसऱ्या दिवशी सकाळी पिंगळने राजाकडे जाऊन सांगितले - "महाराज, बळी द्यावयास लागणारा एक ब्राह्मण अशा अशा ठिकाणी आहे. त्याला आणून घ्यावे."

राजाने पिंगळने सांगितलेल्या माणसास आणण्याकरिता शिपाई पाठवले. परंतु शिपायांनी येऊन तशा प्रकारचा कोणीही माणूस तेथे नसल्याचे राजाला सांगितले व तसा तऱ्हेचा माणूस पहाटेच हे गांव सोडून गेल्याचे सांगितले.

नोकरांकडून ते ऐकल्यावर राजाने विचारले - "आता काय करायचे? अशा तऱ्हेचा ब्राह्मण कोठून तरी शोधून आणला पाहिजे."

त्यावर मंत्र्याने आपली योजना सांगितली -



"महाराज, ही मोठी कठीण बाब नाही? आपल्या पुरोहितात तशा तऱ्हेची सारी लक्षणे आहेत. त्यांनाच बळी द्यावा."

"तसेच करता येईल. परंतु त्याच्यानंतर मला पुरोहित म्हणून कोणी योग्य असा माणूस पाहिजे ना? तशा योग्यतेचा कोणी माणूस आहे कां? ही गोष्टसुद्धां पुरोहिताला बळी द्यावयाच्या आधी योजली पाहिजे!" राजाने आपला विचार सांगितला.

आपल्या पुरोहितापाशी तक्कारिय नांवाचा एक ब्राह्मण शिष्य आहे. तो आपल्या गुरूपेक्षां सुद्धां हुषार व चतुर आहे. त्याला आपण आपल्या पुरोहिताच्या जागी नेमावे." मंत्र्याने आपली सूचना राजाला निवेदन केली.

दुसऱ्या क्षणीच राजाने तक्कारियाला बोलावणे पाठवले आणि म्हणाला - "तुला आजपासून माझा पुरोहित म्हणून नेमले आहे. तू ह्या पिंगळचा शास्त्रशुद्ध तऱ्हेने बळी देऊन त्याला तेथे पुरावे व त्याच्या थडग्यावर ते प्रवेशद्वार उभे करावे."

त्यानंतर तक्कारिय दक्षिण दाराजवळ गेला. तेथे पिंगळलाच यज्ञाचा बळी देण्याच्या पद्धती-प्रमाणे सजवून बांधून आणले होते. त्याला दक्षिण दाराकडे जेथे खड्डा खणला होता, तेथे नेण्यांत आले. तिथे गुरू व शिष्य दोघेही पोहोचले. त्यावेळेस पिंगळ छाती बडवून घेत रडत रडत आपल्या शिष्याला म्हणाला - अरे, कोण्या दुसऱ्याकरिता खणलेल्या खड्ड्यांत मलाच पुरण्यात येत आहे!"

"गुरुदेव, जो मनुष्य वाईट नेहमी चिंतितो, त्याला केव्हां तरी असेच स्वतः खणलेल्या खड्ड्यांत मरावे लागते. तेव्हां आपण काळजी करू नये. मी राजाकडे जाऊन असे सांगून येईन की, मध्यरात्रीपर्यंत कोणताही चांगला मुहूर्त नाही. त्यानंतर तुमचे प्राण कोणती तरी युक्ती करून बाचवीन." तक्कारियने गुरूला सांगितले.

त्याने सांगितल्याप्रमाणे बळी देण्याकरिता अर्ध्यारात्रीनंतरचा मुहूर्त ठेवला आणि त्याच रात्री पिंगळला देश सोडून दूर निघून जाण्यासाठी सांगितले. त्याचप्रमाणे पिंगळ तो देश सोडून अर्ध्यारात्री निघून गेला. त्याच्या जागी एका मेलेल्या बकरीला पुरून टाकले व सकाळ व्हायच्या आत तेथे नवीन दाराची स्थापना करण्यात आली.







# रामायण

रामलक्ष्मणांना बरोबर घेऊन विश्वामित्र ऋषि ईशान्य दिशेने चालू लागले. दोघे मिथिलेला पोंचले तेव्हां जनक राजाने यज्ञ आरंभ केला होता.

जनक महाराजांना कळले कीं त्यांचे आमंत्रण स्वीकारून विश्वामित्र ऋषी आले आहेत, तेव्हां ते स्वतः गुरु शतानंद यांना बरोबर घेऊन विश्वामित्रांच्या भेटीस आले. त्यांनी विश्वामित्र ऋषींची विधिवत पादपूजा केली व यज्ञास आल्याबद्दल आभार मानले.

यज्ञाला अजून बारा दिवस लागणार आहेत असे सांगून राजाने रामलक्ष्मणांचा परिचय करून घेतला. विश्वामित्र म्हणाले - "दशरथ राजाचे हे दोघे गुणवान पुत्र आहेत. यांनीच ताटकेचा वध करून माझा यज्ञ निर्विघ्न पार पाडण्यास मदत केली."

जनकराजाचे पुरोहित शतानंद हे अहल्या व गौतम यांचे चिरंजीव आहेत, हे ऐकून रामा-लक्ष्मणास कौतुक वाटले. रामाच्या कृपेने माता अहल्या शापमुक्त झाली असल्याचे एकून शतानंद मुनींना पण आनंद झाला.

शतानंद मुनि रामाला म्हणाले - "तुम्ही दोघांनी विश्वामित्र ऋषींचा अनुग्रह संपादन केलात. या महापुरुषाचा जीवन वृत्तांत खरोखरच ऐकण्याजोगा आहे."

नंतर त्यांनी तेथे हजर असलेल्या सर्व ऋषी-मुनीं समक्ष रामलक्ष्मणांस विश्वामित्र ऋषींचा जीवनवृत्तांत सांगितला.

"ब्रह्मदेवाला कुश नांवाचा एक मुलगा होता. त्याला कुशनाभ नांवाचा मुलगा झाला. कुशनाभचा मुलगा गाधिराज याचे विश्वामित्र हे जेष्ठ चिरंजीव.



त्यांनी कित्येक वर्षे राज्य केले. एक अक्षौहिणी सैन्य घेऊन त्यांनी सर्व पृथ्वी पादाक्रांत केली व वशिष्ठ मुनींच्या आश्रमाजवळ आले. त्या आश्रमांत कित्येक तपस्वी मुनि राहात असत.

"वशिष्ठ मुनींनी विश्वामित्र व त्यांच्या बरोबर आलेल्या सर्व लोकांचा सर्व प्रकारे आतिथ्य-सत्कार केला. कुशल प्रश्न झाल्यावर वशिष्ठ मुनींनी विश्वामित्रांस ससैन्य जेवणाचा आग्रह केला.

विश्वामित्र म्हणाले - "ब्रह्मर्षी! आपल्या दर्शनानेच मी कृतार्थ झालो. जेवणाचा आग्रह करुं नये." असे सांगून विश्वामित्र उठून चालूं लागले.

पण मुनींनी आग्रह केला व म्हणाले - "या आश्रामांत आपण संकोच करण्याचें कारण नाही. सर्वांच्या खाण्यापिण्याची तरतूद होईल."

असे सांगून त्यांनी शवल नामक कामधेनूला आज्ञा केली, "भक्ष्य भोज्य, लेह्य, पानीययुक्त षड्रस भोजनाची व्यवस्था कर!" आज्ञा होतांच कामधेनूने सर्वांच्या जेवणाची उत्तम व्यवस्था केली.

एका ऋषीच्या आश्रमांत एक अक्षौहिणी सैन्याला पंचपक्वान्नांचें जेवण लाभलेले पाहून विश्वामित्रांचे डोळे दिपून गेले. हे सर्व काम-धेनूच्या कृपेमुळे झालेले ऐकून विश्वामित्र वशिष्ठ-मुनींना म्हणाले - "हे वैभव राजाच्या महालांतच शोभते. मी आपणांकडे एक लक्ष गाई पाठवून देतो. खरं तर राज्यांतल्या प्रत्येक वस्तूवर राजाचा अधिकार असतो. म्हणून कामधेनू पण माझीच आहे."

वशिष्ठमुनि म्हणाले - "राजन्! शतकोटी गाईदेखील एका कामधेनूची बरोबरी करूं शकणार नाहीत. मी तपस्या करून ही मिळविली आहे. हिच्या कृपेनेच साऱ्या आश्रमाची कामें निर्विघ्न पार पडत आहेत."

विश्वामित्र म्हणाले - "आपण मागाल तितके सोने द्यावयास मी तयार आहे. हिरे, माणके जे कांही पाहिजे असेल, ते मागून घ्या ऋषीवर!" पण वशिष्ठमुनि शांतपणे म्हणाले - "मला धनाचा लोभ नाही. स्वतः तपश्चर्या करून मी जी गाय मिळविली आहे, तिची किंमत मी धनाने कशी मोजूं?"

तेव्हां विश्वामित्रांनीं हट्टाने बलप्रयोग करून



कामधेनूला नेण्याचा प्रयत्न केला. कामधेनू हंबरडा फोडून वशिष्ठमुनींकडे धांवत आली व म्हणाली - "धनी, हा काय अत्याचार?"

वसिष्ठ म्हणाले - "माझ्याकडे सैन्य नाही. विश्वामित्राकडे एक अक्षौहिणी सैन्य आहे. त्याचा पराक्रम ऐकून पृथ्वी कांपत आहे."

"आपली आज्ञा असेल तर हा विश्वामित्र व त्याची एक अक्षौहिणी सेनाच काय, शंभर विश्वामित्र आले तरी ते माझ्या अंगाला स्पर्श करूं शकणार नाहीत." कामधेनु म्हणाली.

वशिष्ठ "तथास्तु!" म्हणाले.

कामधेनूनें अंग हलविल्याबरोबर लक्षावधि पप्लव, म्लेंच्छ, वगैरे तिच्या अंगांतून बाहेर आले व त्यांनीं विश्वामित्राच्या सैन्याचा संहार सुरू केला.

विश्वामित्र रथांत बसून दिव्यास्त्र सोडूं लागले. पण कामधेनूनें शतलक्ष काम्बोज, हरीत, किरात वगैरेंची सृष्टि केली व त्यांनी विश्वामित्र व त्यांचे सैन्य याला चारी बाजूंनीं घेरले.

हे पाहून विश्वामित्राचे शंभर राजकुमार वशिष्ठ मुनींवर धांवून गेले. पण वशिष्ठ मुनींनी फक्त एकदांच हुंकार केल्याबरोबर सर्व भस्म होऊन गेले. त्यांचे सैन्यदेखील भस्म होऊन गेलें. विश्वामित्राला स्वतःचा प्राण वांचविण्यासाठी पळून जावें लागले.

विश्वामित्राचा एक मुलगा जिवंत उरला होता. त्याला राज्य देऊन विश्वामित्र हिमालय पर्वतांत तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेले. तेथे त्यांनी



घोर तपश्चर्या केली व शंकराला प्रसन्न केले.

शंकरानें प्रत्यक्ष दर्शन देऊन विचारले - "मला कां बोलाविलेस विश्वामित्रा?"

विश्वामित्र म्हणाले - "देव, गंधर्व व राक्षस यांचा पराभव करण्यास आवश्यक ती सर्व अस्त्रे मला द्यावी. मला धनुर्वेदाचे पूर्ण ज्ञान व्हावें!" शंकर "तथास्तु!" म्हणून अंतर्धान पावला.

विश्वामित्र शस्त्रास्त्रे घेऊन वशिष्ठ ऋषींच्या आश्रमांत पोंचले. त्यांनीं आश्रमाला आग लावली.

ऋषी व मुनी पळूं लागले. पशुपक्षी पळून गेले. सर्व आश्रम ओसाड झाला.

तेव्हां वशिष्ठ ऋषींना राग आला. ते आपला ब्रह्मदंड घेऊन समोर उभे राहिले. विश्वामित्रांनी आग्नेय अस्त्राचा प्रयोग केला. पण ब्रह्मदंडाचा



स्पर्श होतांच ते थंडगार होऊन खाली पडले.

विश्वामित्रांनी एकामागून एक शेंकडो अस्त्रें फेंकली. पण वशिष्ठ ऋषींच्या ब्रह्मदंडाने ती सर्व गिळून टाकली. आतां वशिष्ठ मुनींच्या ब्रह्मदंडांतून ज्वाळा निघूं लागल्या व अग्निवृष्टि होऊं लागली.

विश्वामित्रांना तो अपमान असह्य वाटला. ब्रह्मतेजासमोर क्षत्रियाचे बळ किती टिकाव धरणार? तर मग मी देखील ब्रह्मत्वाची प्राप्ति करून घेणार असे मनाशी ठरवून विश्वामित्र ऋषि तपश्चर्या करण्यासाठी सपत्नीक दक्षिणेकडे निघाले. तेथे त्यांना अनुक्रमे हविष्यन्द, मधुष्यन्द, दृढनेत्र व महारथ अशी चार अपत्ये झाली.

विश्वामित्रांची तपश्चर्या पाहून ब्रह्मदेवाने त्यांना प्रत्यक्ष दर्शन दिले व म्हणाला - ''सर्व क्षत्रिय तुला आज आधीन झाले आहेत. तूं राजर्षी झालास!''

पण राजर्षी पदवी मिळाल्याने विश्वामित्रांचे समाधान झाले नाही. त्यांना ब्रह्मर्षि व्हावयाचे होतें. म्हणून त्यांनीं पुन्हां तपश्चर्या सुरू केली.

त्याच वेळी ईक्ष्वाकू वंशाचा राजा त्रिशंकू याने सशरीर स्वर्गांत जाण्यासाठी यज्ञ सुरुं केला. त्याच्या कुलगुरुने हे अशक्य आहे असे त्याला सांगितले. पण त्याचे समाधान झाले नाही. म्हणून तो वशिष्ठ ऋषींच्या मुलांकडे, त्यांची मदत घेण्याच्या अपेक्षेनें दक्षिणेकडे गेला. त्यांनी त्याचा अपमान करून ''मूर्ख आहेस! चालता हो!'' असें सांगून त्याची निभर्त्सना केली.

पण त्रिशंकू स्वस्थ बसला नाही. तो म्हणाला - ''तुमची नाही तर मी दुसऱ्या कोणाची तरी मदत घेऊन सशरीर स्वर्गांत जाऊन दाखवतो, पहा!''

वशिष्ठ मुनींच्या सर्व मुलांना त्याचा तो उद्दंडपणा आवडला नाही. त्यांनी त्याला शाप दिला कीं तूं चांडाळ होशील!

शापामुळें त्रिशंकूचे सर्व शरीर काळेकुट्ट झाले. त्याची सर्व वस्त्रें पण काळी झाली. त्याचे सोन्याचे दागिने लोखंडासारखे काळे पडले. त्याने वशिष्ठ मुनींचे शत्रू विश्वामित्र यांच्याकडे जाण्याचे ठरविले.

विश्वामित्र त्रिशंकूचे म्हणणे ऐकून घेऊन म्हणाले - ''मी तुला याच रंगारूपात स्वर्गांत पोंचता करीन!'' असें सांगून विश्वामित्र ऋषींनी



यज्ञाची तयारी केली. ऋषी व मुनींना पाचारण करण्यासाठी आपल्या शिष्यांना पाठविले. वशिष्ठ मुनींचे शिष्य सोडून सर्व आले. विश्वामित्रांनी त्यांना शाप दिला.

यज्ञ सुरू झाला. पण हवि घ्यायला देव आले नाहीत.

विश्वामित्रांना क्रोध आला. ते त्रिशंकूला म्हणाले - ''मी आजपर्यंत जी तपश्चर्या केली आहे, ती पणास लावून तुला स्वर्गांत पाठवितो!'' सर्व मुनींसमक्ष त्रिशंकू स्वर्गारोहण करूं लागला.

परंतु इंद्र व इतर देवांनी त्याला स्वर्गांत पाऊल देखील ठेवूं दिले नाही व त्याला खालीं ढकलले. खाली पडत असतां त्रिशंकू ओरडला - ''मुनिवर, वांचवा!''

रागाच्या भरांत विश्वामित्रांनी दक्षिणेकडे एक नवीन सप्तर्षि मंडल निर्माण केले व म्हणाले - 'मी एक नवीन स्वर्ग व नवीन देवांची सृष्टि करीन.''

तें ऐकून देव व मुनि घाबरले. त्यांनी हात जोडून विश्वामित्रांजवळ प्रार्थना केली - ''महात्मन्! शापग्रस्त त्रिशंकूला स्वर्गांत कशी जागा देतां येईल?''

''मी त्याला वचन दिले होते कीं तुला सशरीर स्वर्ग देईन. माझे वचन चुकणार नाही.'' विश्वामित्र म्हणाले.

नंतर विश्वामित्र दक्षिणेकडे पुष्कर नामक तपोवनांत तपश्चर्या करूं लागले.

त्याच वेळीं अंबरीष राजाने एक यज्ञ आरंभ केला, आणि इंद्र यज्ञपशूला पळवून घेऊन गेला.



राजगुरूने राजाजवळ निवेदन केले कीं यज्ञपशू परत मिळविलाच पाहिजे. नाहींतर नरबली द्यावा लागेल. अंबरीष राजाला यज्ञपशू न मिळाल्या कारणाने तो नरबलीसाठी नराच्या शोधार्थ निघाला.

भृग्रातुद नांवाच्या पर्वतीय प्रदेशांत ऋचीक नांवाचे एक ऋषि सपत्नीक रहात असत. त्यांच्याकडे जाऊन अंबरीष राजाने त्याच्यावर ओढवलेला प्रसंग सांगून कांही तरी तोड सुचविण्यास विनंति केली. तो त्यांना म्हणाला, ''आपल्याला तीन पुत्र आहेत. आपण एकाला दिलात तरी माझे कार्य पूर्ण होईल.'' ऋचीक म्हणाला -

''माझ्या मोठ्या मुलाला देण्यास मी तयार नाहीं.'' मधल्याचे नांव शुनःशेष होते. तो राजाला म्हणाला -

''आतां आईवडिलांच्या तोंडचे पुढील वाक्य ऐकण्याची मला मुळीच इच्छा नाहीं. ते मला विकायला तयार आहेत. तूं मला आपल्याबरोबर घेऊन चल.''

अंबरीष उन्हांत शुनःशेषला बरोबर घेऊन निघाला. निवाऱ्यासाठीं दोघे थोडा वेळ विश्वामित्र मुनींच्या आश्रमांत थांबले. विश्वामित्रांना पाहून शुनःशेषने ऋषींच्या पायांवर लोटांगण घातले व रक्षण करण्यास विनंति केली.

विश्वामित्र ऋषींना दया आली. त्यांनी आपल्या मुलांना म्हटले - ''तुमच्यापैकी एकाने याच्याबद्दल राजाबरोबर जावे.'' पण एकाने देखील त्यांचे ऐकले नाही. तेव्हां त्यांनी वशिष्ठ मुनींच्या मुलांना जो शाप दिला होता, तो स्वतःच्या मुलांना दिला.

नंतर विश्वामित्र ऋषींनी शुनःशेषला दोन मंत्र शिकविले. व ते पुढे म्हणाले - ''बलिस्तंभाला बांधल्यावर तूं हे मंत्र म्हण.''

शुनःशेषच्या अंगाला रक्तचंदन चोपडून त्याला लाल वस्त्रें नेसवून बलिस्तंभाला दर्भानें बांधण्यांत आले.

तेव्हां त्याने दोन्ही मंत्र म्हटले. अग्निनारायणाने प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याला दीर्घायुचा वर दिला.

*(पुढे चालू)*







# शत्रूंच्यात दुही

व्यंकटगिरी गांवात वीरबाहु नांवाचा एक शेतकरी रहात होता. त्याची चार एकर जमीन होती. खूप कष्ट करुन मेहनतीने तो शेतांत धान्य पिकवून, त्यांतून मिळणाऱ्या पैशांतून आपल्या कुटुंबाची गुजराण करीत असे.

एका वर्षी पाऊस न पडल्यामुळे दुष्काळ पडला, आणि त्यांत भरीस चोरदरोडेखोरांबद्दलही बातम्या येऊ लागल्या. पण दुसऱ्या वर्षी मात्र चांगला पाऊस झाला व पिकें डोलूं लागली.

वीरबाहूच्या शेतांत हिरव्यागार रोपांवर कणसे डोलत होती. मागील वर्षीच्या दुष्काळामुळे चोरांच्या भयाने वीरबाहू रात्रीं आपल्या शेतांत राखण करीत असे. एका रात्री थंडीत तो आपल्या झोपडीत झोपलेला असताना शेतांत आवाज झाला. शेतांत चोर घुसले की काय, असे वाटून कांबळं पांघरुन हातांत काठी घेऊन तो शेताकडे धावला.

थोड्याच अंतरावर चार चोर शेतांत घुसून कणसे तोडत होते. चांदण्यात वीरबाहूने त्यांना ओळखलं. ते त्याच गांवचे होते. एकट्याने चार लोकांशी लढायची त्याला भीती वाटली.

आता काय करावे असा विचार करतानाच त्याला एक कल्पना सुचली. काठी तिथेच टाकून तो धीटपणे चोरांच्याकडे गेला. त्याच्या शेतांतली कणसे तोडणाऱ्यांच्यात एक ब्राह्मण, एक वाणी. एक क्षत्रिय आणि एक शेतकरी होता.

वीरबाहू प्रथम ब्राह्मणाजवळ गेला आणि नमस्कार करुन म्हणाला ''ब्राह्मण देवा, आपण एवढ्या मध्यरात्री इथे येण्याचा त्रास कशाला केला? कोणाबरोबर निरोप पाठवला असतात तर मीच आपल्याकडे कणसे पोहचवली असती. आपल्याला जेवढी हवी असतील तेवढी घ्या. हे सगळं आपल्या आशिर्वादाचेच फळ आहे.''

शेतकऱ्याचे बोलणे ऐकून ब्राह्मण आनंदाने

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



आणखी वेगाने कणसे तोडण्यांत गर्क झाला.

नंतर वीरबाहू क्षत्रियाच्याजवळ जाऊन त्याला म्हणाला "राजेसाहेब, हे शेत आपलेच आहे. आपण सुद्धां जेवढी कणसे हवी तेवढी तोडा. आम्ही तरी आपली प्रजा आहोत. हे शेत सुद्धां आपलेच आहे."

क्षत्रिय सुद्धां आता आरामांत कणसे तोडूं लागला. वीरबाहू वाण्याजवळ जाऊन त्याला म्हणाला "शेठजी, आपण अडीनडीला वस्तू उधार देऊन आम्हाला वाचवता. तेव्हां इथे आपल्याला कोण अडविणार? आपण सुद्धां हवी तेवढी कणसे तोडून घेऊन जा." हे ऐकून वाण्याची भीड चेपून तोही कणसे तोडूं लागला.

मग वीरबाहू शेतकऱ्याकडे जाऊन म्हणाला, "अरे बाबा, या तिघांना आपल्या सारख्यांना दान, कर रुपाने किंवा कर्ज म्हणून पैसे द्यावे लागतात. पण तू तर माझ्यासारखाच एक शेतकरी असून चोरी करायला आलास? हे अजिबात बरोबर नाही. चल माझ्या आईकडे. तीच ह्याचा बरोबर न्याय निवाडा करेल."

असं म्हणत वीरबाहूने शेतकऱ्याला ओढत झोपडीकडे नेले. बाकीच्यांनी विचार केला की शेतांत कणसे तोडण्याचा हक्क त्यांना आहे. शेतकऱ्याला नाही. म्हणून त्यांनी शेतकऱ्याला मदत केली नाही.

थोड्या वेळाने वीरबाहू परत येऊन ब्राह्मणाजवळ जाऊन म्हणाला, "माझी आई म्हणते आहे की ब्राह्मणाने दान दिले तर घ्यावे, पण चोरी करणे



हा गुन्हा आहे. तेव्हां चला तिच्याकडे." असे म्हणत ब्राह्मणाचा हात पकडून तो त्यालाही ओढत घेऊन गेला.

थोड्या वेळाने वीरबाहू पुन्हां परत आला तेव्हा बाकीचे दोन चोर कणसे तोडत होते. ह्यावेळी वाण्याला हाताला धरुन ओढत तो म्हणाला, "अहो शेठजी, माझी आई म्हणत्येय की शेठजींनी आपल्याला कधी कर्ज दिले नाही. तेव्हा त्यांनी कणसे तोडणे हा गुन्हाच आहे. म्हणून तुम्हीच तुमची बाजू आईला सांगा."

वाण्याने क्षत्रियाकडे मदतीच्या अपेक्षेने दृष्टिक्षेप टाकला, पण क्षत्रिय मात्र कांहीच न बोलता कणसे तोडत राहिला.

वाण्याला झोपडीशी सोडून वीरबाहू काठी घेऊन शेतांत आला. तेव्हां क्षत्रिय कणसांचे पोते भरत होता. वीरबाहूच्या हातांतली काठी पाहून तो पोते घेऊन पळूं लागला.

वीरबाहूने त्याचा पाठलाग करुन त्याला काठीने चांगले बडवून काढले. मार खात तो खाली पडला. दोरीने त्याचे हात बांधून वीरबाहू त्याला म्हणाला, "जर दुसऱ्या लोकांनी चोरी केली तर त्यांना शिक्षा केली पाहिजे. पण तुम्ही तर स्वतःच चोरी करुं पहाताय. ह्याची शिक्षा तुम्हाला मिळालीच पाहिजे. चला, बाकी तिघांना मिळणार आहे, तीच शिक्षा तुम्हालाही देतो."

"मला तुझ्या आईकडे घेऊन चल. बाकी तिघांना तिने माफ केलंय ना? मग मला पण ती माफ करेल." क्षत्रिय म्हणाला.

वीरबाहू हंसत म्हणाला, "अरे, माझी आई म्हणजे ही जमीनच, दुसरे कुणी नाही. तिच्या वतीने मी तुला बांधून ठेवले. बाकी तिघांना पण मी झोपडीत बांधून ठेवले आहे."

नंतर वीरबाहूने आसपासच्या शेतांत राखण करणाऱ्या लोकांना बोलवून त्यांना सर्व हकिगत सांगितली. सकाळ होताच चोरांना पोलिस-चौकीत पाठवले.

अशा तऱ्हेने वीरबाहूने आपल्या बुद्धिचातुर्याने एकट्याने चोरांशी लढत दिली, व आपल्या पिकाच्या रक्षणाबरोबरच चोरांना पण योग्य धडा दिला.



# वाचकांचे पान

मी गेली पंचेचाळीस वर्षे सुंदर 'चंदामामा'चा वाचक आहे. गेल्या पस्तीस वर्षांचे सारे अंक मी जपून ठेवले आहेत. गेली वीस वर्षे मी 'चंदामामा'त लिहितो आहे. लहानपणीच चंदामामांत गोष्टी लिहीण्याचे भाग्य मला लाभले आहे. हा अनुभव आगळाच आहे. पापाजींच्या गोष्टी, मोठ्या भीमाच्या गोष्टी, अरबी रात्रींच्या कथा, ह्या नेहमीच ताज्या वाटतात. नव्या वाचकांसाठी त्या पुन्हां दिल्या कीं त्यांनाही आनंद वाटेल. 'चंदामामा'च्या साठाव्या वाढ दिवसानिमित्त हार्दिक अभिनंदन! पुढील शंभर वर्षे त्याचा प्रवास चालूं राहो अशी इच्छा बाळगणारा,

*- रामनारायण द्विवेदी, बनारस*

दिवसे दिवस 'चंदामामा' बारीक होत चालला आहे, हल्लींच्या गोष्टींत रंगत कमी वाटते, व त्यांनीच मासिक भरलेले असले.

*- शंकर जोशी, नागपूर.*

'चंदामामा' मधे आपण जी ''भयंकर घाटी'' धारावाही कथा देत आहात, ती मनांत उत्सुकता निर्माण करते. १९६८ मधे आपण 'शिथिलालय' नांवाची एक धारावाहिक कथा प्रसिद्ध केली होती. कृपया ती पुन्हां एकवार प्रकाशित करावी.

*- सुगुणा, बंगलोर*

मी 'चंदामामा'चा फार जुना वाचक आहे. पंचतंत्र, हितोपदेश, वगैरे गोष्टी प्रसिद्ध होत असत तेव्हांपासून ! श्री.पी.सी. सरकार, यांच्याही जादूच्या गोष्टी वाचलेल्या मला आठवतात. त्यांतली चित्रें हेही एक प्रमुख आकर्षण आहेच. ज्यांनी ती काढली, त्यांनी चंदामामाची शान वाढवली. मासिकाच्या सध्यांच्या रुपांत थोडा बदल जरूर आला आहे, पण आपण आपली समृद्ध परंपरा सोडली नाहीत, त्याबद्दल आभार! यापुढील अंक जास्त आकर्षक व चटकदार स्वरुपांत समोर येतील अशी आशा आहे.

*- हरदेव कृष्ण शर्मा, हरयाणा*





# विचित्र स्वार्थ

वेदीश्वर गांवात मालती नांवाची एक सुईण रहात होती. आजूबाजूच्या गांवातले लोक बाळंतपण करायला तिलाच बोलावत असत. आणि सगळ्यांचे म्हणणे असे कीं बाळबाळंतीण तिच्या हातांत सुरक्षित असतात.

एक दिवस बाळंतपण पूर्ण करुन ती घरी परतत होती. तेव्हां तिला दिसलं की गांवाच्या वेशीजवळ एका झाडाखाली कांही बायका एका पालखीभोवती घोळका करुन उभ्या आहेत. त्यांतल्या एकीने मालतीला ओळखून विचारले, ''मालती, आपल्या जमीनदारांची सून आपल्या गांवचा विदुराश्रम बघायला आली आहे. सातच महिन्यांची गरोदर आहे. आम्हाला असं वाटतंय की ती कुठल्याही क्षणी बाळंत होईल.'' मालतीने पालखीत झोपलेल्या जमीनदाराच्या सुनेला तपासून सांगितले की ''हो, ही लवकरच प्रसूत होईल. हिला लवकर माझ्या घरी घेऊन या.'' तिने इतर स्त्रियांच्या मदतीने सुनेला घरांत नेले आणि थोड्याच वेळांत मुलगा जन्मला.

बातमी कळल्याबरोबर जमीनदार, त्याचा मुलगा आणि त्यांच्या घरातली इतर मंडळी तिथे आली.

मालती जमीनदाराला म्हणाली, ''सरकार, काळजी करण्याचे कारण नाही. बाळ बाळंतीण खुशाल आहेत. पण आपल्या घरच्यासारख्या सोयी इथे नाहीत.''

जमीनदार खुषींत म्हणाला, ''तुझ्या कौशल्या-बद्दल मी खूप ऐकलं होतं. पण आज स्वतः पाहिले, मी तुझ्यासाठी इथे सर्व सोईंची व्यवस्था करतो. राजवैद्य येतच असतील, ते माझ्या सुनेची व नातवाची व्यवस्था करतील.''

त्या दिवसापासून मालतीचे नशीब फळ-

मार्कंडेय जोशी



फळले. तिच्या घरांत सर्व सुखसोयी आल्या. एका आठवड्याने जमीनदाराने मालतीच्या नवऱ्याला बोलवून त्याला चार एकराचे एक शेत बक्षीस दिले.

मालतीच्या घरुन निघताना जमीनदाराची सून मालतीला म्हणाली, ''तू मला आणि माझ्या मुलाला वाचवलंस. जर तुला मुलगी झाली तर मी तिला माझी सून करुन घेईन.''

मालती हात जोडून म्हणाली, ''मी माझ्या धर्माचं, कर्तव्याचं पालन करते आहे. जमीन-दारांनी मला खूप मदत केली आहे. हेच मला पुष्कळ आहे. आपलं नांव घेत मी सुखाने आयुष्य काढीन. मला आणखी कांही नको.''

आता मालतीची प्रतिष्ठा वाढली. आता तिच्या मालकीचे एक घर आणि शेत होते. आयुष्य आरामांत चालले होते. चार वर्षांनी तिला एक मुलगी झाली. मालतीने तिचे नांव रागिणी ठेवले.

असे दिवस लवकर गेले. जमीनदार आता म्हातारा झाला. आता त्याचा मुलगा जमीनदारी सांभाळू लागला. नातू कल्याणवर्मा वीस वर्षाचा झाला. मालतीची मुलगी रागिणी हिच्या सौंदर्याची सर्वजण स्तुती करत. त्यावर्षी वेदिरेश्वराच्या ब्रह्मोत्सवाला आलेल्या जमीनदाराच्या कुटुंबाने मालती व रागिणीला पाहिले. कल्याणवर्माच्या आईने मालतीशी मोठ्या प्रेमाने गप्पा मारल्या. रागिणीला बघितल्यावर तिला आपल्या वचनाची आठवण आली.

कल्याणवर्माची आई मालतीला म्हणाली, ''तुझी मुलगी फार सुंदर दिसते आहे. मला माझे निर्णय घ्यायचे स्वातंत्र्य असते, तर तुझ्या मुलीला माझी सून करुन घेतली असती.''

तिचे बोलणे ऐकून मालती हंसून गप्प बसली.

कल्याणवर्माने आईचे बोलणे ऐकले. त्याबद्दल त्याने आपल्या आईकडून सगळी माहिती मिळवली. मग रागिणीला एकटे गांठून तो म्हणाला, ''मला तुमच्याशी लग्न करायची इच्छा आहे. आणि आईची पण इच्छा पुरी होईल.''

पण रागिणी दबल्या आवाजात म्हणाली, ''आपण जमीनदाराचे वंशज आहात. एका सुईणीच्या मुलीशी लग्न करण्याला आपले कुटुंबीय आणि समाज कधी मान्यता देणार नाही. आपले कुटुंबीय या म्हणण्याला कडवा विरोध करतील. त्यांच्याशी तुम्ही किंवा माझे लोक टक्कर देऊं शकणार नाहीत.''

कांहीही न बोलता कल्याणवर्मा तिथून निघून गेला.

म्हाताऱ्या जमीनदाराला ही गोष्ट जेव्हां कळली तेव्हां त्याने रागिणीची जन्मपत्रिका मागवून ज्योतिषाला दाखवली. त्यांत असे दिसले की ती महाराणी व राजमाता होईल. हे ऐकून तो चकितच झाला. ह्या परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी-कल्याणवर्माचे लग्न करणे हा एकच मार्ग आहे असे त्याला वाटले, म्हणून तो दुसरी एखादी योग्य मुलगी शोधायला लागला.

पण तेवढ्यांत अचानक एक वाईट गोष्ट घडली. कल्याणवर्मा कांही जरुरीच्या कामासाठी राजधानी बाहेर गेला होता. तेव्हां अचानक वादळ येऊन विजा कडकडायला लागल्या आणि जोराचा पाऊस सुरुं झाला. त्याच्याजवळच वीज पडली. आणि तो बेशुद्ध होऊन घोड्यावरुन खाली पडला. त्याला घरी आणले. पण विजेच्या धक्क्याने त्याची दृष्टी गेली. वैद्यांनी त्याला तपासून सांगितले की अशाच तऱ्हेची कुठली अनपेक्षित गोष्ट जर परत घडली तर याची दृष्टि परत मिळूं शकेल. जमीनदाराच्या सर्व कुटुंबावर दुःखाची छाया पसरली.

या घटनेच्या दुसऱ्याच दिवशी जमीनदार कल्याणवर्माला म्हणाला, ''कुठल्या मुहूर्तावर तुझ्या आईनी तोंड उघडले, कुणास ठाऊक. असं वाटतंय, कीं तुझं लग्न त्या सुईणाच्या मुलीशीच



होणार. ब्रह्मदेवाने पण तसंच लिहीलेलं दिसतंय. मला हे पण कळलंय की तुला देखील तिच्याशीच लग्न करायचंय. तुझ्या या असहाय्य परिस्थितीत जी तुझी चांगली काळजी घेईल, अशाच पत्नीची तुला गरज आहे. तुला तिच्याशीच लग्न करायचे असेल तर आमची काही हरकत नाही.''

''जशी तुमची इच्छा असेल तसंच होईल.'' कल्याण वर्मा म्हणाला. ही गोष्ट मालतीला कळली तेव्हा ती रागिणीला म्हणाली, ''मुली, ते जमीनदार असले तरी तिथे तू जावीस असं मला वाटत नाही. तुला एका आंधळ्याची बायको म्हणून मी बघूं शकत नाही. म्हणून या लग्नाला माझी परवानगी नाही.''

आईचे न ऐकता रागिणी म्हणाली, ''आई, आपण लहान, गरीब माणसे आहोत. जमीन-



दारांची इच्छा नाकारली तर त्यांची नाराजी पत्करावी लागेल. या लग्नाला माझी मनापासून सम्मती आहे.''

ही बातमी समजताच जमीनदारांकडील मंडळी थाटामाटाने मालतीकडे आली. जेव्हां साडी व दागिने घेऊन कल्याण वर्माची आई रागिणीच्या खोलीत आली, तेव्हां तिने डोळ्यांवर पट्टी बांधलेली पाहून ती चकितच झाली. कल्याण वर्माची आई तिला कांही म्हणण्याआधीच ती धीटपणे म्हणाली, ''ज्या लोकांना माझे पती पाहूं शकत नाहीत, त्यांना मी पण बघणार नाही. मी जमीनदारांच्या वंशाशी नाते जोडते आहे. मी देवी गांधारीला आपला आदर्श मानले आहे.''

जेवढे लोक तिथे आले त्या सर्वांनी रागिणीच्या या धाडसाची स्तुती केली. तिचा हा निर्णय जमीनदाराच्या कुळाला साजेसाच आहे. परंतु म्हातारा जमीनदार रागिणीच्या या निर्णयाचा अर्थ चांगला जाणत होता. आशिर्वाद देण्याच्या निमित्ताने तिला एकटे बोलवून तो म्हणाला, ''रागिणी, तू चांगली हुषार आहेस. तू एक सामान्य घरातली आहेस. आंधळ्या कल्याण-वर्माच्या पत्नीच्या रुपांत मी त्याच्यासाठी एक मोलकरीण मिळवूं पहात होतो. पण डोळ्यावर पट्टी बांधून तू लोकांच्या दृष्टीने एक पतिव्रता बनली आहेस. मला कळलंय की तुलापण पतीसारख्याच जमीनदारांच्या घरांतल्या सर्व सुखसोई हव्या आहेत. माझ्या दृष्टीने तू स्वार्थी आहेस. तरी सुद्धा हे इतर लोक तुला पतिव्रता



समजतात. पण तुझ्या या विचित्र स्वार्थाचा गैरअर्थ काढायचे धाडस हे लोक करूं शकणार नाहीत. असो, मी तुझे मनःपूर्वक स्वागत करतो.''

रागिणी उत्तरादाखल म्हणाली, ''भविष्य काळांतच आपल्याला कळेल की कोणाचा स्वार्थ विचित्र आहे. आपण माझा सून म्हणून स्वीकार केल्या बद्दल मी सदा आपली ऋणी राहीन.''

रागिणी आणि कल्याणवर्माचा विवाह झाला. दोन महिन्यांनी पुन्हां एक दिवस मुसळधार पाऊस पडला. विजा कडाडत होत्या. कल्याण वर्मा घरांत जिथे बसला होता, तिथूनच जवळच्या आंब्याच्या झाडावर वीज पडली. तो एकदम जोरांत ओरडला आणि बेशुद्ध होऊन खाली कोसळला.

ही गोष्ट कळताच घरांतली मंडळी पळत तिथे आली. कल्याणवर्मने जेव्हां डोळे उघडले तेव्हां समोर उभ्या असलेल्या रागिणीकडे बघत तो आश्चर्याने म्हणाला, ''अरे, मला पुन्हां दिसायला लागलंय. एका विजेने माझी दृष्टि गेली तर दुसऱ्या विजेनी ती परत आली. रागिणी एक सांगू? तू त्या दिवशीपेक्षां आज आणखी जास्त सुंदर दिसते आहेस. खरंच, मी इतका सुखांत कधीच नव्हतो.''

हे ऐकून रागिणी मंद हंसत म्हणाली, ''मी सुंदर आहे की नाही ते मला कांही माहित नाही. पण आपल्या हृदयाचे सौंदर्य मनोहारी आहे. जेव्हां तुम्ही मला बघितलं तेव्हांपासून तुम्ही माझ्यावर अपार प्रेम करत आहात. माझ्याशीच लग्न करण्यासाठी तुम्ही जे प्रयत्न केलेत, ते मला लाखमोलाचे आहेत. आपले माझ्यावरचे हे ऋण मी कधीच फेडूं शकणार नाही.''

कल्याणवर्मने मोठ्या प्रेमाने तिला जवळ घेतले. सगळ्यांचा विश्वास बसला की रागिणीच्या पातिव्रत्यामुळेच कल्याणवर्माची दृष्टी परत आली. सगळे तिला एक प्रतिष्ठित व आदरणीय स्त्री म्हणून मान देऊं लागले. तिच्या आगमनामुळे जमीनदारांच्या घराण्याची प्रतिष्ठा वाढली.



बरोबर केशव व जयमल्ल जाताना दिसले. एका खडकावर उभे राहून सैनिकांनी ओरडून विचारले, "अरे म्हाताऱ्या, त्यांना कुठे नेतो आहेस?"

केशवच्या पित्याने सैनिकांना न डगमगता उत्तर दिले, "अरे, या दुष्टांना मी राजगुरुंच्या जवळून बक्षीस मिळेल म्हणून घेऊन जातो आहे. माझं इनाम तुम्ही उपटायला बघाल तर याद राखा! तुम्ही आल्या वाटेने निघून जा कसे!"

"मरायला टेकला आहे म्हातारा, पण तरी-देखील पैशाची हाव कांही सुटत नाही अजून!" असं पुटपुटत सैनिक मागे वळून राजगुरुच्याकडे परत जाऊं लागले.

भयंकर घाटीबद्दलची माहिती जाणून घ्यायची राजगुरुला उत्सुकता होती. तरीही त्याने विचार केला कीं हे शिष्य भेटले कीं त्याबाबतीत ब्राम्ह-दंडीकडे चौकशी करणे योग्य ठरेल; कारण यांच्यासमोर तो खोटे बोलूं शकणार नाही.

सर्व प्रथम मांत्रिकाची घमेंड उतरवायची असा राजगुरुने मनोमन निश्चय केला होता.

त्याने सेनापतीला बोलावून सांगितले, "या ब्राम्हदंडीचे हातपाय बांधा, आणि उलटा टांगून नेता [illegible] बांधून, त्याला नगराच्या वेशीपर्यंत ओढत न्या. आधी एक सैनिक पाठवून दवंडी पिटवायला सांगा, कीं मांत्रिक पकडला गेला आहे. म्हणून आजचा दिवस साजरा करायला हवा. त्यानंतर दोघा सैनिकांना ह्याच्या गुहेवर पहारेकरी म्हणून थांबायला सांगा."

राजगुरुच्या आज्ञेप्रमाणे सैनिकांनी ब्राम्हदंडीचे हातपाय बांधले. नंतर एक जाड सोटा ते घेऊन आले. त्यांनी ब्राम्हदंडीला हातपाय बांधून त्या सोटयावर टांगले, आणि दोन्ही टोंकाना दोनदोन सैनिकांनी तो सोटा खांद्यावर घेतला व ते पहाडा-वरुन खाली उतरुं लागले. ब्राम्हदंडीचे शरीर हिंद-कळत होते आणि तो त्यामुळे कळवळून ओरडत होता. "अरे उन्मत्त भैरवा, तू उपासकांचा वटवृक्ष आहेस, माझा आणखी किती अपमान करवणार आहेस रे?"

राजगुरु हंसतच पायथ्याशी बांधलेल्या त्याच्या घोड्याकडे जाऊं लागला. *(क्रमशः)*





वेताळ कथा

# शिवालय

निश्चयाचा महामेरु राजा विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने शव खाली उतरवले आणि खांद्यावर घेतले. नंतर तो नेहमीप्रमाणे स्मशानाच्या वाटेने जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन्, या भीषण अंधारात तू कुठे जाणार आहेस? तुझे इच्छित ठिकाण तुला माहीत आहे कां? तुला पाहून मला शंका येते कीं तू शापग्रस्त असावास, म्हणून दिशाहीन होऊन असा सैरभैर फिरतो आहेस. अजूनही वेळ गेलेली नाही, योग्य मार्ग निवड, नाहीतर शिव नांवाच्या तरुणासारखी तुझी गत होईल.

तो गुणसंपन्न, अत्यंत शूर व धाडसी होता. या गुणांमुळे त्याने एक महान कार्य केले, पण अहंकाराच्यापोटी त्याने त्याचे



फलित गमावले. ज्या ध्येयासाठी तू इतके कठोर परिश्रम करतो आहेस, त्याचे फळ तुला मिळाले तर ते घालवू नकोस. त्यासाठी तुला सावध करण्यासाठी म्हणून मी त्या तरुणाची, शिवची कहाणी तुला सांगतो ती नीट ऐक.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

सुगंधीपुर गांवालगत एका उंच पर्वतावर एक प्रशस्त मंदिर होते. पण त्या मंदिरात कोणता देव आहे, हे लोकांना माहीत नव्हते. कारण त्या पर्वत-शिखरावर जायला मार्गच नव्हता. कडेकपारीमधे कांटेरी झाडी, वृक्ष, व विषारी सर्प, भरपूर होते.

त्या गांवात शिव नांवाचा एक वीस वर्षांचा तरुण राहात होता. तो मोठा झाला तेव्हांपासून तो भक्तांच्या गोष्टी ऐकत असे. लेखन-वाचनाची देखील त्याला गोडी होती, तो हुशार होता, व असामान्य धाडसी होता. पर्वतावरचे ते मंदिर व तिथला देव पाहण्याची त्याला तीव्र इच्छा होती. एकदा त्याने ही इच्छा आईजवळ बोलून दाखवली. ती एकदम घाबरुन म्हणाली, ''बेटा, हे साहस मात्र करुं नकोस. आपल्या गांवातल्या शिवालयाच्या बैराग्याने तिथे जायचे धाडस केले, आणि त्या प्रयत्नांत त्याचा एक डोळा गेला.''

दुसऱ्याच दिवशी शिव त्या बैराग्याला जाऊन भेटला. तेव्हां बैराग्याने त्याच्या खांद्यावर थोपटीत म्हटले, ''त्या पर्वताच्या शिखरावर पोंचणे हे कांही सोपे काम नाही. मी तिथपर्यंत पोंचलो, परंतु एका रागीट यक्षाच्या शापामुळे माझा एक डोळा गेला. पण तिथे जायचे कसे ते मी तुला सांगू शकतो. तुझं नशीब चांगलं असेल तर पुढे सगळं ठीक होईल.''

बैराग्याची भेट झाली ही गोष्ट शिवने आई-पासून लपवून ठेवली. एका आठवड्यानंतर सकाळी उठून तो त्या मंदिराकडे जायला निघाला. महादेवाला प्रिय अशी बेलाची पाने त्याने बरोबर घेतली.

बैराग्याने सांगितल्याप्रमाणे एका दगडावर महाशिवाची लिंग रूपरेषा कोरलेली होती. त्या रूपाला शिवने वंदन केले व बेलाची पाने त्या मूर्तीच्या पायाशी थोडा वेळ ठेवली. नंतर ती पाने उचलून त्याने आपल्या डोक्यावर ठेवली. त्या पानांच्या प्रभावामुळे त्याला झाडांचे कांटे टोंचले नाहीत व विषारी सर्पही त्याच्याजवळ आले नाहीत. हे गुपित बैराग्याला मोठ्या मुश्कीलीने





समजले होते व ते त्याने शिवला सांगितलेले होते.

दुपार होईपर्यंत शिव अर्धा पर्वत चढून गेला. तेवढ्यांत त्याला दगडावर छिन्नीने ठोकल्याचा आवाज ऐकूं आला. शिवने त्या दिशेला वळून बघितले. कुणीतरी दैवी पुरुष छिन्नीने दगडांतून शिवलिंग कोरण्याचा प्रयत्न करीत होता. त्या पुरुषाच्या अंगावर किंमती वस्त्रे व आभूषणें होती. पण त्याच्या हातून कोरताना त्या दगडाला चिरा पडत होत्या. बैराग्याने ज्याच्याबद्दल सांगितले, तो हाच यक्ष असला पाहिजे, हे शिवच्या लक्षांत आले. तो हळूंहळूं त्या यक्षाजवळ गेला आणि त्याने त्याला नम्रतापूर्वक नमस्कार केला.

यक्षाने शिवच्याकडे रागाने बघितले आणि म्हटले, ''तू एक सामान्य मानव - माझ्याजवळ येण्याची तुझी हिंमतच कशी झाली? मी यक्ष आहे. तुझ्यासारखाच एक वैरागी माझ्याकडे आला आणि माझ्याकडून शापग्रस्त झाला. तुझ्यासारखी माणसे इकडे येऊं नयेत, आमच्या पूजेत व्यत्यय येऊं नये, म्हणून आम्ही ही वाट दुर्गम करुन ठेवली. तरीही, तू इथे कसा पोंचलास? तुला माहीत नाही, ह्यामुळेच त्या वैराग्याचा एक डोळा गेला.''

शिवने धिटाईने सांगितले, ''यक्षमहाराज, ज्या बैराग्याने आपल्याला शाप दिला, त्यानेच मला सांगितलं कीं यक्षदेव शिवभगवानाचा अनादर करत आहेत. त्यांच्याकडून केवढा अनर्थ होतो आहे. फार फार पूर्वी एक आदिवासी पर्वतावर शिकार करायला आला होता. लिंगाच्या आकाराचा एक मोठा दगड त्याला दिसला. त्याने त्या दगडाला फुले वाहिली आणि शिव, महाशिव, असा जप करीत मान खाली घालून तो प्रार्थना करुं लागला. आपल्या यक्षांनी ते पाहिलं आणि त्याला ते म्हणाले, ''अरे ओ मूर्खा, तू दगडाची पूजा करतो आहेस आणि जप मात्र करतो आहेस शिवाच्या नांवाचा! हा तर अगदीच चुकीचा उपचार आहे.'' असं म्हणत त्यांनी तो दगड फोडून टाकला आणि त्या आदिवासी माणसाला तिथून पळवून लावलं.'' शिव आणखी कांही बोलण्यापूर्वी, यक्षाने त्याला थांबवून म्हटले, ''ज्या यक्षांच्याबद्दल तू सांगतो आहेस, त्यांत मीही एक होतो. माझं नांव यशोधन आहे. याच्याहून जास्त महत्वाचा वेगळाच विषय आहे. आम्ही त्या आदिवासीला पळवून लावलं,



त्यानंतर लगेच गंभीर स्वरांत महाशिवाने आम्हाला म्हटलं, ''माझ्या निष्पाप भक्ताला तुम्ही सतावलंत, त्याला इथून पळवून लावलंत, आणि हा तुमचा मोठाच अपराध आहे. एवढंच नव्हे, तर माझ्या ज्या रुपाची तो पूजा करीत होता, तेही तुम्ही फोडून टाकलंत. तेव्हां आता तुम्हीच माझं ओक मंदिर ह्या पर्वतावर बनवा आणि त्या मंदिराच्या गर्भगृहांत असे एक शिवलिंग स्थापन करा की ज्यांत कुठेही चीर नाही. माझ्या कोणा निःस्वार्थी भक्ताच्या हातून हे अवश्य होऊं शकेल. हे काम पूर्ण होईपर्यंत हा पर्वत सोडून तुमच्यापैकी कुणालाही परत यक्षलोकांत जाता येणार नाही.''

शिवने आश्चर्य वाटून विचारले, ''यक्षमहाराज, असे चीर नसलेले लिंग बनवणे इतके कठीण आहे कां?'' आपली असहाय्यता व्यक्त करीत यक्ष म्हणाला, ''आम्ही मंदिर तर बांधलं, पण निर्दोष शिवलिंग मात्र अद्याप बनवता आलेले नाही. तू बघतो आहेस ना, ह्या शिवलिंगाला देखील तडे पडत आहेतच!''

यक्ष बनवीत असलेल्या शिवलिंगाकडे शिव थोडा वेळ निरखून बघत राहिला. नंतर त्याने हात जोडून शिवभगवानाची प्रार्थना केली व म्हटले, ''हे महादेवा, आम्ही सामान्य माणसे, भक्तिभावाने आपली प्रार्थना करतो. आमच्याच गांवातले नव्हेत, तर इतर अनेक भक्त आपली पूजा करायला मिळावी, आपली सेवा करायला मिळावी म्हणून तडफडत आहेत. कुणाच्याही मध्यस्थीशिवाय आपण स्वतः या मंदिरात आपली प्रतिष्ठापना करावी ही विनंती.''

दुसऱ्याच क्षणी ते चिरा पडलेले शिवलिंग एकसंध झाले, त्याची प्रभा चमकायला लागली, आणि बघताबघता ते अदृश्य होऊन गर्भगृहांत त्याची आपोआप स्थापना झाली.

शिव व यक्ष धावतच मंदिरात गेले. पर्वतावर जेवढे सगळे यक्ष होते, ते तिथे आले, आणि सर्वांनी मिळून देवावर अभिषेक केला.

नंतर यशोधन यक्षाने शिवची माहिती आपल्या इतर यक्षबंधूंना सांगितली. नंतर यक्ष शिवकडे वळून म्हणाला, ''महाशिवाबद्दलची तुझी भक्ती अपार आहे. यापुढे शिवालयाची देखभाल करण्याची जबाबदारी तुला पार पाडली पाहिजे.''

शिवने स्पष्ट उत्तर दिले, ''आपल्या या औदार्याबद्दल मी आपला आभारी आहे. जे मंदिर आपण निर्माण केले आहे, त्या मंदिरात सर्वांना प्रवेश मिळण्याचे सौभाग्य प्राप्त असावे. ज्या बैराग्याचा डोळा आपल्या शापामुळे गेला, त्याला पुन्हां दृष्टी प्राप्त व्हावी असे आपण करावे. पण मंदिराची जबाबदारी सांभाळण्याचे काम माझ्याकडून होणार नाही. मला घरी परत जाण्याची अनुमती द्यावी.'' असं म्हणून शिव तिथून निघाला.

वेताळाने कहाणी सांगितल्यानंतर राजा विक्रमार्काला म्हटले, ''राजन्, मंदिरामधे यक्षांना शिवलिंगाची स्थापना करता आली नाही, ते काम शिवने केले. मंदिराची जबाबदारी त्याच्यावर सोपवली, पण ती इच्छा त्याने मानली नाही. त्याने मंदिरात शिवलिंग स्थापन केले म्हणून तो स्वतःला इतका मोठा समजायला लागला कीं काय? त्या क्षणी त्याची बुद्धी फिरली होती कीं काय? तिथे त्याचा स्वार्थ तर आड आला नव्हता ना? माझ्या या शंकांची उत्तरे तुला माहीत असूनही तू गप्प राहिलास, तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील.''

विक्रमार्कने उत्तर दिलं, ''शिव बालवयांतच भक्तीच्या कथा ऐकत होता, त्याला वाचन-लेखनांत रुची होती, म्हणूनच तो पर्वतावर चढूं शकला. जरी तिथे जायला इतर लोक घाबरत होते, तरी त्याची निःस्वार्थी भक्ती होती म्हणून त्याच्या हातून शिवलिंगाची प्रतिष्ठापना झाली. त्याच्या डोळ्यांसमोर ही अपूर्व घटना घडली, त्यामुळे त्याच्या मनांतला भक्तिभाव आणखी वाढला.

आध्यात्मिक विषयांत जास्ती अभ्यास करण्याची त्याची इच्छा प्रबळ होती. त्यामुळे मंदिराची देखभाल करण्यापेक्षां तो अभ्यास त्याला जास्त महत्वाचा वाटला. अशा भक्तांना बुद्धिमांद्य किंवा स्वार्थी दृष्टी कधी येत नाही. महाशिवाला एकदा बघण्याची तीव्र इच्छा होती, ती पूर्ण झाली. तेव्हां त्यानंतर तिथून निघून जाणे हे योग्यच होतं. मानवाच्या कल्याणाबरोबर प्रयत्नांची शिकस्त, ही कायम जोडलेली असते.''

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(सुभद्रादेवीच्या रचनेवरुन)*






## वृक्षांचा विवाह



**श्री.** वटवृक्ष, वय ६० वर्षे, यांचा शुभ विवाह कुमारी नीम, वय २५ वर्षे, हिच्याशी पारंपारिक पद्धतीने झाला. मध्य केरळमधल्या तेनकुरिसी इथल्या शिवमंदिराच्या आवारांत ही झाडे आहेत. पुजाऱ्याने मंदिरातले तीर्थ वडाच्या झाडावर शिंपडले आणि केरळमधले नवरदेव नेसतात, तसले पांढरे धोतर झाडाला नेसवले. नीमच्या झाडाला लाल रेशमी साडी नेसवली गेली. मुहूर्ताची वेळ झाली, तेव्हां पुजाऱ्याने सोन्याचे मंगळसूत्र त्या नीम झाडाभोवती बांधले. जमलेल्या सर्व भाविकांनी त्यावेळी वेदपठणाने आसमंत गर्जत ठेवला.

## मस्तकावेगळे पुतळे



तमिळनाडमधल्या वेल्लोर जिल्ह्यांतल्या खेडयांमधे पाहुणे गेले कीं मस्तक नसलेले पुतळे पाहून ते आश्चर्यचकित होतात. हे पुतळे देवीच्या देवळांमधून दिसतात. उत्सवाच्यावेळी मात्र या धडांवर डोकी ठेवली जातात. जर हे पुतळे संपूर्णावस्थेंत असले तर गांवावर पूर किंवा आगीसारखे संकट येऊं शकेल असा त्यांचा समज आहे. अर्जुनाचा मुलगा अरवान याचे हे पुतळे आहेत. त्याने आपल्या जिवाचे दान देऊन कुरुक्षेत्रावर पांडवांना विजयी होण्यास मदत केलेली होती. म्हणून त्याचे पुतळे मस्तकाशिवाय ठेवलेले आहेत.





# दोन भाऊ

आपल्याला जर कुणी असं सांगितलं की ज्ञानचंद्र नांवाचा एक राजा होता, तर आपण तो ज्ञानी आणि शहाणा आहे असं समजू. पण चित्रपुरचा हा राजा ह्याच्या बरोबर उलट होता. त्याला आपल्या प्रजेने शेती करणे, विहिरी खोदणे, रस्ते बांधणे, मुळीच पसंत नव्हते. त्यामुळे लोकांना खायला धान्य नव्हते, प्यायला पाणी नाही, प्रवासासाठी डोंगरदऱ्या पार करुन कांट्या-कुट्यांतून वाट काढावी लागत असे. असं असूनही राजा घरदार, शेती, दुकाने यावर कर वसूल करत असे. लोकांना राजाचा राग येत असे पण काय करणार? संध्याकाळी पिंपळाच्या पारावर बसलेल्या लोकांतला एक जण म्हणाला, "हे सगळं कुठे जाऊन पोचणार आहे कोण जाणे!"

"नुसती तक्रार करण्यात काय अर्थ आहे?" सगळ्यांनी आवाजाच्या दिशेने माना वर केल्या. ज्ञानचंद्रचे वडील अतुलचंद्र ह्यांच्यासाठी लढाया लढलेला कुंजीलाल बोलत होता. आपल्या अडचणींतून हा कांही मार्ग काढेल का, या आशेने ते त्याच्याकडे पाहूं लागले.

"आपण कांहीतरी केलं पाहिजे" कुंजीलाल विचारपूर्वक बोलत म्हणाला. हा वीर अजूनही डोंगरी सिंहासारखा शक्तिवान आणि मजबूत होता. तरीही तो मितभाषी व सौम्य व्यक्तिमत्वाचा होता. लोकांना त्याचा आदर वाटत होता. ते आता आशेने त्याच्या चेहेऱ्याकडे पाहूं लागले.

"प्रथम आपण कर देणं थांबवू. कर वसुलीसाठी आलेल्या अधिकाऱ्याला रिकाम्या हाती परत पाठवू. बघूं राजा काय करतो ते."

"हो, हो." सगळे म्हणाले. इतके दिवस गप्प बसलेल्या त्या सर्वांना आता जोर चढला होता. "तो जर गेला नाही तर त्याला चांगलं बदडून काढूं."

सुदैवाने त्यांच्यावर तशी वेळच आली नाही. त्यांच्या बेताचा सुगावा लागल्यामुळे राजाने





कराधिकाऱ्याच्या ऐवजी आपले सैनिकच युद्धासाठी त्यांच्या गांवी पाठवले.

सैनिक गांवाच्या वेशीवर पोचले असून राजाच्या येण्याची वाट बघत आहेत. ही गांव-कऱ्यांनी आणलेली बातमी ऐकूनही कुंजीलाल कांही अस्वस्थ झाला नाही. त्याने असा विचार केला.

''मी माझ्या भावाची मदत घेईन. आम्ही दोघे मिळून राजाला सहज हरवूं.''

पण कीर्तिलाल हा भित्र्या स्वभावाचा होता. जेव्हां त्याला भावाच्या भेटीमागले कारण कळले, तेव्हां तो उत्तरादाखल म्हणाला, ''माफ कर. सध्या माझी तब्येत चांगली नाही आणि वैद्यांनी मला पूर्ण विश्रांती घेण्याचा सल्ला दिला आहे.''

कुंजीलालला ह्या गोष्टीचे आश्चर्यही वाटले नाही किंवा तो निराशही झाला नाही. त्याने गांवातल्या तरुणांना गोळा केले आणि तो राजाच्या सैनिकांशी युद्ध करायला गेला. सुदैवाने गांवकऱ्यांची संख्या सैनिकांपेक्षा जास्त होती. गांवकऱ्यांनी शौर्याने लढून राजाचा पराभव केला.

जेव्हां विजयी गांवकरी परतले, तेव्हा स्वागताला किर्तीलाल सर्वांच्यापुढे हजर. तो आपल्या भावाला म्हणाला, ''कुंजीलाल, मला खरंच तुझ्याबरोबर यायचं होतं पण वैद्यांचे सांगणे कसे टाळणार? पण तू आणलेल्या लुटीतला वांटा मला दे ना. मी तुझा लाडका भाऊ ना?''

कुंजीलालला भावाबरोबर भांडण करायचे नव्हते म्हणून त्याला लुटीतला कांही थोडा भाग देऊन त्याने त्याची रवानगी केली.

कुंजीलालच्या लौकरच लक्षात आलं की राजा ज्ञानचंद्र आपल्याला फार दिवस या विजयाचा आनंद मिळूं देणार नाही. तो आपल्याला शिक्षा करायची संधी शोधेलच. त्याला स्वतःची चिंता नव्हती पण आपल्या गरोदर बायकोची, गंगादेवीची, काळजी वाटत होती.

तो एक दिवस तिला म्हणाला, ''गंगा, मला शिक्षा देण्यासाठी राजा तुला कांहीतरी दगाफटका करेल, अशी मला भीती वाटते. म्हणून मी कांही दिवसांसाठी डोंगरातल्या एका गुहेत तुझ्या रहाण्याची व्यवस्था करणार आहे. जेव्हां सगळे सुरळीत, पूर्वीसारखे होईल, तेव्हांच मी तुला परत घेऊन येईन.''

त्याच्या लाडक्या बायकोला त्याला एकटं सोडून जायचे नव्हतं. ती म्हणाली, ''तुम्ही राजाची क्षमा कां नाही मागत? माझी खात्री आहे तो तुम्हाला माफ करेल आणि सगळं विसरेल.''

कुंजीलाल म्हणाला, ''नाही गंगा, ते कधीही होणार नाही. आपला राजा तसा नाही. तो गरीब गांवकऱ्यांना कसा त्रास देतोय ते बघितलं नाहीस कां? तो त्याचे वागणे सुधारेपर्यन्त मी त्याच्याशी लढेन.''

आपल्या नवऱ्याचे मत बदलणे शक्य नाही, तेव्हां त्याच्याशी वाद नको असा विचार करुन तिने पुष्कळ दिवस पुरेल एवढे अन्नधान्य बरोबर घेतले, आणि ती कुंजीलालबरोबर डोंगरावरच्या गुहेत रहायला गेली. गुहेंत तिची व्यवस्था लावून परत जाताना कुंजीलाल तिला म्हणाला, ''गंगा, आपला मुलगा पण शूर योद्धा होईल. आणि मोठा झाल्यावर शत्रूशी लढेल घाबरं नकोस. मी लवकरच परत येईन.'' असं म्हणून जड अंतः-करणाने त्याने तिचा निरोप घेतला.

थोड्याच दिवसांनी राजाचा दूत कुंजीलालला भेटला. राज्यांतील दुसऱ्या भागातले बंड मोडायच्या कामी त्याची मदत हवी होती. त्याबरोबर असा निरोप होता की ''तू यशस्वी झालास तर तू आणि तुझ्या गांवाला कायमची करमाफी मिळेल.''

ह्यावर जरी फारसा विश्वास नव्हता तरी कुंजीलालने गांवासाठी राजाची मदत करण्याचे ठरविले. पुन्हां एकदा त्याने आपल्या भावाला बरोबर येण्याची विनंती केली. किर्तीलाल बरोबर येण्यास तयार झाला म्हणजे जर विजय मिळाला तर त्या बदल्यात राजाकडे कांहीतरी बक्षिस मागता येईल. दोघे भाऊ आणि सैनिक बंडाच्या ठिकाणी पोचणार, इतक्यांत अचानक किर्तीलाल तब्येत बरी नसल्याचे नाटक करुन मागे फिरला.

कुंजीलालने त्याला परतण्यास सम्मती देऊन तो एकटाच बंड मोडण्यास पुढे गेला. त्या गांवातल्या ज्येष्ठ लोकांनी कुंजीलालबद्दल आणि त्याने त्याच्या गांवातल्या लोकांचे प्रेम कसं मिळवलंय, याबद्दल ऐकले होते. त्यांनी वेशीवर त्याचे स्वागत केले. कुंजीलालने त्यांना वचन दिले की त्यांनी त्यांचे बंड थांबवले, तर राजा त्यांना त्रास देणार नाही आणि योग्य रीतीने राज्य करेल अशी तो व्यवस्था करेल. गांवकऱ्यांना कुंजीलाल दिलेला शब्द पाळेल असा विश्वास





जर तुला जडजवाहीर दिले तर ते घेऊन जायला मी बरोबर असायला पाहिजेच कीं!''

राजाने दोघा भावांचे अगदी थंडपणे स्वागत केले. तो फक्त म्हणाला, ''तुम्ही थोडे दिवस इथे रहा आणि दरबारांत रुजूं व्हा. माझ्या दरबारांत आता लढवय्ये नाहीत.''

या दोघा भावांचे फारसे सख्य नाही असे कळताच राजाने किर्तीलालकडे एक दूत पाठवला. ''राजाने सांगितलेले काम फत्ते झाले तर राजकन्येचा हात तुझ्या हातांत देईन'' असे राजाचे म्हणणे होते.

ते काम किर्तीलालला सहज शक्य होते कारण दोघे भाऊ एका खोलीतच झोपत होते. असे दुष्ट कृत्य करुन तो राजाला त्याच्या वचनाची आठवण करुन द्यायला गेला, तेव्हां राजाने त्याला धक्का दिला. तो म्हणाला, ''ज्याला आपल्या भावाचे एक कणभरही प्रेम नाही, अशा माणसाला कोण आपली मुलगी देईल? तू केलेल्या गुन्ह्याबद्दल तुला शिक्षा देणेच योग्य होईल, जरी तो गुन्हा माझ्या सांगण्या वरुन होता तरीदेखील!''

वाटला म्हणून त्यांनी राजा विरुद्ध केलेले बंड मागे घेण्यास होकार दिला.

लढाई, रक्तपाताशिवाय आपण बंड मोडले, म्हणून कुंजीलाल आनंदात होता. राजवाड्यावर जाऊन राजाला ही बातमी देऊन पुढे जावे असे त्याने ठरविले. वाटेत त्याला वाट बघत थांबलेला किर्तीलाल दिसला. ''तू घरी कां नाही गेलास?'' त्याने विचारले.

''त्या गांवातले लोक तुला त्रास देतील अशी मला भीती वाटत होती. म्हणून गरज पडली तर तुला मदत करायला मी इथे थांबलो होतो.'' कुंजीलालला खरे कारण माहित होते. ''माझ्या-बरोबर राजवाड्यांत चल. मी बक्षिस घ्यायला चाललो आहे.'' तो म्हणाला.

''हो, हो. मी तुझ्याबरोबर येतो ना. राजाने

राजाने त्याला तुरुंगात टाकायची आज्ञा केली. इकडे कुंजीलालचे जंगी स्वागत करण्या-साठी वाट पहाणाऱ्या गांवकऱ्यांना जेव्हां कुंजी-लालच्या भावानेच त्याची हत्या केल्याची बातमी समजली तेव्हां मोठा धक्काच बसला. राजाने किर्तीलालला शिक्षा केली हे न्याय्यच होतं असं त्यांना वाटलं.

गंगादेवी डोंगरातल्या गुहेत राहून आपल्या नवऱ्याची वाट पहाताना दिवसाचे आठवडे



आठवड्याचे महिने, महिन्याची वर्षे झाली. कुंजीलालची कांहीच खुशाही कळली नाही म्हणून तीही काळजीत होती. गांवकऱ्यांना तिचा ठावाठिकाणा माहित नसल्याने तिला मुलगा झाला आहे, हे देखील त्यांना माहित नव्हते.

गंगादेवी आपल्या मुलाला वाढवूं लागली. त्याचे नांव तिने वज्रलाल असे ठेवले. जवळच्या एका गुहेत एक मुनी खूप दिवसांपासून तपश्चर्या करताहेत हे त्या दोघांनाही माहित नव्हते. त्या मुनींना काही दैवी शक्ती प्राप्त झाल्या होत्या. एका लहान मुलाला गुहेजवळ खेळताना पाहून त्यांना आश्चर्य वाटले. मुलगा त्यांना आपल्या आईकडे घेऊन गेला. तिने आपल्या पतीची सर्व हकिगत त्यांना सांगितली.

तेव्हां मुनींनी आपल्या दिव्यशक्तीने कुंजी-लालचे काय झाले हे शोधून काढले. त्यांनी गंगा-देवीला धीर देऊन सांगितले, ''तुझ्या मुलाला मी स्वतः विद्या देईन आणि वडिलांच्या मृत्यूचा बदला घेण्यासाठीही तयार करीन.''

तोपर्यन्त गंगादेवीने आपल्या मनाशी असे ठरविले होते की आपल्या मुलाला कोणत्याही वेड्या साहसात पडूं द्यायचे नाही. पण मुनींनी वज्रलालला असा एक कोट दिला की जो घातला कीं घालणारा अदृश्य होईल. आपल्या आईचा आणि मुनींचा आशिर्वाद घेऊन वज्रलाल कांही अडचण न येता राजवाड्यात पोचला.

राजाला कुठून आवाज येतो आहे ते समजत नव्हते. तो आवाज म्हणत होता ''ज्ञानचंद्रा, तुझ्या सुटकेचा दिवस उजाडला आहे. तू अन्यायाने माझ्या वडिलांची हत्त्या त्यांच्या

भावाकडून करविलीस. तुझ्या मारेकऱ्यापेक्षांही शंभर पटीनी तुझा गुन्हा मोठा आहे.''

''तू कोण आहेस? आणि कुठून बोलतो आहेस?'' थरथरत्या आवाजात ज्ञानचंद्राने विचारले. ''तुला ते माहित असायची जरुर नाही.'' आवाज म्हणाला. आणि दुसऱ्या क्षणी राजा मरुन पडला.

मग वज्रलाल आईकडे परतला. मुनींनी सांगितले की आता गांवाकडे परत जाण्याची वेळ झाली आहे. मुनी गांवकऱ्यांशी बोलले. सगळ्या गांवाने तरुण वज्रलालला आपला नवा नायक मानले.





# आळशी

सोमशर्मा हा श्रीमंत कुटुंबातला होता. शिक्षणाला सुरवात केल्यापासून तो काव्यांचे पाठांतर करीत असे, आणि ते नंतर दुसऱ्यांना गोष्टीरुपांत सांगत असे. या गोष्टी तो अतिशय सुरस शब्दांत सांगत असे, म्हणून त्याचे मित्र त्याला महाकवी म्हणू लागले. ते त्याला म्हणत असत,

''तू सुद्धा एखादं महाकाव्य लिही आणि तुझी महाकवी पदवी सार्थ कर.''

''पांडवांच्या अज्ञातवासाची गोष्ट मला फार आवडते. शिक्षण पूर्ण झाल्यावर ती गोष्ट मी काव्यरूपात रचीन.'' सोमशर्मा त्यांना आश्वासन देत म्हणाला.

थोड्याच दिवसांत सोमशर्माचे शिक्षण पूर्ण झाले. मित्र त्याला काव्य रचण्याचा आग्रह करु लागले.

''तालपत्रावर लिहीलेल्या गोष्टी वाचायला मला आवडते. पण स्वतः लेखणी हातांत घेऊन लिहिण्याचा कंटाळा येतो. मला सुस्ती येते. म्हणून मी कविता करीत जाईन, आणि तुम्हांपैकी कोणीतरी येऊन ती लिहून घेत जा.''

''हे आमच्याने कांही होणार नाही. आळस झटकून स्वतः लिहिण्याचे कष्ट कर. नाही तर लवकरच लग्न कर. म्हणजे तुझी बायको नेहमीच तुझ्याबरोबर असेल, आणि तू केलेले काव्य ती लिहून ठेवीत राहील.''

कांही दिवसांनी सुचला नांवाच्या मुलीशी सोमशर्माचे लग्न झाले. त्याचे मित्र सुचलाला भेटून तिला म्हणाले,

''तुझा पती महाकवी आहे. तेव्हां त्याच्या-कडून काव्य रचून घेण्याची तुझीफार मोठी जबाबदारी आहे.''

सुचलाने ही जबाबदारी स्वीकारली. पण दिवसभर तिला घरकाम असायचं आणि सोमशर्माला रात्री झोप यायची. आणि कवितेत त्याचं लक्षच लगायचं नाही. तरी पण कधीकधी तो एखादी कविता सांगायचा. असं करुन वर्षभरांत जेमतेम एकवीस कविता झाल्या.

त्या ऐकून मित्र त्याला प्रोत्साहित करीत म्हणाले,

''तुझं काव्य श्रेष्ठदर्जाचं आहे. तू आळस सोडून काव्य पुरे कर.''

त्यांच कौतुक ऐकून सोमशर्माला उत्साह आला. पण त्याच दिवशी त्याचे सासू-सासरे सुचलाला माहेरी घेऊन जायला आले. सोमशर्मा सुचलाला म्हणाला,

''जोपर्यन्त तू परत येत नाहीस, तोपर्यन्त माझं काव्य कोण लिहून घेणार?''

त्यावर हंसून सुचला त्याला समजावून सांगत म्हणाली, ''आल्यावर तरी मी वेळ कसा देणार? छोट्या बाळाला सांभाळायचे काम आहे. तेव्हां आता आळस सोडून तुम्हीच काव्य लिहा.''

थोड्या दिवसांनी आई होऊन सुचला परत आली. पण सोमशर्मा फक्त वीस कवितांपर्यन्तच पोचला होता. त्याचं तिला खूप वाईट वाटलं, पण कविता लिहून घ्यायला कांही तिला वेळ मिळाला नाही.

जेव्हां मित्रांना ही गोष्ट कळली, तेव्हां ते त्याला प्रोत्साहन देत म्हणाले, ''सगळ्यांनाच कविता करता येत नाहीत. तेव्हां आळस सोडून तूच काव्य लिही.''



''तुम्ही माझे जवळचे मित्र आहात. फक्त तुमच्या म्हणण्याने कांही मी मोठा कवी होत नाही. जोपर्यन्त कोणी श्रेष्ठ कवी असे म्हणत नाही, तोपर्यन्त मला खरा उत्साह येणार नाही.'' सोमशर्मा म्हणाला.

तेव्हां त्याच्या मित्रांनी राजाने गौरवलेल्या सारस्वत नांवाच्या एका कवीला त्याच्या घरी आणले. सोमशर्माच्या कविता वाचून ते त्याला कौतुकाने म्हणाले,

''सरस्वती तुझ्यावर प्रसन्न आहे. लवकरच तुझं काव्य पूर्ण करवून घेऊन राजाची शाबासकी मिळवून देईन. ही माझी जबाबदारी आहे.'' असं म्हणून ते गेले.

सोमशर्मा मित्रांना म्हणाला, ''जर सरस्वतीची माझ्यावर कृपा असेल तर योग्य वेळी तीच माझा

कमला जोशी



आळस घालवून माझ्याकडून काव्य लिहून घेईल. तोपर्यन्त मी वाट पाहीन."

इतक्यांत तेज नांवाचा एक योगी त्या गांवात आला. त्याचे म्हणणे होते की आळस, ढिलेपणा हा मनुष्याला शाप आहे. गांवात सगळीकडे, हा योगी आळस घालवतो, अशी बातमी पसरली. सोमशर्माचे मित्र सोमशर्माला घेऊन त्याच्याकडे गेले. तेजने सोमशर्माला खूप वेगवेगळे प्रश्न विचारुन आळस घालवायचे कांही उपाय सांगितले. सोमशर्माने योग्यांना सांगितले की त्याने हे सर्व उपाय करुन पाहिले आहेत, पण त्यांचा कांही फायदा झाला नाही. हे ऐकून निराश होत तेज म्हणाला, "मुला, आजपर्यन्त मी समजत होतो, की मला कांहीही अशक्य नाही. पण तुझा आळस घालवणे कांही मला शक्य नाही."

सोमशर्मा हंसतच तिथून निघून गेला. पण त्याचे मित्र तिथेच थांबले, ते तेजला म्हणाले, "स्वामी, आपण इतक्यांतच हार मानलीत, ही गोष्ट जरा विचित्र वाटते."

तेज मंदपणे हंसून म्हणाला, "मुलांनो, ज्यांना आपल्या आळसाची लाज वाटत असे, आणि ज्यांना तो घालवायचा होता, त्यांना मी सांगितलेल्या उपायांची मदत झाली. पण सोमशर्माला आपल्या आळसाची लाज नसून गर्व आहे. कविता करण्यापेक्षा आळशी म्हणवून घेणेच त्याला आवडते. म्हणून माझ्या उपायांचा त्याच्यावर कांही प्रभाव पडत नाही."

"मग त्याच्या हातून काव्य रचून घ्यायचं आमचं स्वप्न या जन्मीं सत्य नाही होणार कां?" मित्र योग्याला म्हणाले.

तेज म्हणाला, "खरे कवी काव्य करण्यात कधीही आळस करीत नाहीत. सोमशर्माला स्वतःला कवी म्हणवून घ्यायची दुर्दम्य इच्छा आहे. पण त्याच्यात काव्य करायची योग्यता नाही. म्हणून आपली ही कमतरता तो आळसा-आड लपवूं पहात आहे. कांही मोठ्या कवींनी त्याला काव्य करण्याचा आग्रह पण केला, पण त्याने कांहीही केले नाही. अरे, तो कसा महाकवी होणार? इथून पुढे त्याला महाकवी नका म्हणू, महाआळशी म्हणा. आजच मी तीर्थयात्रेला जात आहे. तीन चार महिन्यांनी परत येईन."



तेजचे हे बोलणे सर्व गांवभर पसरले. त्या दिवसापासून लोक सोमशर्माला महाकवी न म्हणता महाआळशी म्हणूं लागले. हे ऐकून अपमानाने, लाजेने, सोमशर्माची मान खाली झुकली. जो एक दिवस महाकवी संबोधला जात होता, त्याला महाआळशी नांव; केवढी ही विटंबना!

सोमशर्माला आपले महाकवित्व सिद्ध केलेच पाहिजे अशी प्रबळ इच्छा झाली. हातांत लेखणी घेऊन रात्रंदिवस लिहीण्याच्या कामांत तो तल्लीन झाला.

तीन महिने एकाग्रतेने खूप परिश्रम करुन त्याने महाकाव्य पूर्ण केले. राजाने त्याचा गौरव केला. आता लोक मुक्तकंठाने त्याची स्तुती करुन त्याला महाकवी म्हणूं लागले. आता कुणीही त्याला आळशी म्हणायचं धाडस करत नव्हता.

चार महिन्यांनी तेज परत आला. सोम-शर्माच्या मित्रांनी घडलेली सर्व हकिगत सांगून गर्वाने म्हटले,

"योगीवर, तुमच्या उपायांचा कांही उपयोग झाला नाही, तो आमच्या मित्रांच्या आग्रहाने झाला."

त्यावर तेज हंसत त्यांना म्हणाला,

"मित्रांनो, दृढ संकल्पाने सर्व साध्य होते. निश्चय आणि आग्रहाअभावी कांहीही साध्य होत नाही. माझ्या उपायांनी मनुष्यांत जिद्द निर्माण होते. तुम्ही कष्ट न करता सोमशर्माला महाकवी बनवले.

तुमच्याद्वारे मी असा प्रचार केला की तो महाकवी नसून महाआळशी आहे. त्यामुळे त्याच्या स्वाभिमानाला ठेंच पोचली, आणि राग येऊन इरेस पेटून त्याने निश्चय केला.

त्याची प्रतिभा जागृत होऊन त्याला काव्य रचायला स्फूर्ती मिळाली. खरं पाहिलं तर माझ्या उपायानेच अप्रत्यक्षरित्या त्याचा आळस घालवला गेला. आणि एक चांगलं काव्य जन्माला आलं.

जे झालं ते चांगलंच झालं!"



# श्रेष्ठ शिल्पकार आणि त्याचे प्रारंभीचे समीक्षक



जगांतील सर्वश्रेष्ठ शिल्पकारांपैकी एक गणला जाणारा इटलीचा मायकेल अँजेलो (१४७५-१५६४) कुणाला माहीत नाही? रोममधल्या म्युझियम्स आणि चॅपेल्‌मधल्या भिंती व छतावरील त्याने केलेल्या कामातले सौंदर्य, आणि त्यांची भव्यता बघून हजारो लोक आश्चर्यचकित होतात. चित्रकलेवरची शेकडो पुस्तके या शिल्पांच्या छायाचित्रांनी नटलेली असतात. संपूर्ण युरोप खंडाला त्याचा अभिमान वाटतो.

तो लहान असताना त्याची दाई त्याला कडेवर घेऊन दगडाच्या खाणीजवळ उभी रहात असे. तिथे तिचा नवरा दगड फोडायचे काम करीत असे. खडकाचे थरच्या थर तुटून वेगळे झालेले तो बघत असे. वेगवेगळ्या आकाराचे दगड घडताना, आकारांत येताना त्याने पाहिले. एक दिवस त्याने हत्यार उचलून दगडाच्या लादीतून स्वतःच्या आवडीचे शिल्प घडवायला सुरवात केली. हा तो महान कलाकार कसा झाला ही एक मोठी कहाणी आहे. तो फक्त शिल्पकारच नव्हता, तर कवी आणि चित्रकार पण होता.

त्यावेळच्या समाजाने त्याच्या कलाकृतींची फारशी दखल घेतली नाही. समाजाच्या उच्च स्तरांत त्याचे फार मित्र नव्हते. त्याच्या कलागुणांचे कौतुक अमीर उमरावांकडे करुन त्याला समाजांत प्रतिष्ठा मिळवून देतील असे कुणी नव्हते. तरी देखील तो शिल्पनिर्मिती करीत राहिला आणि कला समीक्षकांना आपल्या शिल्पांचे मूल्यमापन करण्याविषयी विनवत राहिला. परंतु समीक्षकांनी त्याची उपेक्षा केली.

रोम हे पुरातन वास्तूंचे शहर आहे. तिथे शेकडो



वर्षांच्या जुन्या वास्तूंचे अवशेष ठिकठिकाणी बघायला मिळतात. एकदा एका उपनगरांत मातीत गाडलेल्या देवळाशेजारी उत्खनन चालू होते. कामगार खणण्याचे काम करत असताना शेजारी उभा असलेला मायकेल अँजेलो एकदम ओरडला ''मला मातीत एका नाजूक पुतळ्याचे सुंदर डोके दिसत आहे. काळजीपूर्वक खोदा.'' कामगारांनी हळूवारपणे खोदून एक सुंदर मानवी शिल्प बाहेर काढले. ही बातमी वाऱ्यासारखी सगळीकडे पसरली. आणि थोड्या वेळांतच कलेचे चाहते, टीकाकार व पुरातन कलाकृतींचा संग्रह करणारे अमीर उमराव तिथे हजर झाले. या कलाकृतीचे कौतुक करायला त्यांना शब्द अपुरे पडू लागले.

''कुठल्या गतकालीन कलाकाराचे हे काम असेल?'' एक म्हणाली. ''आजच्या काळात ह्याच्या जवळपास येईल असे कांहीही नाही.'' दुसरा म्हणाला.

पुष्कळांना तो पुतळा हवा होता. पण सॅन जॉर्जिओच्या धर्मगुरुने सर्वाधिक रक्कम कबूल करुन तो शिल्प आपल्या चर्चमधे नेणार, एवढ्यांत मायकेलअँजलोकडे पहात. एक टीकाकार म्हणाला, ''हे तरुण शिल्पकारा, तू सुद्धां यासारखे कांहीतरी निर्माण करण्याचे स्वप्न पाहिले पाहिजेस.''

''खरंच, तू मोठे स्वप्न पाहिलेस, तर कांही अंशी तरी यशस्वी होशील.'' दुसरा म्हणाला.

''अगदी बरोबर. मी स्वप्न पाहिले आणि हे शिल्प घडले.'' तो म्हणाला.

''तुला म्हणायचंय तरी काय?'' बरेच आश्चर्योद्‌गार निघाले. मायकेलअँजलोने शांतपणे शिल्पाच्या तळाशी असलेल्या आपल्या सहीकडे त्यांचे लक्ष वेधले. इतकेच नव्हे तर या शिल्पाची प्रतिकृती आपल्या घरांतून आणून दाखवली.

नंतर त्याने कबूल केले की त्या शिल्पाला जुने दिसण्यासाठी आपण रंगवले आणि रात्री या जुन्या अवशेषांजवळ आणून पुरले.

आपल्या फजितीची तीव्रता ओसरल्यावर कलाप्रेमी रसिकांनी व टीकाकारांनी मायकेल-अँजलोचे कर्तृत्व, व प्रतिभेचे कौतुकच केले. आणि त्यानंतर मात्र तो दुर्लक्षिला गेला नाही.





# देवसेनाची कथा

अवंती देशाच्या राजधानीत विष्णूचे एक प्रसिद्ध देऊळ होते. विष्णुशर्मा त्या देवळाचा पुजारी होता. त्याने संगीत आणि नाट्यशास्त्राचा सखोल अभ्यास केला आणि या कलांत तो पारंगत झाला. राजस्थानातील श्रीमंत लोकांची मुले या विद्या शिकण्यास त्याच्याकडे येत असत.

देवसेना ही विष्णुशर्माची एकुलती एक मुलगी होती. ती लहान असतानाच तिची आई निधन पावली. मोठी होता होता तिने नृत्य संगीतकला अचूकपणे आत्मसात केल्या. लोक तिच्या कलेचे खूप कौतुक करीत असत. तिचा नाच पहाण्यास सामान्य लोक व मोठे अधिकारी येत असत.

राजा विक्रमसेन तिची प्रसिद्धी ऐकून बहुरुप्याच्या वेषांत तिचे नृत्य पहाण्यास आला. तिचे कौशल्य बघून तो थक्क झाला. तिचे नृत्य, संगीतज्ञान, आणि सौंदर्याने तो मंत्रमुग्ध झाला. त्याने आपली राजधानी भोगिमाला परतल्या बरोबर विष्णुशर्माला निरोप पाठवला की त्याची मुलगी देवसेना हिला राजनर्तकीचे पद बहाल केले आहे.

त्याला उत्तर म्हणून देवसेनेने राजाला एक पत्र लिहिले. त्यांत तिने असे लिहिले की तिने कलेला वाहून घेतले आहे. रसिक जनता आणि पंडित यांच्यासमोरच ती आपली कला सादर करेल. राजनर्तकी बनून दरबाराचे नियम पाळणे तिला शक्य होणार नाही आणि आवडणार देखील नाही. ही गोष्ट राज्यांत सगळीकडे पसरली. लोक असं सुद्धा म्हणायला लागले की राजाला तिच्याशी लग्न करायचे होते, पण तिने नकार दिला.

"देवसेना संगीत, नृत्यात प्रवीण आहे म्हणून ती कोणा महान कलाकाराशी लग्न करु इच्छित असेल." एका शिल्पकाराला असे वाटून त्याने एका गुळगुळीत सुंदर दगडावर देवसेनेची प्रतिमा कोरुन तिला भेट म्हणून पाठवून, तिच्याशी लग्न करायची इच्छा व्यक्त केली.

एका कवीने तिला नायिका बनवून एक महाकाव्य रचले.

एका चित्रकाराने तिचे सुंदर चित्र काढून तिच्याशी विवाह करायची इच्छा दर्शवली.

अशा तऱ्हेने पुष्कळ लोक तिच्याशी लग्न करायला पुढे आले. हे सर्व पाहून देवसेना घाबरली. काय करावे हे तिला कळेना. ती तिची लहानपणापासूनची मैत्रीण राजवैद्यांची मुलगी सुभाषिणी हिचा सल्ला घेण्यास गेली.

सुभाषिणी अतिशय विवेकी मुलगी होती. तिला भल्याबुऱ्याची चांगली समज होती. ती देवसेनेला म्हणाली,

"तुला आयुष्यभर कुमारिकाच रहायचंय की सर्व दृष्टीने तुला आवडणाऱ्या एखाद्या तरुणाशी लग्न करायचे आहे?"

न अडखळता देवसेना तिला स्पष्टपणे म्हणाली, "मी अशा माणसाशी लग्न करु इच्छिते जो माझ्या नृत्य, गायन किंवा रुपावर प्रेम न करता, मी देवसेना, म्हणून माझ्यावर मनःपूर्वक प्रेम करेल."

तिच्या ह्या उत्तरावर सुभाषिणी खूष झाली. ती म्हणाली, "ठीक आहे. माझे वडील औषधोप-चारासाठी कांही जडीबूटी वापरतात, त्यांची मला चांगली माहिती आहे. त्यांतल्या दोन तुला देते. तू एक खाल्लीस की एका तासांत तू काळी कुरुप दिसायला लागशील. दुसरी खाल्लीस कीं कांही क्षणांत पहिल्यासारखी दिसू लागशील."



पहिली बुटी तर तिने तेव्हांच खाल्ली. एका तासात ती काळी कुरुप दिसू लागली. दुसऱ्याच दिवशी तिने शिल्पी, कवी, चित्रकार यांना निमंत्रण पाठविले. ते तिच्याशी लग्न करायला उत्सुक होते. आपल्या भाग्यावर खूष होऊन तिघे तिला भेटायला आले. पण तिचे रूप पाहून ते चकित झाले.

"दुर्दैवाने माझे रूप असे झाले आहे, पण आपल्या तिघांपैकी ज्याला माझ्याशी लग्न करायचे आहे, त्याने पुढे यावे." देवसेना म्हणाली.

तिघेही तिथून पळून गेले.

बाह्य रुपावर मनुष्य किती भाळतो, मोहांत पडतो, याचा प्रत्यक्ष अनुभव देवसेनेला आला.

त्यावेळी देवसेनेचे वडील विष्णुशर्मा आजारी होते. आपल्या मुलीचे हे बदललेले कुरुप रूप

एस.डी.ए. अजीज



त्यांना सहन झाले नाही. कांही दिवसांतच ते मरण पावले. आतां देवसेनेला जवळचे कुणीच राहिले नाही. दुःखाने एक दिवस ती पण घरांतून निघून गेली, व गांवाच्या बाहेरील आमराईत बेशुद्ध होऊन पडली.

थोड्या वेळाने शुद्धीवर आल्यावर तिच्या लक्षांत आले, कीं आपण झोपडीत आहोत, आणि एक तरुण शेतकरी दयेने आपल्याकडे लक्ष देऊन बघतो आहे.

देवसेना कांही बोलायच्या आंतच तो म्हणाला, ''माझं नाव मुकुंद आहे. सकाळी शेतावर जात असताना एका झाडाखाली तुम्हाला बेशुद्ध होऊन पडलेलं बघितलं, म्हणून मी तुम्हाला माझ्या घरी घेऊन आलो. तुम्ही बेशुद्ध कशा झालात? तुम्ही कुठे रहाता?''

सुचातीला थोडं अडखळत, देवसेना म्हणाली, ''माझं या जगांत कोणी नाही. मी अगदी एकटी आहे. जगण्याचा अगदी तिटकारा आला आहे. कुठे तरी निघून जावे म्हणून घराबाहेर पडले पण रस्त्यांत बेशुद्ध होऊन पडले. तुमच्या घरी मला घेऊन आल्याबद्दल आभारी आहे.''

''आपण एकट्या आहात असं म्हणता. कुठे जाणार ते माहीत नाही. आपण इथेच रहावे हेच बरे होईल.''

''तुम्ही पण एकटेच आहात? आपलं सुद्धा दुसरं कोणी नाही?'' देवसेनेने विचारले.

''हो. माझं कोणी नाही. आई, वडील वारले. दोन एकर शेती आहे. त्याच्यावर जगतो आहे. आपण बरोबर राहू शकतो. तुम्ही इथेच रहा.'' मुकुंद म्हणाला.

देवसेनेने होकार दिला. ती मुकुंदच्या बरोबर शेतावर जाऊ लागली आणि जसे जमेल तशी त्याला मदत करुं लागली.

असा एक महिना गेला. देवसेनेला मुकुंदचा स्वभाव फार आवडला. तो तिला जो मान देत असे, त्यामुळे ती खूष झाली. खूप विचार करुन तिने एक निर्णय घेतला. शेतांतले काम संपवून एक दिवस दोघे घरी येत असताना ती मुकुंदला म्हणाली,

''मुकुंद, खूप दिवस आपण एकत्र रहात आहोत. मला सांग, की माझ्याविषयी तुझं काय मत आहे?''

मुकुंद लगेच म्हणाला, ''तू खूप छान बोलतेस. सुस्वभावी आहेस. जगांतल्या घडामोडींच तुला चांगले ज्ञान आहे. याहून एका स्त्रीला अजून काय हवं?''

देवसेना हंसली आणि म्हणाली, ''मी कोण होते आणि आता कशी आहे, याबद्दल तुला सांगायचंय.'' असं म्हणून तिने आपली सारं कांही कहाणी त्याला सांगितली.

आश्चर्याने मुकुंद म्हणाला, ''तू सुखांत होतीस. ते सोडून जाणूनबुजून मुळी खाऊन कुरुप बनून इथे माझ्याबरोबर शेतावर काम करते आहेस?''

''शेताचंच काम नाही तर मला तुझी पत्नी बनून जगायचंय. आता मी काळी कुरुप दिसते आहे, पण पुन्हा सुंदर दिसण्याची मुळी खाते.'' असं म्हणून खांद्यावरच्या पिशवीतली मुळी ती खाणार, इतक्यांत मुकुंदने ती पिशवी घेऊन दूर फेकून देत तिला म्हणाला, ''देवसेने, मला तुझे सौंदर्य नको आहे पण तुझ्यासारखी सद्गुणी धर्मपत्नी हवी आहे.''

मुकुंदचे बोलणे ऐकून देवसेनेच्या डोळ्यांत पाणी आले. दोन आठवड्यांनी त्या गांवातल्या मंदिरात त्यांचे लग्न झाले. तेव्हां सुभाषिणी पण लग्नाला आली. तिने दोघांचे अभिनंदन करुन देवसेनेला म्हटले,

''कांही झालं तरी तू तुझी इच्छा पूर्ण केलीस.''

''हो, सुभाषिणी. आज मी खूप आनंदात आहे. माझं बाह्य सौंदर्य पाहून माझ्याशी लग्न करायला निघालेल्या तरुणांपेक्षा मुकुंद कितीतरी पटींनी श्रेष्ठ आहे.''

ती सुभाषिणीला म्हणाली,

''मुकुंदच्या स्वभावाशी त्यांची तुलनाच करता येणार नाही. मी कुरुप असूनही मुकुंदला मी आवडले, व त्याने माझ्यावर प्रेम केलं. तो लाखमोलाचा आहे. त्याच्याशी लग्न करुन मी धन्य झाले. तो गरीब शेतकरी आहे पण मनाचा श्रीमंत आहे. त्याच्याशी लग्न झाले हे मी माझे सौभाग्य समजते.''

हे बोलताना तिच्या डोळ्यांत आनंद मावत नव्हता.



# तुझ्यासारखाच

रामेश व कामेश हे दोघे शेजारी शेतकरी होते. गांवात रामेशला शब्दांचा जादूगार म्हणत. त्याच्या प्रत्येक बोलण्यांत कांहीतरी वैशिष्ट्य असे. रामेशला हरवावे व लोकांकडून वाहवा मिळवावी अशी कामेशची तीव्र इच्छा होती. पण त्याने केव्हांही प्रयत्न केला तरी तो सफल होत नसे.

त्यावर्षी रामनवमीच्या उत्सवाबद्दल प्रमुख गांवकऱ्यांची चर्चा सुरुं होती. रामेश ज्या सूचना सांगत होता, त्याविरुद्ध भीमेश सारख बोलत राहिला. म्हणून रामेशने कांहीही सूचना द्यायच्या नाहीत असा निश्चय केला.

त्याला सहानुभूती दाखवीत कामेशने विचारले, "काय झालं रे? तू सल्ला देणे बंद केलेस?"

"जिथे परिस्थिती अनुकूल नसते, तिथे गप्प बसणे हेच योग्य असते." रामेशने उत्तर दिले.

"तुझं कुणी ऐकत नाही म्हणून नाराज झालास कां?" कामेशने त्याला डिवचण्यासाठी विचारले.

"गरीबाची नाराजी त्याचे नुकसानच करते." रामेश म्हणाला.

"समजलं. तुझा मोठेपणा त्यांना मान्य नाही. पण म्हणून तू सीताराम विवाहात भाग सुद्धां घेणार नाहीस कीं काय?"

"अरे, परमेश्वराच्या दारांत कोण मोठा नि कोण लहान? सगळे सारखेच असतात." रामेश म्हणाला.

"सगळे सारखे असतात ना? मग सगळेच पालखीत बसले तर उचलणार कोण?" कामेशने वाहवा मिळवण्यासाठी या म्हणीचा वापर करुन सर्वांकडे हेतूपूर्वक बघितले. रामेश लगेच म्हणाला, "तुझ्यासारखाच कुणी ना कुणी असेलच की!" सगळे हंसू लागले. कामेशचे तोंड मात्र उतरले.

*- श्री रामकमल*





# पंचकल्याणी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एक उत्तम जातीच्या घोड्याचा अवतार धारण केला. राजाच्या तबेल्यांतल्या घोड्यांमध्ये तो घोडा पंचकल्याणी म्हणून ओळखला जाई. म्हणून त्याच्या खाण्यापिण्याची, वस्त्राभूषणाची व खोगीर वगैरेंची राजेशाही थाटांत व्यवस्था करण्यात येत असे.

राजाच्या तबेल्यातील फक्त त्या घोड्याला जुन्या धान्याचा दाणा देण्यांत येई. तिसऱ्या वर्षापासून त्याची देखरेख स्वतंत्रपणे केली जाऊं लागली. त्याला जो दाणापाणी देण्यात येई तो इतर सामान्य घोड्यांसारखा नसे. एक हजार मोहोरा खर्च करून तयार केलेल्या सोन्याच्या ताटांत त्याला दाणा दिला जाई. त्याचा तबेला सुगंधी द्रव्यांनी शिंपडलेला असे. त्या तबेल्याच्या चारी बाजूला सुंदर पडदे लावलेले होते. शिवाय सोनेरी फुलांच्या कांठाची चमकदार चांदणी लावलेली होती. चारही भिंतींवर सुवासिक फुलांच्या माळा सोडलेल्या होत्या. रात्रंदिवस त्या तबेल्यात सुवासिक उदबत्त्यांच्या धूप दरवळत होता. सर्व वातावरण कसे शोभिवंत व प्रसन्न होते. अशा तऱ्हेने त्या घोड्याचा तबेला सजवलेला असे.

अशा तऱ्हेने अश्वाला शोभिवंत करून ठेवलेले पाहून काशी राजाच्या सामंतांना त्याचा हेवा वाटू लागला. त्याचा पाणउतारा कसा करता येईल याचा ते सारखा विचार करू लागले. एकदा सात मोजक्या प्रमुख सामंत राजांनी मिळून एक कारस्थान रचले. त्यांनी एक पत्र लिहून एका दूताला काशी राजाकडे पाठविले. त्या पत्रांत त्यांनी लिहिले होते की तुम्ही आपले राज्य आम्हाला देऊन तरी टाकावे, नाही तर युद्धाला तयार रहावे. लगेच काशी राजाने आपल्या सर्व मंत्र्यांची सभा बोलाविली आणि आलेल्या



प्रसंगाला कसे तोंड द्यावयाचे या विषयी त्यांचा सल्ला विचारला. मंत्री म्हणाले - "महाराज! आपण स्वतः युद्धाला जाण्याची गरज नाही. आपण आपले सेनापती वीरवर्मा यांस युद्धाला पाठविले तरी पुरे! ते युद्ध जिंकून येतील. त्यांना शक्य झाले नाही तर पुढे काय करावयाचे याचा विचार करतां येईल."

म्हणून काशी राजाने सेनापतीला बोलाविले व तो त्याला म्हणाला -

"सेनापती! आपल्यावर सात सामंत राजे चालून आले आहेत. त्यांना जिंकणे तुम्हाला शक्य आहे का?"

राजाला उत्तरादाखल सेनापती म्हणाला -

"महाप्रभु! महाराजांचा अत्यंत प्रिय असा पंचकल्याणी घोडा आपण देऊ शकलात तर या सातही सामंतांनाच नव्हे तर सर्व देशभरचे लोक आले तरी जिंकणे अशक्य नाही."

वीरवर्मा राजाला आत्मविश्वासपूर्वक म्हणाला. राजाला ते ऐकून फार आनंद झाला. त्याने अत्यंत आनंदाने पंचकल्याणी घोडा देऊन आणि सेनापतीला प्रोत्साहन देऊन निरोप दिला.

राजाचा निरोप घेऊन सेनापती लगेच पंच-कल्याणी घोड्यावर बसून युद्ध करायला रणांगणावर गेला.

वीरवर्मा विजेसारखा किल्ल्यांतून घोड्यावर बसून शत्रूवर तुटून पडला. त्याने पहिल्या सामंताशी साहसाने युद्ध करून त्याला कैद केले. नंतर तो पुन्हां रणांगणावर येऊन दुसऱ्या सामंताला आणि त्यानंतर क्रमाने पांच राजांना जिंकून त्यांना त्याने कैद केले.



सहाव्या राजाशी युद्ध करीत असताना त्याच्या घोड्याला एक जबर जखम झाली आणि जखमेतून रक्त येऊ लागले.

वीरवर्माने आपल्या पंचकल्याणी घोड्याला एका दाराजवळ बांधून ठेवले आणि आणखी एका घोड्यावर बसून युद्धाला जायचा विचार करू लागला. म्हणून तो पंचकल्याणी घोड्याचे खोगीर व लगाम वगैरे काढू लागला.

तेव्हां पंचकल्याणी रूपांत असलेल्या बोधिसत्वांनी सेनापती काय करीत आहेत ते त्यांनी आपले डोळे उघडून पाहिले.

"अरेरे, हे शूर सेनापती! तू किती भोळा आहेस रे! मला जखम लागलेली पाहून तू दुसरा घोडा तयार करू लागलास? सातव्या शत्रुसैन्याचा व्यूह भेद करून सातव्या सामंताला कैद करणे त्या घोड्याला शक्य तरी होईल का? तू दुसऱ्या घोड्याला घेऊन गेलास तर आतापर्यंत मिळविलेला जय व्यर्थ होईल. तू निष्कारण शत्रूच्या हाती कैद होशील व शत्रू हालहाल करून तुला ठार करील, आणि आपले दोघांचे मालक काशीराज शत्रूच्या हातांत अगदी सहजी कैद होतील. सातव्या सामंताला जिंकणे फक्त मलाच साध्य होईल, आणखी कोणत्याही घोड्याला ते शक्य नाही. हे तुला कसे कळत नाही?" असा विचार करीत पंचकल्याणी घोडा फार दुःखी झाला.

तो तेवढ्यावर थांबला नाही. त्याने वीर-वर्मालाजवळ बोलाविले व तो त्याला म्हणाला -

"हे वीरवर! सातव्या राजाला जिंकणं हे काम माझ्याशिवाय इतर कोणत्याही घोड्याला शक्य



नाही! मी आतापर्यंत साध्य करून घेतलेले काम व्यर्थ करू नकोस! कोणत्याही परिस्थितीत धैर्य व साहस सोडता कामा नये. तसाच आत्मविश्वासही सोडून चालणार नाही. म्हणून माझ्यावरच पूर्ण विश्वास ठेवून, मला जखम झाली एवढ्यावर घाबरून जाऊन मला सोडू नकोस. माझ्या जखमेवर पट्टी बांध व लवकर माझ्यावर स्वार होऊन रणांगणावर जा.'' अशा तऱ्हेने त्याने अनेक प्रकारे समजावून सांगितले.

वीरवर्माने लगेच आपल्या पंचकल्याणी घोड्याच्या जखमेला पट्टी बांधली व त्याला तयार केले. तो त्याच्यावर बसून निघतांच तो विद्युत् वेगाने निघाला. त्याने सहावाच नाही तर सातवा व्यूहही भंग केला. वीरवर्माने सातव्या सामंताला जिंकून त्यालाही कैद केले. अशा तऱ्हेने वीरवर्माला त्या युद्धांतही जय मिळाला.

सातही सामंतांना कैद करून वीरवर्माने काशीराजाच्या समोर नेऊन उभे केले. पंचकल्याणी घोडासुद्धा तेथे आला आणि राजाला म्हणाला,

''प्रभो! हे सातही सामंत राजे तुझ्याचसारखे राजेच आहेत. त्यांचा वध करणे योग्य होणार नाही. त्यांचा अपमान करणेसुद्धा रास्त नाही. तू त्यांना कोणत्याही एका अटीवर सोडून देणेच श्रेयस्कर होईल! राजा, उदारतापूर्वक शत्रूला क्षमा करून न्याय व धर्माने राज्य कर!''

पंचकल्याणी घोड्याने या शब्दांत राजाला उपदेश केल्यावर सैनिकांनी पाठीवरचे खोगीर व तोंडातून लगाम काढला. आणि घोड्याच्या अंगावरचे दागिने काढले. ते काढीत असतांनाच पंचकल्याणी घोड्याने अंग टाकले आणि त्याचे पंचप्राण पंचतत्वात लुप्त झाले!

त्यानंतर काशी राजाच्या आज्ञेने सर्व गौरव व मानमरातबाने त्या घोड्याची उत्तरक्रिया करण्यात आली. वीरवर्माचा राजदरबारात सत्कार झाला. सातही सामंत राजांना आदरपूर्वक त्यांच्या त्यांच्या राज्यात परत पाठविण्यात आले. त्या दिवसापासून बोधिसत्वांना मान्य असलेल्या धर्म व न्याय पद्धतीने राजाने राज्य करून कीर्ती संपादन केली.







# रामायण

भरत आपल्या मामाबरोबर आजोळी गेला. शत्रुघ्न पण बरोबर गेला. आजोळी कोणत्या गोष्टीची कमतरता? त्यांना आपल्या घरची आठवण सुद्धां राहिली नाहीं. तरी म्हाताऱ्या वडिलांची व प्रेमळ भाऊ राम याची त्यांना सारखी आठवण येत असे.

दशरथ राजाला पण आपल्या दोघां मुलांची सारखी आठवण येत असे. पण राम अयोध्येला असल्याकारणाने त्याने वडिलांना कोणत्याही प्रकारची उणीव भासू दिली नाही.

उतारवय होत गेले, तसे राजाला वाटूं लागले कीं आतां हे राज्य रामाला सोंपवून आपण वानप्रस्थाश्रमांत प्रवेश करावा. रामाला गादीवर बसलेला पाहिले म्हणजे डोळ्याचे पारणे फिटेल.

राजाने आपल्या मंत्र्यांचा सल्ला विचारला. त्यांनी पण राजाचा राज्याभिषेक करण्यास आपली संमति दिली. त्याच्या मांडलिक राजांचे व प्रजेचे मत का ते घ्यायचे उरले होते. म्हणून राजाने सर्व राजांना निमंत्रण पाठविले व त्यांचा सल्ला विचारला. फक्त राजा जनक व कैकेयीचे वडील कैकेय दूर असल्यामुळे त्यांना तो बोलावणे पाठवूं शकला नाहीं.

दशरथ राजाच्या निमंत्रणाला मान देऊन सर्व मांडलिक राजे दरबारांत हजर झाले. राजधानीतले प्रमुख नागरिक व कांही शेतकरी पण आले. राजा त्यांना आदरपूर्वक म्हणाला, ''आतां मी वृद्ध झालो आहे. राज्याचा भार संभाळणे मला शक्य नाही. विश्रांतीची आवश्यकता आहे. राम पराक्रमी आहे. राज्य कारभाराचा त्याने अनुभव घेतला आहे. त्याचा राज्याभिषेक करून टाकला म्हणजे प्रजेच्या कल्याणाची मला फिकीर राहणार



नाहीं. तुम्हाला हे पसंत नसेल तर दुसरा उचित सल्ला द्या.''

तें ऐकून सर्वांनी पाळीपाळीने मत दिले कीं रामाचा राज्याभिषेक करावा व तो लवकरच करावा.

दशरथ राजाने थट्टेखातर त्यांना विचारले, ''रामाचा राज्याभिषेक लवकर करायला सांगता आहात म्हणजे माझा राज्यकारभार तुम्हाला पसंत पडला नाही! मी नुसता सल्ला विचारला. पण तुम्ही सर्वजण म्हणता आहात कीं राज्याभिषेक करावा व तोही लवकर करावा.''

एक दरबारी मंदस्मित करून राजाला म्हणाला, ''महाराज! आमच्यापैकी पुष्कळ लोक वृद्ध झाले आहेत. हा उत्सव स्वतःच्या डोळ्यांनी पहायला मिळेल या हेतूने त्यांनी ही सूचना केली आहे.''

कांही दरबारी त्यावर राजाला म्हणाले - ''रामासारख्या सद्गुणी युवराजाचा राज्याभिषेक लवकर पहायला मिळावा हे आम्हा तरुणांना देखील वाटते. महाराजांना पण त्यांत आनंद वाटेल.''

उत्तरादाखल राजा त्यांना म्हणाला, ''राम गादीवर बसला म्हणजे मी मोकळा झालो. प्रजेला व तुम्हाला सर्वांना हा सल्ला पसंत आहे, हे ऐकून माझ्या मनाचे समाधान झाले.''

नंतर राजाने वशिष्ठ, वामदेव, जावाली आदि ऋषी व मुनींना निमंत्रण पाठविले. ते आल्यावर राजाने रामराज्याभिषेकाची तयारी करण्यास विनंति केली. तो त्यांना म्हणाला -

''आपल्या सर्वांच्या आशीर्वादाने राम राज्याकारभार संभाळण्यायोग्य झाला आहे. त्याचा राज्याभिषेक पहायला सर्व प्रजा आतुर आहे. तरी या उत्सवाला आवश्यक ती सर्व सामुग्री एकत्र करावी.''

राजाने आपला प्रधान सुमंत्र याच्या बरोबर रामाकडे निरोप पाठविला. तो रामाला बोलावून घेऊन आला. दशरथ रामाला प्रेमाने म्हणाला,

''बाळ! तुझा राज्याभिषेक करावा असे सर्व दरबारी व प्रजेचे मत आहे.'' असे सांगून राजाने रामाला निरोप दिला.

रामाची मित्रमंडळी जमा झाली. त्यांनी रामाचे अभिनंदन केले व कौसल्या मातेला ती आनंदाची बातमी जाऊन सांगितली. ज्याने ती सुवार्ता सांगितली त्याला कौसल्या मातेनें गळ्यांतला मोत्यांचा हार काढून दिला.



नंतर राजाने सुमंत्र वगैरे आपल्या मंत्र्यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. सर्वांमते असे ठरले कीं दुसऱ्याच दिवशी चांगला मुहूर्त असल्या कारणाने राज्याभिषेक उरकून घ्यावा. दशरथाने पुन्हां रामाकडे निरोप पाठविला.

सारथी रथ घेऊन आलेला पाहून रामाला आश्चर्यच वाटले. राम त्याला म्हणाला, ''मी आतांच तर महाराजांचे दर्शन करून आलो! पुन्हां इतक्या तांतडीने बोलावण्याचें कारण समजले नाही!''

''महाराजांनी आपल्याला बोलावून आणायला सांगितले म्हणून आम्ही आलो. आतां येणें न येणे आपल्या मर्जीवर!'' सारथी थट्टेत रामाकडे बघून हंसत म्हणाला.

राम वडिलांच्या आज्ञेप्रमाणे पुन्हां रथांत बसून निघाला. रामाला आलेला पाहून राजा गदगद-लेल्या कंठाने म्हणाला,

''बाळ! राज्याभिषेकाचा मुहूर्त उद्यांचाच ठरला आहे. एक तर मी म्हातारा झालो आहे. मला वाईट स्वप्ने पडूं लागली आहेत. ज्योतिष्यांनी उद्यांच हा समारंभ उरकून घ्यायला सांगितले आहे.

आज रात्री तूं व सीता दोघांनी व्रत करावयाचे आहे. तुझा भाऊ भरत समारंभाला हजर राहूं शकणार नाही हे मनाला बरे वाटत नाही. पण नाईलाज आहे. आपला त्याचा स्वभाव चांगला आहे. तुझ्यावर त्याचे फार प्रेम आहे.''

राम वडिलांचा निरोप घेऊन कौसल्या



मातेच्या महालांत गेला. त्यावेळीं कौसल्या माता राज्यलक्ष्मीची पूजा करीत होती. दुसऱ्याच दिवशीचा मुहूर्त ठरल्याची गोष्ट तिच्या आधी सुमित्रेला कळली होती.

म्हणून ती बरोबर लक्ष्मणाला व सीतेला घेऊन कौसल्येकडे आली.

रामाने आईला नमस्कार केला आणि तिला नम्रपणे विचारले,

''आई, वडिलांनी उद्यांच राज्याभिषेक करण्याचे ठरविले आहे. तर मी व सीता दोघांनी दुसरे कांही व्रत वगैरे करावयाचे असेल तर सांग.''

राम लक्ष्मणाला म्हणाला - ''मी राजा झालो तरी राज्याचा सर्व भार तुझ्यावरच टाकणार आहे. सूर्यवंशांतल्या बाकी सर्व गोष्टी मला आवडल्या.



पण मोठ्यालाच राज्याभिषेक करतात हे मात्र मला नाही आवडले.''

सीतारामांनी दोघी मातांना नमस्कार केला व दोघे आपल्या महालांत गेली.

वशिष्ठमुनि रामाच्या महालांत आले. त्यांनी त्या दिवशी रामाकडून सर्व देवांची पूजा करविली आणि त्या दिवशीं फक्त फलाहार करावयास सांगितले.

रामाला आशीर्वाद देऊन ते घरी जात असतां राजधानींत त्यांना सर्वत्र लोकांची गर्दी दिसली. लोक पताका व तोरणें बांधण्यांत गर्क होते.

त्या दिवशीं रात्री वडिलांच्या व गुरु वशिष्ठ यांच्या आज्ञेप्रमाणें सीतारामांनी नारायणाच्या देवळांत जाऊन पूजा केली व उपवास केला.

पहाटे नौबत वाजूं लागली. सनईचा गोड आवाज ऐकून राम व सीता उठले. स्नान संध्यादि आटोपून राम सीतेसह पुण्याहवाचनाला बसला. मंगलवाद्ये वाजूं लागलीं. सारे नगर आनंदांत मग्न होऊन गेले.

उजाडतांच अयोध्येच्या नागरिकांनी आपल्या घरासमोर मांडव उभे केले. केळ्यांचे खांब लावून आंब्याच्या पानांची तोरणे बांधली. बायकांनी अंगणात सडा घालून सुंदर रांगोळ्या काढल्या. मुलें नवीन वस्त्रें घालून आपल्या वडिलांबरोबर राज्याभिषेक उत्सव पाहण्याची तयारी करूं लागली.

परंतु देवाला हा सर्व आनंद पाहवला नाही. ज्यावेळी सर्व अयोध्या नगरी राज्याभिषेकाच्या तयारींत निमग्न होती त्याच वेळीं कैकेयीच्या महालांत दुसऱ्याच एका नाटकाची तयारी चालू होती.

कैकेयीकडे मंथरा नांवाची एक कुबडी दासी होती. ती कैकेयीच्या महालांत पोंचली तेव्हां ती पलंगावर घोरत पडलेली होती. मंथरेने महालाच्या सज्जांत उभी राहून अयोध्येत राज्याभिषेकाची चालू असलेली तयारी पाहिली. प्रथम तिला ते सर्व कळले नाही. तिने एका दासीला विचारले तेव्हां ती हंसून म्हणाली - ''अग बाई! तुला माहीत नाही का? अग, रामाचा राज्याभिषेक नाही का उद्यां?''

''केव्हां, सकाळी?'' मंथरेने विचारले.

''उजाडताच!'' दासी म्हणाली आणि निघून गेली.



उजाडताच! आणि रामांचा राज्याभिषेक? मंथरेला तो शुभ समाचार अशुभ वाटला. ठरला केव्हां समारंभ? मला किंवा मालकिणीला कांहीच बातमी नाही कशी? ती आपल्या मालकिणीच्या खोलीत गेली व तिला हलवून जागे केले - ''बाई-साहेब उठा! तुमच्या घराला आग लागली आहे आणि तरी तुम्ही गाढ झोंपलांत कशा काय?''

कैकेयी घाबरून उठून बसली आणि विचारूं लागली -

''आग? कुठे आहे?''

''कुठे आहे? जरा बाहेर येऊन पहा तरी! राजधानीभर मंगलवाद्यें वाजत आहेत आणि तुम्हाला कांहीं वार्ताच नाही? आश्चर्य आहे!'' मंथरा म्हणाली.

''तुझे डोकेबिके तर नाहीं फिरले? झाले आहे तरी काय तुला?'' कैकेयीने विचारले.

''माझे डोके नाहीं, तुमचे भाग्य फिरले आहे तुमच्या विरुद्ध! म्हणे, महाराजांची लाडकी राणी! कळले सारे !'' मंथरा म्हणाली.

''अग पण, बोलशील तरी, सांग बरं मला काय झाले ते!'' कैकेयीनें विचारले.

''उद्यां महाराजांनी रामाचा राज्याभिषेक करावयाचा ठरविला आहे. पण मला काय त्याचे? तुमचे अनिष्ट पहावत नाही म्हणून आले धांवत.'' मंथरा म्हणाली.

''रामाचा राज्याभिषेक! खरेच का मंथरा? माग काय वाटेल ते मागून घे! ही माझी मोत्याची माळ प्रथम घे आणि वर काय पाहिजे ते माग.''



कैकेयी म्हणाली. मंथरेला कैकेयीचा हा भोळसटपणा बिलकुल आवडला नाही.

ती कैकेयीला रागाने म्हणाली - "माझे डोके फिरले आहे का, विचारलेत तुम्ही? पण मला दुसरेच दिसते आहे. अहो, आतां मी काय सांगूं? तुमच्या घराला आग लावण्यासाठी तुमच्या सवतीने एवढे मोठे कारस्थान केले आणि तुम्हाला त्याचे कांहीच वाटत नाही. त्या पट्टराणीसाहेब उद्यां राजमाता झाल्या कीं भरताला व तुम्हाला बंदीवास, आणि आयुष्यभर दास्य भोगावे लागेल."

मंथरेने पाहिलें की तिचा गुरुमंत्र मर्मी पडला आहे. ती पुढे म्हणाली - "तुम्ही मला हा कंठहार द्यायला तयार झाला आहात! मी तो घेईन, पण आतां नाहीं. भरत राजा झाला तरच.

अहो! आतां मी काय सांगूं? तुम्हाला स्वतःलाच हे नको का कळायला? नाहीतर दुःखाच्या वेळीं तुम्हाला आनंद नसता वाटला. आतां तुमच्याबद्दल मीच रडते. महाराजांचे आपल्यावर एवढे प्रेम आहे, तर भरताला सोडून रामाला त्यांनी राज्य कां दिले? त्यांच्या मनांतले काळेबेरें तुम्हाला नाही कळणार.

राम राजा झाला कीं भरताला अयोध्येंत पाऊल तरी टाकूं देईल का? तुमच्या सवतीने खूप मोठा डाव टाकला आहे."

कैकेयीच्या मनांत सवतीमत्सर उत्पन्न करण्यासाठी ती आणखी पुढे म्हणाली - "तुम्ही महाराजांच्या प्रेमाची परीक्षाच कां नाहीं घेत? सांगा कीं भरत तुमचा मुलगा नाही का? भरताला राज्य द्या. भरताला राज्य व रामाला वनवास द्यायला सांगा! सवतीकडून मूळ व्याजासहित सर्व वसूल करून घ्या. भरत राजा झाला कीं तुम्ही राजमाता! पण जर का राम राजा झाला तर, नको बाई, तो विचारच करवत नाहीं!"

मंथरेनें दुधांत विष कालवले. कैकेयीच्या कपाळाला आठ्या पडूं लागल्या. ती मंथरेला म्हणाली - "भरतच राजा होणार! पहाते राम कसा राजा होतो ते. त्याला वनवास भोगावा लागेल. पण हे होणार तरी कसे?"

*(पुढील गोष्ट पुढील अंकी)*







# राजकुमारी लवंगलता

पूर्वेच्या महासागरांत सुवर्णद्वीप नांवाचे एक बेट होते. त्याचा राजा धीमन ह्याला एक मुलगी होती. तिचे नांव लवंगलता. ती सुंदर तर होतीच, पण नृत्य, संगीत, चित्रकला, व इतर विद्यांमधे पण पारंगत होती. जेव्हां ती लग्नाच्या वयाची झाली तेव्हां धीमन राजाला तिच्या लग्नाबद्दल काळजी वाटूं लागली.

राजा धीमनने तिच्या स्वयंवराची तयारी केली. अनेक देशांतले राजकुमार व राजे त्या स्वयंवरासाठी आले, पण लवंगलतेला त्यांच्यापैकी कुणीही पसंत पडला नाही. धीमनराजाने तिला आश्चर्याने विचारले, "इतक्या राजे-राजकुमारांपैकी तुला एकही पसंत पडला नाही, हे कसं काय? तुझ्या मनांत काय आहे ते तरी मला स्पष्टपणे सांग."

तेव्हां लाजतलाजत राजकुमारीने सांगितले, "मी ऐकलंय कीं रत्नदीप बेटाचा राजा शशांक देखणा, धाडसी व बुद्धिमान आहे. माझ्या मैत्रिणी म्हणतात कीं तोच माझ्यासाठी योग्य आहे!"

"हे मला अगोदर तरी सांगायचंस." असं म्हणून राजाने मंत्र्याबरोबर विचार विनिमय केला. सुवर्णद्वीपाहून रत्नदीप बेटाला जाण्यासाठी समुद्रमार्गाने तीन महिने लागत असत.

मंत्र्याने सल्ला दिला, "या विवाहाच्या प्रस्तावाबद्दल शशांकचा विचार जाणून घ्यायला हवा. त्यासाठी आपण एक दूताबरोबर राजकुमारीचे चित्र व संदेश नेणारे कबुतर पाठवूं या म्हणजे शशांकचा विचार आपल्याला लवकर समजेल."

मंत्र्याच्या कल्पनेनुसार धीमनराजाकडून एक दूत नजराण्यासहित रत्नदीपला जायला निघाला. तो गेल्यानंतर शंभर दिवसांनंतर कबुतर माहितीसह परत आले. राजा शशांक त्याच्या कारभारांत गुंतलेला होता, म्हणून त्याला सुवर्णद्वीपला यायला सवड नव्हती. पण जर लवंगलता, रत्नदीपला जाऊं शकली असती, तर योग्य निर्णय घेता आला असता. विवाहापूर्वी वधूला वराच्या घरी



धाडणे हे रीतिरिवाजाविरुद्ध होते खरे, पण धीमनराजा तो नियम मोडण्यासाठी तयार झाला. त्याने एका मोठ्या नावेत अमूल्य भेटी भरल्या आणि राजकन्या लवंगलतेच्याबरोबर आपल्या पुरोहितालाही रत्नदीपला धाडले.

रत्नदीपच्याजवळ जेव्हां ही नाव येत होती, तेव्हां एका रात्री त्या नावेला दोन्ही बाजूंनी समुद्रावरच्या चोरांनी घेरले. सुवर्णद्वीपच्या पुरोहिताने त्यांच्याशी मोठ्या धैर्याने सामना दिला, पण त्याचा कांही फायदा झाला नाही. त्या चोरांनी या नावेवर प्रवेश मिळवला.

लवंगलतेला धोक्याची स्वच्छ कल्पना आलेली होती. म्हणून तिने सगळ्या अंगावर नावेवरचा काळा रंग फासला. त्याच परिणाम पंधरा दिवस टिकणारा होता. तिने आपले लांबसडक केस कापून टाकले, आणि नाविकांचे कपडे घातले. नंतर राजपुरोहिताबरोबर तीदेखील दोरखंडांच्या ढीगाच्यामागे लपली.

त्या सागरी चांच्यांनी नावेंतले सर्व सामान सुमान लुटले, आणि नाव सोडून जाण्यापूर्वी त्यांनी नावेच्या तळाच्या भागांत एक भोक पाडले. नंतर ते त्यांच्या नावेवर चढून पळून गेले. ही नाव मात्र समुद्रांत बुडाली.

त्या नावेवर एक लहानशी होडी होती. नावेवरचे सारे लोक मरण पावले, परंतु दोघे नाविक बेशुद्ध होते, तरी जिवंत होते. ते शुद्धीवर आल्यावर लवंगलता आणि राजपुरोहिताबरोबर त्यांनी त्या होडींतून तीन दिवस प्रवास केला, आणि ते रत्नद्वीपला पोंचले.

लवंगलता आणि पुरोहित त्या दोघा नाविकांबरोबर राजधानींत पोंचले. रस्त्यांतच त्यांना राजाची धोबीण भेटली. त्यांची सारी हकीकत ऐकल्यानंतर धोबीणीने त्यांना त्यांचे काम पुरे होईपर्यंत तिच्या घरी येऊन राहाण्याचे निमंत्रण दिले. लवंगलताने त्या निमंत्रणाचा स्वीकार केला.

त्या दिवशी राजपुरोहित रत्नदीपच्या शशांक राजाला भेटला आणि लवंगलता तिथे पोंचली असल्याची माहिती त्याने दिली. शशांकने एक पालखी पाठवून तिला महालांत बोलावून घेतले. धोबीणीने तिच्याजवळचे उत्तम कपडे राजकुमारीला दिले. ती वस्त्रें नेसून लवंगलता शशांकला भेटायला गेली. पण तिला बघून शशांक मात्र निराश झाला. राजवंशात इतकी काळीकुट्ट कन्या असेल यावर त्याचा विश्वास बसेना. यांत



कांहीतरी विश्वासघात आहे, असे वाटून शशांकने तिला परत पाठवले.

धोबीणीने राजकुमारीला धीर दिला. धोबीणीच्या ओळखीची एक माळीण होती. केस लवकर वाढण्यासाठी त्या माळीणीजवळ एक औषध होते. पंधरा दिवसानंतर लवंगलतेचा काळा रंग साफ उतरला व तिचे केसदेखील वाढायला लागले.

राजमहालासाठी हार, गजरे तयार करणारी फुलवाली सुरमा, हिने पंधरा दिवसांतच लवंगलतेला पूर्वीसारखी देखणी बनवले. पण आता तिला शशांकराजाकडे कशी पाठवायची?

त्यासाठी लवंगलतेला एक युक्ती सुचली. तिलाही तऱ्हेतऱ्हेचे हार, माळा गुंफण्याची कला ठाऊक होती. तिने शशांकराजासाठी एका खास प्रकारची माला तयार केली आणि सुरमाच्यामार्फत ती राजाकडेपाठवली. ती सुरेख माळ पाहून शशांकला आश्चर्य वाटले. त्याने सुरमाला विचारले, "आज-पर्यंत इतकी सुंदर माळ तू कधीच गुंफली नव्हतीस."

"महाराज! ही माळ मी नाही गुंफली. ती एका तरुणीने खास करुन आपल्यासाठीच गुंफलेली आहे. ती आपणच धारण करावी." सुरमाने उत्तर दिले. "ही माळ बनवणाऱ्या त्या तरुणीला तू माझ्याकडे पाठवशील कां? ही माळ कशी काय गुंफली जाते ते मला बघायचे आहे." राजाने आपली उत्सुकता प्रकट केली.

"महाराज! आपण चकित व्हाल. ती तरुणी एका थाळींतली फुले घेऊन आपले नांव उच्चारते.



आणि त्या फुलांवर फुंकर घालते. नंतर ती फुले एका भांड्यात घालून त्यांतून त्यांची माळ बाहेर काढते. अशा प्रकारे बनलेली माळ फक्त आपल्या-साठीच असते." सुरमाने सांगितले.

"ही तर अजब गोष्ट आहे. त्या युवतीला मला एकदा भेटलं पाहिजे. एक दिवस तिला घेऊन येशील कां?" राजाने विचारले.

सुरमा घरी परत गेली आणि लवंगलतेला म्हणाली, "राजकुमारी, माझी चाल यशस्वी झाली बरं कां!" त्यानंतर लवंगलताने चमेलीची फुले मागवली, त्यांतली निम्मी फुले घेऊन एक मोठी माळ गुंफली. उरलेली फुले तिने एका थाळींत ठेवली. त्यानंतर माळेची गुंडाळी तिने डाव्या हातावर घेतली व त्यावर फुलांची थाळी ठेवली. पण थाळीखालची माळ कांही दिसत नव्हती. पालखीतून राजमहालांत जाताना नेसलेली वस्त्रेंच

तिने पुन्हां नेसलेली होती. राजकुमारी महालाकडे जायला निघाली.

शशांकने तिच्याकडे पाहिले आणि पहिल्याच नजरभेटींत त्याला ती आवडली. लवंगलतेनेदेखील त्याच्याशी राजदरबारी थाटांत प्रश्नोत्तरे केली.

"तू माळा कशा गुंफतेस, ते आम्हाला दाखव ना!" शशांकने विचारले.

"माळांचे प्रकार गुंफायची शक्ती माझ्यांत नाही. माझ्या हातून परमेश्वरच माळा गुंफून घेतो. ज्या व्यक्तीवर माझे मन जडले आहे, अशा व्यक्तीच्या मागणीनुसार माझ्या हातून माळ बनली जाते." लवंगलताने नम्रपणे उत्तर दिले.

"माझ्यासाठी एखादी माळ तुला तयार करता येणार नाही कां?" शशांकच्या मंत्र्याने विचारले.

"क्षमा करावी. मला ते जमणार नाही. परमेश्वराला माझे मन ठाऊक आहे. ज्या व्यक्तीवर माझा जीव जडला आहे, त्या व्यक्तिसाठीच केवळ माझ्या हातून परमेश्वर माळा बनवतो." लवंगलताने सांगितले.

"म्हणजे माझ्यावर तुझे मनःपूर्वक प्रेम आहे कीं काय?" शशांकने विचारले.

"ती परमेश्वराची इच्छा आहे. तिथे चूक कशी असेल?" लवंगलताने विचारले.

"तर मग ती परमेश्वराचीच इच्छा आहे हे तू सिद्ध करुन दाखव." शशांक म्हणाला.

तेव्हां लवंगलताने आपल्या डाव्या हातांतली फुलांची थाळी शशांकला दाखवली.

त्यांत चमेलीची सुटी फुले भरलेली होती. लवंगलताने शशांकला सांगून एक मोठे चांदीचे पात्र मागवले. त्या पात्रांत तिने थाळीतली फुले ओतली व त्याच्या नकळत ती माळदेखील त्या पात्रांत घाडली.

त्यानंतर त्या फुलांबरोबर असलेली माळ दिसूं लागली. लवंगलताने ती माळ शशांकच्या गळ्यांत घातली. शशांक मनांतल्या मनांत म्हणाला, "ही तरुणी चित्रापेक्षां जास्त सुंदर दिसते आहे." आणि त्याने उघडपणे विचारले. "आता या उरलेल्या सुट्या फुलांचं काय करायचं?"

"महाराज! आपण थोडा वेळ थांबावं म्हणजे मी ह्या फुलांची माळ गुफते." सुरमा म्हणाली.

सुरमाने माळ गुंफली आणि ती माळ शशांकने लवंगलताच्या गळ्यांत घातली.






















# वाचकांच

***बालसेवक, इंदौर***

मी सातव्या वर्षापासून चंदामामा वाचतो आहे. इंदोरमधे चंदामामाचे नियमित वाचक भरपूर आहेत हे ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटेल. गेल्या २८ वर्षातले सर्व अंक आम्ही जपून ठेवले आहेत. मुलांसाठी इतर बरीच मासिके आहेत, पण त्या सर्वांत चंदामामा जास्त चमकतो, कारण त्यांतल्या गोष्टी आणि पारंपारिक मूल्ये यांचा मनावर होणारा परिणाम दीर्घकाळ टिकतो. आम्हाला खरोखरीच वाटतं कीं, १. चंदामामांतल्या वेद, पुराणें, उपनिषदे व नीतिकथामुळे मासिक अद्वितीय ठरते. २. बोध कथा, लोककथा, शौर्यगाथा व साहसकथांमुळे त्याचे वेगळेपण दिसते. ३. शंकर व चित्रा यांची आकर्षक चित्रे मासिकाची रंगत वाढवतात. मी आणखीही बरेच लिहू शकेन, तरीही चंदामामाचे गुणगान संपणार नाही!

***नीलमणी भाटिया, नवी दिल्ली***

नवीन युग व जुन्या काळाशी सांगड घालताना चंदामामाने यशस्वीपणे समतोल राखलेला आहे. चंदामामा हे खरोखरीच एक उत्तम भेटवस्तू म्हणून मुलांना देता येते. आकाशांतल्या चांदोबाप्रमाणे चंदामामाही अक्षय प्रकाश देत राहो!

***मिलिंद सामंत, सिंधुदुर्ग***

चांदोबाचे अंक वाचनीय आहेतच, शिवाय कथानुरूप रेखाटलेली चित्रे माझे मन खूपच प्रफुल्लित करतात. ग्रामीण भागांनी कात टाकून राहणीमानांत बराच बदल केला आहे. पण चांदोबातील चित्रे, ग्रामीण जीवन, घराच्या रचना हे भूतकालीन ग्रामीण जीवन चिरंजीव ठेवतात. तात्पर्याप्रत जाणाऱ्या गोष्टी, वेताळकथा, सामान्य ज्ञानविषयक माहिती, या दृष्टीने चांदोबाचा मोकळेपणा छान आहे. मला वाटतं, निर्मळ रंजनासोबत ज्ञानवृद्धीप्रत चांदोबा हा एक उत्तम अंक आहे.

***कार्तिक भूषण, उडुपी***

मी चंदामामाचा भक्त आहे. तुमचे मासिक इतके चांगले असते कीं कोणताही अंक वाचायचा मी चुकवत नाही.





# तिळाचा ताड

अशर्फीलाल धनपुरांत राहात होता. तो सावकार होता. लोक त्याला निर्दय म्हणत असत. महावीर नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ नेहमी म्हणायचा, ''माणूस कसा नसावा, याचं उत्तम उदाहरण म्हणजे अशर्फीलाल. म्हणून मी तर नेहमी व्याज न घेता लोकांना कर्ज देतो. गुप्तपणे दान करीत राहातो.''

त्या गांवातल्या लोकांना महावीरने शब्द दिला होता कीं त्याला लाखों रुपयांचं येणं बाकी होतं; ती रक्कम मिळाली कीं तो गांवातल्या मंदिरासाठी व शाळेसाठी, दहादहा हजार रुपयांच्या देणग्या देणार होता. पण कांही गांवकरी म्हणत कीं जे त्याच्याकडे कर्ज मागायला जात होते, त्यांना कांहीतरी कारण सांगून तो टाळाटाळ करीत असे. कर्जही नाही आणि मदतही नाही, कांहीच देत नव्हता. अनेक लोकांचे मत होते की महावीर उगीचच लंबेलंबे गप्पा मारतो, तिळाचा-ताड करतो, पण कृतीच्या नांवाने शून्य! पण सूरज नांवाच्या एका गरीब शेतकऱ्याचा मात्र महावीरवर विश्वास होता, तो त्याला अगदी परोपकारी, महान, मानत होता. त्या विश्वासाने तो आपल्या मुलीच्या लग्नासाठी महावीरकडे हजार रुपये कर्जाऊ मागायला गेला.

त्यावर महावीर त्याला म्हणाला, ''परवांच मी तीन हजार रुपयांची देणगी दिली. काल आणखी एकाला बिनव्याजी दहा हजार रुपये कर्जाऊ दिलेत. आज म्हणशील तर माझ्याजवळ शंभर रुपयेदेखील शिल्लक नाहीत. हे तुझं दुर्दैव आहे बघ!''

नाईलाजाने सूरज अशर्फीलालकडे पैशासाठी गेला. अशर्फीलालने कर्ज दिलं पण एक अट घातली. वर्षाच्या आंत जर रकमेची फेड करता आली नाही तर सूरज आणि त्याची बायको लक्ष्मी यांनी त्याच्याकडे घरी कामाला राहायचे! सूरजने ही अट मान्य केली. पण त्यावर्षी पीक चांगले आले नाही, म्हणून वेळेवर रक्कम कांही परत देता आली नाही.

अशर्फीलालचे कर्ज चुकवण्यासाठी सूरजने



पुन्हां महावीरकडे कर्ज मागितले. महावीरने विचार करुन त्याला म्हटले. "अरे, दुसऱ्यांची मदत घेऊन किती दिवस असे आयुष्य घालवीत बसणार आहेस तू? अशर्फीलालकडे घरकामाला राहा. जन्मभर जेवणखाण, कपडालत्ता, याची कांही काळजी करावी लागणार नाही."

"साहेब, माझी बायको व मी ह्याला तयार आहोत. पण माझा मुलगा शेखर हा मात्र याच्या साफ विरुद्ध आहे. तो थोडासा शिकलेला आहे. तो म्हणतोय, आपण व्यापार करुन पैसे मिळवू आणि कर्जाची फेड करुं. त्यासाठी मला तुमच्याकडून मदत पाहिजे." "तर मग एक काम कर. शेखरला माझ्या हवाली कर आणि तू अशर्फीलालकडे नोकरीसाठी राहा. मी त्याला मोठा करीत आणि तुलाही नोकरीतून मोकळा करीन. त्यावेळी सगळे गांवकरी तुझी प्रशंसा करतील. मी अशी दहा कुटुंबांना मदत केलेली आहे. तुझे अकरावे कुटुंब होईल." महावीरने म्हटले.

सूरजने शेखरला महावीरकडे धाडले, आणि तो पत्नीसह अशर्फीलालकडे गेला. शेखरने व्यापार सुरुं करण्यासाठी महावीरकडून दहा हजार रुपये मागितले. "अरे, दहा हजारच काय, मी लाख रुपये देईन. पण कुणीतरी दिलेल्या पैशावर धंदा चालत नसतो. हुशारी हीच व्यापाराची खरी पुंजी असते. मी पूर्वी पुराणिक, रंगा आणि भद्र नांवाच्या तिघा गरीबांना आसरा दिला होता, त्यांना शिकवलं, त्यांची लग्ने केली. व्यापाराला सुरवात करण्यासाठी प्रत्येकाला दहा दहा हजार रुपये सुद्धां दिले. वर्षभरांतच ते धंद्यात नुकसान झालं असं सांगून पुन्हां कर्ज मागायला परत आले. मी पैसे द्यायला नकार दिला, तेव्हां ते जनपुरला गेले आणि तिथे त्यांनी लाखो रुपये कमावले. पण मला मात्र फुटकी कवडीदेखील त्यांनी परत दिली नाही." महावीरने शेखरला सांगितले. त्यावर शेखर म्हणाला, "मी तसा नाही. जी रक्कम तुम्ही घाल, ती मी व्याजासहित परत करीन."

महावीर त्याला हंसून म्हणाला, "मी थोडाच व्याज मागणार आहे? दुसऱ्या कुणालातरी मदत व्हावी म्हणून मी रक्कम परत घेतो. तूसुद्धां जनपुरला जा, त्या तिघांना भेट. तुझी बुद्धिमत्ता आणि चतुराई ह्याचा उपयोग कर. जितकी रक्कम वसूल करता येईल, तेवढी वसूल कर. तेच तुझे भांडवल आहे असं मानून व्यापार सुरुं कर. जेव्हां तुझी कमाई चालू होईल, तेव्हां माझी रक्कम मला परत दे."

शेखर जनपुरला गेला. प्रथम तो भद्रला भेटला,



आणि जे घडलं, ते त्याने त्याला सांगितले. भद्रचा चेहरा संतापाने लाल झाला. तो म्हणाला, "महावीर तिळाचा ताड करतो आहे. वास्तविक त्याने पुराणिक, रंगा व मी, आम्हाला काय दिलं ते माहीत आहे? एकेकाला तीनशे रुपये! शंभर शिक्षणासाठी, शंभर लग्नखर्चासाठी आणि शंभर व्यापारासाठी!"

शेखर त्याला म्हणाला, "मी वसुलीसाठी तुमच्याकडे आलो नाही. महावीरच्या शब्दावर विश्वास ठेवून माझे आईवडील मोलमजुरी करायला लागले आहेत. महावीरच्या शब्दांवर कितपत विश्वास ठेवायचा, हे मला जाणून घ्यायचं होतं, म्हणून मी तुम्हाला तिघांनाही भेटायला आलो आहे. आता मी त्याला धडा शिकवीनच." भद्रने म्हटलं, "तू जर त्याला नक्की धडा शिकवशील असे वचन देणार असशील तर मी तुला माझ्या धंद्यात भागीदारी देईन. पण त्यापूर्वी तुला एक काम करावे लागेल. एका आठवड्यांच्या आंत तुला आपल्या आई वडिलांची त्या वेठबिगारीतून सुटका करावी लागेल आणि तुझी हुशारी सिद्ध करावी लागेल."

त्यानंतर शेखर रंगाला भेटला व त्यालाही त्याने जे घडलं ते सांगितलं. आपला संताप कसाबसा आवरत रंगा त्याला म्हणाला, "जर तू महावीरला धडा शिकवण्याचे वचन देणार असशील तर मी तुझ्या आईवडिलांना त्यांच्या वेठबिगारीतून मुक्त करीन. त्यासाठी एका आठवड्याच्या आंत तुला एखाद्या चांगल्या कुटुंबातल्या मुलीशी लग्न करावे लागेल व तुझी हुशारी शाबित करावी लागेल."



शेवटी शेखर पुराणिकला भेटायला गेला. तो जेव्हां पन्नास वर्षांचा होता, तेव्हां त्याची पत्नी वारली होती आणि त्याने दुसरे लग्न केले होते. आता त्याची मुलगी मोठी झाली होती. पुराणिकला मुलीचे लग्न लौकर करायचे होते. कारण सावत्र आईचे तिच्याबरोबर रोज खटके उडत असत. शेखरला बघून पुराणिकला तो योग्य व लायक वाटला. आपल्या लेकीचे लग्न ह्याच्याबरोबर व्हावे, अशी इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. म्हणून त्याने सांगितले, "माझ्या मुलीचे लग्न मी तुझ्याशी करून देईन. पण एका आठवड्याच्या आंत तुला महावीरला धडा शिकवावा लागेल आणि तुझी चतुराई सिद्ध करून दाखवावी लागेल."

शेखर विचारांत पडला. खूप डोकेफोड केल्यानंतर त्याला एक उपाय सुचला. त्याने



पुराणिकला सांगितल्यावर तो एकदम खूष झाला. त्याने त्याला तीन हजार रुपये दिले. शेखर धनपुरला परत गेला आणि महावीरला म्हणाला, ''पुराणिक, रंगा आणि भद्रचे म्हणणे आहे कीं आपल्याकडून त्यांनी प्रत्येकाने तीनशे रुपये घेतलेले होते. व्याजासकट आपल्याला त्यांनी हजार रुपये देऊन मला जबरदस्तीने तुमच्याकडे धाडले. त्यांनी असंही म्हटलंय कीं जर तुम्ही हे पैसे घ्यायला नकार दिलात, तर ते इथे येऊन गांवात सर्वांना सांगतील.''

असं म्हणून त्याने तीन हजार रुपये त्याच्या हातांत ठेवले. महावीरला वाटलं कीं ते तिथे इथे येतील आणि खरोखरीच सर्वांना सांगत सुटतील. तो शेखरला म्हणाला, ''हे मात्र आणखी कुणालाही सांगू नकोस.''

''तुम्ही माझे आदर्श आहात. तुम्ही जसे कराल तसेच मी करीन.'' शेखरने म्हटलं. महावीरला आनंद झाला. त्यानंतर शेखर गांवातल्या कांही प्रमुख लोकांना भेटून म्हणाला, ''महावीर तिळाचा ताड करतात हे अगदी खोटं आहे. खरं तर त्यांनी कुणाला तरी तीस हजार रुपये दिले होते, तरी ते गप्प बसले होते. मी ती रक्कम मोठ्या मुष्किलीने वसूल केली. व्याजासहित लाख रुपये आता त्यांना मिळाले आहेत त्यामुळे खूष होऊन त्यांनी माझ्या आईवडिलांना वेठबिगारीतून मोकळे करायचे वचन दिलेले होते. मला नोकरी देऊन माझ्या लग्नाचीही जबाबदारी घ्यायचं त्यांनी कबूल केलेलं होतं. तेव्हां आता मला कसलीच चिंता नाही.''

ही बातमी महावीरला कळली. तो घावरला आणि शेखरला म्हणाला, ''अरे तू मला फक्त तीन हजार रुपयेच दिले होतेस. आणि गांवात सांगतो आहेस लाख रुपये म्हणून! तुझ्या या उपकाराबद्दल मी कांहीही म्हटलं नव्हतं. पण गांवात तू सांगितलंस कीं मी तुला मदत करणार आहे. दानधर्माच्या नांवाखाली लोकांनी मला लुटावं अशी तुझी इच्छा आहे कीं काय? मी तुझा हा खोडसाळपणा चालवून घेणार नाही. तू जे खोटे सांगतो आहेस, ते मी सर्वांना सांगीन.'' त्याने धमकी दिली.

तेव्हां शेखर अगदी नम्रपणे म्हणाला, ''मी आपल्याला सांगितलं होतं कीं तुम्ही माझे आदर्श आहात. तुम्ही करता तसंच मीही करीन. आता आपण पुराणिक, रंगा व भद्र यांना फक्त तीन तीनशे रुपये दिलेले होतेत आणि गांवात दवंडी पिटवलीत कीं तुम्ही लाखलाख रुपये दिलेत. याचा हाच अर्थ झाला ना, कीं तीनशे रुपये म्हणजे लाख रुपये! तिळाचा ताड करायची तुमची रीत आहे. मी तीच पद्धत स्वीकारली. मला वाटलं कीं उलट तुम्ही माझं कौतुक कराल. माझे बोलणे पटले नसेल तर तुम्ही जरूर गांवात तसं सर्वांना सांगावं!''

शेखर खोटे सांगतोय असं सांगायला जावं तर महावीरचं बिंग फुटलं असतं. म्हणून तो गप्प बसला. इतकंच नव्हे, तर त्याने मंदिराला व शाळेसाठी ज्या देणग्या पूर्वी जाहीर केल्या होत्या, त्याही पूर्ण केल्या. तो स्वतःशीच बडबडत होता, ''आता तरी बुद्धी चांगली असूं दे माझी! ही तिळाचा ताड करायची संवय सुटली पाहिजे.''

तितक्यांत पुराणिक, रंगा आणि भद्र धनपुरला आले. महावीरला चांगला धडा मिळाला, हे ऐकून त्यांना फारच आनंद वाटला. भद्रने शेखरला आपल्या धंद्यात भागिदारी दिली, रंगा आणि भद्रने अशर्फीलालचे कर्ज चुकवले, आणि सूरज आणि त्याची पत्नी यांना वेठबिगारीच्या कामांतून मोकळे केले. पुराणिकने आपल्या मुलीचे लग्न शेखरशी लावून दिले.

जनपुरला जाण्यापूर्वी शेखरने एक मोठी मेजवानी दिली आणि म्हटले, ''माझ्या जीवनांत आज हा मोठा बदल घडून आला, त्याला कारण केवळ महावीरजी आहेत.''

''अरे शेखर, तिळाचा ताड करूं नकोस बरं कां! ही संवय चांगली नसते.'' महावीर पाठीमागून जोरांत म्हणाला.



हाच माझा त्राता आहे. "असं म्हणून भक्ती-भावनेच्या भरांत त्याने जमिनीवर अंग टाकले.

"गुरुजी, हा दुष्ट असला तरी निस्सीम भक्त आहेसं दिसतंय." राजाने आश्चर्य व्यक्त केले.

तितक्यांत दाराजवळ गलका, गोंधळ चालू असलेला ऐकूं आला. सेनापती तिकडे गेला. दोन सैनिक धापा टाकीत येऊन त्याच्यासमोर उभे राहिले. राजाने इशारा करीत म्हटले, "या, आंत या. काय झालं?"

"नगरांतले तरुण लोक भिकाऱ्यांना पकडून "तुम्ही मांत्रिकाचे शिष्य आहात कां? खरं काय ते सांगा!" असं त्यांना मारहाण करीत विचारत आहेत.

"आम्ही त्या भिकाऱ्यांना वांचवायला गेलो, तर आम्हालाही त्यांनी तडाखे हाणले." सैनिकांनी सांगितले.

"काय झालं?" राजाने सेनापतीकडे बघितलं.

"ब्राम्हदंडीचे दोन्ही शिष्य भिकाऱ्याच्या वेषांत शहरांत हिंडत आहेत. आता हे खरं कीं खोटं आहे, ते [illegible] सेनापतीने सांगितलं.

जमिनीवर पडलेल्या मांत्रिकाला लाथेने हालवीत राजगुरुने म्हटलं, "उठ, उठ, ब्राम्हदंडी, तू ही बातमी ऐकलीस कां? तू त्या शिष्यांना भिकाऱ्याच्या वेषांत असले तरी ओळखशील कां?"

हे ऐकून ब्राम्हदंडी लगेच उठून उभा राहिला. तो म्हणाला, "ऐकावं महाराज, मी त्यांना भिकाऱ्याच्या नव्हे, तर राजाच्या वेषांतदेखील ओळखूं शकेन."

तोपर्यंत मंत्री निमूट बसलेला होता, पण हे ऐकून तो म्हणाला,

"तर मग महाराज, शहरांतल्या साऱ्या भिकाऱ्यांना इथे घेऊन येऊं कां?"

राजाने मान डोलावून होकार दिला, आणि मंत्री व सेनापती दालनाच्याबाहेर गेले. त्यांची आज्ञा झाली आणि नगरांतल्या सगळ्या रस्त्यावरच्या भिकाऱ्यांना पकडण्यासाठी सैनिक निघाले.

(क्रमशः)



वेताळ-कथा

# राजाच्या सुना

शब्दांचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने शव खाली उतरवले, खांद्यावर घेतले आणि स्मशानाचा मार्ग धरला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन्, इष्ट कार्य सिद्ध करण्यासाठी तू अतिशय कष्ट झेलतो आहेस. त्याचं मला कौतुक वाटतं. पण कोणत्याही कार्याची सिद्धी केवळ सहनशक्ती व अथक् परिश्रम यांच्यामुळेच होऊं शकते. त्यासाठी विवेक, वाक्चातुर्य, लोकज्ञान, हेही आवश्यक असते हे विसरुं नकोस. हे गुण तुझ्यांत आहेत कां त्याचा अगोदर विचार कर. त्यासाठी मी तुला एका राजाच्या तीन सुनांची



गोष्ट सांगतो. त्यांची गोष्ट तुला मार्गदर्शक ठरेल व तुझा थकवाही कमी होईल.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

''महेंद्रपुरीच्या राजाला मूलबाळ नव्हते. राजा व राणीने अनेक नवस केले, तीर्थयात्रा केल्या व दानधर्म केला होता. शेवटी आपल्या नशिबांत संतान प्राप्ती नाही, हे सत्य त्यांनी स्वीकारले.

अशा वेळी, एका रात्रीं राणीला स्वप्नांत पंचमुखी नागराजाचे दर्शन झाले. त्याने राणीला म्हटले,

''तुमच्या मंदिराच्या आवारांत काळ्या दगडाची नागप्रतिमा स्थापन कर आणि तू त्याला चाळीस दिवस दुधाचा अभिषेक केलास तर तुला मूल होईल.''

सकाळी उठल्यानंतर राणीने राजाला आपले स्वप्न सांगून म्हटले, ''आपल्या इष्टदेवाने, नागराजाने जे सांगितलंय, तसंच आपण करूं या.''

आठवडाभरांतच राजाराणीने पर्वतावर नागेंद्रमंदिराच्या आवारांत नागाच्या प्रतिमेची विधीपूर्वक स्थापना केली. दोघांनी मोठ्या भक्तीभावाने चालीस दिवस पूजा करून दुधाचा अभिषेक केला. चाळीसाव्या दिवशी एक अनोळखी विचित्र दिसणारा माणूस राणीकडे आला. तिने यापूर्वी त्याला कधीही बघितलेले नव्हते. तो उंच, काळाकभिन्न व हाडकुळा होता. त्याच्या खांद्यावर एक पिशवी लटकत होती. त्यांतून त्याने तीन आंबे काढले आणि ते राणीला देऊन तो तिला म्हणाला, ''राणीसाहेब, तुम्ही मंदिरांत जा आणि तिथे हे आंबे खा. तुम्हाला तीन सुंदर पुत्र होतील.''

राणीने श्रद्धापूर्वक अंतःकरणाने ती फळें हातांत घेतली. नंतर मंदिरात जाऊन ती खाल्ली. नऊ महिन्यांनंतर राणीला तीन सुंदर पुत्र झाले. राजाने त्यांची नांवे जय, विजय व अजय ठेवली. राजवाड्यामधे मोठ्या प्रेमाने त्यांचे पालनपोषण सुरुं झाले.

तिघे राजकुमार हुशार, देखणे व पराक्रमी होते. त्यांनी सर्व विद्या शिकल्या. राजाने तिघा मुलांची लग्ने एकाच मुहूर्तावर केली. तिघी सुना राजाच्या पदरी असणाऱ्या मांडलिक सरदारांच्या मुली होत्या.

असे दिवस जात होते. राजाची प्रकृति दिवसेंदिवस खालावत होती. म्हातारपणामुळे तो अशक्त झाला होता. आता प्रकृतींत फारशी सुधारणा होण्याची शक्यता नाही, असे राजवैद्याने स्पष्ट सांगितले. आता राजाच्यासमोर एक गंभीर समस्या उभी राहिली. या तिन्ही अगदी सारख्या गुणांच्या व योग्यतेच्या युवराजांपैकी कुणाला गादीचा वारस नेमावे हे कांही राजाला सुचेना.

राजाने खूप विचार केला आणि राजाची अचूक निवड करण्याची जबाबदारी आपला प्रधानमंत्री चंद्रशेखर ह्याच्यावर सोपवली.

दुसऱ्या दिवशी प्रधानमंत्र्याने युवराजांची हर प्रकारे परीक्षा घेतली. पण प्रत्येक विषयांत तिघांची सारखीच गुणवत्ता होती.

परीक्षा घेतल्यानंतर मंत्री राजाला म्हणाला,

''महाराज, तिघेही राजकुमार सिंहासनावर बसायला योग्य आहेत. त्यांच्यापैकी एकाला राजा निवडणं म्हणजे इतर दोघांच्यावर अन्याय करण्यासारखं आहे.''

त्यावर विचार करून राजा म्हणाला,

''प्रधानजी, हा प्रश्न जास्तच कठीण होऊं लागला आहे. आता आपण काय करायचं?''

मंत्र्याने एक दीर्घ श्वास घेऊन म्हटले, ''महाराज, एक उपाय आहे. जर आपण अनुमती दिलीत, तर आपल्या तिन्ही सुनांशी मला आपल्याबरोबर वेगवेगळ्या वेळी भेटायचंय. व त्यांना एक प्रश्न मला विचारायचा आहे.

त्यांची जी उत्तरे असतील, त्यावरुन आपल्या



निश्चित राजगादीसाठी निवडीचा प्रश्न सुटेल असं मला वाटतं.''

राजा मंत्र्याला म्हणाला,

''जे कांही करायला हवं, ते आता तुम्ही लौकर करा. म्हणजे माझ्या डोक्यावरचा एक भार कमी होईल.''

असं म्हणून त्याने आपल्या मुकुटाकडे बोट दाखवले.

त्यानुसार राजाच्या आज्ञेवरुन जयची पत्नी प्रथम दालनांत आली. तिथे राजा व मंत्री, दोघेही बसलेले होते. मंत्र्याने तिला प्रेमळ स्वरांत विचारले,

''देवी, तुमच्या पतीला जर राजा म्हणून निवडले नाही, तर तुम्ही काय कराल?''

जयच्या पत्नीच्या चेहऱ्यावर निराशा स्पष्ट



दिसत होती. तिने दबल्या आवाजांत म्हटलं, ''कोणत्याही देशाचा राजा होणे ही भाग्याची गोष्ट आहे. जर माझ्या पतीच्या भाग्यांत ते नसेल तर मी गप्प बसेन.''

ती गेल्यानंतर विजयची पत्नी आंत आली. तोच प्रश्न तिला विचारण्यांत आला. त्यावर ती कोरड्या स्वरांत म्हणाली,

''काय करणार? मी मनांतल्या मनांत कुढत राहीन कीं आजपर्यंतच्या माझ्या भक्तीभावांत कांही कमी असेल म्हणून देवानं माझं ऐकलं नाही.''

शेवटी अजयची पत्नी आली. मंत्र्याने तोच प्रश्न तिला विचारल्याबरोबर तिने दुसऱ्याच क्षणीं ताडकन उत्तर दिले,

''प्रधानमंत्रीजींच्या मनांत असे विचार आले तरी कसे? माझे पती राजा बनतील ह्याबद्दल प्रश्नच नको. मला त्यांची कुवत, शक्ती, बुद्धी व चतुराई माहीत आहे. प्रयत्न करुनही, जीवनांत त्यांची कधी हार होणार नाही.''

ती परत जाताच मंत्र्याने राजाला सांगितले, ''महाराज, अजयची राजा म्हणून आपण घोषणा करावी.''

वेताळाने ही गोष्ट सांगून राजा विक्रमार्काला विचारले,

''राजन्, मंत्र्याने जो सल्ला राजाला दिला होता, तो मला तरी तो अविचारी व अयोग्य वाटतो. सुनांची परीक्षा एकाच प्रश्नाने घेऊन मुलांची योग्यता कशी ठरवायची?

थोरल्या दोन्ही सुना विनयशील होत्या. पण धाकटी मात्र निराळी आहे. मोठ्यांचा अनादर, जाणून बुजून करणारी, अहंकारी, व बोलण्यांत चटपटीत आहे, म्हणून तिला असं वाटतं कीं आपला पती श्रेष्ठ होय ना?

मंत्र्याच्या मनांत शंका आली असेल कीं जर तिच्या पतीची निवड केली नाही, तर ती आपल्या नवऱ्याला बंडाळी करायला लावेल. या भीतीपोटी घाबरून जाऊन तर मंत्र्याने राजाला गैरसल्ला दिला नाही ना?

माझ्या या शंकेची उत्तरे माहीत असूनही जर तू मौन पत्करलेस, तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होऊन खाली पडतील.''

ह्या प्रश्नांना उत्तर देताना विक्रमार्कानि म्हटलं, ''प्रथम हे स्पष्ट आहे की तिघेही राजकुमार समान योग्यतेचे आहेत. त्यांच्या मनांता स्पर्धा नाही किंवा आपणच सिंहासनावर बसावे, असाही आग्रह दिसत नाही. पण पुरुषाच्या वागण्यावर व विचाराबर पत्नीचा थोडाफार प्रभाव अवश्य असतो. म्हणून मंत्र्याने राजाच्या सुनांची मानसिकता जाणून घेण्याचा प्रयत्न केला. व त्यानुसार त्याने विचारपूर्वक निर्णय घेतला.

तिन्ही सुना नम्र आहेत. जयची पत्नी सहनशील स्त्री आहे. ती परिस्थितीशी संघर्ष करणारी नाही. समझोता करणारी आहे.

विजयची पत्नी देवावर विश्वास ठेवणारी, म्हणून ती सर्व भार देवावर टाकणारी आहे.

परंतु अजयची पत्नी मात्र निराळी आहे. पतीचा आत्मविश्वास व धाडसीपणा वाढवण्याचे कौशल्य तिच्या स्वभावांत आहे.

आणि हे गुण राजामधे अवश्य हवेत. त्याचा स्वतःवर विश्वास असायलाच हवा. आणि त्यांत धर्मपत्नीचा सहयोग व प्रोत्साहन असले तर फारच उत्तम.

म्हणून मंत्र्याने तशी निवड केली, त्याने उगीच घाबरुन जाऊन केलेली नाही.''

राजाचे मौनभंग करण्यांत वेताळ सफल झाला होता, म्हणून तो शवासहित गायब झाला आणि पुन्हां त्या झाडावर जाऊन बसला.

***(कामेश पांडेंची रचना)***








# म्युझियमचा सन्मान

मुंबईतले दीडशे वर्षांचे व्हिक्टोरिया व आल्बर्ट म्युझियम हे युनेस्कोकडून उत्कृष्ट व्यवस्थेबद्दल सन्मानित केले गेले आहे. सांस्कृतिक वारसा जतन कार्यक्रम २००५ यांच्या आशिया-पॅसिफिक पुरस्कारातर्फे हा सन्मान आहे.

हे म्युझियम १८५५ साली भाऊ दाजी लाड यांनी सुरुं केले, पण त्याला महाराणी व्हिक्टोरिया व त्यांचे पती प्रिन्स आल्बर्ट यांचे नांव देण्यांत आले. म्युझियमची व्यवस्था कालांतराने मुंबई महानगरपालिकेकडे आली, तेव्हां त्याच्या व्यवस्थेला जरा दुरावस्था प्राप्त झाली. १९९६ मधे 'इंटाक' - इंडियन नॅशनल ट्रस्ट फॉर आर्ट अँड कल्चरल हेरिटेज-यांच्यातर्फे म्युझियममधे सुधारणा करुन वस्तूंचे जतन करण्यासाठी एक प्रयोगशाळादेखील असावी अशी सूचना मांडण्यांत आली.

ही सूचना स्वीकारली गेली आणि त्यासाठी जमनालाल बजाज फाऊंडेशनची मदत घेण्याचे ठरले. म्युझियमची डागडुजी व सुधारणांचे काम त्याला १५० वर्षे पूर्ण होत आहेत त्यावेळीच पूर्ण करण्यांत आले. जर सर्व दालनांतून आता एक नीट फेरी मारली तर अरबी भाषेंतल्या कथांमधल्या चित्ताकर्षक वातावरणांत गेल्यासारखे वाटेल, असं म्हणतात.

मध्यंतरी जीर्ण वाटणारी ही इमारत आता भाऊ दाजी लाड या नांवाने ओळखली जाणार आहे.





# राजा परत आला

चोळ देशांत मंगलापुरम नांवाचे एक संस्थान होते. त्यांचा राजा राजरत्नम हा चोळ सम्राटाचा मांडलिक होता. तो नियमित खंडणी देत असे, त्यामुळे त्याचे संस्थान शांत व समाधानी होते. तो भाग सुपीक होता, दरवर्षी पीक चांगले, येत होते. नागरिक जो कर देत होते त्याने राज्याची संपत्ती वाढत होती. राजरत्नम दिलदार राज्यकर्ता होता. तो चित्रकार, कवी, तंत्रकार यांना उदार आश्रय देत असे.

राजाचा धाकटा भाऊ मणीरत्नम ह्याला कलाकारांच्यावर केलेला हा असा खर्च पसंत नव्हता. जर राजरत्नमनंतर मणीरत्नम राजा झाला तर त्याला रिकामा खजिना मिळेल, अशी त्याला सतत भीती वाटत होती. दिवस जात होते तसी मणीरत्नमची लोभी इच्छा वाढत होती. त्याच्या यशाच्या मार्गात भावाचा अडथळा होता, आणि तो काढायला हवा होता. परंतु त्याला स्वतः तो गुन्हा करायचा नव्हता. त्यासाठी दुसरा कुणीतरी शोधायला हवा होता. राजरत्नमच्या सहवासांत असलेल्या लोकांमधे ही कल्पना मणीरत्नमने पसरवली.

त्याने राजवाड्यांतल्या मुख्य आचाऱ्याला हे काम करण्यासंबंधी विचारले. पण 'रोज पंगतीला पाहुणे असतात', म्हणून तो राजाच्या जेवणांत विष घालूं शकत नव्हता. इतर कुणी त्यामुळे मरण पावले आणि आचारी पकडला गेला असता, तर त्याला मृत्यूदंड निश्चित होता.

शेवटी, मणिरत्नमने राजाच्या न्हाव्याला हे कृत्य करण्यास राजी केले. पण न्हाव्याने त्यासाठी पैशाचे इनाम घेण्याचे नाकारले. दुसऱ्या दिवशी राजाची दाढी करताना न्हाव्याने राजाला या कटाची माहिती दिली. राजरत्नम स्तब्ध झाला.





त्यांना सांगितले, "एकांतवास मिळाला कीं आजपर्यंत मी स्वतः किती मूर्खपणा केला आहे, ते मला समजेल." त्याने मणीरत्नमला बोलावून घेतले आणि दरबारांतल्या सर्वांसमक्ष कोणताही समारंभ किंवा धार्मिक विधी न करता भावाला आपला मुकुट दिला.

दुसऱ्याच दिवशी राजा अरण्यांत निघून गेला. मणिरत्नम किती दुष्ट व पाताळयंत्री आहे हे नागरिकांना लौकरच कळून चुकले. त्यापूर्वीही तो लोकप्रिय नव्हताच. यानंतर मणिरत्नम काय करील याकडे लोकांचे डोळे लागले होते. मणीरत्नम पहिले कांही दिवस फारच खुषींत होता. पण इतरांचे चेहरे त्याला कांही प्रसन्न दिसत नव्हते.

त्यानंतर न्हाव्याने राजाच्या कांही सेवकांना विश्वासांत घेतले, तेही राजरत्नमशी बेईमानी करण्यास तयार नव्हते, हे त्याच्या लक्षांत आले.

ही बातमी साऱ्या दरबारांत समजली. पण राजाने सर्वांनाच धक्का दिला. त्याने राजगादीवर भावाला बसवून आपण वनांत राहायला जायचा आपला निर्णय जाहीर केला.

"मला आता राज्यकारभाराचा वीट आला आहे. कांही काळ वनांत राहायला जावे व ध्यानधारणा करावी असे मला वाटते. माझ्या जागी माझा भाऊ मणीरत्नम हा राजा होईल."

कांही दरबारी मंडळींनी राजाने असा मूर्खपणा करुं नये, म्हणून त्याची विनवणी केली. राजाने

अगदी त्याचे सेवकसुद्धां गंभीरपणे नव्या राजाच्या आज्ञांचे पालन करीत होते. मणीरत्नमला वाटले कीं आपण राजवाड्यांतच बसून राहावे, म्हणजे लोकांकडे बघायलाच नको.

लोकांच्या चेहऱ्यावरचे भाव बघून त्याच्या मनांत आले कीं जसा त्याने भावाच्या विरुद्ध कट केला, तसा इतर कुणीतरी त्याला ठार मारुन पुन्हां राजरत्नमला आणायचाही बेत करीत असेल. तेव्हां मणिरत्नम जर सुरक्षित राहायला हवा असेल, तर भावाचा मृत्यू व्हायलाच हवा होता. वास्तविक राजरत्नम अरण्यांत जाऊन जपतप व साधनेंत गर्क होता. मणीरत्नमने, भावाचा कांटा काढणाऱ्या माणसाला अर्धे राज्य देऊं केले, पण



कुणीही त्यासाठी पुढे आले नाहीत. त्याला मदत करायला कुणीच तयार नव्हते.

एके दिवशी, एक गरीब कवी दरबारांत आला. राजरत्नम अरण्यांत गेल्यापासून मंगलापुरमच्या लोकांना चांगल्या किंवा नवोदित कविता ऐकण्याची संधी मिळाली नव्हती. या कवीने दरबारांत येऊन आपले काव्यवाचन करण्याची राजाकडे परवानगी मागितली. काव्याचा विषय होता राज्याच्या इतिहास. जेव्हां मणीरत्नमला समजले कीं, त्यांत त्याच्या स्तुतीपर अशी कांही कवने नव्हती, तेव्हां तो त्याला म्हणाला,

"मला तुझी कविता मुळीच ऐकायची नाही. त्याऐवजी, तू अरण्यांत जा आणि माझ्या भावाचे मस्तक घेऊन ये. त्यासाठी मी तुला अर्धे राज्य बक्षीस देईन."

त्या कवीला क्षणभरदेखील दरबारांत थांबवेना. तो अरण्यांत कांही निराळ्या कारणासाठी गेला. तो राजरत्नमला भेटला आणि काय घडले तेही त्याने सांगितले. त्याने त्या माजी राजाला सांगितले की त्याच्या राज्यांत पूर्वी कवि, चित्रकार यांना मान होता. पण ह्या नव्या राजाला मंगलापुरमच्या इतिहासासंबंधीचे काव्य ऐकण्याची-देखील इच्छा नव्हती.

ह्या परिस्थितीत आपण कांहीच करुं शकत नाही, पण तो पुढे म्हणाला, असे राजरत्नमने त्याला सांगितले.

"मित्रा, तुला एक गोष्ट करता येईल. ही माझी तलवार घे. माझे मस्तक छाटून माझ्या भावाला ते नेऊन दे. म्हणजे तुला अर्धे राज्य बक्षीस मिळेलच."

कवीला धक्काच बसला. "महाराज, हे काय सांगता? माझे कुटुंब आणि मी उपाशी मेलो तरी हरकत नाही, पण मी हे असले अधम कृत्य करणार नाही. मला क्षमा करावी, महाराज." असं म्हणून कवी घरी गेला, आणि राजरत्नमशी झालेल्या भेटीबद्दल एक दीर्घकविता लिहून त्याने ती मणिरत्नमकडे पाठवली. त्या कवितेंत शेवटी त्याने असे म्हटले होते,

"मस्तकहीन मंगलापुरमने एक मस्तक विकत मागितले. ते मस्तक स्वतःला विकायला



तयार झाले, कारण त्यामुळे एका दरिद्री कवीला मदत झाली असती. पण राज्याच्या सेवेसाठी तो कवीही आता आपले मस्तक देण्यास तयार आहे.''

ही कविता वाचून मणिरत्नमला एकदम उपरती झाली. कुणीही त्याच्या त्या उदार मागणीला होकार द्यायला तयार झाले नाही. त्याच वेळी, भावाला रागावण्याऐवजी राजरत्नम उलट आपले मस्तक देण्यास तयार झाला होता! त्याने घोडा तयार ठेवायला सांगितला.

''राजा झाल्यानंतर तो प्रथमच राजवाड्याच्याबाहेर पडत होता. मणिरत्नम घोड्यावर स्वार होऊन, हातांत शस्त्र न घेता, अरण्याकडे वळला. त्याचा भाऊ जीर्ण कपडे, दाढी वाढलेली, अशा अवतारांत त्याला दिसला. मणिरत्नमने राजरत्नमच्या पायावर डोके ठेवले आणि क्षमा मागितली.



''दादा, त्या कवीने माझे डोळे उघडले. तू गादीवर असताना माझ्या मूर्खपणामुळे मी तुला मारण्याचा प्रयत्न केला. शिवाय तुझे मस्तक आणून देणाऱ्यास अर्धे राज्य इनाम देण्याची मी घोषणाही केली, तो तर मूर्खपणाचा कळसच होता. कृपा करुन तू परत ये. तू मला दिलेले राज्य, तू परत घे आणि तूच गादीवर बैस. मंगलापुरमचा साधा नागरिक म्हणून राहाण्याची देखील माझी लायकी नाही. मला क्षमा कर, दया कर!''

मणिरत्नमने भावाला घोड्यावर बसण्याची विनंती केली आणि तो स्वतः त्याच्यामागे बसला.

राजवाड्याबाहेर नेहमीसारखे राजाचे दर्शन व्हावे, म्हणून गर्दी जमलेली होती. लोकांचा लाडका राजा राजवाड्यांत परत येताना पाहून लोकांना फारच आनंद झाला. त्यांचा जयजयकार ऐकून वाड्यांतले लोक बाहेर प्रांगणात आले, आणि त्यांनी राजरत्नमचे मनःपूर्वक स्वागत केले.

मणिरत्नमने भावाचा हात धरुन त्याला दरबारांत नेले, त्याच्या हातांत राजमुकुट देऊन त्याने राजरत्नमला गादीवर बसवले. तो स्वतः भावाच्या पायाशी जमिनीवर बसला. उपस्थित मंडळींच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले.



# खास बातम्या

## हत्तींची अी–नोंदणी

केरळमधे सुमारे ८०० हत्ती पकडलेले आहेत ८० टक्के हत्तींच्या मालकांची माहिती किंवा त्यांच्या हालचाली यांची नोंद सांपडत नाही. पण आता वनखात्याला ही अडचण पडणार नाही. या प्राण्यांच्या कातडीखाली मायक्रो चिप्स् बसवण्यांत येतील. ही योजना २००३ सालीच मान्य झाली होती, पण चिप्स् मिळत नव्हत्या, त्यामुळे हे काम लांबले. आता १२०० मायक्रोचिप्स् राज्यांत पाठवले आहेत. त्या चिप्स् बसवून काम सुरुं झाले कीं खास यंत्राच्या मदतीने माहिती नोंदली जाईल. त्यावरुन अधिकाऱ्यांना प्राण्यांची वर्तणूक व वृत्तीचा अभ्यास करता येईल. त्यांना होणारे रोग, त्यावर केले जाणारे उपाय, लसीकरण, व इतर सर्व नोंदी उपग्रहावरच्या नियंत्रण केंद्रात पोंचतील. आता १४ जिल्ह्यांतल्या हत्तींसाठी ही पद्धत वापरली जाणार आहे.




## लेखनाचा विक्रम



**टी.** कविता ही चेन्नईमधली एक कॉलेजकुमारी, टेबलापाशी बसली आणि फुलस्केप कागदाचे ढीग घेऊन ती लिहीत बसली. सव्वीस तासानंतर ती उठली तोपर्यंत तिने ३१२ पाने (एका बाजूला) लिहून काढली आणि एक नवा विक्रम झाला. यापूर्वीचा अखंड लेखनाचा विक्रम २४ तासांचा होता. कविताचे नांव भारतीय ''लिम्का बुक ऑफ रेकॉर्डस'' मधे निश्चित नोंदले जाईल.



# गोविंदची हुशारी

गोविंद एक साधा शेतकरी होता. त्याच्याकडे बैलांची एक जोडी होती. एक दिवस तो शेतांतले काम संपवून घरी परत आला. नंतर त्याने बैलांना चारापाणी दिले आणि गोठ्यांत बांधून ठेवले. पण, जेव्हां सकाळी उठून तो जेव्हां गोठ्याकडे गेला, तेव्हां तिथे त्याला एकच बैल उभा दिसला. दुसरा बैल कुठे गेला असेल ते त्याला समजेना. तो काळजींत पडला. त्याने खूप शोधाशोध केली, पण दुसऱ्या बैलाचा पत्ता लागला नाही.

पावसाळा तोंडावर आला होता. जमीन नांगरायची होती, पण एका बैलाने कसे काम झाले असते? ते जमण्यासारखे नव्हते. म्हणून गोविंदने गुरांच्या बाजारांत जाऊन एक बैल विकत घ्यायचे ठरवले.

गोविंदचा बैल एका चोराने चोरलेला होता. तोही त्या बाजारांत तो बैल विकायला आला.

चांगला बैल शोधत गोविंद बाजारांत सगळीकडे हिंडतफिरत, चौकशी करीत होता. एका ठिकाणी त्याला एक चांगला, तगडा बैल दिसला. गोविंद त्याच्याजवळ गेला तर काय, तो त्याचाच बैल होता.

बैल विकणाऱ्या माणसाला गोविंदने जरा घुश्श्यांतच फटकारले, "ही तर शुद्ध लबाडी आहे. तू आहेस तरी कोण? हा माझा बैल आहे. गेली चार वर्षे हा माझ्याजवळ आहे. आणि ह्याला घेऊन मी शेती करतो आहे."

गोविंदचे बोलणे ऐकून चोर प्रथम घाबरलेला होता. पण नंतर जरा सावरून तो म्हणाला, "दिवसा ढवळ्या खोटं बोलतोस? हा बैल चार वर्षे तुझ्याकडे कसा असेल? तो माझ्याकडेच पांच वर्षांपासून आहे आणि त्याच्या मदतीने मी शेती करतो. मुलीच्या लग्नाला पैसे उभे करायचे होते, म्हणून मी हा विकतो आहे."

गोविंद बुचकळ्यांत पडला. बाजारांत आलेले कांही लोक तिथे गोळा झाले आणि काय भांडण चाललंय ते विचारुं लागले. कारण एकदा समजल्यानंतर एका बघ्याने गोविंदला विचारले, "उगीच कां भांडतो आहेस? हा बैल तुझाच आहे, ह्याला पुरावा काय?"

"पुरावा" शब्द ऐकल्यानंतर गोविंदने कमरेला बांधलेला पंचा घेतला आणि त्या बैलाचे दोन्ही डोळे बांधून तो म्हणाला, "तुझा असा दावा आहे कीं हा बैल तुझाच आहे. माझा बैल एका डोळ्याने आंधळा आहे. सांग, कोणता डोळा आंधळा आहे?"

हा प्रश्न ऐकून चोर बावरला. चूक उत्तर दिले, तर तो चोर ठरेल. त्याच्या पाळीव कुत्र्याचा डावा डोळा आंधळा होता. त्याला ते आठवलं आणि त्याने उत्तर दिलं, "माझ्या बैलाचा डावा डोळा आंधळा आहे."

त्याचे उत्तर ऐकून गोविंद जोरजोराने हंसायला लागला, आणि त्याने बैलाच्या डाव्या डोळ्यावरचा पंचा बाजूला करीत म्हटले, "अरे, तुम्ही सगळ्यांनी नीट बघा. ह्या बैलाचा डावा डोळा किती चांगला आहे."

पळून जाण्याच्या हेतूने चोर इकडे तिकडे पाहात घाबरलेल्या आवाजाने म्हणाला, "हो, मी चुकून सांगितलं माझ्या बैलाचा डावा नव्हे, उजवा डोळा अधू आहे."

"डावा असो किंवा उजवा, तुझ्या सांगण्याप्रमाणे तुझ्या बैल एका डोळ्याने आंधळा आहे ना?"

"हो, हो त्यांत शंकाच नको. माझा बैल एका डोळ्याने आंधळा आहे हे मी ठामपणाने सांगतो."

गोविंदने बैलाच्या डोळ्यांवरचा पंचा काढला व चोराला म्हटले, "अरे भामट्या, माझा बैल आंधळा नाही. बघ, त्याचे दोन्ही डोळे कसे छान चकचकीत आहेत." गोविंद उत्साहाने बोलत होता.

लोकांनी लागलीच चोराला पकडून बांधले. जेव्हां तो स्वत:ला सोडवायचा प्रयत्न करायला लागला, तेव्हां जमीनदाराचे नोकर तिथे आले. त्यांनी चोराचे हात बांधून त्याला ओढतच कचेरीत नेले.

गोविंदला त्याचा बैल मिळाला, त्याशिवाय त्याने चोरालाही शिताफीने पकडून दिले. लोकांनी त्याची खूप तारीफ केली.

विनायक जोशी



साहित्य-संपदा

# ग्रामाधिकारी

रामापुरचा ग्रामाधिकारी प्रसाद एक मोठा शेतकरी होता. त्याच्या वडिलांकडून त्याला दहा अेकरांचे शेत मिळालेले होते, पण आपल्या हुशारीने आणि जोडधंदा म्हणून सावकारी करुन त्याने भरपूर पैसा मिळवला होता. त्या गांवातले बहुतेक लोक गरीब होते. जेव्हां त्यांना पैशाची गरज पडत होती, तेव्हां ते प्रसादच्या मदतीवर अवलंबून असत. म्हणून त्या गांवांत प्रसादची अेरावी चालत होती. त्याला कुणी विरोध करणारा नव्हता.

प्रसादला परिस्थितीनेही साथ दिली. म्हणून त्याचा अहंकार वाढतच गेला. ग्रामाधिकारी असूनही गांवकऱ्यांच्या अडीअडचणींविषयी त्याची बेपर्वाई दिसून येत असे. जर गांवातली मुले शिकून मोठी झाली तर ती त्याला विरोध करतील, म्हणून त्याने पडझड झालेल्या शाळेची कधी दुरुस्ती केली नाही. नवीन शिक्षक गांवात आले कीं तो त्यांना दरडावून पळवून लावायचा.



अशी वेळी सूरज नांवाचा एक नवीन तरुण, शिक्षक म्हणून त्या गांवात आला. हा कृष्णपुरचा राहाणारा होता आणि प्रसादच्या धाकट्या बहिणीचा मुलगा होता. मामाकडून गांवकऱ्यांवर होणात अन्याय व अत्याचार पाहून सूरजने गांवकऱ्यांना मदत करायचा निश्चय केला.

सूरज भाचा होता म्हणून प्रसादने त्याला दरडावले नाही. त्याने त्याला घरी बोलावून समजावले, "या खेड्यांत राहून तू काय करणार? इथेच राहिलास तर आयुष्यांत कधी प्रगती करता येणार नाही. तू कूपमंडूकाप्रमाणे राहाशील. तुझी बदली मी एखाद्या मोठ्या शहरांत करुन देईन."

"शहरांत काम करायला कितीतरी शिकलेले लोक मिळतात. या दूरदूरच्या गांवातच यायला सुशिक्षित व्यक्ती तयार नसतात. म्हणून तर मी आलो आहे. मामा, या गांवातल्या लोकांना शिक्षणाची फार जरुरी आहे." सूरज म्हणाला. त्याचे बोलणे ऐकून प्रसाद मनांतल्या मनांत खूप चिडला होता, पण तो गप्प बसला.

सूरजने गांवकऱ्यांची मदत घेतली आणि मोडकळीस आलेल्या शाळेची दुरुस्ती केली, आणि मुलांना शिकवायला सुरवात केली. वयस्कर व प्रौढ मंडळींना तो लिहायला-वाचायला शिकवूं लागला. त्याशिवाय त्यांना वेगवेगळ्या व्यवसायांची माहिती, त्यासाठी मिळणारी सरकारी मदत, यांचीही माहिती देऊं लागला. हळूं हळूं गांवकऱ्यांच्या जीवनांत बदल होऊं लागला.

ते पाहून प्रसाद जास्तच संतापला. त्याला भीती वाटायला लागली कीं यामुळे गांवकरी त्याची पर्वा करणार नाहीत. सूरजला गांवातून कसे पळवून लावावे, ह्याचा विचार करताकरता एके दिवशी संध्याकाळीं तो शाळेंत गेला. त्यावेळीं सूरज मुलांना कांहीतरी सांगत होता. प्रसादने झाडाआड लपून त्याचे बोलणे ऐकले.

"निसर्गामधे जे बदल होत राहातात, ते आपल्या हस्तक्षेपाशिवाय होत असतात. परंतु, आपल्या आयुष्यांत बदल होण्यासाठी आपण प्रयत्न करायला लागतात. तसं बघितलं तर आपला जन्म सारखाच असतो, पण ज्या संधी मिळतात, त्यांचा योग्य वेळी, चांगला उपयोग केला तर, त्यांचा फायदा उठवला तरच आपण पुढे जाऊं शकतो. पण हो, त्यासाठी भरपूर कष्ट करावे लागतात. जे असं करीत नाहीत, ते मागे राहातात. जे जीवनांत पुढे जाऊं शकतात, त्यांनी मागे राहिलेल्यांना मदत केली पाहिजे. त्यांच्यात हा दिलदारपणा अवश्य हवा. द्वेष, ईर्षा, अहंकार, या सर्व दुर्गुणांपासून दूर राहायला हवं. सारे गांवच चांगले झाले, की गांवातला प्रत्येकजण चांगलाच असेल." सूरज त्यांना असा उपदेश करत होता, त्यांचे कर्तव्य त्यांना समजावून सांगत होता.



त्याच्या बोलण्यांतली सत्यता प्रसादच्या मनाला भिडली. सूरजच्या बोलण्यामुळे प्रसादचे मात्र अचानक परिवर्तन झाले. तो सर्वांच्यासमोर येऊन म्हणाला, "सूरज, तू अजून तरुण आहेस, पण तू माझे डोळे उघडलेस. ग्रामाधिकारी होऊन देखील जी कामे मी करवून घेतली नाहीत, ती तू सहा महिन्यांतच करुन दाखवलीस. तू या गांवचा ग्रामाधिकारी होण्याच्या योग्यतेचा आहेस."

"तुमच्यांत हा बदल केव्हां होईल, याची मी वाट पहात होतो. मामा, आता तुम्ही खरे ग्रामाधिकारी आहात. यापुढे तुम्ही गांवकऱ्यांच्या गरजा पूर्ण करा आणि नांव मिळवा. उद्यां सकाळींच मला इथून रंगापूरला जावे लागेल." सूरजने सांगितलं.

*- प्रवीणा, आंध्र प्रदेश*



# धनपिपासू

**पा**लक हा हस्तवर गांवात राहात होता. तो धनपिपासू व अत्यंत कंजूष होता. सावकारी करुन व व्यापारांत त्याने भरपूर पैसा कमावला होता.

एका दिवशी व्याजाची वसुली करायला तो शेजारच्या गांवात गेला होता. परत येईपर्यंत अंधार पडला होता. तरीदेखील तो गांवी परतायला निघाला. त्यावेळी समोरुन येणाऱ्या घोडागाडीच्या चालकाने त्याला ओळखले व म्हटले, ''पालकजी, एक रुपया भाड्यामधे तुम्हाला गांवी सुरक्षित नेतो बघा!''

पालकने चिडून म्हटलं, ''मी पायी जाऊं शकतो. इतका जोरांत चालीन कीं तुझा घोडादेखील माझी बरोबरी करुं शकणार नाही.''

''एक रुपया द्यायला तुम्ही इतकी किरकिर करता आहात. तुम्हाला माहीत आहे ना, वाटेंत भुतेप्रेतेही आहेत.'' गाडीवानाने पालकला घाबरवण्यासाठी म्हटलं.

परंतु पालकने त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिलं नाही, आणि तो चालायला लागला. चांदणी रात्र होती. म्हणून रस्ता स्वच्छ दिसत होता. रस्त्यांत पारंब्यांनी लगडलेला असा एक विशाल वटवृक्ष होता, आणि त्याच्याजवळच एक जुनाट, ओसाड धर्मशाळादेखील होती. धर्मशाळेसमोर एक वृद्ध पुरुष उभा होता, त्याने विचारलं, ''ठीक आहेस ना, पालक?

पालकने त्याला नीट न्याहाळून म्हटले, ''तुम्हाला मी यापूर्वी कधी बघितलेलं नाही. कोण आहात तुम्ही?''

''मी तुझ्या सात पिढ्यांपूर्वीचा पूर्वज आहे. म्हणजे तुझा पणजोबा.'' म्हातारा म्हणाला.

''माझे पणजोबा तर माझ्या जन्मापूर्वीच मरण पावले होते. तेव्हां त्यांचे पणजोबा अजून जिवंत असूं शकतील, यावर माझा कांही विश्वास नाही. पण तुम्ही त्या पणजोबांच्या पणजोबांचं भूतबित तर नाही ना?''

''तू बरोबर ओळखलंस. घाबरुं नकोस, पालक मला तू खूप आवडतोस. म्हणून तर तुला ही सगळी धनराशी द्यायला मी आलो आहे. माझ्या आयुष्यांत मी ही संपत्ती लपवून ठेवली होती. या गुप्तधनाबद्दल आणि माझ्याबद्दल मी तुला सांगतो ते ऐक.'' तो वृद्ध म्हणाला.

रजनी कामत

त्या भुताचे नांव प्रकाश होते. तो पालक पेक्षांही जास्त श्रीमंत व कंजूष होता. पैसे सांठवणे हे त्याचे एकमेव लक्ष्य होते. त्याची मुलें किंवा नातवंडे कांही त्याच्यासारखी नव्हती. ती कंजूष नव्हती किंवा पैशांमागे पळत नव्हती. हीच चिंता त्याला कायम पोखरत होती. ती सारीजण उदार मनाची होती.

संधी मिळेल तेव्हां दानधर्म करायला पुढे होत असत. सढळपणे पैसे खर्चत असत. जेव्हां प्रकाशने पाहिलं कीं त्याने सांठवलेला पैसा बर्फासारखा वितळून जातो आहे, तेव्हां त्याला फारच वाईट वाटले.

बराच विचार करुन त्याने एक कठोर निर्णय घेतला. त्याने सर्वांना घराबाहेर काढलं. मेल्यानंतर भूत होऊन त्या संपत्तीचे तो रक्षण करुं लागला. नुकतीच त्याला पालकबद्दल माहिती कळली. त्याला वाटलं कीं एवीतेवी पालक हा त्याचाच वारस आहे, तर ही धनसंपदा त्यालाच देऊन टाकावी. म्हणजे धन सुरक्षित राहीलच, शिवाय त्यांत वाढ होईल.

पालकने भुताचे म्हणणे नीट ऐकले आणि त्याला हर्षवायू झाला. भूत त्याला म्हणाले, ''बघ पालक, माझी सारी संपत्ती मी तुला देईन, पण एका अटीवर.''



पालकने आतुरतेने विचारले, ''सांगा, कोणती अट आहे?'' ''मी अदृश्य राहून तुझ्याबरोबर सतत राहीन. घराची सारी जबाबदारी माझ्यावर तू सोंपवली पाहिजेस. मी सांगेन तसंच वागलं पाहिजेस.'' भुताने म्हटलं.

लोभी पालकने मागचा पुढचा कांहीही विचार न करता आनंदाने भुताची ही अट मान्य केली. त्यानंतर प्रकाशने आपली सगळी लपवलेली संपत्ती पालकच्या स्वाधीन केली. आणि पालकच्या घराची देखभाल करण्याची जबाबदारी भुताने स्वीकारली. त्याच क्षणीं घराचा नरक बनला. घरांत पालकची आई, त्याची पत्नी, तीन मुलें असे सहाजण राहात होते. त्याच्या अटीनुसार जेवणांत तिका तांदूळ लागत होता, त्याचा चौथा भाग वांचवायचा होता. बेचव भाजी-आमटी व



पातळसर ताक, यावर समाधान मानावे लागत होते. सणावारी गोडधोड करायला मनाई होती.

पूर्वी पालक इतका कठोर वाटत नसे. तो इतका निर्दय कसा काय झाला, याचेच आश्चर्य घरांतल्या लोकांना वाटायला लागले. त्याचे वागणे-बोलणे एकदम बदलले.

एके दिवशी पालकची दहा वर्षांची मुलगी पार्वती ही अचानक आजारी पडली. "पार्वतीला शेजारच्या गांवातल्या वैद्यांकडे न्यायचे आहे. पेटीमधे थोडे पैसे मी काढून घेऊं कां?" पालकने भुताला दबत्या स्वरांत विचारले.

"नाही! आपले वाडवडील सांगत असत कीं उपवास हे सर्वांत मोठे औषध आहे. तिला उपास करायला सांग म्हणजे ताप पळून जाईल." भुताने कडक शब्दांत नकार दिला.

"ताप कमी होण्याची चिन्हें दिसत नाहीत. कांही झालं तर?" पालकने दीनवाण्या स्वरांत म्हटले.

"तसं झालं तर आपल्याला फायद्याचंच आहे कीं! हल्ली मुलीचे लग्न करायचं म्हणजे केवढा मोठा खर्च येतो. ती कांही लहानसहान गोष्ट राहिलेली नाही. आपला खर्च वांचेल कीं!" भुताने मोठ्याने हंसत म्हटले. हे ऐकून पालक हतबुद्ध झाला.

मुलीच्या प्रकृतिच्याबाबतीत पालक इतका उदासीन आहे, हे पाहून त्याची पत्नी लक्ष्मी एकदम भडकली.

तिने पेटी उघडण्यासाठी एक किल्ली शोधून काढली. नवऱ्याच्या गैरहजेरींत तिने पैसे काढले आणि मुलीवर उपचार करवले. आता पार्वतीचा ताप हळूंहळूं कमी होऊं लागला.

भुताला शंका आली कीं त्याला न सांगता घरांत कांहीतरी गडबड होते आहे. एके दिवशी तो पालकसोबत न जाता घरांतच थांबला. घरांत काय चाललंय ते त्याला समजलं.

पालक जेव्हां रात्री घरी परत आला, तेव्हां भुताने गळा काढून म्हटले, "अरे, पेटींत कायकाय शिल्लक राहिलंय ते जरा बघ तरी!"

पालकने पेटी उघडली तर त्यांत दोन प्रकारची भस्मे, चाटण, काढ्याची बाटली त्याला दिसली. तितक्यांत त्याची पत्नी तिथे आली. तिला त्याने विचारले, "हे सर्व काय आहे?"

"हो, मीच ही पेटी उघडली, पैसे घेतले आणि लेकीवर उपचार करवले. असं केलं म्हणून माझं कांही चुकलं कां? जे धन मुलीच्या औषधालाठी देखील वापरता येणार नसेल, तर ते आपल्या काय कामाचं? तुमच्यासाठी पैसा हेच सर्वस्व आहे ना? मग आपल्याला जेवणखाण नको, उपाशी राहूं आणि आपण सगळेच एकदम आत्महत्त्या करुन टाकूं." लक्ष्मीने डोळे पुसत म्हटले.

कांहीही न बोलता पालक निघून गेला. त्याला रात्रभर झोंप आली नाही. पहाटेच्या सुमारास त्याने एक निर्णय घेतला. ती पेटी उघडून थोडीशी रक्कम त्याने पत्नीला देऊन म्हटले, "लक्ष्मी, माफ कर मला मी चुकलो. वेळेवर इलाज करुन तू पार्वतीचे प्राण बांचवलेस. या पैशांतून घरासाठी ज्या वस्तू आवश्यक आहेत त्या खरेदी कर. नीट लक्षांत ठेव. आपल्या मुलांना कांहीही कमी पडता कामा नये."

भूत हे सगळं बघत होतं. ते पालकला मागल्या अंगणात घेऊन गेलं आणि रागावून म्हणालं, "अरे पालक, तू आपला शब्द पाळला नाहीस."

"मी व्यापारी आहे. शब्द बदलणे ही माझी संवय आहे." पालकने धीटपणे उत्तर दिलं.

"अरे, माझी इच्छा होती कीं पिढ्यान् पिढ्या आपली संपत्ती टिकली पाहिजे. या हेतूने मी हे सगळं करत होतो. तू जर सांगितल्याप्रमाणे वागला नाहीस, तर तुझे काय होईल?" भुताने कर्कशपणे विचारलं.

"त्याचा निर्णय देवाच्या हातांत असेल. शेवटी संपत्ती हवी ती तरी कशासाठी? आपण जर त्याचा उपभोग घ्यायचा नाही, अन् ती पेटींत ठेवून त्याची फक्त राखण करायची, याच्याचसाठी कां? आपल्या मुलीच्या औषपाण्यासाठी देखील पैसे खर्चायचे नसतील, तर तो पैसा कशासाठी ठेवायचा? पैशाच्या लोभाने तुम्ही सर्वांना दूर लोटलेत. प्रेम, ममता राहूं द्या, तुम्ही मेल्यानंतर देखील घरांतल्या धनाचा लोभ अजून सुटलेला नाही. तुमची ही दुर्गति पाहून मी स्वतःशीच निर्णय घेतला आहे कीं पुढे माझीदेखील अशी अवस्था होऊं नये." पालकने आवेशांत सांगितलं.

"वा पालक, तू माझे डोळे उघडलेस. तुझे बोलणे शंभर टक्के खरे आहे. केवळ तुझ्या परिवारापुरताच नव्हे, तर आसपासच्या लोकांनाही मदत करुन तुम्ही सुखाने संसार करा." असे म्हणून भूत दिसेनासे झाले.





# गुरु-भार

बिश्वेश्वररायपुर एक चांगले मोठे गांव होते. तिथे भगवदगीतेचा सप्ताह चालू होता. गांवकरी आठवडाभर भक्तिसागरांत डुंबत होते. शेवटच्या दिवशी त्रिपाठीने त्यांना सांगितले,

''प्रिय श्रोतेगणहो, परमेश्वरांने मला इतकाच वेळ दिलेला आहे. मला आता दुसऱ्या गांवी अशाच कार्यक्रमासाठी जायला हवे. मोक्षप्राप्तिसाठी निरंतर प्रयत्न करीत राहिले, तर मानवजन्माचे सार्थक होते. त्या मार्गदर्शनासाठी एका सद्गुरुची नितांत आवश्यकता असते. असा गुरु देवासारखा असतो. आपणा सर्वांना अशा सद्गुरुचा अनुग्रह मिळावा, अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे. आता मी आपल्या सर्वांचा निरोप घेतो.''

गांवकऱ्यांनी त्रिपाठींचा सत्कार केला, त्यांना अनेक भेटी दिल्या आणि आनंदाने त्यांना निरोप दिला.

मंगल व भवानी त्या गांवातले जमीनदार होते. दोघे चांगले मित्र होते. त्यांनी त्रिपाठीजींची प्रवचने अगदी लक्ष देऊन ऐकलेली होती. घरी परतल्यावर भावनेच्या भरांत मंगलने भवानीला सांगितलं,

''त्रिपाठीजी महान पंडित आहेत. जीवन परमार्थावर त्यांनी सांगितलेले विवेचन खरोखरच किती चांगले होते, नाही?''

''हो तर, ते साक्षात् सरस्वतीचे पुत्र आहेत'' भवानी म्हणाला.

''जेव्हां मी त्यांचं प्रवचन ऐकलं, तेव्हांपासून माझं मन अस्वस्थ झालेलं आहे. मला सद्गुरुचा शोध घ्यायचा आहे, आणि त्यांच्या पायावर माझे आयुष्य वाहायची माझी इच्छा आहे. तू कांही काळ माझ्या शेतीवाडीची जबाबदारी संभाळ, माझ्या घराकडे लक्ष ठेव. जर तू कबूल झालास तर मी त्या कामासाठी बाहेर पडणार आहे. सांग, तुझी तयारी आहे? मला यांत मदत करशील?'' मंगलने विचारलं.

''तुला मदत करायला माझी तयारी आहे. पण एक गोष्ट नीट लक्षांत घे. गुरु शोधायचा, तो किती चांगला आहे ते पाहाण्यासाठी आपल्याला योग्य ती परिस्थिती व ज्ञान असतेच असं नाही! शिवाय गुरु हवा, तो कशासाठी हवा आहे? खूप विचार करुन मग निर्णय घे.'' भवानीने सल्ला दिला.

''मी खूप विचार करुनच हे ठरवलं आहे. प्रयागजवळ कुणीतरी श्रेष्ठ महात्मा आहेत म्हणे! ते पाण्यावरुन चालतात, हवेंत तरंगतात आणि आगीतूनसुद्धां चालू शकतात असं ऐकलंय. मी त्यांच्याकडे जायचं ठरवलंय. त्याच्या सहवासांत माझे आयुष्य नक्की सत्कारणी लागेल'' मंगल म्हणाला.

आता मंगलला थांबवले तरी तो थांबणार नाही हे भवानीच्या लक्षांत आले. म्हणून तो मंगलला आश्वासन देत म्हणाला,

''तू निश्चिंत मनाने जा. तुला लौकरच सद्गुरुचे दर्शन होवो, व तुझा उद्धार होवो अशी माझी मनःपूर्वक प्रार्थना!''

मंगल प्रयागला गेला आणि तिथे नित्यानंदस्वामींच्या आश्रमांत पोंचला. तिथे त्याला लोकांची खूप गर्दी दिसली. ती पाहून मंगल आनंदून गेला. शिष्यांनी त्याची चौकशी केली आणि स्वामीजींकडे ते त्याला घेऊन गेले.

त्यांना पाहून मंगळ अभावितपणे उद्गारला,



''वा, किती तेजस्वी चेहरा आहे, किती समाधान वाटतंय!'' आणि त्याने भक्तिभावाने स्वामीजींच्या पायावर डोके ठेवले.

''उठ मंगल, तुला मोहपाशांतून सुटका हवी आहे ना, तर तुला कांही काळ तपस्या केली पाहिजे. त्यानंतर तुला जे हवे आहे, ते तुला मिळेल. हरि ओम् तत्सत्!'' स्वामीजींना त्याला आशिर्वाद दिला.

''आपण सर्वज्ञ आहात. माझ्याबद्दल आपल्याला सारे कांही माहित आहे. या जन्मांतून मला मुक्ती हवी आहे.'' मंगलने विनंती केली.

स्वामीजींनी हंसून म्हटले, ''सारं कांही तुझ्याच हातांत आहे. हे बघ मंगल, तुझ्या मनांत वैराग्य वाढलं पाहिजे. हा प्रसाद घे आणि श्रद्धाभक्तिपूर्वक हा खा.'' असं म्हणून स्वामीजींनी हवेंत

जयप्रकाश



हात वर केला. त्यांच्या हातांत अचानक एक सीताफळ दिसूं लागले, ते त्यांनी मंगलला दिले. तो भारावून गेला.

मंगलने घर सोडल्याला आता सहा महिने होऊन गेले होते. त्याचा ठावाठिकाणा कुणाला माहित नव्हता. कांही लोकांनी म्हटलं, "तो हिमालयांत आहे."

तर कुणी म्हटलं, "तो आता म्हणे बैरागी झालाय!" या गोष्टी ऐकून मंगलची पत्नी व मुलें हैराण झाली. पण त्यांचा नाईलाज होता. भवानीचा मात्र त्यांना चांगला आधार होता. प्रत्येक वेळी अडीअडचणीला तो त्यांना धीर देऊन मदत करीत होता.

एक दिवस मंगलकडून दोन पत्रें आली. एक त्याच्या पत्नीला व दुसरें भवानीला. त्याने त्या पत्रांत लिहिले होते, "मी श्री नित्यानंद आश्रमांत राहातो आहे. परमपूज्य गुरुजींनी मला उपदेश केला आहे कीं मी बंधने तोडून तुम्हा सर्वांपासून दूर राहावे. इथें शांतपणे मी राहाणार आहे.

माझी पत्नी व मुलांना कोणतेही कष्ट होऊं नयेत, कसलीही उणीव भासूं नये, म्हणून त्यांच्यासाठी तीन एकरांचे शेत व घर मी त्यांना देतो आहे.

जी शेतजमीन उरली आहे, ती व मळा मी विकणार आहे आणि या आश्रमांत येऊन राहाणार आहे. जर योग्य किंमत आली तर मी येईन, आणि जमीन विकून परत इथे येईन.

पण गुरुजींनी सांगितलं तरच माझा हा निर्णय बदलूं शकेल."

पत्र वाचून मंगलची पत्नी व मुले भेदरली व लगेच भवानीच्या घरी गेली. त्याने त्यांची समजूत घालीत म्हटले, "मी सांगतोय तसे करा. तुमची काळजी दूर होईल." त्या सर्वांनी होकार दिला. नंतर ती दोन्ही पत्रे घेऊन भवानी ग्रामाधिकाऱ्या-जवळ गेला. त्यापूर्वी मंगलबद्दलची माहिती त्याने ग्रामाधिकाऱ्याला सांगितली होती. ती दोन्ही पत्रे वाचून दोघांनी त्यावर चर्चा केली.

महिन्याभरांतच मंगल अचानक गांवात आला. तो सरळ ग्रामाधिकाऱ्याकडे जाऊन म्हणाला,

"अहो, इतका घोर अन्याय! असा द्रोही मित्र मी कधी पाहिला नव्हता. त्याच्यावर विश्वास ठेवून मी माझी संपत्ती, माझा परिवार, त्याच्या



स्वाधीन केला होता. आणि भवानीने माझ्याशी अशी लबाडी केली.

माझी घर जमीन स्वतःच्या नांवाने केली आणि माझी बायकोमुलें रस्त्यावर आली आहेत. त्यांना न्याय द्या. मला आणि माझ्या कुटुंबाला तुम्ही वांचवा, भवानीला शिक्षा करा हो!"

ग्रामाधिकाऱ्याने मंगलकडे रोखून बघितले व म्हटले, "तुझ्यावर कसला अन्याय झाला आहे? भवानीवर तुझा कोणता आरोप आहे?"

"मी त्याने केलेल्या लबाडीबद्दल सांगितलं आहे. गुरुंच्या शोधार्थ जाण्यापूर्वी मी भवानीला म्हटलं होतं कीं माझ्या कुटुंबाची नि शेतजमिनीची देखरेख कर. पण त्याने माझ्या मालकीची सारी संपत्ती स्वतःच्या नांवावर केली. यापेक्षां जास्त मोठा अन्याय कोणता असेल?" मंगलने त्वेषाने म्हटलं.

"ते ठीक आहे. त्यावर आवश्यक ती कारवाई मी करीन. परंतु हे सांगा कीं तुमच्या गुरुने काय उपदेश केला होता?" ग्रामाधिकारी शांतपणे विचारत होता.

"भवबंधने पूर्णपणे तोडून आलास तर तुला मी मोक्षाचा मार्ग दाखवीन." मंगलने सांगितलं.

"भवबंधने म्हणजे कोणती असतात हो?" ग्रामाधिकाऱ्याने प्रश्न केला.

"भवबंधनचा अर्थ आहे, पत्नी, मुले, आप्त, मित्र वगैरे सर्वांना विसरुन जाणे, त्यांचा त्याग करुन निघून जाणे!" मंगल म्हणाला.

"तुम्ही पत्रांत लिहिलं होतं कीं तुमच्या मनांत



वैराग्य आलं आहे. भवबंधन तोडून टाकायचं आहे, वगैरे! तेव्हां पुन्हां "हे माझं आहे, मला हवंय" हे सगळं पुन्हां कसं उपटलं? आणि आता तुमच्यापाशी राहिलंय तरी काय? तेव्हां तुम्ही आपल्या गुरुकडे परत जा आणि परमेश्वराच्या सेवेंत रुजूं व्हा ना. तुम्हाला मोक्षही नक्की मिळेल." ग्रामाधिकारी उपहासाने म्हणाला.

"माझे गुरुजी नेहमी मला सांगत असतात कीं कोणतेही काम पूर्ण झाल्याशिवाय परत येऊं नको. जोपर्यंत माझी मालमत्ता मला परत मिळत नाही, तोपर्यंत मी इथून हालणार नाही." मंगल ठामपणे म्हणाला.

त्यावर ग्रामाधिकारी मोठ्याने हंसायला लागला व नंतर मंगलला म्हणाला, "भवानीजवळ जी कागदपत्रे आहेत, त्यावरुन ती सारी संपत्ती

त्याच्या नांवावर आहे. थांबा, मी त्यांना इथे बोलावून घेतो."

"त्यानेच ते खोटे कागद बनवलेले असतील." मंगल संतापाने म्हणाला.

"पण तुम्ही तर म्हणता आहात ना की मला कांही नको म्हणून! तुम्ही तर सगळ्याचा त्याग केला आहेत. तुम्हाला फक्त मोक्ष हवा आहे ना? मग या जंजाळात पुन्हां कशासाठी अडकता आहात?" गंभीर स्वरांत ग्रामाधिकारी म्हणाला.

"मला नको आहे असं मी कधी म्हटलं? मला तर हवं आहे म्हणून तर मी आलो आहे." मंगल न डगमगता म्हणाला.

"तुम्हाला काय हवं आहे? मालमत्ता कीं परिवार? तुमचा गुरु कीं त्यांनी सांगितलेला मोक्ष? तुमच्यामधे तर कणभरदेखील वैराग्य आलेलं दिसत नाही." ग्रामाधिकाऱ्याची कठोर प्रतिक्रिया होती.

ती ऐकून मंगल विचारांत पडला. त्यातलं मर्म मंगलच्या लक्षांत आलं. त्याने हात जोडून म्हटलं, "माझ्या हातून किती मोठी चूक झाली आहे ते आता मला लक्षांत आलं. मला क्षमा करा. माझे डोळे आज उघडले!" मंगलने ग्रामाधिकाऱ्याचे पाय धरले.

ग्रामाधिकाऱ्याने मंगलला प्रेमाने वर उठवले आणि त्याला म्हटले,

"तुम्हाला आपली चूक समजली ही आनंदाची गोष्ट आहे. तुमच्या मनांत हे परिवर्तन व्हावे म्हणून मी आणि भवानीने मिळून हे नाटक केले. तुमच्या कुटुंबाचे कसलेही नुकसान झालेले नाही. स्वतःच बघून घ्या." असं म्हणून ग्रामाधिकारी त्याला आंतल्या बाजूला घेऊन गेला. तिथे भवानी व मंगलची पत्नी व मुले अतिशय अस्वस्थ होऊन त्याची वाट पाहात होते.

मंगलला मिठी मारुन भवानी त्याला म्हणाला, "मी तेव्हांही तुला सांगत होतो. पण तू ऐकण्याच्या मनःस्थितींत नव्हतास. म्हणून मी गप्प बसलो. जो गुरु असतो तो तुमची इच्छा पूर्ण करतो. तुमच्याकडून कांहीतरी हांव असलेला गुरु नसतोच, तो उलट भार असतो."

मंगलने शरमेने मान खाली घातली.





# चन्दामामा प्रश्नावली-६



बरोबर उत्तर देणाऱ्यांपैकी एकाला रु.२५०/- दिले जातील.

*या प्रश्नावलीत विचारलेले सर्व प्रश्न २००५ मधे जानेवारी ते डिसेंबर या अंकांत असलेल्या गोष्टींवर आधारित आहेत. तुम्ही त्या वाचलेल्या आहेत. जर तुम्हाला त्या आठवत असल्या तर तुम्ही लगेच उत्तरे देऊं शकाल. लक्षांत नसतील तर बाराही अंक पुन्हां नजरेखालून घाला. म्हणजे उत्तरे शोधताना मजा वाटेल.*

**अचूक उत्तरे देणाऱ्यांची संख्या एकापेक्षां जास्त असेल तर बक्षिसासाठी सोडत काढण्यांत येईल व पांच विजेत्यांना समान रक्कम वाटून दिली जाईल.*

<u>त्यासाठी</u> : १. उत्तरे लिहा. २. आपले नांव, वय (१६ वर्षांखालील मुलांसाठीच ही स्पर्धा आहे) व पिनकोडसहित पत्ता. ३. एका कुटुंबातून एकाच व्यक्तीला भाग घेता येईल. ४. वर्गणीदार असलात तर तो क्रमांक. ५. पाकिटावर चंदामामा प्रश्नावली-६ असे लिहा व चंदामामाचा संपूर्ण पत्ता लिहून आम्हाला पाठवा. ६. जुलै महिना अखेरपर्यंत तुमची प्रवेशिका आमच्याकडे पोंचली पाहिजे. ७. ऑगस्टच्या अंकात निकाल जाहीर होतील.

१. "वाघाच्या मिशीसाठी तू ज्या ठाम विश्वासाने व दृढ निश्चयाने प्रयत्न केलास, तसाच प्रयत्न आता कर. तुला अवश्य विजय मिळेल." साधूचा हा सल्ला आचरणांत आणला आणि आपल्या पुत्राला प्रेम व आदराने विद्या शिकवल्या, आणि त्याला लायक बनवले. असे करणारा कोण राजा होता आणि कोणत्या गोष्टींत होता?

२. जगांतले सर्वांत जुने तेल शुद्धीकरण केंद्र आपल्या देशांत कुठे आहे?

३. अकबर जेव्हां सिंहासनावर बसला तेव्हां त्याचे वय किती होते?

४. दख्खनच्या पठारावरची सर्वांत लांब नदी कोणती आहे?

५. विश्व आहार दिन हा उत्सव केव्हां साजरा होतो?

६. गझलचा जन्म कुठे झाला?

७. सर्वांत प्रथम कॉंग्रेसच्या अध्यक्ष पदावर निवडून आलेले मुसलमान कोण होते?

८. हे चित्र कोणत्या कहाणींत आहे?





# अमृतसिद्धी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता सामंतराजा चिरायू याच्या पदरी नागार्जुन नामे बोधिसत्व प्रधान म्हणून काम करीत होते.

प्रधान नागार्जुन दयाळू दानशील, व रसायन-शास्त्रांत, औषध तयार करण्यात निपुण म्हणून प्रसिद्ध होता. त्याने रसायन-शास्त्रांत प्रयोग करून एक गुप्त औषध व रसायन तयार केले व ते खाऊन त्याने स्वतःला व आपल्या राजाला जरामरणापासून मुक्त करून घेतले होते.

त्याने त्या औषधाचा व रसायनाचा शोध लावला, त्याच्या मुळाशी त्याच्या मुलाचा मृत्यू होता. एकदां त्याच्या मुलांपैकी त्याचा सर्वात जास्त लाडका सोमदेव नांवाचा मुलगा मरण पावला. नागार्जुनाला अर्थातच त्याचे फार दुःख झाले. दयाळू नागार्जुनाने विचार केला की जगांत कोणाला मरणच येऊ नये व मरणामुळे कोणाला शोक करण्याचे कारणच राहू नये.

''रसायनच तयार करावयाचे झाले तर त्याला फार जास्त खर्च होणार. म्हणून जनसामान्याला-सुद्धां झेपेल अशी औषधी बनस्पती वापरून अमृत तयार केले पाहिजे.'' नागार्जुनाच्या मनात असा विचार होता.

त्याप्रमाणे तो औषधी बनस्पतींचा शोध काढू लागला. त्याला जेवढे आयुर्वेद शास्त्राचे ज्ञान होते, त्याचा पूर्ण उपयोग करून त्याने अनेक प्रयोग सुरु केले. अनेक क्रिया प्रक्रिया करून यश मिळण्याची चिन्हें दिसू लागली आणि शेवटचा टप्पा गाठायची वेळ आली. 'अमृतकल्प' नांवाची एक विशिष्ट मुळी त्यांत मिळविली की प्रयोग पूर्ण होणार होता.

ही गोष्ट इंद्राला कळली. त्याने लगेच अश्विनी-कुमारांना बोलाविले आणि त्यांना आज्ञा केली - ''तुम्ही लगेच भूलोकांत जायला निघा, आणि नागार्जुनाने जो 'अमृत योग' सिद्ध करण्याचा प्रयोग सुरुं केला आहे, त्यांत विघ्न आणा.''

अश्विनीकुमार वेष पालटून भूलोकी आले व नागार्जुनाला भेटून कुशल प्रश्न विचारूं लागले. ते म्हणाले - ''मंत्रीवर! राज्ये कशी उलटून पाडायची यांत आपण निष्णात व चतुर आहात. आपणांस माहीत नाही, असे या जगांत काय आहे? पण ब्रह्मदेवाचा संकल्पच उलटून टाकण्याच्या प्रयत्नात आपण व्यस्त दिसतां आहात, हे काय? ब्रह्मदेवाने कपाळावर लिहून ठेवले आहे, तेच उलटून टाकण्याच्या प्रयत्नांत जर आपण गुंतून राहिलात तर जगाचं रहाटगाडगं कसं चालायचं? अमृत सिद्धी झाल्याने सृष्टीचे पालन करणे देवांना अशक्य होईल. आपल्याला आपल्या प्रयोगांत यश आले तर देव आणि मानव यांत भेद तो काय राहणार? आपला लाडका मुलगा गेला, त्याचा आपण एवढा धसका घेतलात व ब्रह्मदेवाची सृष्टीच बदलून टाकायचा निर्णय घ्यावा, हे बरोबर नाही. आपला मुलगा भूलोक सोडून निघाला, पण आता तो स्वर्गसुख उपभोगीत आहे!''

परंतु त्या सर्व उपदेशाचा नागार्जुनाच्या मनावर फारसा परिणाम झाला नाही. आपण करतो आहे ते काम चूक आहे की बरोबर, या विचारांत तो गढून गेला. त्याचवेळी चिरायू सामंतराजाचा मुलगा जयसेन याच्या राज्याभिषेकाची जय्यत तयारी चालू होती. शुभमुहूर्त जवळ येऊ लागला तसतसे दरबारला उत्सवाचे रूप येऊ लागले. मध्यंतरी वृद्ध ब्राह्मण रूप घेऊन इंद्र भूलोकात आला व जयसेनाला भेटून म्हणाला, ''नागार्जुनाने जे रसायन तयार केले आहे ते प्राशन करून माझे वडील जरामरणाच्या



भयांतून मुक्त झाले आहेत, हे तुला माहीत नाही वाटतं? म्हणजे तुला आयुष्यभर युवराज रहावे लागणार, सिंहासनारूढ होण्याचे भाग्य लाभणार नाही.''

ते ऐकून जयसेन विचारांत पडला. तेव्हां तो वृद्ध ब्राह्मण त्याला म्हणाला, ''बाबा रे, यासाठी एवढं दुःखी होऊन हातपाय गाळून बसण्यात काय अर्थ आहे? तुझी इच्छा पूर्ण होण्यास सोपा उपाय आहे, दररोज नागार्जुन जेवणापूर्वी कोणी कांही मागितले तर ते तत्काल देतात. उद्या तू त्यांच्या जेवणापूर्वी जा आणि मागेपुढे न पाहतां म्हण - ''मला तुमचे मुंडके हवे आहे!'' इंद्राने जयसेनच्या मनात चांगले विष ओतले.

राज्याकांक्षा असल्यामुळे जयसेन दुसऱ्याच दिवशी नागार्जुनाच्या जेवणाच्या वेळी गेला

आणि वृद्ध ब्राह्मणाने सांगितलं होते तसेच म्हणाला. नागार्जुनाने कोणताही संशय न दर्शविता आपली तलवार उपसून जयसेनाच्या हातांत दिली व म्हणाला - ''बाबारे! माझे मुंडके कापून घे!'' जयसेनाने अनेक वेळा तलवारीने वार केले परंतु तलवार 'खणकन' वाजे, परंतु डोके कांही कापले जात नव्हते. कारण 'अमृतसिद्धी' रसायनाच्या प्रभावाने त्याचा देह वज्रदेह झाला होता.

ही गोष्ट चिरायू राजाच्या कानावर हांहां म्हणता गेली. तो धावतच तेथे आला. मुलगा करत होता ते बरोबर नाही, असे त्याला समजावून सांगू लागला.

तेव्हां नागार्जुन राजाला म्हणाला - ''महाराज, हे युवराज कां मारीत आहेत याची पूर्वापर कथा मला माहीत आहे. ते निमित्तमात्र आहेत. म्हणून त्याला अडवू नये. आतांपर्यंत मी पूर्वजन्मी 'नको' न म्हणतां नव्याणव वेळा आपले डोके कापू दिले आहे. आज शंभरावी वेळ आली आहे. मी हा जो वेष धारण केला आहे त्याला अपकीर्ती येतां कामां नये, यासाठी मी वचन दिल्याप्रमाणे ते पूर्ण करण्याची जबाबदारी माझ्याइतकी आपणांवरही आहे.'' असे सांगून नागार्जुन राजाला अगदी शेवटचा म्हणून कडकडून भेटला.

त्यानंतर त्याच्या जवळच्या मुळ्यांतली एक मुळी काढून ती तलवारीवर घासून तलवार जयसेनाला देत म्हणाला - ''बाबा रे, आता वार कर!''

जयसेनाने यावेळी वार करतांच नागार्जुनाचे डोके, देठ कापताच जसे कमळ जमिनीवर पडते तसे पडले.

ते दृश्य पाहू न शकल्यामुळे राजा स्वतः आत्महत्या करायला तयार झाला.

त्या वेळी नागार्जुनाचे खाली पडलेले डोके बोलू लागले - ''चिंतामग्न होऊ नकोस. तू किती जन्म घेतलेस तरी मी नित्य तुझ्याबरोबरच राहीन.'' असे म्हणत त्याने प्राणत्याग केला. राजाला जिवाचा वीट आला. त्याने तत्क्षण मुलाचा राज्याभिषेक करून दिला व तपश्चर्या करण्यासाठी वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला.

अशा प्रकारे जयसेनाला राज्यलाभ झाला. देवेंद्राची इच्छा पूर्ण झाली.







# रामायण

''रामाला वनवास देऊन भरताचा राज्याभिषेक कसा करायचा हे मी सांगते. राणीसाहेबांना आठवत नाही का, एकदां देव व राक्षस यांचे युद्ध चालू असता महाराज इंद्राला मदत करण्यासाठी गेले हते त्यांच्या बरोबर राणी सरकारपण गेल्या होत्या. दंडकारण्यांत मत्स्यध्वज याच्या राज्यांत वैजयंतजवळ शंबर नांवाच्या राक्षसाशी युद्ध करीत असतां महाराज जखमी होऊन बेशुद्ध झाले होते. तेव्हां राणीसरकारांनी रथ युद्धभूमीपासून दूर नेऊन महाराजांचे रक्षण केले होते. शुद्धीवर आल्यावर महाराजांनी राणीसाहेबांना दोन वर देऊं केले होते. ते वर मागण्याची वेळ आतां आली आहे. एका वराने रामाला चौदा वर्षे वनवास व दुसऱ्या वराने भरताला राज्य मागून घ्यावे.'' मंथरेनें कैकेयीला सुचविले.

वस्तुतः कैकेयीचा स्वभाव दुष्ट नव्हता. परंतु मंथरेच्या संगतींत तिचे मन पालटले होते.

ती मंथरेला म्हणाली - ''कुबडे! तूं कुबडी असलीस तरी तुझे डोके मात्र खूप चालते बाई! तुझ्या इतकी माझे हित इच्छिणारी दुसरी कोणी असेल असे नाही वाटत.''

नंतर तिने मंथरेच्या सल्ल्याप्रमाणे अंगावरचे सर्व दागिने काढून जमिनीवर फेंकून दिले व एक फाटके जुने लुगडे नेसून ती कोपगृहांत जमिनीवर जाऊन झोंपली.

मंथरेनें तिला बजावून सांगितले, ''महाराज येतील तेव्हां त्यांच्याशीं बोलूं नका. रडत रहा. फक्त रामाची शपथ घेऊन विचारीपर्यंत कांही बोलूं नका. कारण रामाची शपथ घेतल्यावर ती मोडणे शक्य नाही.''



"त्या शंबर राक्षसापेक्षां तूंच जास्त वस्ताद दिसतेस की ग!" असे प्रेमाने सांगत तिने मनाशी निश्चय केला की राजाने वचन दिल्याप्रमाणे वर दिले नाहीत तर त्याच्या समोरच डोके फोडून प्राण द्यायचा.

महाराज दशरथ रामराज्याभिषेकाची सर्व तयारी करण्यासाठी आज्ञा देऊन कैकेयीला स्वतः शुभवार्ता देण्यासाठीं तिच्या महालाकडे निघाले. पण ती तेथे नव्हती. चौकशी करतां ती कोपगृहांत गेल्याचे कळले. तेव्हां राजा मनांतल्या मनांत चपापला.

परंतु तिच्या रुसण्याखुपण्याचा राजाला चांगला अनुभव होता. म्हणून "ती काय मागेल ते देऊं" असा विचार करीत राजा कोपगृहाकडे निघाला.

तेथे जाऊन राजाने तेथले दृश्य पाहिले तेव्हां राजाच्या हृदयाला चरकाच बसला. आजच्या-सारख्या शुभप्रसंगी तिने असा अशुभ वेष कां बरे करावा? ती जमिनीवर लोळत पडली होती. मोत्याचा हार तुटलेला होता, आणि आकाशांत तारे असतात तसे जमिनीवर मोती विखुरलेले होते.

दशरथाने जवळ जाऊन प्रेमाने विचारले -

"एवढा राग यायला काय कारण झाले? कोणावर राग हा? कोणी तुला रागावले कीं तुझा अपमान केला? तुला बरे नाही का? राजवैद्याला बोलावूं कां? तूं सांगशील त्याचे डोके उडवतो. ऐकूं तरी दे कीं तुझा अपमान करण्यासाठी येणारा असा हा कोण आहे? सांग कोणाला राजाचा रंक करूं? ऐकूं तरी दे, तुझ्या मनांत काय आहे ते. आज तुझ्या लाडक्या रामाचा राज्याभिषेक आहे. अशा शुभप्रसंगी तुला असे रुसणे शोभते कां?"

पण कैकेयीनें तोंड उघडले नाहीं. राजाने प्रेमानें तिची वेणी हातांत घेऊन विचारले -

"लाडके! काय हवे तुला? घे मागून. रामाची शपथ, तूं मागशील ते मी देईन."

तेव्हां तिने विचारले - "मागे दोन वर दिले होते ते आठवते का?"

राजा म्हणाला - "अग, दोनच काय? दोनाच्या जागीं चार मागून घे! मुद्दल व्याजासकट वसूल करून घे. पण अशी रुसून नको बसूं." बिचाऱ्या राजाला कैकेयीच्या मनांतला दुष्ट हेतू कोठे माहीत होता?



राजाने रामाची शपथ घेतल्यावर तिने दोन्ही वर मागितले. म्हणाली -

"पहिल्या वराने रामाच्या ऐवजी भरताला राज्य व दुसऱ्या वराने रामाला चौदा वर्षे वनवास द्यावा."

तें ऐकून राजाला डोक्यावर एकदम वीज पडल्यासारखे वाटले व तो त्या धक्क्याने बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. थोड्या वेळाने शुद्ध आल्यावर रागाने म्हणाला -

"तूं एक राजकन्या आहेस असे समजून मी तुझ्याशी लग्न केले. पण तूं एक नागीण आहेस हे मला आज कळले. तुझे त्याच्यावर स्वतःच्या मुलापेक्षां जास्त प्रेम होते, आणि आज तुला हे काय झाले? तुझ्या मानेवर भूत तर नाहीना बसले? नाही तर तूं असे बोलली नसतीस. मी काय पाप केले किंवा त्याने तरी काय केले? आज विनाकारण त्याला ही वनवासाची शिक्षा कां? राम समोर नसेल तर मी एक क्षणभरदेखील जगूं शकणार नाही. तूं हा हट्ट सोड. भरताला तूं राज्य मागून घेतलेस, त्याला मी नाही म्हणत नाहीं. पण निरपराध रामाला वनवास कां, हे नाही कळले मला.

मी तुझ्या पाया पडतो. पदर पसरून प्राणाची भिक्षा मागतो. मीच जगांत राहिलो नाही तर तुला तरी काय सुख मिळणार?

मी जिवंतपणी भरताचा राज्याभिषेक पहावा असे नाही कां तुला वाटतं? भरतावर माझे प्रेम आहे कीं नाही, ह्याची परीक्षा पाहण्यासाठीं तूं हा



वर मागितला असलास, तर मी गैर म्हणत नाही. पण रामाला वनवास द्यायला सांगून तूं लोकमर्यादा पाळली नाहीस. या जगांत मी चार दिवसांचा पाहुणा आहे. काय वाटेल तो दुसरा वर मागून घे."

पण दशरथाच्या विनवण्यांचा उलटाच परिणाम कैकेयीच्या हृदयांत होत होता. ती म्हणाली-

"पहिल्याने वचन देऊन, रामाची शपथ घेऊन वर मागायला सांगितला आणि मी मागितला. वचनभंग करून क्षत्रिय कुळाला कशाला कलंक लावतां? मी तो वर परत मागून घ्यायला तयार नाही व राम वनवासाला गेला नाही तर तुमच्यासमोर जमिनीवर डोके आपटून जीव देईन, हे विसरूं नका."



दशरथाच्या दुःखी हृदयावर डागण्या देण्यासाठींच जणूं कांही ती ते सर्व म्हणाली. "राज्य द्यायचे वचन देऊन, राज्याभिषेकाची तयारी करायला सांगून कोणत्या तोंडाने रामाला वनांत जायला सांगूं?"

या दुःखाने दशरथाचा धीर सुटत चालला होता. "कैकेयीच्या सांगण्यावरून रामाचा राज्याभिषेक केला नाहीं तर प्रजा व मांडलिक राजे माझ्या नांवावर थुंकतील, त्यांच्या सल्ल्यानेच मी रामाला राज्य द्यायचे ठरविले. कौसल्येला तरी मी कसे तोंड दाखवूं?"

राजाने कैकेयीला समजावून सांगण्यासाठी साम दाम वगैरे सर्व उपाय करून पाहिले. पण तेथे त्याची डाळ शिजली नाही. ती रात्र त्याला प्रलय रात्रीसारखी वाटली.

वशिष्ठ मुनी आपल्या शिष्यांसह राज्याभिषेकाचे साहित्य घेऊन आले. अंतः पुराच्या दाराजवळ सुमंत्र उभा असलेला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. राज्याभिषेकाची सर्व तयारी झाली असल्याचे राजाला कळवायला त्याला त्यांनी सांगितले. तो आंत गेला व वशिष्ठ मुनींचा निरोप सांगून 'काय आज्ञा आहे?' असे विचारून हात जोडून उभा राहिला.

सुमंत्र राजाचा बालसखा असल्यामुळे त्याला अंतःपुरांत देखील प्रवेश मिळत होता. त्याने प्रसंग ओळखला, राजाला शोकातुर पाहून त्याला भीतीच वाटली. राणीने कांही तरी कारस्थान केले असावे हे ओळखायला त्याला वेळ लागला नाही. पण जणूं कांही घडलेच नाही असे दाखवीत त्याने नेहमीसारखी राजाला हाक मारली. म्हणाला– "महाराज! सूर्योदयाची वेळ झाली. उठावे! आज रामाचा राज्याभिषेक आहे ना? सर्व आपली वाट पहात आहेत."

दशरथाने एकदां डोळे उघडून पाहिले. रात्रभर रडत राहल्यामुळे त्याचे डोळे लाल झाले होते. तो सुमंत्राकडे पाहून म्हणाला– "सुमंत्रा! सोड मला! कशाला त्या गोष्टी बोलून मला दुखवितोस?"

राजाचे ते शब्द कानीं पडल्यावर सुमंत्राचे मन जास्तच चरकले. तो दोन पावले दचकून मागे सरकला.

दशरथ कांहींच बोलला नाही. तेव्हां कैकेयी म्हणाली– "सुमंत्रा! राजाला रात्रभर झोंप लागलेली नाही. रात्रभर रामाच्या नांवाचा जप चालला आहे. कारण देव जाणे! तूं जाऊन रामाला लवकर बोलावून घेऊन ये."

सुमंत्र निघाला, पण मनांत उलगडा होईना. राजधानींत राज्याभिषेकाची तयारी होती. राजवाड्यांत लोकांची ये जा सुरू झाली. मांडलिक राजे नजराणे घेऊन हजर झाले. पण दशरथ महाराज त्यांना कोठे दिसले नाहीत. समोर सुमंत्र दिसला. त्यांच्या प्रश्नाची वाट न पाहतां तो म्हणाला– "तुम्ही आल्याची गोष्ट मी महाराजांच्या कानावर घालतो. त्यांनी रामाला बोलावून घेऊन यायला सांगितले आहे. म्हणून मी घाईनें तिकडे जात आहे." सर्व लोक ते ऐकून चकित झाले.

कैकेयीने सांगितले ते खरे की खोटे, याची शंका आली म्हणून कीं काय कोण जाणे, सुमंत्र पुन्हां अंतः पुरांत गेला, व म्हणाला, "महाराज! सूर्योदय झाला आहे. आपले सर्व मांडलिक राजे, आपले सेनापति व स्वतः गुरु वशिष्ठ बाहेर वाट पहात आहेत. उठावे, व पुढे काय करावयाचे, ह्याची आज्ञा व्हावी!"

"रामाला घेऊन यायला कैकेयीने तुला सांगितले होते ना? मग त्याला घेऊन कां नाही आलास? तिची आज्ञा म्हणजे माझी आज्ञा नाही असे वाटले का तुला? मी जागा आहे. छान कान उघडून सर्व ऐकतो आहे. जा, रामाला लवकर बोलावून घेऊन ये!" दशरथाचे ते विचित्र बोलणे ऐकून सुमंत्र जास्तच बुचकळ्यांत पडला.



तो कांही बोलल्याशिवाय चालत होता. रस्त्यावर लोकांची गर्दी होती. कोणाशी कांही न बोलता तो रामाच्या महालाकडे गेला. त्या विशिष्ट परिस्थितीत सुमंत्राला रामाकडे जात असलेला पाहून सर्वांना आश्चर्यच वाटले.

रामाच्या वाड्यासमोर चतुरंग सेना उभी होती. वाजत गाजत त्याची मिरवणूक निघणार होती. मोठ्या थाटाने व समारंभाने त्याचा राज्याभिषेक होणार होता. सुमंत्र त्या सर्वांना बाजूला सरायला सांगून सरळ पुढे गेला. आपण आल्याची सूचना दासीकरवी आंत पाठवून अनुज्ञा होताच तो आंत गेला.

राम सर्व वस्त्रालंकार घालून राज्याभिषेकाला तयार बसला होता. सीता शेजारी उभी होती. सुमंत्राने जवळ जाऊन आदरपूर्वक अभिवादन केले व म्हणाला, "महाराज धाकट्या राणी-साहेबांच्या महालांत आहेत. त्यांनी आपल्याकडे मला बोलावून आणण्यासाठी पाठविले आहे."

ते ऐकून रामाला आनंद झाला. लगेच उठून तो रथांत बसून राजाच्या दर्शनास निघाला. लक्ष्मण त्याच्या पाठीमागे येऊन उभा राहिला. एका हातांत छत्र घेऊन, दुसऱ्या हाताने चंवर हलवूं लागला. रामाच्या रथामागून पायदळ, घोडेस्वार हत्ती व रथ यांचें चतुरंग सैन्य चालूं लागले. सर्वांना वाटले कीं, राज्याभिषेकासाठींच राम चालला असावा. पण बरोबर सीता नव्हती. म्हणून शंका कुशंकापण करूं लागले.

रामाचा रथ कैकेयीच्या महालासमोर येऊन थांबला. मागून येणारें चतुरंग सैन्य देखील अर्थातच तेथेच थांबले. राम रथांतून उतरला व पायींच दोन प्राकार पार करून कैकेयीच्या महालांत गेला.

एक सुंदर मंचकावर दशरथ व कैकेयी बसले होते. रामानें दोघांना नमस्कार केला. राजाच्या तोंडून "रामा!...." एवढाच शब्द निघाला व दुःखामुळें हुंदका आल्याने पुढे एकही शब्द तोंडावाटे बाहेर आला नाही. राजा डोळे मिटून बसून होता. दोन्ही डोळ्यांतून अश्रूधारा वहात होत्या. तो कांही बोलूंच शकला नाही. तोंड फिरवून बसून राहिला.

*(क्रमशः)*







# हिऱ्याची दुर्बीण

एका शहरांत श्रीगुप्त नांवाचा एक व्यापारी होता. एकदा श्रीगुप्तच्या नातेवाईकांच्या घरी लग्न होते. ते दुसऱ्या गांवी होते, म्हणून श्रीगुप्त त्या गांवाला चालत जायला निघाला.

रस्त्यात रंगनाथ नांवाच्या एका माणसाशी त्याची गांठ पडली. रंगनाथ शहराजवळच्याच एका गांवात राहात होता. तो आपल्या शेतांत भाजीपाला लावत असे. रोज शहरांत तो नेऊन, विकून, संध्याकाळी आपल्या गांवी परत येत असे. श्रीगुप्तला रंगनाथ माहीत नव्हता, पण रंगनाथ त्याला ओळखत होता.

ते दोघं ज्या रस्त्याने गांवाकडे चालले होते, त्या रस्त्याच्या बाजूलाच एक भुतांचा महाल होता. एके काळी तो महाल एका जमीनदाराचा होता. पण एकदा त्याच्या नातेवाईकांनी गुंडांच्या मदतीने महालावर हल्ला करून जमीनदाराच्या कुटुंबाची हत्या करुन घर लुटायचा प्रयत्न केला. त्यावेळी जमीनदाराच्या घरातले कांही लोक पळून गेले, पण महाल मात्र पूर्णपणें लुटला गेला. हळूं हळूं तो महाल ओसाड पडला. आणि मग अशी अफवा पसरली की, तिथे भुतें राहातात. तो रस्त्यापासून थोडा आंतल्या बाजूला असल्याने, तिकडे जाण्याचेही कोणी धाडस करत नसे.

त्या महालाजवळ पोचल्यावर रंगनाथ श्रीगुप्तला म्हणाला, "अहो, रोज मला इच्छा होते की एकदा हा महाल बघावा. पण मी कधी एकटा जात नाही, कोणी बघितलं तर काय म्हणतील? आज आपण दोघे आहोत, तर आपण महाल बघायचा कां?"

श्रीगुप्त हंसत त्याला म्हणाला, "भुतांच्या भीतीमुळे आजपर्यन्त गेला नाहीत असं कां नाही म्हणत?"

"मला भुतांची भीती वाटतच नाही. आणि भुताखेतांवर माझा विश्वासही नाही. चला, आंत

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



जाऊन बघू या.'' रंगनाथ म्हणाला.

दोघेजण त्या उजाड महालाच्या आंत गेले. आंत सगळीकडे वटवाघळे होती. पावसापाण्याने कांही भिंती पडल्या होत्या. अनेक ठिकाणी कोळयांची जाळी होती. या सगळ्यामुळे तो महाल भयाण दिसत होता. तरीपण दोघे हिम्मत करुन आंत गेले.

नेमके त्याच वेळी महालाचे मुख्य दार तुटून खाली पडले. भीतीने कांपत श्रीगुप्त म्हणाला, ''बाबारे, ही भुतें आपल्या दोघांना प्राणांसकट इथेच गाडतील. तुझ्यासाठी मी इथे आलो, आणि आता तर माझ्या जिवावरच बेतलंय.''

रंगनाथ हंसून म्हणाला, ''महाशय, हे कांही भुतांचे काम नाही. काल रात्री पाऊस पडला, त्यामुळे भिंती भिजून ढासळल्या. देवाचे उपकारच आहेत, की त्या आपल्यावर नाही पडल्या! आपल्याला कांही धोका नाही.''

''ठीक आहे. आता आपण बाहेर पडायचा कांही तरी मार्ग शोधायला हवा'' श्रीगुप्त म्हणाला.

रंगनाथ मोठ्या कौशल्याने तुटक्या भिंतींवर चढून बाहेर आला. त्याच्या मागोमाग श्रीगुप्त पण बाहेर आला.

एके ठिकाणी रंगनाथला पडक्या भिंतीत एक छोटासा तांब्या मिळाला. त्याच्या तोंडावर तांब्याचे झाकण होते. रंगनाथ झाकण उघडून, तांब्या उलटून पालथा केला. त्यांतून कांही खडे खाली पडले. श्रीगुप्तने ते हातांत घेऊन पारखून ओळखलं, कीं हे किंमती खडे आहेत. त्याला मोह झाला कीं रंगनाथला फसवून हे सगळे आपणच पळवावेत.

''हे बघ, सिंहद्वाराजवळ तीन किंवा पांच दगड आपण पुरुन, तिथे हा ठेवूंया. असं केलं तर घराला चांगलं असतं असं म्हणतात. नीट बघ. कदाचित् अजून कांही वस्तू सांपडतील.'' श्रीगुप्त म्हणाला.

रंगनाथ परत तुटक्या भिंतीवर चढला. थोड्या वेळाने रिकाम्या हाताने परत आला. तेवढ्यांत श्रीगुप्ताने तांब्यातले खडे काढून त्या जागी दुसरे साधे खडे घालून ठेवले. रंगनाथ आल्याआल्या ते दगड आजूबाजूला फेकत तो म्हणाला, ''ही तर पंचलिंगे आहेत. दगडाची फालतू लिंगे कोणाला हवी आहेत?'' आणि त्याने रंगनाथच्या हातांत तांब्या दिला.

श्रीगुप्तने जे खडे फेकले होते, त्यांतला एक रंगनाथच्या पायाजवळ पडला. पण त्याच्या



जवळच आणखी एक खडा दिसला, पण तो तांब्यातला नव्हता.

''एक फालतू लिंग मी आजची आठवण म्हणून माझ्या बरोबर घेतो.'' असं म्हणत रंगनाथने तो खडा हातांत घेतला.

रंगनाथला कळलं की श्रीगुप्तने तांब्यामधले खडे चोरायला आपल्याला परत पडक्या भिंतीवर चढवलं. पण तसे त्याने दाखवले नाही.

त्या नंतर दोघेही आपापल्या वाटेने निघून गेले. दुसऱ्या दिवशी रंगनाथ आपली भाजी विकून श्रीगुप्तच्या घरी गेला. रंगनाथला बघून श्रीगुप्त घाबरला. त्यामुळे रंगनाथचा संशय जास्त वाढला.

शहरांत रंगनाथचा एक मित्र होता, तो नाटकांत कामें करीत असे. एकेकाळी ते लोक श्रीमंत होते. त्याचें नांव वसंतराज होते. रंगनाथने सगळी हकीकत आपल्या मित्राला सांगितली. आणि श्रीगुप्तला चांगला धडा शिकवायला पाहिजे असं म्हणाला. वसंतराजने एक युक्ती शोधली.

त्याच दिवशी संध्याकाळी वसंतराज भरजरी पोषाख घालून व्यापारी बनून श्रीगुप्तच्या दुकानावर गेला.

श्रीगुप्त त्यावेळी पडक्या महालांत मिळालेल्या दगडांना पैलू पाडत होता. ते पैलू न पाडलेले हिरे होते. खूप दिवस मातीत गाडले गेल्याने साध्या दगडांसारखे दिसत होते.

वसंतराज श्रीगुप्तला म्हणाला, ''हे दगड हिरे आहेत ना? अरबी देशात आपल्या हिऱ्यांना खूप



मागणी आहे. मी अरब देशांत हिरे विकून लाखो रुपये मिळवले आहेत.''

''हिऱ्यांची किम्मत कशी ठरवली जाते?'' श्रीगुप्तने वसंतराजला विचारलं.

''त्यासाठी हिऱ्याची दुर्बीण नांवाचे एक उपकरण आहे. हिऱ्यांना पाणी भरलेल्या भांड्यात एक दिवसभर बुडवून ठेवायचे. तुम्हाला हवे असेल तर एक दिवस ते उपकरण मी तुम्हाला देऊं शकतो.'' वसंतराज म्हणाला.

यामुळे श्रीगुप्तचा वसंतराजवर विश्वास बसला. त्याने आपले हिरे वसंतराजला दाखवून विचारले,'' तुमच्या दुर्बिणीत यांची किम्मत करता येईल कां?'' वसंतराजने हिरे आपल्या हातांत घेऊन पहात म्हटलं,'' नक्की करता येईल. हे पूर्वीचे जुने हिरे आहेत. आजकाल मिळत नाहीत.''

"आपण ही दुर्बिण योग्य किमतीला मला विकत द्याल कां?" श्रीगुप्तने विचारले.

"हे अशक्य आहे. जगभरात अशी चारच उपकरणे आहेत." असं म्हणत रंगराजने आपल्या मोठ्या पेटीतून एक रंगीबेरंगी छोटी पेटी काढून ती उघडून म्हटलं, "आपण आपले हिरे या पेटीत ठेवा." श्रीगुप्तने त्या पेटीत हिरे ठेवले. वसंतराजने पटकन पेटी बंद केली. मोठ्या पेटीतून भस्म काढून ते श्रीगुप्तच्या हातांत देऊन म्हणाला, "तुम्ही तुमच्या हाताने हे भस्म पेटीवर शिंपडा." श्रीगुप्तने तसं केलं.

नंतर वसंतराजने मोठ्या पेटीला कुलूप लावले. छोटी पेटी श्रीगुप्तच्या हातांत देत तो म्हणाला, "उद्या याच वेळी येऊन मी माझी पेटी घेऊन जाईन." असं म्हणून तो निघून गेला.

वसंतराज सरळ रंगनाथच्या घरी पोचला. आणि त्याच्याकडे हिरे दिले. रंगनाथ म्हणाला, "हे हिरे विकून आपण अर्धे अर्धे पैसे घेऊंया." रंगनाथ म्हणाला.

"एका काळात या हिऱ्यांमुळे खून पडलेले आहेत. पूर्ण कुटुंब नामशेष झालेलं आहे." वसंतराज म्हणाला.

"हे तुला कसं माहिती?" रंगनाथ म्हणाला.

"हे हिरे माझ्या आजोबांनी मिळवून आणून आपल्या वंशाचा विनाश ओढवून घेतला." वसंतराज म्हणाला.

"तर मग हे हिरे तूच घ्यायला पाहिजेस." दिलदारपणे रंगनाथ म्हणाला.

"रंगनाथ, तू असं का म्हणतोस? तुझ्यामुळे तर हे हिरे सांपडले. आमच्या कुटुंबाच्या विनाशानंतर या हिऱ्यांचे माझे आकर्षण संपले, हे विकून येणारे धन अर्धे अर्धे वाटून घेऊं." वसंतराज म्हणाला.

दुसऱ्या दिवशी श्रीगुप्तने पाण्यांतून छोटी पेटी काढून बघितली. त्यात साधे दगड निघाले. त्याच्याकडे आलेल्या नकली व्यापाऱ्याने भस्म देताना आपली हिऱ्याची पेटी बदलली, हे समजून श्रीगुप्त आपल्या नशीबाला दोष देऊं लागला.

रंगनाथने शहरांत एक मोठा महाल बांधला आणि व्यापारांत लाखो रुपये कमवले.









# अजिंक्य गरुड

आदित्य रामसिंहला शोधायला जायचा निश्चय करतो. त्याला कांही गुप्त हेतूने आदिवासींच्या वस्तीत आदित्यनेच धाडले होते. तो स्वतःच त्यांच्या जाळ्यांत सांपडतो. आदित्यला मुक्त करण्यासाठी रामसिंह मदत आणतो.









# वाचकांचे पान

*श्रद्धा उभयकर, गोवा, या लिहितात,*

गेली दोन वर्षें मी संस्कृत चंदामामाची वर्गणीदार आहे. हे मासिक माहितीपूर्ण असून आबालवृद्ध वाचकांची करमणूक करते. संस्कृती व नीतीमूल्यें यांचा परिचय होतो. संस्कृतमधे संभाषण करण्यासाठी उत्तेजन मिळते. लोककथा, वेताळ-कथा, इतर करमणूक प्रधान कथा, चित्रस्पर्धा, यांच्यामुळे वाचनाची आवड वाढते. पुराणकथा, 'भारतदर्शनम्' या फारच उपयुक्त मालिका आहेत. चित्रांमुळे गोष्टींना छान उठाव येतो. संस्कृतमधे कथावाचन केल्यानंतर विचारसरणी व वागणुकीत चांगला बदल होताना दिसतो. लोक परमेश्वराच्या जास्त जवळ येतात. अशा प्रकारे चंदामामा सर्वांच्या उपयोगी पडतो.

*बिहारहून मनोरंजन प्रसाद लिहीतात,*

मी लहानपणापासून 'चंदामामाचा वाचक आहे. कांही दुर्देवी काळांत, कांही कारणांमुळे मला हे वाचन करता आले नाही. आता मात्र मी हे मासिक पुन्हां वाचायला सुरवात केली आहे. पूर्वीच्या दिमाखाप्रमाणे आजही चंदामामा तितकाच तेजस्वी व लोकप्रिय आहे. भारतीय परंपरेची महती सांगणाऱ्या कथा, बोलकी चित्रें, सुबक छपाई आणि मासिकाचे रूपरंग बघून आनंद होतो. संपादक मंडळ व मुद्रकांस माझ्यातर्फे शुभेच्छा!

*डॉ. नलिनी दिक्षित, अलाहाबाद लिहितात*

मी माझ्या मुलासाठी संस्कृत चंदामामा तीन वर्षें घेत होते आता कॉलेजमधे त्याला हा विषय शिकायला नाही. म्हणून मी जपून ठेवलेले ३६ अंक संस्कृत पाठशाळेला दिले आहेत. इतर विद्यार्थ्यांना त्याचा उपयोग होईल.

*कु. एम्. श्राव्या, आय्.आय्.टी. चेन्नई लिहितात*

मी चंदामामाची उत्सुक वाचक आहे. मला तुमचे मासिक फार आवडते. हे शानदार मासिक अनेक वर्षे असे च प्रसिद्ध होत राहो ही सदिच्छा!





# राजपुत्राचा अक्षराभ्यास

सूर्यसेन हा विंध्यगिरी राज्याचा राजा होता. तो मोठा धार्मिक होता. नेहमी तो लोककल्याणाचाच विचार करीत असे.त्यामुळे त्याच्या खजिन्यातील बराचसा पैसा लोककल्याणासाठी खर्च होत असे. त्यामुळे एक वेळ अशी आली की त्याचा खजिना जवळजवळ रिकामा झाला. त्यासाठी प्रजेकडून जास्त कर वसूल करण्याची त्याची बिलकुल इच्छा नव्हती. त्यामुळे राज्यासाठी आर्थिक आवक कशी वाढवावी ह्या विचारांत तो पडला.

विंध्यगिरीच्या शेजारी विदर्भ आणि वैशाली अशी दोन राज्यें होती. विदर्भाचा राजा चंद्रकांत आणि वैशालीचा राजा महीधर, या दोघांचीही दृष्टी विंध्यगिरीच्या बिकट आर्थिक परिस्थितीवर व सैन्याच्या दुर्बलतेवर पडली. आपापली राज्यें वाढवून मोठी करावी, अशी दोघांचीही महत्वाकांक्षा होती. दुसऱ्यांच्या गोष्टी हडप करण्याची ते संधीच शोधत असत. प्रथम विंध्यगिरीवर हल्ला करून ते आपल्या राज्याला जोडून मग दुसऱ्याचे राज्य हडप करावे, अशा तऱ्हेचे षड्यंत्र दोघेही आपापल्या मनांत रचत होते.

सूर्यसेनला आपल्या गुप्तहेरांद्वारे ही बातमी समजली होती. सूर्यसेन स्वतः एक निष्णात, राजकारणी होता. तो युद्ध टाळण्याच्या मार्गाचा विचार करू लागला. आणि त्याच्या हातात एक सुसंधी चालून आली. सूर्यसेनाचा जयंत हा चार वर्षांचा एकुलता एक मुलगा होता. त्याच्या शालाभ्यासाच्या शुभारंभासाठी राजपुरोहितांनी शुभमुहूर्त नक्की केला होता. ही हातची संधी राजा दवडणार नव्हता. त्याने आपले शत्रू चंद्रकांत व महीधरला ह्या शुभप्रसंगी येण्याचे आमंत्रण धाडण्याचे ठरवले. दोघांशीही मैत्रीपूर्ण संबंध वाढवण्याच्या दृष्टीने त्याने दोघांना आमंत्रणपत्रे पाठवली. दोघेही राजे अशा संधीच्या शोधांतच होते. त्या दोघांचीही इच्छा होती की कांहीतरी निमित्ताने सूर्यसेनाबरोबर भांडण उकरून काढावे व मग त्याच्याबरोबर युद्ध पुकारावे. दोघांची ही

नंद गोपाल



एक चाल होती. दोघेही जयंताच्या विद्याभ्यासाच्या आरंभदिनी आले. सूर्यसेनने दोन्ही पाहुण्यांचा चांगला आदरसत्कार केला. मोठ्या मैत्रीपूर्ण वातावरणात त्या दिवशीचे भोजन पार पडले.

ह्यानंतर विदर्भाचा राजा चंद्रकांत याने सोन्याची एक पाटी भेट म्हणून देत सूर्यसेनला म्हटले, "अक्षराभ्यासाचा श्रीगणेशा करताना या पाटीचा उपयोग करावा."

वैशालीचा राजा महीधर यानेही सुरेख हस्तीदंती पाटी देत म्हटले, "सरस्वती मंदिरातून पूजा करून आणलेली ही पाटी आहे. युवराजांच्या अक्षराभ्यासाचा श्रीगणेशा ह्या पाटीवर केलात तर तो मोठा विद्यावान होईल."

आता सूर्यसेनची परिस्थिती मोठी अवघड होऊन बसली. तरीही हंसत हंसत त्याने म्हटले, 'तुम्हा दोघांप्रती मी खरोखर कृतज्ञता व्यक्त करतो."

नंतर चंद्रकांत व महीधर मोठ्या गंभीरपणे अतिथी गृहात पोचले.

चंद्रकांत मनातल्या मनांत हीच इच्छा करत होता की सूर्यसेनने आपल्या मुलाचा अक्षराभ्यास महीधरने दिलेल्या पाटीवरच करावा. मग तो आपला स्वतःचा अपमान झाला असे म्हणून त्या सबबीखाली सूर्यसेनला युद्धासाठी ललकारेल. महीधर असाच विचार करत होता. कुठून तरी सूर्यसेनशी भांडण उकरून काढावे, हाच दोघांचाही उद्देश होता.

पाटीबाबत दोघांच्या मनांतील विचार व उद्देश सूर्यसेनने मनोमन जाणले होते. परंतु अशा स्थितीत नेमके काय करावे हे त्याला समजत नव्हते. दुसऱ्या दिवशी युवराजाच्या विद्यारंभाचा शुभ मुहूर्त येऊन ठेपला. राज्याच्या परंपरेनुसार, सुंदर सजवलेल्या हत्तीवर आसनस्थ होऊन सूर्यसेन व युवराज जनतेचे आशीर्वाद घेण्यासाठी बाहेर पडले. राजमार्गावर रस्त्याच्या दुतर्फा लोक रांगेत उभे होते. ते पुष्पवृष्टी करत राजपुत्रास आशीर्वाद देत होते.

त्याच वेळी महाराजांची दृष्टी एका लहान मुलावर पडली. त्याचं वय जेमतेच पांच वर्षाचं असेल. त्याच्या हातांत एक पाटी होती व ती घेऊन वारंवार राजपुत्राकडे इशारा करून तो रडत होता. त्याची आई त्याला समजावत, गप्प करण्यासाठी खूप प्रयत्न करत होती.

सूर्यसेनने माहुताला हत्ती थांबवण्यास सांगितले व तो स्वतः त्या मुलाच्या आईजवळ पोचला. राजाला समोर पाहताच ती घाबरतच उद्गारली, "महाराज, माफी असावी. अशा शुभप्रसंगी ह्याचे रडणे हा अपशकुन आहे. पण मी खरोखरच लाचार आहे." असं बोलून तिने हात जोडले.



"घाबरू नकोस. सांग बरं हा मुलगा कां रडतो आहे?" महाराजांनी विचारले. "ह्याने मला विचारले की राजपुत्र हत्तीवर बसून कशासाठी येत आहे? मी सांगितले की राजपुत्राच्या विद्याभ्यासाचा शुभमुहूर्त आहे. म्हणून लोकांचा आशीर्वाद घेण्यासाठी तो येत आहे. हे ऐकून तो एकच हट्ट धरून बसला आहे की "मी माझी पाटी युवराजाला देणारच."

हे ऐकताच सूर्यसेन अतिशय प्रसन्न झाला. त्याने मनांतल्या मनांत विचार केला की एक छोटासा मुलगा मोठ्या प्रेमाने आपली पाटी युवराजाला देऊं इच्छित आहे, हीच खूप मोठी भेटवस्तू आहे. प्रेमभावाने दिलेल्या भेटीपेक्षा दुसरी कोणती भेट जास्त मूल्यवान असते? मग त्याने हळुवारपणे त्या मुलाचा हात पकडला व त्याला विचारले "बाळा, तुझे नांव काय?"

मुलाने डोळे पुसत सांगितले. 'सुधाम.' "हे बघ सुधाम, आधी रडणे एकदम थांबव आणि तूच आपली पाटी युवराजाला दे बरं!" राजाने म्हटले.

सुधामने मोठ्या आनंदाने ती पाटी युवराजाला दिली. राजाने सुधामच्या आईस सांगितले, "हे पहा, रात्री राजवाड्यांत भोजनसमारंभ आहे. तुम्ही दोघेही जरूर या." तेथे त्यांना घेऊन येण्याची जबाबदारी एका सैनिकावर सोंपवली.

मिरवणूक उत्सव संपताच राजवाड्यांत युवराजाच्या विद्याभ्यासाचा कार्यक्रम सुरूं झाला. राजउपाध्यायांनी युवराजाकडून अभ्यासाचा श्रीगणेशा करण्यासाठी पाटी मागितली. चंद्रकांत आणि महीधर दोघेही हे जाणण्यास आता अधीर झाले होते की दोघांपैकी कुणी दिलेली पाटी



युवराजाला दिली जाईल?

तेव्हां सूर्यसेन उठला, सर्वांकडे बारकाईने बघत त्याने म्हटले, "युवराजाच्या अक्षराभ्यास समारंभात भाग घेण्यासाठी आज राजा चंद्रकांत व राजा महीधर इथे खास पाहुणे म्हणून आले आहेत. माझ्या ह्या दोन्ही मित्रांनी युवराजाच्या विद्याभ्यासाच्या प्रगतीसाठी शुभेच्छा देत, एकाने युवराजास सुवर्णपाटी दिली, तर दुसऱ्या मित्राने सरस्वती मंदिरातून पूजा करून आणलेली हस्तीदंती पाटी दिली. दोघांनाही मी हार्दिक धन्यवाद देतो. परंतु राज्याच्या प्रथेनुसार जेव्हां आम्ही जनतेचे आशीर्वाद घेण्यासाठी निघालो, तेव्हां सुधाम नांवाचा एक निर्धन मुलगा आपली एकमात्र पाटी युवराजाला देण्यासाठी अति उत्सुक होता. तेव्हां मी स्वतः जाऊन त्या पाटीचा स्वीकार केला. आता इथे तीन पाट्या आहेत. प्रजेच्या इच्छेनुसार चालावे

ह्याच आमचा परिपाठ व परंपरा आहे. तेव्हां आता तुम्हीच सांगा, कीं युवराजाने कोणत्या पाटीवर आपल्या विद्याभ्यासाचा श्रीगणेशा करावा?''

दोघेही राजे कांही बोलणार इतक्यांत सभेतील एका सद्गृहस्थाने म्हटले, ''आपले महाराज स्वतः धर्मनिष्ठ व तज्ञ आहेत. राजा आणि रंक दोघांनाही ते समानतेने वागवतात. अजाण सुधामने मोठ्या प्रेमाने जी पाटी दिली आहे, त्या पाटीवरच युवराजाच्या अभ्यासाचा शुभारंभ झाला पाहिजे.' असे त्याने म्हणताच सगळ्यांनी आनंदाने संमती दिली.

राजा सूर्यसेनने सुटकेचा निश्वास सोडला. महाराज जाणून होते की त्यांनी दोघांपैकी एका राजाची पाटी अभ्यासासाठी निवडली तर दुसऱ्या राजाशी शत्रुत्व निश्चितच होते. पण त्यांना असेही भय वाटत होते की सुधामची पाटी अभ्यासासाठी निवडल्याने कदाचित दोन्ही राजे नाराज होण्याची शक्यता आहे. प्रजेचा पाठिंबा मिळेल ह्याची मात्र त्यांना खात्री वाटत होती.

युवराज जयंतच्या अक्षराभ्यासाचा श्रीगणेशा सुधामच्या पाटीवरच झाला. राजा चंद्रकांत व सूर्यसेन दोघांनी स्वतः प्रत्यक्ष बघितले की महाराज सूर्यसेन सामान्य प्रजेवरही किती प्रेम करत होते, अन् प्रजाही त्यांना किती मानत होती. असे अनन्य साधारण प्रेम व आदर पाहून ते दोघेही आश्चर्य-चकित झाले. दोघेही जाणून चुकले कीं राजाला केवळ आर्थिक स्थैर्य व सैन्यबळ असणं पुरेसं नाही, तर प्रजेचं प्रेम व आदर मिळणं, हेही अतिशय आवश्यक आहे.

सूर्यसेन आपल्या प्रजेस आपल्या पोटच्या पोराप्रमाणे वागवतात, म्हणूनच प्रजाही त्यांच्याकडे आदराने बघते. त्यांना प्रजेकडून खूप प्रेम व मान मिळतो. म्हणूनच दोघांनीही सूर्यसेनाकडे आपला दोस्तीचा हात पुढे केला.

त्यानंतर सूर्यसेनने विदर्भ आणि वैशालीच्या राजांचा जोरदार आदरसत्कार करून त्यांना मौल्यवान भेटवस्तू देऊन निरोप दिला.

सूर्यसेनाल सुरवातीस असे वाटत होते की ही समस्या जटिल होईल अन् त्याचे राज्यावर विपरीत परिणाम होतील. पण सुधामच्यामुळे राज्यावरील संकट सहजपणे टळले, व समस्या सुटली. राजाने युवराजाबरोबरच सुधामच्या विद्याभ्यासाचीही योग्य व्यवस्था केली.







# कामेशची संगीत सभा

रामेश अन् कामेश दोघे शेजारी राहत असत. गांवातील लोकांचे म्हणणे असे आहे की रामेश स्वभावाने चांगला आणि मनमिळावू आहे. त्याचे वागणे-बोलणे गोड असून त्याचे भाषेवरील प्रभुत्व खरोखरच प्रशंसनीय आहे. परंतु कामेशचा स्वभाव मात्र ह्याच्या अगदी विरुद्ध! जेव्हां कधी त्याला संधी मिळे. तेव्हां तो रामेशची टर उडवत असे, त्याला टोमणे मारून, आपण स्वतः कुणीतरी विशेष असल्याचं सिद्ध करण्याची तो व्यर्थ धडपड करीत असे

एकदा रामेश आणि कामेश दोघांनाही जवळच्याच गांवातील एका श्रीमंत जमीनदाराच्या थोरल्या मुलाच्या लग्नाचे आमंत्रण आले. दोघेहीजण गेले. संध्याकाळपर्यंत लग्नविधीचे कार्यक्रम आटोपले. रात्रीच्या जेवणानंतर तिथे संगीत सभेचे आयोजन केले गेले होते.

रात्रीचे आठ वाजले, परंतु संगीत सभेत गाणाऱ्या गायकाचा पत्ता नव्हता. नवरदेवाचे वडील सर्व पाहुणे मंडळींची क्षमा मागून म्हणाले, ''सर्व वादक मंडळी तयार आहेत पण गायकच आले नाहीत.'' नवरदेवाच्या नातेवाईक मंडळीपैकी एक दोघे जण नवरदेवाच्या वडिलांना म्हणाले, ''तुम्ही कांही काळजी करू नका. आपल्या सुदैवाने इथे रामेश आणि कामेश दोघेही हजर आहेत. आम्ही तर असे ऐकले आहे की ह्या दोघांमध्ये कामेश तर फार चांगले गायक आहेत तेव्हां त्यांनीच गायलं तर?''

पाहुणे मंडळींनीही आग्रह केला तेव्हां कामेशला गाणे भागच पडले. गात असताना कामेशला वाटलं की त्याचा आवाज अतिशय गोड असून सर्वजण त्या गाण्याचा आनंद लुटत आहेत. कांही लोकांनी त्याचं कौतुकही केलं, पण रमेश मात्र कांहीच बोलला नाही. त्यामुळे कामेश त्याच्याबर रागावला.

आपल्या गांवी परतल्यानंतर, कामेश स्वतःच आपल्या संगीताच्या ज्ञानाची स्तुती करूं लागला, तेव्हां अनेक संगीत सभांमध्ये वाद्यें वाजवून ख्याती मिळवलेल्या तीन व्यक्ती पुढे सरसावल्या.

त्यांच्या सहकार्याने त्याच रात्री कामेशच्या संगीत सभेचे आयोजन केले गेले. त्याने गायला

सुरवात करताच लोकांनी कांही क्षणांतच ताडलं की कामेशला संगीताचे फारसे ज्ञान नाही, अन् जोरजोरांत किंचाळण्यालाच तो संगीत मानतो. ते मनांतल्या मनांत त्याच्या गाण्याला हंसत होते.

शेवटी संगीत सभा संपताच कामेश उद्गारला, 'मी माझ्या गाण्याने सुप्रसिद्ध संगीतज्ञ त्यागराजाला-ही तुम्ही विसरावे असे काम केले आहे. तेव्हां माझ्या या गाण्यावर तुम्ही आपापला अभिप्राय जरूर व्यक्त करावा.''

कांही लोकांनी नाइलाजास्तव त्याची खोटी स्तुती केली. त्यांत तेथे वाजवणारेही कांही लोक होते.

रामेशला गप्प बसलेले बघून कामेशने म्हटले, 'अरे, तुला असं कांहीच न बोलता गप्प राहणं शोभून दिसत नाही. माझी इच्छा आहे की तू पण आपली प्रतिक्रिया द्यावीस!''

कामेशला वाटलं की रामेशने जर त्याची स्तुती केली नाही, तर गांवकरी मंडळी रामेशला मत्सरी स्वभावाचा समजून त्याची निर्भत्सना करतील. परंतु रामेश म्हणाला, 'मीच कां, इथे असे बरेच लोक आहेत, की ज्यांनी कांहीच मत व्यक्त केलेले नाही. त्यांचा जो अभिप्राय आहे तोच माझाही आहे.''

रामेशच्या बोलण्यांत जी छुपी टीका होती, ती बऱ्याच लोकांच्या लक्षांत आल्याने ते हंसू लागले. कामेशने नाराज होऊन आग्रह धरला की रामेशला आपले मत व्यक्त करावे लागेल. शेवटी रामेशने तिन्ही वादकांची स्तुती केली आणि परत तो गप्प राहिला.

'पण तू तर माझ्या गाण्याविषयी कांहीच बोलता नाहीस' कामेशने म्हटले.

''जे वाद्यें वाजवत होते, त्या तिघांनी तुझे कौतुक केले. पण त्यांच्यातील एकानेही स्वत:बद्दल चकार शब्दही काढला नाही. याचा अर्थ असा की आत्मप्रशंसा करण्याचे तुझे कौशल्य असाधारण आहे, पण त्या तिघांकडे मात्र ही कला नाही. जे काम ते करूं शकले नाहील, ते मी करतो आहे. मी नेहमी अशांना मदत करतो कीं जे स्वत: कांहीही करूं शकत नाहीत. तुझ्यासारख्या तज्ञ मंडळींना मदत करण्याची मला संवय नाही. त्यामुळे मी कांही तुझी स्तुती केली नाही.''

अशा तऱ्हेने कामेश परत एकदा रामेश द्वारा पराभूत झाला.







# भयंकर घाटी

## 11

**(ब्राम्हदंडी मांत्रिकाला पकडल्यानंतर, जयमल्ल व केशवला शोधण्यासाठी नागरिकांनी डोंगरावर बघितले. केशवच्या म्हाताऱ्या बापाने त्यांना सांगितलं कीं दोघेजण भिकाऱ्याच्या वेषांत नगराकडे पळाले आहेत. हे ऐकून राजगुरुने नगरांतल्या भिकाऱ्यांना पकडण्यासाठी सैनिकांना धाडले. त्यानंतर....)**

राजगुरुने पाठवलेले सैनिक आणि नगरांतले उत्साही तरुण शहरांतल्या साऱ्या भिकाऱ्यांना गोळा करुन राजवाड्याकडे घेऊन जाऊं लागले. त्या लोकांमधे केवळ भिकारीच नव्हते, तर गोरगरीबदेखील बरेच होते, फाटके, मळकट कपडे घातलेले!

यांची गणनाही भिकारी म्हणून जेव्हां होऊं लागली, तेव्हां त्यांची संख्या हजारांपेक्षां जास्तच भरली.

राजवाड्याच्या आवारांत त्यांची ही गर्दी बघून राजाला फारच आश्चर्य वाटले. त्याच्या राज्यांत इतके भिकारी अन्नान दशेत असतील याची त्याला कल्पनादेखील नव्हती.

राजा, राजगुरु व ब्राम्हदंडी मांत्रिक आवारांत शिरल्याबरोबर सैनिकांनी सर्व भिकाऱ्यांना रांगेत उभे केले. राजा व राजगुरूसाठी उच्चासनाची सोय केली. ब्राम्हदंडीला बांधून त्यांच्याजवळ उभे केले गेले. ''गुरुजी, मी आत्तापर्यंत समजत होतो कीं आपल्या राज्यांत सारं कांही ठीक चाललंय, पण

धोक्याचं ठरलं असतं. केशव व जयमल्ल तर विंध्याचलाच्या दिशेने जात होते. पण म्हाताऱ्याला अजून कांही दिवस तरी इथेच राहाणं भाग होतं.

"जर तू त्या डाकूचं तोंड बघितलंस तर तुझे प्राण पटकन उडून जातील. तो फार भेसूर आहे!" असं म्हणत केशव व जयमल्लाने मिळून त्या शिपायाला बांधले आणि त्याच्या डोळ्यांवर-देखील पट्टी बांधली.

जयमल्ल गुहेत गेला, आणि थोड्या वेळानंतर धुळकटलेल्या कपड्यांमधे बाहेर आला. त्याच्या हातांत एक थैली होती. जेव्हां त्याने ती थैली गोलगोल फिरवली. तेव्हां त्याचा खन्खन् आवाज आला.

"या थैलीमधे सोन्याच्या मोहोरा आहेत. ब्राम्हदंडी मांत्रिकाने कितीतरी लोकांना फसवून हे धन जमा केलेलं आहे. तेव्हां त्याची चोरी केली तरी ते पाप नाही ठरणार. यांतून आपण क्षत्रियाला शोभतील अशी वस्त्रें आणि शस्त्रें खरेदी करूं शकूं. चला, आता निघूं या." जयमल्ल केशवला म्हणाला.

तिघेही गुहेत परत आले. पहांट झाली की त्यातल्या कांही मोहोरा देऊन म्हाताऱ्याला नगरात पाठवायचे अ[illegible] कीं नगरांत [illegible] कीं कुणीही त्याला ओळखलं नसतं. केशव व जयमल्लाने त्याला संमती दिली.

गुहेंत बसून जयमल्ल हळूं हळूं त्या थैलीतले सोने काढत होता, तेव्हां तिकडे राजवाड्यांत झोंपलेल्या ब्राम्हदंडीला वाईट स्वप्नें पडत होती. कुणीतरी चोर त्याच्या मोहोरांची थैली घेऊन खन्खन् आवाज करीत होता असे स्वप्न त्याला पडले.

"चोर, चोर, सोने, सोने," असं झोंपेतच ओरडत तो उठला आणि दालनाबाहेर पळायला दाराकडे गेला.

तिथे पाहाऱ्यावर असलेल्या शिपायाने मांत्रिकाच्या छातीकडे नेम धरून भाला रोंखून म्हटले, "एक पाऊल जरी पुढे टाकलंत तरी मी तुम्हाला मारून टाकीन." नंतर त्याने बरोबरच्या शिपायांना बोलावले, "अरे इकडे या रे, ब्राम्हदंडी पळून जायचा प्रयत्न करतो आहे."

*(अपूर्ण)*





वेताळ
कथा

# अहंकारी पंडित

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडावर चढला, त्याने शव खाली उतरवले, आपल्या खांद्यावर घेतले, आणि तो स्मशानाकडे जाणाऱ्या वाटेने चालायला लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन्, आता मध्यरात्रीची वेळ आहे, काळाकुट्ट अंधार आहे. तरीही तू धीराने पुढे चालला आहेस. तुझा हा अट्टाहास पाहून असं वाटतं कीं तू एखाद्या कठीण कामासाठी इतके प्रयत्न करतो आहेस. कांही व्यक्ती अशा असतात, ज्या अहंकाराच्या नशेंत स्वतःला महान व अद्वितीय समजतात. आपल्या कुवतीबाहेर कार्य साधण्याचा ते निश्चय करतात. पण त्यांचा अहंकार त्यांना गोंधळात पाडतो. तुला सावध करण्यासाठी म्हणून



मी अशाच एका अहंकारी पंडिताची कहाणी तुला सांगतो. थकवा दूर होण्यासाठी ही गोष्ट ऐक." आणि वेताळ त्या पंडिताची गोष्ट सांगायला लागला.

मोटेराम हा ब्रम्हपुरचा एक सामान्य शेतकरी होता. श्रीचरण हा त्याचा एकुलता एक मुलगा होता. लहानपणापासून त्याला कविता रचायचा छंद होता. त्याची ही प्रतिभा बघून परिमित नांवाच्या एका आचार्यांनी त्याला आपला शिष्य बनवला.

इतर मुलांना जे शिकण्यासाठी दहा वर्षे लागत असत, ते शिक्षण श्रीचरणने तीन वर्षांतच आत्मसात केले. परिमितने त्याची चांचणी घेऊन सांगितले, "जे मला तुला शिकवायचं होतं, ते मी शिकवलं आहे. आता तूं दंडकारण्यांतल्या गुरुकुलांत जाऊन पुढील शिक्षण जर घेतलंस तर, तुझा उत्कर्ष आणखी वाढेल."

परंतु श्रीचरणला गुरुचा सल्ला अंमलात आणता आला नाही. कष्ट करणाऱ्या वडिलांबरोबर राहून त्यांना मदत करावी अशी त्याची इच्छा होती. एकदा एक राजस्तानी कवी त्या गांवात आला. परिमित गुरुर्जीनी श्रीचरणविषयी त्याला सांगितले व म्हटले, "मी शास्त्र शाखेचा जाणकार आहे, पण काव्याचे मूल्यमापन करण्याच्या बाबतीत मी असमर्थ आहे. आपण श्रीचरणच्या कविता ऐका आणि सांगा कीं तो राजसन्मान मिळवण्याच्या योग्यतेचा आहे कां?"

राजस्थानी कवीने श्रीचरणची कविता ऐकून म्हटलं, "तुझ्या कवितेत व्याकरण व अलंकार-शास्त्रासंबंधी कांही दोष आहेत. शंखपुरांत महानंद नांवाचे महापंडित आहेत. जर त्यांनी तुम्हाला प्रमाणपत्र दिलं तर मग तुमची कविता राजसन्मानाला पात्र आहे, असं समजा."

श्रीचरणने महानंदाबद्दल चौकशी केली, तेव्हां आपल्या गांवातल्या संचारी नांवाच्या जमीनदाराचा तो लांबचा नातेवाईक आहे असे त्याला समजले. श्रीचरण संचारीला भेटला व त्याने त्याविषयी सविस्तर सांगितले.

संचारी म्हणाला, "महानंदाचा वेगळाच स्वभाव आहे. मी जर तुझं नांव सांगितलं, तर मला तो उलट विचारेल कीं काव्यांतलं मला कितपत कळतं? तू एक काम कर. एक चांगली कविता रचून त्याला ऐकव. जर त्याची प्रशंसा मिळवलीस तर काम झालंच म्हणून समज. कांही लोक म्हणतात कीं तो गर्विष्ठ, अहंकारी आहे, आणि इतरांचे दोष दाखवण्यांत त्याला आनंद वाटतो. इतरांना तो कधीही चांगले म्हणत नाही."

श्रीचरणने महानंदाकडून प्रशंसा मिळवण्याचा मनाशी निश्चय केला. त्याने आठवडाभरांत "श्रीकृष्ण लीलामृत" नांवाचे एक काव्य लिहिले. शंखपुरला जाऊन तो महानंदाला भेटला.

त्यावेळी महानंद घराच्या ओटीवर बसून आरंभ नांवाच्या एका तरुण कवीची कविता ऐकत होता. त्याच्या कवितेतल्या चुका त्याला दाखवत होता. ती टीका ऐकून श्रीचरणला हंसू आले. महानंदाने श्रीचरणकडे रोखून बघितले आणि त्याच्या हंसण्याचे कारण विचारले.

"महोदय, कमळ कितीही सुंदर असले तरी चिखलांत जन्मते, म्हणून कांही ते चिखलाचा अलंकार होऊं शकत नाही. चिखलापासून वेगळे झाल्यानंतर कमळ एक अलंकार ठरते. म्हणून दोष असतील तर ते ठीक केल्यानंतर त्याचा काय उपयोग? आपण सर्वज्ञ आहात. आपल्यासारखा महान पंडिताने अशा प्रकारे वेळ वाया घालवला तर त्याचे फलित काय? म्हणून मी हंसलो. क्षमा करावी. मला हंसणे आवरता येईना."

महानंदने श्रीचरणला नखशिखान्त न्याहाळून म्हटले, "ज्याला कविता ऐकवायची असेल, त्याला व्याकरणाचे दोष हे समजलेच पाहिजेत. तुझे ज्ञान अपूर्ण आहे. आणि तू माझी चेष्टा केलीस, म्हणजे तू माझाही वेळ वांया घालवलास. पण मला हे तरी कळूं दे, की तू आहेस कोण?"

श्रीचरणने स्वतःचे नांव गांव सांगितले आणि आपली इच्छाही सांगितली. ती ऐकून महानंद





एकदम नाराजीने उठून म्हणाला, ''माझी सेवा करायला आला होतास ना? तर मग मला बघून अगोदर तू माझ्या पाया पडायला हवं होतंस, माझा आशिर्वाद घ्यायला हवा होतास. आधी दुसऱ्या एखाद्या गुरुकडे जा आणि त्यांच्याकडून गुरूचा आदर करायला नीट शीक. त्यानंतर काय करायचे ते मी ठरवीन.'' महानंदाने कठोर, कर्कश स्वरांत श्रीचरणाला ठणकावलं.

श्रीचरण निराश होऊन गांवी परतला. संचारीने काय झालं ते विचारल्यावर श्रीचरणने उत्तर दिले, ''भाऊ, तुम्ही सांगितलंत ते खरं ठरलं. महानंद फारच अहंकारी आहेत. त्यांच्याकडून प्रशस्ती मिळवणे मला जमेलसे दिसत नाही. त्यांना कविता ऐकवावी असंही आता मला वाटत नाही.''

या घटनेनंतर कांही दिवसांनंतर संचारीला महानंदाकडून एक पत्र आले. ''तुमच्या गांवातल्या श्रीचरणने रचलेल्या ''श्रीकृष्णलीलामृत'' काव्यामधल्या कांही तुम्हाला आवडतील त्या पंक्ती मला निवडून पाठवाव्यात. मात्र याविषयी त्याला कांहीही सांगू नये.''

त्यानंतर संचारी स्वतः महानंदाला भेटायला शंखपुरला गेला. महानंदाने त्याला जेवायला बोलावले होते. स्वादिष्ट जेवणानंतर महानंदाच्या आतिथ्याची स्तुती करीत संचारी काव्यांत म्हणाला, ''तुमची धर्मपत्नी यशोदा यांच्या हातची बनलेली ही मिठाई अगदी तेजस्वी पूर्णचंद्रासारखी आहे. त्यांत असलेल्या अमृताची चव चाखायला राहूप्रमाणे माझी तयारी होतीच, पण घांस गळ्यांतच अडकला. जेव्हां मी तोंड उघडले, तेव्हां तुमच्या यशोदेला माझ्याजागी माती तोंडात घालणारा बाळकृष्ण दिसला असेल. आपली यशोदा त्या यशोदामातेची आठवण करून देते.'' या अर्थाची एक कविता त्याने ऐकवली.

महानंदाने चकित होऊन म्हटलं, ''तू जे कांही म्हटलंस, तसं तर इथे कांहीही घडलेलं नाही. पण जेव्हां माझ्या पत्नीने आपल्याला जेवण वाढलं, तेव्हां तिच्यांत तुला तुझी आई आठवली, हे जे अप्रतिम वर्णन आहे, ती फारच सुरेख कल्पना आहे. ह्या ओळी श्रीचरणच्या काव्यांतल्या तर नाहीत ना?''

संचारीने होकारार्थी मान डोलवीत म्हटले, ''जेव्हां श्रीचरण तुझ्याकडे आला होता, तेव्हां त्याच्या कवितेत हीच कल्पना मांडली होती.''



महानंद हंसून म्हणाला, ''एका महाकवीने म्हटलं आहे कीं कविता म्हणजे कधीही तृप्त न होणारी तृष्णा आहे. श्रीचरण जर राजाकडे जाईल तर त्याला निश्चित योग्य सन्मान प्राप्त होईल.''

संचारी ब्रम्हापुरला परत आला. त्याने जेव्हां श्रीचरणला ही गोष्ट सांगितली, तेव्हां तो अतिशय खूष झाला. त्याच्या तोंडातून शब्दच फुटेना. थोड्या वेळानंतर भानावर येऊन तो म्हणाला, ''शंखपुरला जाऊन त्या महाकवीला जर मी माझं काव्य ऐकवलं नाही तर मीच उद्धट ठरेन.'' आणि तो लगेच शंखपुरला जाण्यास निघाला.

शंखपुरांत श्रीचरण पोचला तेव्हां महानंद घराच्या ओसरीवर बसून दुसऱ्या एका कवीची कविता ऐकत होता. श्रीचरणला बघितल्याबरोबर महानंद उठून उभा राहिला. श्रीचरणने महानंदाच्या पायावर लोटांगण घातले व म्हटले, ''गुरुवर्य, मी आपल्याला माझे काव्य ऐकवायला आलो आहे. मला आपला शिष्य म्हणून आपण स्वीकारावे.''

महानंदाने त्याला आशिर्वाद देत म्हटले, ''आयुष्मान भव, कीर्तिमान भव,'' त्याला वर उठवले व सांगितले, ''माझे बोलणे समजून घेऊन तू शिष्य संप्रदायाचे पालन केलेस, त्याचा मला फार आनंद झाला. परवां पंचमी आहे. तुझे काव्यपठण त्या दिवसापासूनच सुरुं होईल.''

महानंदाने श्रीचरणाची राहाण्याची व्यवस्था आपल्या स्वतःच्या घरीं केली.

पंचमीच्या दिवशी महानंदाने एक मोठी सभा



आयोजित केली आणि श्रीचरणला त्याने आश्चर्य चकित केले. त्या सभेंत भाग घेण्यासाठी दूरदूरच्या प्रदेशांतले विद्वान पंडित कवी आले होते. त्या सर्वांना पाहून श्रीचरणने जास्त उत्साहाने काव्यपठण केले.

त्यानंतर जेव्हां महानंदाने त्याच्या काव्यातल्या खास गुणांसंबंधी विवरण केले, तेव्हां साऱ्या सभेंत आनंदाचे वातावरण पसरले.

ही कहाणी सांगून वेताळाने म्हटलं, ''राजन्, महानंद हा अहंकारी पंडित आहे, यांत शंकाच नाही. सर्व साहित्यिक त्याला महापंडित मानत होते. हीच गोष्ट संचारीने श्रीचरणला सांगितली होती. अनेकजण म्हणत असत कीं महानंद इतरांच्या चुका काढीत राहातो आणि इतरांची कधीही स्तुती करीत नाही. आणि अशा अहंकारी माणसाने श्रीचरणच्या कवितेची स्तुती केली ही खरंच आश्चर्याची गोष्ट आहे. महानंदामधे जे हे आकस्मिक परिवर्तन दिसून आले, त्याचे काय कारण असूं शकेल? कवी आणि पंडितांच्यासमोर त्याची जी मानहानी झाली. ती त्याला बाहेर काढण्यासाठीच केवळ होती कां? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील.''

विक्रमार्काने उत्तर दिले, ''कित्येक कवी आपल्या कविता ऐकवण्यासाठी महानंदाकडे येत होते. त्यांच्या काव्यांतले व्याकरणाचे व अलंकारातले जे दोष होते, ते महानंद निस्संकोचपणे त्यांना सांगत असे. त्याकारणाने त्याची अशी प्रसिद्धी झाली कीं तो अहंकारी आहे. श्रीचरणच्या कवितेची महानंदाने भरपूर प्रशंसा केली यांच कांही आश्चर्य नाही. त्याच्या स्वभावांत आकस्मिक परिवर्तन आलं हे म्हणणं बरोबर नाही. साहित्याची समीक्षा करताना दुसऱ्यांच्या काव्यांतले दोष शोधून दाखवणे, हा अहंकार होत नाही. खरं सांगायचं तर जे लोक महानंदाला अहंकारी ठरवून त्याच्याविरुद्ध प्रचार करीत होते, तेच लोक अहंकारी होते असं म्हणायला हवं.''

राजाचे मौनभंग करण्यांत यशस्वी झालेला वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार: 'वसुंधरा' यांची रचना)*








# आपले राष्ट्रगीत

मूळ बंगाली गीत 'जन गण मन' हे १९७७ साली कविवर्य रविंद्रनाथ टागोर यांनी लिहीले आणि ते संपादन करीत असलेल्या ''तत्वबोध प्रकाशिका'' यांत प्रसिद्ध झाले.

आंध्र प्रदेशमधल्या चित्तूर जिल्ह्यांत मदनापल्ली इथें बेझंट थिऑसॉफिकल कॉलेज आहे. त्याचे प्राचार्य डॉ. जेम्स एच्. कझिन्स यांनी १९१९ मधे टागोरांना निमंत्रण देऊन बोलावले होते.

फेब्रुवारी महिन्यांतल्या एक रम्य संध्याकाळच्या वेळी, डॉ. कझिन्स-हे एक आयरीश कवी होते, त्यांची पत्नी मागरिट आणि कांही विद्यार्थ्यांनी टागोरांना हे बंगाली गीत गाण्याचा आग्रह केला. जेव्हां ''जय हे, जय हे,'' ही ओळ सुरुं झाली, तेव्हां सारेजण उत्स्फूर्तपणे टागोरांच्या सुरांत सूर मिळवून गाऊं लागले.



मदनापल्लीच्या त्यांच्या मुक्कामांत, टागोरांनी मिसेस कझिन्सना हेच गीत इंग्लिशमधे सादर केले. त्या बाईंनी लगलीच त्याचे स्वरलेखन तयार केले. नंतर त्यांच्या आठवणी लिहिताना डॉ. कझिन्सनी त्यांत लिहिले आहे...'' त्यांचे गीत गायन म्हणजे प्रदेश, पर्वत, नद्या यांचा भूगोल जणूं होता. दुसऱ्या कडव्यामधे हिंदुस्तानच्या धर्मांची यादी होती.''

१५ ऑगस्ट १९४८ रोजी जेव्हां पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी लाल किल्ल्यावर प्रथमच तिरंगी झेंडा फडकवला, त्यावेळी मिसेस कझिन्सनी लावलेल्या चालीवर शीख रेजिमेंटने हे गीत वाजवले. तेव्हांपासून आपण सारेजण ह्याच चालीवर हे गीत गातो आहोत.

## राजकारणाची तोंडओळख



लौकरच नवीन लोकसभेचे अधिवेशन सुरुं झाले कीं नव्याने निवडून आलेल्या खास दारांचा शपथविधी होईल आणि ते कामकाजांत भाग घेतील. परंतु सभासद या नात्याने जास्त प्रभावी कार्य त्यांच्याकडून व्हावे म्हणून त्यांना प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्रिवेंद्रमच्या केरळ विद्यापीठाने यंदा शिक्षणक्रमांत एक नवा विषय सुरुं केला आहे. त्याचे नांव ''डिप्लोमा इन प्रोफेशनल पोलिटिकल मॅनेजमेंट'' असे असून, ग्रामपंचायतींचे सभासद, स्थानिक स्वायत्त संस्था, यांना हे प्रशिक्षण घेणे उपयोगी ठरेल. प्रत्येक वर्गांत चाळीस विद्यार्थी असतील व हा अभ्यासक्रम सहा महिन्यांचा असेल.

## डॉक्टरच डॉक्टर

घरांत डॉक्टर असणे हे नेहमीच फायद्याचे व सोयीचे असते. कुणी आजारी पडले तर घरांतली व्यक्ती त्याची काळजी घेणारी असतेच. कर्नाटकांतल्या बागलकोट जिल्ह्यांतल्या मुधोळ तालुक्यांतल्या सोन्नाड परिवारांत एक नव्हे, तर सातजण डॉक्टर आहेत. पण त्यांच्यापैकी कुणीही वैद्यक नाहीत! सर्व सातीजणांनी पी.एच्.डी. ही पदवी मिळवलेली आहे. या कुटुंबाचा कर्ता रामण्णा, याला अकरा मुलें झाली. त्यांच्यापैकी तीन मुलगे आणि चार मुली यांनी उच्च शिक्षण घेऊन पुढे प्रबंध लिहिले. त्यांचे नांव आता गिनेस बुकांत नोंदले गेले आहे.







# मृत्यूच्या दरीच्या शोधांत

मणिपुरची राजकन्या मधुवंती ही एक रूपवती राजकुमारी होती. साहजिकच, तिचे पाणिग्रहण करायला अनेक तरुण उत्सुक होते. पण कांही ना कांही कारण सांगून ती प्रत्येकाला नकार देत होती. तिच्या आईवडिलांची ती फार लाडकी होती, आणि त्यांना तर तिच्या लग्नाची घाई होती. मरण्यापूर्वी एखादे गोजिरवाणे नातवंड खेळवावे, अशी त्यांची इच्छा होती. मोनीसिंह हा एका टोळीच्या सरदाराचा मुलगा मधुवंतीला भेटला. तिने त्याची मागणी नाकारली नाही. तिला तो देखणा, दयाळू व सज्जन वाटला. राजाराणीला तो राजवंशातला नव्हता तरीही आनंद वाटला. विवाहाचा मुहूर्त ठरला आणि साऱ्या राज्यांत तीन दिवस आनंदोत्सव चालू होता.

आणि लग्नाच्या आदल्या दिवशी अतिशय वाईट गोष्ट घडली. नेहमीप्रमाणे राजकन्या नदीवर स्नान करायला गेली आणि नदीतून ती बाहेर आलीच नाही. तिच्या दासी रडतरडत राजवाड्यांत परत गेल्या. संबंध राज्य दुःखांत बुडाले. मधुवंतीच्या आईवडिलांना आठवलं कीं तिच्या लग्नाच्याआगोदर ती त्या शापांतून मुक्त झाली नव्हती, आणि हे लक्षांत ठेवून बहुधा ती प्रत्येक तरुणाला नकार देत असावी. मोनीसिंगशी लग्न ठरवण्याच्यावेळी त्या शापाची कालमर्यादा ती विसरली असावी असं त्यांना वाटलं.

तरुण उमदा मोनीसिंग तर वेडापिसा झाला होता. तिचे शव नदीतून वर येईल आणि तिचे शेवटचे दर्शन घेता येईल या आशेने तो कांही दिवस राजधानींत थांबला होता. नंतर तो त्याचा आईवडिलांकडे परत जाणार होता. राजा व राणीने तर त्याला दत्तक घेऊन आपला वारस बनवण्याचे ठरवले होते.

पण मोनीसिंगाने ही सूचना कांही मान्य केली नाही. तो त्यांना म्हणाला कीं जर राजकन्येला





मृत्यूच्या दरींत नेलेलं असेल, तर तो तिथे जाऊन तिला परत घेऊन येईल. राजा राणीने आश्चर्याने आणि साशंक नजरेने एकमेकांकडे बघितले. अशी एखादी दरी अस्तित्त्वांत होती असं कोण खात्रीने सांगू शकलं असतं? आणि तिथे जायची वाट कुणाला माहीत होती? मरण पावलेली व्यक्ती परत जिवंत येऊं शकेल? पण मोनीसिंगचे म्हणणे होते, कीं तिचे मृत शरीर कांही दिसले नव्हते, तेव्हां ती कुठेतरी जिवंत असेल, आणि मृत्यूची दरी ही एकच शक्यता होती. आणि मोनीसिंग तिथे जायला तयार झाला होता. राजाराणीने जड अंतःकरणाने त्याला निरोप दिला.

मोनीसिंग त्याच्या आईवडलांना भेटायला गेलाच नाही, कारण त्यांनी त्याला मृत्यूच्या दरीचा शोध घ्यायला जायची अनुमती दिलीच नसती. जिथे कुठे ही दरी होती तिथे जायला मोनीसिंग तयार होता.

त्याचे पहिले काम होते या मृत्यूच्या दरीची वाट शोधणे. तो जागोजागी फिरत गेला, त्याने अनेक साधू, संत व साधकांना त्याबद्दल विचारले. अनेक वयस्कर मंडळींना त्याने हाच प्रश्न विचारला, ''मला मृत्यूच्या दरीकडे जाणारा रस्ता कुठे आहे ते सांगाल कां?'' ते लोक मोनीसिंगाकडे केवळ सहानुभूतीने बघत राहात. कुणालाच ही दरी माहित नव्हती, तेव्हां साहजिकच तिथे जायची वाटही माहीत नव्हती.

अखेरीस मोनीसिंगाला एक खूप म्हातारा दिसणारा एक माणूस भेटला. मोनीसिंगाला या दरींत कशासाठी जायचे आहे हे त्याला जाणून घ्यायचे होते. तोपर्यंत मोनीसिंगने आपले हे गुपित कुणाला ही सांगितले नव्हते.

जेव्हां म्हाताऱ्याने ही कहाणी ऐकली, तेव्हां त्याच्या तोंडावर किंचित हास्यरेषा उमटली. तो म्हणाला, ''मला वाट माहीत नाही. पण एका अतिवृद्ध स्त्रीकडे कसं जायचं ते मी तुला सांगीन. तिचे वय किती आहे ते कुणालाच माहीत नाही. पण आम्हाला सर्वांना वाटतं कीं ती बहुतेक दोनशे किंवा तीनशे वर्षांची असावी. जिथे जायची इच्छा आहे, त्याबद्दल तिला कदाचित थोडीफार माहिती असूं शकेल. पण लक्षांत ठेव. तिथे जाण्यासाठी तुला अनेक गोष्टींची तयारी करायला लागेल. म्हणजे, प्रवासाला निघालास कीं तू स्त्रियांकडे बघायचं नाहीस, किंवा त्यांनी बनवलेले भोजनपदार्थ खायचे नाहीस. एकेचाळीस दिवस तू तीनदा स्नान करायचेस, आणि त्या म्हातारीला भेट देण्यासाठी पांढरे रेशमी कापड कुठूनतरी मिळवायचेस. हे सर्व कष्ट उपसल्यानंतर, तू माझ्याकडे निर्मळ मनाने व शुद्ध अंतःकरणाने परत ये. त्यानंतर त्या पर्वतापली-कडेल्या म्हातारीच्या झोंपडीकडे जायची वाट मी तुला दाखवीन.''

मोनीसिंगने या साऱ्या सूचना पाळण्याचे वचन दिले आणि बेचाळिसाव्या दिवशी परत यायचे कबूल केले. त्या एकेचाळीस दिवसांत मोनीसिंगने एकाही स्त्रीला बघितले नाही, त्याने स्वतःच भोजन बनवले आणि दिवसांतून तो एकवेळच जेवत होता. तो तीन वेळा रोज आंघोळ करुन दिवसा व रात्रीं प्रार्थना म्हणत होता.

मोनीसिंग म्हाताऱ्याबाबाकडे जेव्हां परत गेला, तेव्हां त्याच्यासाठी एक पिशवी, एक भाला एक पेला, कांही अन्नपदार्थ आणि तांदळाची मदिरा म्हातारबाबाने तयार ठेवलेली होती. म्हातारीसाठी त्याने एक शाल ठेवली होती. पर्वत ओलांडून दाट अरण्य व दऱ्याखोऱ्यांतून जाण्यासाठी मोनीसिंग लगेच निघाला. उंच पर्वत चढून जाताना त्याला इतका त्रास वाटला नाही, पण जेव्हां तो दरींत उतरून अरण्यापर्यंत पोंचला, तेव्हां म्हातारीच्या झोंपडीपर्यंत जाण्यासाठी कोणत्या दिशेला जावं हे कांही त्याला कळेना.

बरेच दिवस चालत राहिल्यानंतर, मोनीसिंगला अखेरीस एका मोकळ्या रानांत एकच झोंपडी दिसली. त्याने दार हळूंच ढकललं आणि तिथे त्याला पलंगावर निजलेली एक सुरकुतलेली म्हातारी दिसली. त्याने पिशवीतून आणलेली पांढरी रेशमी शाल बाहेर काढली. आणि म्हातारीया हातांत दिली. तिचा चेहरा एकदम उजळला. ''मुला, माझ्याकडून तुला काय हवंय?'' तिने विचारले.

''मला, मृत्यूच्या दरीकडे जायचे आहे, आजी!'' त्याने उत्तर दिले ''फक्त इतकंच?'' त्या म्हातारीने विचारले. तिच्या चेहऱ्यावर प्रश्न चिन्ह दिसत होते.

''होय आजी, मला माझ्या प्रियतमेला, राजकन्या मधुवंतीला भेटायचे आहे. मला तिला, परत राजवाड्यांत घेऊन जायचे आहे, आणि जर तिची संमती असेल, तर मला तिच्याशी लग्न करायचे आहे.''





"तुला ती त्या दरींत भेटेल कीं नाही, ते मला माहीत नाही, पण त्याच जागी मृत व्यक्ती चांदण्या रात्री अवश्य येतात. पण मला तुला सांगितलं पाहिजे, कीं जरी तू तिला पाहिलंस, तरी तू तिला स्पर्श करायचा नाहीस. तू फक्त तिच्याशी बोलूं शकशील आणि तिच्या उत्तरासाठी वाट पाहाशील." नंतर त्या दरींत रात्रीं कसे पोचायचे ते म्हातारीने त्याला सांगितले, व चंद्र उगवण्याची वाट पाहाण्यास सुचवले.

अंधार पडल्यावर मोनीसिंगने मृत्यूच्या दरीकडे जाण्याची वाट धरली, व तो चालत जाताना झाडांमधून चंद्र दिसतोय कां, ते तो बघत होता. सुदैवाने, त्याला वाटेत कुणी हिंस्र जनावरे दिसली नाहीत, तरीही त्याने हातांतला भाला कायम सज्ज ठेवलेला होता. अचानक, त्याला थोडी मोकळी जागा दिसली आणि कांही आकृती फुलझाडांच्या मधे फिरताना त्याला स्पष्ट दिसल्या. त्यांतून राजकन्या कोणती ते शोधायला त्याला जरा त्रासच पडला. तिच्यासारखी दिसणारी एक आकृती त्याने बघितली आणि तो धावतच तिच्याकडे गेला. आनंदाच्या भरांत त्याने तिचा हात पकडून तिला म्हटले, "राजकन्ये! चल माझ्याबरोबर. मी तुला तुझ्या आईवडिलांकडे घेऊन जाईन." आणि काय आश्चर्य, ती राजकन्या एकदम नाहीशी झाली. बिचारा मोनीसिंग! काय करावे ते त्याला कळेना. त्या जागी राजकन्या परत कांही आली नाही.

पहांटेपर्यंत त्याने वाट पाहिली आणि तो म्हातारीच्या झोंपडीकडे परत गेला. तिने शांतपणे त्याचा पराक्रम ऐकला व म्हटले, "आज दिवसभर तू इथेच राहा. रात्री पुन्हां तू राजकन्येच्या शोधांत त्या दरीकडे परत जा. जर ती दिसली तर तिला तू अजिबात स्पर्श करूं नकोस!"

अंधार पडेपर्यंत मोनीसिंग थांबला आणि पुन्हां अरण्यांतल्या वाटेने त्या मृत्यूच्या दरीकडे गेला. पण आज त्याने आपला भाला बरोबर घेतला नव्हता. त्याला वाटलं, कीं त्याच्या हातांतला भाला पाहून राजकन्येने त्याला कदाचित ओळखलं नसेल. चंद्राचा प्रकाश जेव्हां साऱ्या दरीवर पसरला, तेव्हां मोनीसिंग मृत व्यक्तींच्या आकृती परत येतील या आशेने वाट पहात थांबला होता. त्यापैकी राजकन्येला आज त्याने सहज ओळखलं. त्याने मनःपूर्वक देवाची प्रार्थना केली. "हे देवा! तिच्याशी बोलण्याच्या व तिच्याजवळ जाण्याच्या मोहापासून मला वांचव."

पण अघटितच घडलं. राजकन्येने त्याला लांबूनच ओळखलं, व ती वेगाने त्याच्याजवळ आली आणि त्याला म्हणाली, "मोनीसिंग! तू मला शोधत इथे आलास! तुला ही जागा कशी सांपडली?"

तिला स्पर्श होता कामा नये म्हणून मोनीसिंग अतिशय सावध होता. ती नदींत नाहीशी झाल्यापासून काय काय घडलं ते तिला सांगितलं. "तू माझ्याबरोबर परत पृथ्वीलोकांत येशील कां? मी तुला तुमच्या राजवाड्यांत घेऊन जाईन, आणि तुझ्या मातापित्यांच्या अनुमतीने आपण लग्न करूं या."

"आनंदाने येईन मी, मोनीसिंग!" मधुवंती उद्गारली. "तू मला वाट दाखव, पण कांहीही झालं तरी तू मागे वळून बघूं नकोस. मी मागोमाग येते आहेच. आपण त्या पर्वतावर चढून वर गेलो कीं नंतर मी तुला हांक मारीन. त्यानंतर तू माझ्याकडे पाहूं शकशील."

मोनीसिंगचा राजकन्येवर पूर्ण विश्वास होता. तिचेही त्याच्यावर खरे प्रेम होते. त्याने त्या दरीतून परतीचा रस्ता धरला. अरण्य ओलांडून तो पर्वत चढून वरती आला, तोपर्यंत पहांट झाली होती. त्याचे नांव हळूंच घेऊन त्याला हांक मारलेली त्याला ऐकूं आली. मोठ्या आतुरतेने व आनंदाने त्याने मागे वळून बघितले, तर राजकन्या त्याच्याकडे पाहून प्रसन्नपणे हंसत होती. आता त्याने तिचा हात मोठ्या धीराने पकडला आणि दोघेही राजवाड्याकडे निघाले. राजा व राणीचा आनंद तर गगनांत मावेना. आपली लाडकी राजकन्या त्यांच्या नजरेसमोर सुखरूप व सुरक्षित होती. मधुवंती व मोनीसिंगच्या लग्नाच्या तयारीला त्यांनी उत्साहाने सुरवात केली. त्याला युवराज म्हणून घोषित करण्यांत आले. त्या दोघांचे आयुष्य आनंदात चालू होते.

राजपुत्र मोनीसिंगाला कुणीही सांगितलं नव्हतं, तरी तो त्या मृत्यूच्या दरींत राजकन्येला शोधायला कसा गेला याची कहाणी मात्र त्याने कुणालाही कधीही सांगितली नाही. ते शेवटपर्यंत गुपितच राहिले.





# विचित्र स्वप्न

शिव हा पंचवीस वर्षाचा एक अशिक्षित तरुण होता. माणसांपेक्षाही जास्त प्रेम तो प्राण्यांवर करत असे. तो कोकरांना मांडीवर घेऊन त्यांचा प्रेमाने मुका घेत असे. गांवातल्या कुत्र्यांबरोबर तो खेळत असे, घरांत घुसलेल्या उंदीर पालींना मोठ्या शिताफीने पकडून एका बंद पिशवींत घालून त्यांना गांवाबाहेर सोडत असे.

त्याच गांवात चमन नांवाचा मनुष्य दुधाचा व्यवसाय करत असे. नीलवेणी नांवाची त्याची एकुलती एक मुलगी होती. शिवला ती फार आवडे. एक दिवस संध्याकाळी गांवाबाहेर एका कडुलिंबाच्या झाडाखाली बसून शिव गाणें गुणगुणत असतानाच, तिथे नीलवेणी पाणी भरण्यासाठी आली.

आजूबाजूला कोणी नव्हतं, म्हणून हिंमत करून शिवने तिला विचारले, "मला तझ्याशी लग्न करायची इच्छा आहे. तुला हे लग्न मान्य आहे का?"

"ह्या बाबतीत माझ्या वडिलांनाच विचार", असं बोलून हंसतच ती निघून गेली.

शिवने ओळखलं की तिला हा लग्नाचा प्रस्ताव मान्य आहे. तेव्हां त्याने तिचे वडील चमन ह्यांना भेटायचा निश्चय केला. शिवचे बोलणे ऐकताच नीलवेणीचे वडील एकदम रागावून म्हणाले, "तू निव्वळ अडाणी आहेस. कांही नोकरी धंदाही करीत नाहीस. फक्त उंदीर आणि पालींना पकडण्याचे काम करतोस. तू एक नंबरचा आळशी आहेस. अशा बेकार माणसा-बरोबर मी माझ्या मुलीचे लग्न लावून कसा देऊ? अशक्य. अरे चल, जा!"

शिवला वाटले की चमनने त्याचा फार मोठा अपमान केला आहे. तो अतिशय दुःखी आणि निराश झाला. पण नंतर त्याला जाणवलं की चमनच्या बोलण्यांत तथ्यांश आहे. त्याला कोणी कामही देणार नाही आणि लग्न करुन तो बायकोला खाऊं पिऊं तरी कसा घालणार? हाच विचार करत तो झोपी गेला. त्याच दिवशी रात्री त्याला एक विचित्र स्वप्न पडले. तो समुद्रांत पोहतो आहे. जवळच एक लांबसडक केस असलेला एक काळा माणूस बुडत आहे; त्याला वांचवण्याच्या हेतूने शिव त्याला किनाऱ्यावर ओढून आणतो आहे. त्याच वेळेस एक मोठी लाट उसळते आणि प्रवाहाबरोबर वाहात ते दोघे किनाऱ्याला जाऊन पोचतात. परंतु तो लांब केसांचा मनुष्य एका खोल खड्ड्यांत पडतो तर शिव एका वाळूच्या छोट्याशा टेकाडावर जाऊन पडतो. अन दुसऱ्याच क्षणी त्याला जाग आली.

शिवला समजेना कीं ह्या स्वप्नाचा अर्थ काय असावा? गांवातले लोक म्हणत असत की जंगलाच्या एका बाजूकडील पर्वतामधील गुहेत राहणारा तिरळ्या डोळ्यांचा एक बाबा असल्या स्वप्नांचा अर्थ जाणतो, आणि तो ते समजावूनही सांगतो. अशी स्वप्ने साकार होण्यासाठी तो योग्य उपायही सुचवतो. तेव्हां त्या विचित्र स्वप्नाचा अर्थ जाणून घेण्यासाठी शिव त्या बाबांना भेटायला निघाला.

जंगलाच्या मधोमध एक अरुंद रस्ता होता. तो त्या रस्त्याने जात असतानाच वाटेत जोराचा पाऊस सुरू झाला. जवळच असलेल्या देवीच्या एका उजाड देवळात तो निवाऱ्यासाठी थांबला. बघता बघता चारी बाजूला गडद अंधार दाटला.

त्याच वेळेस तेथून एक बैलगाडी आली. ते पाहताच शिवच्या जिवांत जीव आला. घाईने तो त्या गाडीशी पोचला. गाडी हांकणारा तर कुणी दिसला नाही, परंतु गाडीत एक माणूस आडवा पडलेला दिसला. तो गाडीच्या आंत गेला आणि त्याने बारकाईने बघताच त्याच्या लक्षांत आले की गाडीतील मनुष्य खूप आजारी आहे. त्याचे



अंग तापाने रसरसलेले आहे.त्याला वाटलं की ह्याच्यावर तावडतोब उपचार केले नाहीत तर ह्याचा मृत्यू अटळ आहे. त्याने गाडी राजधानी-कडे वळवली.

राजधानीच्या पोचेपर्यंत सूर्योदय झाला. शिवने गाडी थांबवली आणि तेथे उभ्या असलेल्या सैनिकांना त्याने विचारले, "अहो येथे जवळपास कुणी वैद्य आहे कां?"

जरा संशयास्पद नजरेने बघतच एका सैनिकाने त्याला विचारले, 'तू कोण आहेस?" असं विचारतच त्याने गाडीत डोकावून पाहिले. आणि तो एकदम जोरात ओरडला, 'अरे बाप रे, हा मनुष्य तर महाचोर लड्डू आहे."

सैनिकांनी गाडीची, आंत जाऊन तपासणी करताना त्यांना आंत एक पेटी सांपडली. त्यामध्ये दागदागिने व मोहोरा भरल्या होत्या.

राहुल आहुजा



"असं दिसतंय की, तू त्या महाचोराचा साथीदार आहेस" असं म्हणतच एका सैनिकाने शिवाची मान पकडली.

असह्य वेदनेने शिव कण्हायला लागला व थरथरत कांपऱ्या आवाजात म्हणाला, "साहेब, मी चोर नाही. जर चोरी करण्याइतके धाडस माझ्याकडे असते तर मी तुमच्या कह्यांत सांपडलोच नसतो. खरं तर काल रात्रीं मला एक विचित्र स्वप्न पडले. त्याचा अर्थ जाणून घेण्यासाठी म्हणून मी तिरळ्या बाबांच्या दर्शनासाठी जाताना वाटेत मला हा आजारी मनुष्य दिसला. त्याच्यावर उपचार करण्यासाठी म्हणून त्याला इथे घेऊन आलो आणि तुमच्या जाळ्यांत अडकलो."

शिपायाने ताबडतोब त्याचा गळा सोडून म्हटले, "अरे, आधीच सांगायचं होतंस ना! मीही त्या तिरळ्या बाबांचा भक्त आहे. दर अमावस्येला तेथे जाऊन मी त्यांचे दर्शन घेऊन येतो. आता एक सैनिक असल्याने माझे पहिले कर्तव्य हे आहे की तुला आमच्या महाराजांपुढे नेऊन उभे करणे. तू महाचोर आहेस कीं बाबांचा भक्त आहेस, त्याचा तेच निर्णय घेतील."

शिवला दरबारांत महाराजांसमोर हजर केले गेले. शिपायाने महाराजांना सविस्तर वृत्तांत कथन केला.

राजाने शिवला बारकाईने न्याहाळत गंभीर आवाजांत विचारले, "हं, मग तू त्या महाचोराचा साथीदार आहेस तर बोल, ह्यावर काय म्हणणे आहे तुझे?"

राजाने मंद स्मित करतच जवळच बसलेल्या राजगुरूंकडे एक दृष्टिक्षेप टाकला. राजगुरु शिव कडे पहात म्हणाले 'स्वप्नांत बघितलेल्या, त्या सुरकुतलेल्या माणसाला वांचवण्याच्या प्रयत्नात तूच किनाऱ्यावर येऊन पाण्याविना तडफडणाऱ्या माशाप्रमाणे अडकलास." मग राजाकडे वळून बघत ते म्हणाले, "हा दोषी नाही. ह्याला सोडून द्या."

तेव्हां शिव मोठ्या उत्साहाने राजगुरुना म्हणाला, "धन्यवाद, गुरु महाराज. मला तुम्ही तिरळ्या बाबांच्या दर्शनाला जाण्यापासून वांचवलेत."

इतक्यांत बाजूच्या खोलीतून बारा वर्षांची राजकुमारी आपली वेणी इकडे तिकडे जोराने हलवत, ओरडत ओरडतच बाहेर आली. शिवने लगेच तिकडे पाहिल्यावर त्याला दिसले की तिच्या वेणीवर एक पाल चिकटून बसल्यामुळे ती रडत होती.

चटकन शिव पुढे सरसावला आणि त्याने दोन बोटांच्या चिमटीतच पालीचा गळा पकडला. राजकुमारी आश्चर्य चकित होऊन बघत राहिली, तोवर त्याने पालीला राजवाड्याच्या भिंतीवर उंच फेकून दिले.

"बापरे, काय धीट आहेस रे! तुला पालीची भीती नाही वाटत?" राजकुमारीने शिवला विचारले.

शिव नम्र स्वरांत उत्तरला "आमच्या गांवात ज्या कुणाच्या घरांत पाली, उंदीर साडतात, त्यांना मी पकडतो. आणि गांवाबाहेर सोडून येतो. असं म्हणतात की पालींना आणि मांजरांना मारणे हे महापाप आहे."

महाराज खूष होऊन शिवला म्हणाले, "राजवाड्यांतील केवळ पालींनांच पकडण्याचे नव्हे, तर इतर किडे कीटकांनाही पकडण्याची जबाबदारी मी तुझ्यावर सोपवतो. करशील का ही नोकरी?"

"ह्यापेक्षा जास्त मला आणखी काय पाहिजे महाराज?" मान झुकवीत शिव उत्तरला. "आंधळा काय मागणार? तर दोन डोळे. माझं भाग्यच फळफळलं. मला लोक आळशी अन् निरुद्योगी मानतात. आणि तसेही मला किडे कीटकांना पकडण्याशिवाय इतर कांही येत ही नाही. तुमच्या कृपेने माझं जीवन मार्गी लागेल."

अशा तऱ्हेने आळशी, बेकार शिवला नोकरी मिळाली. ह्या बाबतीत सर्व हकीगत समजताच चमनने आपली मुलगी नीलवेणीचा विवाह शिवबरोबर मोठ्या थाटामाटांत करून दिला.



# रतनच्या गळ्यांतला फांस

पंचवीस वर्षांपूर्वी रतन त्या गांवात आला होता. तेव्हां त्याच्याजवळ कांही नव्हते. पण आता तो त्या गांवातला एक सधन शेतकरी आहे. तो नेहमी म्हणतो की रात्रंदिवस अपार कष्ट केले, म्हणून संपत्ती जमवता आली. पण गांवकरी मात्र त्याला महाकंजूष म्हणतात आणि त्याच्या क्षुद्रवृत्तीची टवाळी करतात. ज्या वृक्षापासून कांहीही फायदा होत नाही अशा वृक्षाशी त्याची तुलना करतात.

त्यावर्षी पाऊस वेळेवर पडला, म्हणून उडीद डाळीचं पीक चांगलं आलं. फायदेशीर किंमत मिळाली, म्हणून शेतकऱ्यांनी पीक तेव्हांच विकून टाकलं. पण रतनने तसं केलं नाही. जास्त किंमत मिळेल ह्या आशेने रतनने विक्री केली नाही.

परंतु उडदाच्या किंमतीत कांही वाढ झाली नाही, उलट दिवसेंदिवस किंमती कमी होऊं लागल्या. त्यामुळे जे नुकसान झालं असतं त्याची कल्पना रतनला असह्य झाली. त्याने गाईचे दावे गळ्याला बांधून आत्महत्त्या करायचे ठरवले. तो जेव्हां त्या तयारीत होता, तेव्हां शेजारच्या नोकराने त्याला पाहिले आणि लागलीच येऊन ते दावे कापून टाकले. रतनला जमिनीवर झोपवले आणि त्याच्या चेहऱ्यावर पाणी शिंपडले.

रतनने डोळे उघडून इकडेतिकडे पाहिले आणि तो म्हणायला लागला, "अरे लच्छू, मला तर ही साधी दोरी वाटली होती, पण हे तर महागडं दावं आहे. आणि तू याचे दोन तुकडे केलेस! आता याचे पैसे तू दिले नाहीस तर बघून घेईन. मी गप्प बसणार नाही. तुझी वाट लावून टाकीन." *- बलराम*





# सीतारामचा नोकर

शेखर बलीपूरमधे राहात होता. तो दहा वर्षांचा होता, तेव्हां त्याच्या आईवडिलांचा मृत्यू झाला. त्याचा मामा जोगी त्याला आपल्या घरी घेऊन गेला. पण त्याची पत्नी रोहिणी हिला शेखरचे पालनपोषण करुन त्याला वाढवण्यासाठी जबाबदारी नको होती. ती त्याच्याकडून घरांतली बरीच कामें करुन घेत होती आणि त्याचबरोबर कांहीतरी खुसपट काढून त्याला रागवत होती. शेखर निमूटपणे हे सहन करीत होता.

बायकोचे हे वागणे जोगीला मुळीच आवडत नव्हते. त्याबद्दल एक दिवस तो तिला रागावला, तेव्हां तिने उत्तर दिले, "तुम्ही विनाकारण माझ्यावर आळ घेता आहात. तुमच्या भाच्याला मी सख्ख्या मुलासारखा सांभाळते आहे. हवं तर त्यालाच विचारा कीं!"

जोगी तिला म्हणाला, "शेखर संकोची आहे. मी आत्ता बोलावून विचारलं तर तो कांहीही बोलणार नाही, कारण तो तुला घाबरतो. त्याचा चांगुलपणा पाहून तरी तू त्याच्याशी नीट वाग."

रोहिणी नाराज होऊन म्हणाली, "जर खरंच तुमचा भाचा संकोची व चांगला आहे, हळवा आहे, तर त्याला सीतारामच्या घरी पाठवा. किती दिवस तिथे काम करता येतंय ते मी बघतेच."

"मी जिवंत आहे तोपर्यंत माझा भाचा मी कुणाच्याही घरी कामाला पाठवणार नाही. तू बाई आहेस कीं कोण आहेस?" जोगीने रागाने तिला फटकारलं.

दोघांमधले हे भांडण शेखर बघत होता. तो पुढे येऊन म्हणाला, "मामा, मामी मला त्रास देते असं मी कधीच तुम्हाला म्हणालो नाही. तेव्हां याबर तुम्ही उगीच वाद वाढवूं नका. पण तुम्ही जे म्हटलंत ते खरं आहे, हे मला मामीला सिद्ध करुन दाखवायला हवं. मी संकोची आहे, हळवा आहे कीं घाबरट आहे, हे पाहाण्यासाठी तरी मला सीतारामच्या घरी काम केलं पाहिजे. त्यांत कांहीच चूक नाही."

शरद जोशी



जोगीला वाटलं कीं सीतारामच्या घरी निदान शेखरची स्थिती बरी राहील, म्हणून त्याने या प्रस्तावाला विरोध केला नाही. शेखर सीतारामच्या घरीं पोचला.

सीताराम हा शिवपुरांतला एक प्रसिद्ध व्यापारी होता. तो व्यापारांत फार हुशार व चाणाक्ष होता असे लोक म्हणत. त्याची पत्नी अरुंधती ही गुणवती होती. मुले, सुना, सारी एकत्र कुटुंबात राहून नीटनेटका संसार चालला होता. त्यांच्या व्यवहारदक्षतेचे हे एक चांगले उदाहरण आहे असे गांवात मानले जात होते. घरांत असो किंवा बाहेर, कांही अडचण उभी राहिली तर सर्वजण एकजुटीने तिचे निराकरण करीत, व त्याचा त्यांना रास्त अभिमान वाटत होता.

पण आता सीताराम म्हातारा झाला होता आणि धंद्याचा रोजचा व्याप सांभाळायची शक्ति त्याला राहिली नव्हती. त्याचे मुलगे व्यापार बघूं लागले आणि वडिलांनी नुसती विश्रांती घ्यावी असे त्यांनी ठरवले. कोणताही प्रश्न ते वडिलांच्याकडे आणत नव्हते. जेव्हां लोकांना हे समजलं, तेव्हां ते आपापल्या अडचणींसाठी उपाय विचारायला येईनासे झाले.

सीतारामला मात्र शंका आली की सारेजण त्याच्याकडे दुर्लक्ष करीत आहेत. त्याचं वय झालं होतं, म्हणून लहानसहान बाबतींत तो नाराज होत होता, चिडायला लागला होता. अरुंधतीला नवऱ्याचा हा चिडचिडेपणा सहन होईना, म्हणून त्याच्यावर देखरेख करण्याची जबाबदारी तिने मुलांच्यावर सोंपवली. मुले, सुना, नातवंडे ही आळीपाळीने सीतारामकडे जातीने लक्ष पुरवत होती. परंतु कांहीतरी खुसपट काढून सीताराम रोज नाखूष होत होता, व वादविवाद वाढवत होता.

बऱ्याच दिवसानंतर थोरल्या सुनेचा आजोबा नरसिंह त्यांच्या घरी गेला. सीतारामचा बदललेला स्वभाव पाहून त्याला फार वाईट वाटले. अरुंधतीनेही त्याला सविस्तर सांगितले कीं सीताराम आता सर्वांच्यासाठी एक समस्या बनलेला आहे.

सगळी हकीकत ऐकल्यानंतर नरसिंहाने हंसून म्हटलं, "कांही वर्षांपूर्वी माझीही हीच दशा झाली होती. पण तेव्हां माझ्या मुलाने माझी देखभाल करण्यासाठी एक बाहेरचा माणूस आणून ठेवला. त्यानंतर मात्र आमच्या घरांत कांही गडबड झाली नाही."



नरसिंहाची ही सूचना अरुंधतीने लगेच अंमलात आणली. पण ही व्यवस्था सीतारामला कांही आवडली नाही. घरांतल्या लोकांना आपण आवडत नाही, म्हणून त्यांनी नवीन माणूस नेमला असं सीतारामला वाटलं. आणि आपला राग तो त्या नोकरावर काढूं लागला. साहजिकच कुणी नोकर टिकेना. या कठीण परिस्थितीत शेखर सीतारामच्या घरी कामावर रुजूं झाला. सर्वांनाच हायसे वाटले.

शेखर सीतारामची सेवा मनापासून करायला लागला. तो कोणतीही टाळाटाळ करीत नव्हता. पण सीताराम त्याच्या प्रत्येक कामांत कांहीतरी दोष काढीत असे. पण शेखर नुसतंच हंसून गप्प बसत होता. ते बघून सीताराम जास्तच चिडत राही. असे तीन महिने गेले. शेखरच्या सहनशक्तीचे आश्चर्य वाटून एक दिवस सीतारामने त्याला विचारले, "मी तुला इतका रागावतो, तरी तुला इथून जावेसे कसे वाटत नाही?"

शेखरने उत्तर दिले, "ह्या घरांतले सारे लोक चांगले आहेत. मला इथे पोटभर जेवण मिळतं, भरपूर झोंप मिळते; तेव्हां जर वडीलधाऱ्या मंडळींनी थोडंसं रागावलं तर बिघडलं कुठे? मोठ्यांच्या शिव्या हा लहानांना आशिर्वादच असतो, असं म्हणतात. तेव्हां माझा इथून जायचा प्रश्नच येत नाही."

हे उत्तर ऐकून सीतारामला समाधान वाटले. पण शेखरला काढून टाकायचाच असा त्याचा विचार होता. एके दिवशी त्यांच्या घरी एक साधू आला. घरांतून दिलेली भिक्षा घेत तो म्हणाला,



"मला या घरांतले सर्वजण चांगले वाटले. प्रत्येकाने येऊन मला सांगा कीं तुम्हाला काय पाहिजे ते! तुमची इच्छा रास्त असेल तर मी ती अवश्य पूर्ण करीन."

सीतारामच्या मुलांनी, सुनांनी व्यापारांत वाढ व्हावी अशी इच्छा व्यक्त केली. नातवंडांनी खूप शिकण्याची मनीषा सांगितली. अरुंधतीने सौभाग्यवती म्हणून जन्मभर राहावे असे मागितले, आणि सीतारामने त्याच्या घरांतल्या मंडळींनीच त्याची देखभाल करावी अशी इच्छा व्यक्त केली.

साधूने "तथास्तु" म्हटलं.

तेव्हां सीतारामने शेखरला बोलावून म्हटलं, "हा कांही दिवसांपासून इथे माझी सेवाशुश्रूषा करतो. हा आमच्या घरांतलाच सदस्य समजा, आणि त्याचीही इच्छा विचारुन आशिर्वाद द्या."

सीतारामला वाटलं कीं शेखर आपल्या उज्वल भविष्याची इच्छा सांगेल, नि इथून निघून जाईल. नंतर घरांतले सारेजण पुन्हां आळीपाळीने सीतारामला सोबत करतील. पण शेखरने तसं केलं नाही. तो साधूला म्हणाला, ''माझे मालक श्रीमान सीतारामजी यांना मनःशांती व सहनशक्ती द्यावी आणि त्यांना दीर्घायुष्य द्यावे.''

साधूने 'तथास्तु' म्हटले आणि त्याला विचारले, ''तू जर विचारलं असतंस तर मी तुला भाग्यवंत बनवलं असतं. तुला ही सेवा करावी लागली नसती. पण तू ही इच्छा कां सांगितलीस?''

''महाराज, ह्या घरांतली प्रत्येक व्यक्ती फार चांगली आहे, म्हणूनच त्यांच्या इच्छा पूर्ण करण्याची इच्छा आपल्या मनांत आली. माझे मालक सीतारामजी ज्याप्रकारे घरांतल्या लोकांना रागावतात, त्याच तऱ्हेने ते मलाही रागावतात. पण नाराज होऊन, प्रत्येक गोष्टीवरुन चिडचिड केल्यामुळे त्यांची प्रकृति बिघडते. घरांतले लोक घाबरुन त्यांच्यापासून दूर राहातात. सध्यां मी सारं कांही सहन करतो आहे, पण माझ्या सहनशक्तीचीही सीमा आहेच. मी त्यांना सोडून गेलो, तर त्यांना कदाचित चांगला सेवक मिळणार नाही. मी किंवा आणखी कुणीही असो, त्यांची सेवा शुश्रूषा प्रेमाने करुं दे, एवढीच माझी इच्छा आहे. म्हणून त्यांना मनाची शांती व सहनशक्ती आपण द्यावी, अशी मी इच्छा व्यक्त केली.''

त्याचे हे शब्द सीतारामच्या मनांत खोल रुतून बसले. तो म्हणाला, ''जर माझ्याबद्दल तुला इतकी काळजी वाटते आहे, तर तू परका कसा रे असशील? आजपासून तूही घरांतलाच एक आहेस. तू माझी शुश्रूषा करतो आहेस, तेव्हां माझ्याच घरांतल्या मंडळींनी माझी देखभाल केली आहे असे मी यापुढे समजेन.''

सर्वांनाच सीतारामचा विचार आवडला. शेखरने सर्वांनाच दाखवलं कीं तो हळव्या स्वभावाचा व संकोची आहे. पण तो पुन्हां मामाच्या घरी परत गेला नाही. सीतारामच्याच घरांतल्या मंडळींमधे तो मिळून-मिसळून राहिला व सेवा-धर्माचा एक आदर्श त्याने दाखवला. त्याच्या-मुळे सीतारामचा स्वभावही शांत व प्रेमळ झाला.





# चन्दामामा प्रश्नावली-७

Co-sponsored by Infosys FOUNDATION, Bangalore

बरोबर उत्तर देणाऱ्यांपैकी एकाला रु.२५०/- दिले जातील.

*या प्रश्नावलीत विचारलेले सर्व प्रश्न २००५ मधे जानेवारी ते डिसेंबर या अंकांत असलेल्या गोष्टींवर आधारित आहेत. तुम्ही त्या वाचलेल्या आहेत. जर तुम्हाला त्या आठवत असल्या तर तुम्ही लगेच उत्तरे देऊं शकाल. लक्षांत नसतील तर बाराही अंक पुन्हां नजरेखालून घाला. म्हणजे उत्तरे शोधताना मजा वाटेल.*

**अचूक उत्तरे देणाऱ्यांची संख्या एकापेक्षां जास्त असेल तर बक्षिसासाठी सोडत काढण्यांत येईल व पांच विजेत्यांना समान रक्कम वाटून दिली जाईल.*

<u>त्यासाठी :</u> १. उत्तरे लिहा. २. आपले नांव, वय (१६ वर्षांखालील मुलांसाठीच ही स्पर्धा आहे) व पिनकोडसहित पत्ता. ३. एका कुटुंबातून एकाच व्यक्तीला भाग घेता येईल. ४. वर्गणीदार असलात तर तो क्रमांक. ५. पाकिटावर चंदामामा प्रश्नावली-७ असे लिहा व चंदामामाचा संपूर्ण पत्ता लिहून आम्हाला पाठवा. ६. ऑगस्ट महिना अखेरपर्यंत तुमची प्रवेशिका आमच्याकडे पोंचली पाहिजे. ७. ऑक्टोबरच्या अंकात निकाल जाहीर होतील.

१. ६३ शिवभक्त तत्परांमधे एकच महिला आहे. त्यांचे नांव काय?

२. धर्मावर श्रद्धा असणे हाच उत्तम धर्म आहे, हे कोणत्या जातक कथेंत सांगितलेलं आहे?

३. शरीराचा रासायनिक कारखाना म्हटलं जातं, तो शरीरांतला सर्वात मोठा अवयव कोणता आहे?

४. दरवर्षी ५ सप्टेंबरला शिक्षक दिन साजरा होतो. हा कुणाचा जन्मदिवस आहे?

५. १९८९ मधें ५५० वर्षांपूर्वीच्या एका वटवृक्षाला गिनेस बुकांत नोंदणीचा मान मिळाला आहे. आंध्र प्रदेशांतल्या कोणत्या गांवी हा वृक्ष आहे?

६. शिवाजीवर प्रभाव टाकणाऱ्या दोन व्यक्ती कोण होत्या?

७. २००२चे ज्ञानपीठ पुरस्कार मिळवणारे दक्षिण भारतांतले सुप्रसिद्ध साहित्यिक कोण आहेत?

८. हे चित्र कोणत्या कथेंत आहे?





# विचित्र जन्मकुंडली

कलिंग देशात अनेक लहानमोठी राज्ये होती. दांतिपुर त्यांपैकीच एक होते. दांतिपुरच्या राजाला कलिंग म्हणत. त्याला दोन मुलगे होते. मोठ्याला थोरला कलिंग व धाकट्याला धाकटा कलिंग म्हणत. त्या दोघांच्या जन्मकुंडल्या पाहून ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविले की पित्याच्या मृत्यूनंतर ज्येष्ठ पुत्रच राजा होईल. परंतु धाकट्यांनी जन्मकुंडली विचित्र व अपूर्व अशी होती. कुंडली-प्रमाणे तो स्वतः साधूसंन्याशासारखं आयुष्य काढील, पण त्याचा मुलगा गादीला वारस होईल.

कांही वर्षांनी कलिंग राजा निवर्तला. अर्थातच त्याच्या थोरल्या मुलाला गादी मिळाली. धाकट्याला राजप्रतिनिधीचे पद मिळाले. परंतु त्याच्या मनांत ज्योतिष्याचे भविष्य कोरले गेले होते, की त्याच्या मुलाला गादी मिळणार आहे. म्हणून तो आपल्या थोरल्या भावाचे मुळीच ऐकत नसे, व उर्मटपणाने वागे. थोरल्या भावाने धाकट्या भावाला कैद करून तुरुंगात टाकायला सांगितले.

त्यावेळी बोधिसत्व कलिंग महाराजांच्या काळापासून मंत्री होते. थोरला कलिंग गादीवर आला तेव्हां बोधिसत्वांचे वय फार झाले होते. राजाच्या कुटुंबाचे हितचिंतक अशा त्या वृद्ध मंत्र्याने गुप्तपणे धाकट्या कलिंगला त्याच्या भावाने काढलेला हुकूम कळविला. धाकट्याला तो हुकूम अपमानकारक वाटला. तो वृद्ध मंत्र्याला म्हणाला - "प्रधान, आपण सर्व प्रकारे माझे हितैषी आहां. आपणाला ज्योतिष्याने वर्तविलेले भविष्य माहीतच आहे. त्यांत कांही तथ्य असेल, तर आपण मला थोडी मदत करावी. ते भविष्य खरे करण्याची जबाबदारी आपणांवर आहे. ही घ्या माझी मुद्रा असलेली अंगठी, माझी शाल व माझी तलवार. पुढे कधीकाळी जो कोणी या तिन्ही वस्तू आणून आपणांस दाखवील, तो माझा मुलगा आहे असे समजावे. आपण त्याला शक्य असेल ती मदत करावी." असे वृद्ध प्रधानाला सांगून धाकटा कलिंग जंगलात निघून गेला.

त्याच्या कांही वर्षे आधी मगध राजाला एक मुलगी झाली होती. तिची जन्मकुंडली पाहून ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविले, की तिची जन्मकुंडली विचित्र असून ती आयुष्यभर साधू संन्यासिनीसारखी राहील, परंतु तिच्या पोटी जन्मलेला मुलगा राजा होईल." ते कळल्यावर तिच्याशी लग्न करण्यासाठी कित्येक तरुण राजकुमारांत चढाओढ लागली. तिला मागण्या घालणाऱ्या राजकुमारांकडे पाहून राजा काळजीत पडला. त्यांपैकी कोणा एकाशी राजकन्येचा विवाह करून दिल्यास इतर सर्व राजकुमार आपल्या जांवयाशी वैर धरतील. म्हणून राजा विचार करून सपत्नीक कोणाला कांही न कळविता जंगलात निघून गेला.

एका नदीच्या कांठी एक झोपडी बांधून राजा व राणी राहू लागली. त्या झोंपडीपासून थोड्याच अंतरावर धाकट्या कलिंगाची झोंपडी होती.

एके दिवशी मगध राजा राणीसह कंदमुळे व फळे वेंचण्यासाठी राजकन्येला झोपडीत सोडून जंगलात गेला. तेव्हां राजकन्येने निरनिराळी फुले आणून एक सुंदर हार केला आणि ती नदीकाठांवर फिरूं लागली. कांठावर एक आंब्याचे झाड होते. ती त्या झाडावर चढून बसली. तेथून तो हार पाण्यात फेंकून ती गंमत पहात बसली.

तो हार वहात जाऊन धाकटा कलिंग नदीत स्नान करीत होता त्याच्या डोक्याला जाऊन लागला. तो हार हातात घेऊन धाकटा कलिंग विचार करू लागला - "किती सुंदर हार आहे? ह्याच्यात निरनिराळ्या रंगांची सुवासिक फुले ओवलेली आहेत. कोणा तरुण युवतीने ही ओवली असतील? या भयंकर जंगलात ती कशाला वरे आली असावी?" असे अनेक विचार करीत छोटा



कलिंग प्रवाहाच्या उलट्या दिशेने चालू लागला.

तो जंगलात नदीच्या कांठाकांठाने चालत जात होता. त्याच वेळी त्याला दूर कोणीतरी गोड आवाजात गात असल्याचे ऐकू आले. तो थांबून, आवाज कोणत्या दिशेने येत होता याचा अंदाज पाहू लागला व त्या दिशेने तो चालत जात त्या आंब्याच्या झाडाखाली आला. त्याला एका फांदीवर बसलेली मगध राजकन्या दिसली.

राजकन्येला पाहतांच धाकट्या कलिंगचे मन तिने हिरावून घेतले. तरी स्वतःला सावरून त्याने तिची चौकशी केली. दोघांचे संभाषण चालू असतां धाकट्या कलिंगने स्वतःचा परिचय देऊन तिच्याशी तो लग्नाला तयार असल्याचे सांगितले. तेव्हां ती तरुण राजकन्या म्हणाली - "परंतु तुम्ही तर कोणी साधू किंवा संन्यासी दिसतां आहां? आम्ही क्षत्रिय आहो, आपला विवाह कसा काय होणार?"

धाकट्या कलिंगाने तो देखील क्षत्रिय असल्याचे सांगितले आणि आपली पूर्व कहाणी सुरवातीपासून शेवटपर्यंत सांगितली. तेव्हां राजकन्येने देखील आपल्या राजघराण्यातील गुप्त गोष्टी निवेदन केल्या. त्यानंतर दोघे राजकन्येच्या आईवडिलांना भेटायला गेले. राजाने सर्व वृत्तांत ऐकल्यावर विचार केला की आपल्या कन्येला या राजकुमाराहून चांगला वर कोठे मिळणार?

त्यानंतर धाकटा कलिंग व मगध राजकन्या यांचा विवाह सुमुहूर्तावर पार पडला.

एका वर्षानंतर त्यांना एक मुलगा झाला. सर्व राजलक्षणांनी युक्त अशा त्या मुलाचे नांव विजय कलिंग असे ठेवण्यात आले. तो मुलगा लाडांत वाढू लागला.

काही वर्षे लोटल्यावर धाकट्या कलिंगने जन्मकुंडल्या काढल्या व त्यांची ग्रहदशा संपली असल्याचे गणितावरुन कळले. ज्योतिर्गणितावरुन हे देखील कळले की थोरल्या कलिंगाचे आयुष्यही संपुष्टात येऊं लागले आहे.

तेव्हां त्याने विजय कलिंगला बोलावून समजावून सांगितले, की तो कलिंग राज्याचा वारस आहे. तो म्हणाला - ''विजय, तुला आपले आयुष्य या जंगलात कंठण्याची गरज नाही. माझा थोरला भाऊ कलिंग देशाचा राजा आहे. त्याचा मृत्यू जवळ येऊन ठेपला आहे. म्हणून तू लवकर दांतिपुरला जाऊन आपला राज्याभिषेक करून घे.'' असे सांगून त्याने त्याला वृद्ध प्रधानाविषयी सर्व गोष्टी समजावून सांगितल्या आणि ओळख पटावी म्हणून अंगठी वगैरे खुणेच्या तीन वस्तू त्याच्या हातात दिल्या. सर्वांचा आशीर्वाद घेऊन युवराज विजय निघाला.

विजय दांतिपुरला पोचतांच वृद्ध प्रधानाला भेटला व खुणेच्या तिन्ही वस्तू दिल्या.

तोपर्यंत धाकट्या कलिंगाच्या अंदाजाप्रमाणे थोरल्या कलिंगाचा स्वर्गवास झाला होता. दांतिपुरात अराजक माजण्याची स्थिती उत्पन्न झाली होती.

वृद्ध मंत्र्याने दरबार भरवून विजय कलिंगाची ओळख करून दिली. त्यांचा जन्मवृत्तांत ऐकून सर्व सभासद चकित झाले व त्यांनी विजयचा जयजयकार केला.

त्यानंतर विजय कलिंगचा राज्याभिषेक झाला व तो वृद्ध मंत्र्याच्या सल्ल्याप्रमाणे राज्य करूं लागला.







# रामायण

आपल्या वडिलांना त्या करुण स्थितीत पाहून श्रीरामचंद्राचे मन फार दुःखी झाले. त्यांनी कैकेयी मातेस विचारले - ''माते! माझ्या हातून कांही चूक झाली का? बाबा फार काळजीत दिसतात. काय कारण असेल कांही समजत नाही. मी यापूर्वी त्यांना इतके दुःखी झालेले कधी पाहिले नाही.''

कैकेयीने निःसंकोचपणे सर्व सांगून टाकले. म्हणाली - ''कांही नाही रे बाळ! तुझ्यावर त्यांचे जे प्रेम आहे त्यामुळेच ते इतके दुःखी झाले आहेत. त्यांच्या मनांत तुला सांगावेसे वाटत आहे. पण तुझ्या प्रेमामुळे त्यांच्या तोंडांतून ते शब्द उमटत नाहीत. त्यांनी एकदां मला एक वर दिला होता. वचनपालन करणे हा क्षात्रधर्म आहे. वडिलांनी दिलेलें वचन पुरे करणे व करविणे हा मुलाचा, म्हणजे तुझा धर्म आहे. ते स्वतःच्या तोंडाने सांगणार नाहीत. म्हणून मलाच सांगावे लागणार आहे.''

''राज्याभिषेकाची ही सर्व तयारी व्यर्थ जाणार नाहीं. भरताचा राज्याभिषेक होईल, आणि तूं वल्कल वस्त्रे धारण करुन वनांत गेलास, तर तुझ्या वडिलांवर हा आरोप कोणी लावणार नाही, कीं त्यांनी वचन देऊन ते मोडले.''

अगदी कठोरपणाने कैकेयीने हे सांगून टाकले. सामान्य माणसाने ते ऐकले असते तर त्याला कैकेयीचा रागच आला असता. तो तिला उलट उत्तर देऊन, तोंडावरच तिची निंदा करून तेथून निघून गेला असता. पण रामाला यत्किंचित देखील राग आला नाही. तो म्हणाला - ''माते! मी तयार आहे. वडिलांची आज्ञा, व माते, तुझी



पण आज्ञा पालन करण्याचे भाग्य मला लाभले आहे. भरत गादीवर बसला काय, किंवा मी बसलो काय, एकच. पण मला एकाच गोष्टीचे दुःख होत आहे. या लहानशा गोष्टीसाठीं बाबांना इतके दुःख कां वाटावे? भरताला राज्य देण्याचा माझा विचार आहे हे बाबांनी मला सांगायला एवढा संकोच कां करावा?''

कैकेयी म्हणाली - ''त्यांची ही इच्छा पुरी करण्यास तूं होकार देशील कीं नाही, एवढीच शंका त्यांच्या मनांत होती. मी भरताला बोलावून घेते. तूं मात्र रानांत जाण्याची तयारी कर. तूं जाईपर्यंत तुझे बाबा स्नानसंध्येला सुद्धां उठतील कीं नाही त्याची मला शंका वाटते.''

कैकेयीनें थंडपणाने ते सर्व सांगितले. तिच्या प्रत्येक शब्दाबरोबर दशरथाच्या हृदयाला घरे पडत होता. तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. रामाने त्याला हात देऊन नीट झोपविले व कैकेयीला म्हणाला -

''माते! मी कधी धनाची अपेक्षा किंवा राज्याची अपेक्षा ठेवली नाही. आणखी कांही करावयाचे असल्यास ते देखील निःसंकोचपणे सांगून टाक.''

ते ऐकून दशरथ एकदां उठून रामाशी कांही बोलण्याच्या विचारांत होता. पण पुन्हां बेशुद्ध होऊन खाली पडला. रामाने दोघांना नमस्कार केला व तो अंतःपुरांतून बाहेर पडला. लक्ष्मणाला हे सर्व कळले. त्याला फार वाईट वाटले व रागही आला. तरी तो स्वतःला आवरून रामाच्या मागे चालूं लागला.

राम रथांत बसून गेला नाही. छत्र-चामरांचा त्याने त्याग केला व कौसल्या मातेचा निरोप घेण्यासाठी निघाला.

रामाचे ते विचित्र वागणे पाहून अंतःपुरांतील दासदासी रडूं लागल्या. सर्वसंगपरित्याग करून वनगमन करणाऱ्या वैराग्यासारखा राम तेथून निघून गेला.

राम कौसल्येच्या महालांत आला, तेव्हां कैकेयीच्या महालांत घडलेले वृत्त तेथे कोणाला कळले नव्हते. रामाने प्रवेश केल्याबरोबर दासदासी छत्रचामरे घेऊन त्याच्या स्वागतासाठी धांवल्या. पण रामाने त्यांना थांबायला सांगितले, व तो सरळ कौसल्यामातेकडे गेला. वृद्ध दासदासींनी ''महाराज रामचंद्र की जय!'' चा जयघोष करून कौसल्या मातेला रामलक्ष्मण आल्याची वार्ता दिली.

कौसल्या तेव्हां पूजा करीत होती. रामाने नमस्कार केल्याबरोबर तिने त्याला आशीर्वाद दिला व राज्याभिषेकाच्या मुहूर्ताला फार वेळ नाही, वशिष्ठ मुनी वाट पहात असतील, असे सांगितले.

ते ऐकून या आनंदात वनगमनाची गोष्ट कशी सांगावयाची, हा संकोच रामाला वाटला.

पण धीर करून राम म्हणाला, ''आई! बाबांनी मला वनाचे राज्य दिले आहे. मी त्याचे रक्षण करण्यासाठी जात आहे. आतां मी सिंहासना-ऐवजीं दर्भासनावर बसणार आहे. बाबांनीं भरताला राज्य द्यायचे ठरविले आहे. व ते मी कबूल केले आहे.''

तें ऐकून कौसल्येला डोक्यावर आकाश कोसळल्यासारखे वाटले व ती बेशुद्ध होऊन जमिनीवर पडली. रामाने तिला सावरून बसविले. कांही वेळाने हुंदका आवरून ती म्हणाली - ''बाळा! मला आयुष्यभर असेच रडत रहावे लागणार आहे. तुला आपल्या पोटीं जन्म देऊन आज वनांत जाण्यासाठी निरोप देण्याचा प्रसंग माझ्यावर यावा, त्यापेक्षां मी वंध्याच राहिले असते, तर बरे झाले असते. मूल नाही, एवढेच काय ते दुःख राहिले असते. हृदयाचे रक्त आटवून तुला लहानाचा मोठा केला, आणि आतां ही मायलेकरांची ताटातूट कशी सहन होणार? मी राजमहिषी आहे पण राजमाता होण्याचे भाग्य मला



मिळाले नाही. आजपर्यंत सवतीमत्सर आपल्या घरांत नव्हता, आणि आज एकाएकी हे उग्ररूप धारण करून तो उभा राहिला आहे. मला दास-दासींपेक्षां जास्त हाल सहन करावे लागणार. मरण तरी मागून येते कां? बाळ, मी देखील येते तुझ्या-बरोबर, करूं दे तिला आणि तिच्या लेकाला राज्य!''

लक्ष्मण ते सर्व ऐकत होता. त्याच्या अंगाचा संताप वाढत चालला होता. तो म्हणाला- ''माते! त्या कैकेयीच्या हट्टाने दादाला आज वनवास भोगावा लागत आहे. त्यांत नवीन असे कांहीच दिसत नाहीं. म्हातारपणामुळे मन दुबळे होतेच. बाबांनी स्त्रीच्या मोहाला बळी पडून हा कठोर वनवास दादाला दिला आहे. पण आपण हा अन्याय डोळ्यादेखत होऊं देणे शोभत नाही.''



नंतर तो रामाकडे वळून म्हणाला - "दादा! राजाने भरताला राज्य व तुला वनवास दिला आहे, हे जगाला कळण्यापूर्वी चल, आपण आपल्या पराक्रमानें तुझा हक्क मिळविण्याचा प्रयत्न करूं. मी आपल्या सर्व शत्रूंचा नायनाट केल्याशिवाय शस्त्र खालीं ठेवणार नाहीं. अन्यायाचा प्रतिकार करणे हा क्षत्रियांचा धर्म आहे. अन्याय करणारा कोणी परका असो किंवा स्वतःचा बाप असो, त्याचा प्रतिकार केला हा पाहिजेच. तूं आम्हां सर्व भावंडांत मोठा आहेस. कुळरीतीप्रमाणे गादी तुलाच मिळाली पाहिजे. तुला रानांत पाठवायला तूं काय चूक केलीस, मला सांग! हे माझे धनुष्य, आणि हा बाण, माझ्या हातांत, व तूं पाठीराखा असल्यावर, मला कोणाचीहि भीती नाही."

कौसल्या म्हणाली - "बाळा रामा! लक्ष्मण म्हणतो ते कांहीं गैर नाहीं. वडिलांची आज्ञा शिरोधार्य असावी. परंतु कोणत्या परिस्थितीत त्यांनी आज्ञा दिली आहे हे पाहिलेच पाहिजे. तूं रानांत जाणे मला बिलकुल पसंत नाहीं. तूं गेलास तर मी उपाशी राहून प्राण सोडीन. त्याचे पाप तुला!"

रामाने जवळ येऊन मातेला समजावण्याचा यत्न करीत म्हटले -

"आई, वडिलांची आज्ञा मोडणे बरोबर होणार नाही. वडिलांच्या आज्ञेने पूर्वी याहून मोठमोठी व घोर पापे मुलांनी केली आहेत. याची उदाहरणे काय कमी आहेत? कंड नामक मुनीने गोवध केला.

परशुरामाने मातृहत्या केली. सगरपुत्र भस्म झाले. आणि मी तुझ्या आज्ञेबाहेर का आहे? तुझ्या बोलण्याकडे मी दुर्लक्ष करीत नाही. पण तूंच सारासार विचार करून मला रानांत जायची परवानगी दे. मी मोठा आहे. मी जो कित्ता घालून देईन, तोच माझे धाकटे भाऊ गिरवणार." नंतर लक्ष्मणाकडे वळून राम म्हणाला, "लक्ष्मणा! तुझे प्रेम व पराक्रम मी ओळखतो. पण जेथे धर्म, तेथेच जय असतो. आपण स्वतःच्या धर्माचे पालन केलेच पाहिजे. रागाच्या भरांत स्वार्थवश कांही करून नंतर पश्चात्ताप करणे हे शहाणपणाचे काम नव्हे."

राम पुन्हां आईला म्हणाला - "मी वनांत जात आहे, याचा बाबांना आनंद होत आहे असे का तुला वाटते? वचनांत बद्ध झाल्यामुळे त्यांना ते



करावे लागले. त्यांचे मन अत्यंत दुःखी आहे. हा दैव-दुर्विलास समजून मनाचे समाधान करून घेण्यापलीकडे कांहींच करतां येत नाहीं. नाहीतर कैकेयी मातेला असा वर मागण्याची बुद्धि झाली असती का? तिचे माझ्यावर भरतापेक्षां जास्त प्रेम होते, हे तुला माहीत आहे आणि तीदेखील एक माताच आहे. माझ्या राज्याभिषेकांत विघ्न आल्याचे तुला इतके दुःख झाले हे जितके स्वाभाविक आहे, तितकेच किंबहुना जास्त दुःख माझ्या राज्याभिषेकाने तिला होणे, नैसर्गिक नाही का?"

राम वडिलांची आज्ञा मोडून घरी राहणे अशक्य आहे, हे पाहून कौसल्या मातेने मन कठोर करून त्याला आशीर्वाद दिला.

नंतर राम सीतेच्या महालांत गेला. सीतेला पहिल्यावर रामाचा धीर सुटला. त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रुप्रवाह सुरू झाला. सीता आनंदाने रामाच्या स्वागतासाठी जवळ आली. पण रामाच्या डोळ्यांतली टिपे पाहून ती घाबरून गेली.

रामानें थोडक्यांत सर्व सांगून टाकले आणि म्हणाला -

"मला आतां रानांत जाणे भाग आहे. तोपर्यंत तूं घरीं राहून वृद्ध सासूसासऱ्यांची सेवा कर. भरत सांगेल तसे वाग. त्याच्यासमोर कधी माझी प्रशंसा करूं नकोस. तो स्वभावाने गोड आहे. माझा धाकटा भाऊ आहे, म्हणून तुझा भार त्याला वाटणार नाही."



तें ऐकून सीता किंचित प्रेमाकुल व क्रोधपूर्ण आवाजांत म्हणाली - "हे सर्व काय बोलतां आहात? असा माझा अपमान कां करतां? स्त्रीचा धर्म पति आहे. तुम्हाला वनवास दिला, तर तो मला नाहीं कां दिला? मी तुमच्या पावलावर पाऊल ठेवून अग्नीसमोर प्रतिज्ञा नाहीं की केली? तुमचे सुख ते माझे सुख, तुमचे दुःख ते माझे दुःख, आणि रानांतील श्वापदांचे भय म्हणाल, तर तुमच्यासारखे पराक्रमी पती जवळ असल्यावर मला कशाचे भय? जो रानांत राहणाऱ्या ऋषी व मुनींचे रक्षण करील, तो माझे रक्षण करणार नाही का? मीसुद्धां बरोबर येणार. माझा हा निश्चय अढळ आहे."

रामाने अनेक प्रकारे सीतेची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण सीतेने त्याचे कांही एक ऐकले नाहीं.

ती म्हणाली - "ज्योतिष्यांनी आपले भविष्य वर्तवले तेव्हां वनाचा योग आहे असे सांगितले होते, तसेच माझे भविष्य सांगताना देखील त्यांनी वनाचा योग सांगितला होता. तेव्हां तो टळणे शक्य नाही. म्हणून मी देखील बरोबर येणार."

तरी रामाने बरोबर घेऊन जाण्यास नकार दिला. सीतेला अपार दुःख वाटले व रागही आला. तिने रागाच्या भरांत म्हटले -

"माझ्या वडिलांनी माझा हात तुमच्या हातांत दिला, तो तुम्ही मला असे सोडून जाल म्हणून कां दिला? त्यांचा जांवई पराक्रमी असावा, म्हणून तर त्यांनी धनुष्ययज्ञ करविला होता. त्यांना ही गोष्ट कळली तर त्यांना काय वाटेल? त्यांना तुमच्या शौर्याबद्दल संशय आला, तर माझी मान खाली होईल, याचा कांही विचार! मी तरी अशी काय चूक केली, कीं मला येथे सोडून वनांत जायचा तुम्ही विचार केलात? तुमच्याशिवाय जगांत माझे कोणी नाही. जेथे तुम्ही तेथे मी." असें सांगून सीता रडूं लागली.

रामाने जास्त आग्रह धरला नाही. त्याने तिला बरोबर जाण्याची तयारी करावयास सांगितले.

राम निघून गेल्यावर सीतेनें अंगावरचे सर्व दागिने काढून दासदासींना वांटून टाकले. उरलेले सामान ब्राह्मणांना दान करून टाकले.







# विरूपचा विवाह

एका गांवात ब्रजभूषण नांवाचा एक जमीनदार राहत होता. त्याला विरूप नांवाचा लग्नाला योग्य वयाचा एक मुलगा होता. विरूप रोज रात्री आपल्या घरामागच्या अंगणातील पिंपळाच्या झाडाखाली झोपत असे. सकाळी झाडावरील किलबिलणाऱ्या पक्ष्यांना बघून प्रसन्नचित्ताने उठत असे.

एक दिवस सकाळी जाग येताच त्याने झाडाकडे बघितले आणि एक किंकाळी मारून तो बेशुद्ध पडला. मुलाच्या किंचाळीचा आवाज ऐकून ब्रजभूषण त्या ठिकाणी पोचला. बेशुद्ध पडलेल्या आपल्या मुलाला त्याने नोकरांच्या मदतीने घरांत आणले.

थोड्याच वेळात विरूप भानावर आला. परंतु वेड्यासारखे वागत तो असंबद्ध बोलूं लागला. विरूपच्या अशा परिस्थितीमुळे ब्रजभूषण घाबरला. घाबरण्याचे एक महत्वाचे कारण ही होते, कारण त्याच दिवशी विरूपशी लग्न ठरवण्यासाठी मुलीकडील मंडळी यायची होती.

ब्रजभूषणने मुलीकडच्या मंडळींना निरोप धाडला की त्यांनी एका आठवड्यानंतर यावे. मग त्याने शेजारच्या वैद्य माधवाचार्यांना बोलावणे धाडले.

माधवाचार्यांनी त्याला तपासून सांगितले. "मुलगा आजारी बिजारी नाही. बहुतेक त्याला भूत पिशाचिनीने भारले आहे कदाचित तो भूता प्रेताला पाहून घाबरला असावा. आमच्या मठांत एक साधूबाबा आलेले आहेत. त्यांना एकदा दाखवून बघावे."

नंतर दोघेही त्या मुलाला घेऊन मठांत पोचले. त्याच वेळी एक माणूस साधू महाराजांभोवती प्रदक्षिणा घातल्यासारखा चकरा मारत होता. माधवाचार्यांनी सांगितले की त्यालाही भुताने भारले आहे. साधूने आपल्या हातातील छडीने दोन तीन वेळा त्या माणसाच्या डोक्यावर प्रहार केला. त्याच्या अंगातील भूत उतरले. साहजिकच ब्रजभूषणचा साधूवर विश्वास बसला.

साधूने त्यांचे सारे बोलणे ऐकले व म्हणाला, "तुझ्या शरीरांत कोणी भुताखेताने संचार केलेला



नाही. तुझ्या कोण्या शत्रुने, तुझ्यावर मंत्र फेकला आहे. कुणी मांत्रिकच हे करू शकतो. सांगा बरं तुमच्या गांवात किती मांत्रिक आहेत?''

''आमच्या गांवात दोनच मांत्रिक आहेत. शरभ आणि सांब' ब्रजभूषण म्हणाला.

''त्यांच्यापैकी एकाने हे केले असावे. तू त्या दोघांकडेही जाऊन विचार की ते तुझ्या मुलावर उपचार करतील कां? जो मांत्रिक ह्यावर उपचार करण्यास तयार होईल. त्याचे नांव परत येऊन मला सांग.'' साधूने म्हटले.

ब्रजभूषण आणि माधवाचार्यांनी घरी परतताच त्या दोन्ही भूतवैद्यांना बोलावणे पाठवले. शरभने विरूपवर उपचार करण्यास नकार दिला व तो तेथून निघून गेला. सांबने म्हटले, ''मी ह्याच्यावर उपचार करतो. आज रात्रीच अंजन घालून मी शोधून काढतो की ही करणी आहे तरी कुणाची? शरभ नेहमीच पैशाच्या पाठीमागे धावणारा आहे. मला संशय येतो आहे की हे त्याचेच काम असावे, म्हणून तो गुपचूप येथून सटकला. मी त्याचे रहस्य उघडकीस आणीनच.''

या दोघा मांत्रिकामध्ये वैर होते. ह्यानंतर ब्रजभूषणने सांबला परत पाठवले व साधू-महाराजांना जाऊन सांगितले की सांब विरूपवर उपचार करण्यासाठी तर तयार आहेच, पण त्याचा अंदाज असा आहे की ही शरभचीच करणी असावी. साधू महाराज म्हणाले, 'तु सुद्धां शरभवरच संशय घेतो आहेस कां? पण मी माझ्या दिव्य दृष्टीने जाणलं आहे की ही करणी सांबचीच आहे. आज रात्रीं अंजन घालण्याच्या निमित्ताने तो तुझ्या मुलाचे प्राण घेण्याचा प्रयत्न करेल. माझे म्हणणे ऐक आणि आपल्या मुलाचे रक्षण कर.''

ह्यानंतर साधुने ब्रजभूषणला काय काय करायचे ते सगळे सांगितलं. त्याच दिवशी रात्री ब्रजभूषण आणि माधवाचार्य हे आणखी दोघाजणांना बरोबर घेऊन सांबच्या घराकडे निघाले, अन वाटेतच जवळ एका कोपऱ्यांत लपून बसले.

मध्यरात्रीनंतर सांबने आपल्या घराच्या बरोबर मध्यभागी रांगोळी काढली. रांगोळीच्या मधोमध मेलेल्या सापाला ठेवला. त्याच्यावर मस्तकवजा खापराचा तुकडा ठेवला. त्यावर एक लिंबू रचून ठेवलं. त्यानंतर धूप पेटवला. मग आपल्याच एका बोटावर घाव करून त्या रक्ताने कपाळावर टिळा लावला.

ह्या सर्व सोपस्कारानंतर सांब आता रांगोळी-समोर बसणारच होता - इतक्यांत चारी बाजूनी लपलेले लोक सांबच्या घरांत घुसले. त्याला एका खांबाला बांधून भरपूर बदडून काढले, अन् त्याला ओढत ओढत साधूपुढे आणले.



सगळ्यांनीच सांबवर दबाव आणला की त्याने आपली चूक मान्य करावी. पण सांबने छाती पिटत रडत रडत सांगितले, ''अहो मान्यवर मंडळींनो, मी देवाशपथ सांगतो, मी करणी वगैरे कांही केली नाही. मला हे ही माहित नाही की कुणा दुष्टामुळे हा अनर्थ ओढवला आहे. मी अंजन लावून बघणारच होतो. तेवढ्यांत हे लोक मला ओढत ओढतच इथे घेऊन आले.''

त्यावेळी विरूपला आपल्या बरोबर घेऊन शरभ तेथे पोचला आणि जरा मोठ्या आवाजात ओरडून म्हणाला, ''ताबडतोब बंद करा सांबला मारहाण करणं. प्रत्यक्षांत मंत्र तंत्र करणाऱ्या पण साधुच्या वेषांत आलेल्या शेजारच्या गांवातील ह्या मांत्रिकांना चांगलं झोडपून काढा. त्यांनीच हा दुष्टपणा करून उलट मला आणि सांबला बदनाम करण्याचा प्रयत्न केला. मला पहिल्या-पासून त्यांचाच संशय येत होता.''

हे बोलणे ऐकताच तो लबाड साधू सटकायला बघत होता. पण शरभ आणि विरूपने त्याला पकडून खरपूस मार दिला.

ओरडत ओरडतच साधूने म्हटले, ''बंधूनो, माझ्या अति हव्यासापायीच मी अशी वाईट कृती केली. पण माझ्याहीपेक्षा दुष्ट काम करणारा बदमाश माणूस इथे हजर आहे.'' आणि त्याने माधवाचार्यांकडे बोट दाखवून इशारा केला. माधवाचार्यांचा चेहरा काळा निळा पडला.

ब्रजभूषणने त्यावर म्हटले, ''ही सारी तुझी करणी आहे तर. तू असा दुष्टपणा का केलास?''

ह्याचे विरूपनेच उत्तर दिले, ''माधवाचार्यांचा कंजूषपणा सर्वांना परिचित आहेच. त्यांच्या एकुलत्या एका मुलीचे लग्न माझ्याबरोबर लावायची इच्छा असल्याने, एकही दमडी खर्च न करता मला आपला जांवई करून घेण्यासाठी त्यांनीच साधूद्वारा माझ्यावर हा प्रयोग करवला. ह्या करणीने मी वेडा झाल्यावर साहजिकच मला कुणी मुलगी देणार नाही. मग त्यानंतर आपल्या मुलीचे माझ्याबरोबर लग्न लावून मला परत बरं करायचं, अशा विचारानेच त्याने हे कृत्य केले आहे. झाडावर ती भयंकर आकृती पाहून खरोखरच माझी बुद्धी भ्रष्ट झाली होती. परंतु शरभच्या कृपेने आता मी बरा झालो आहे.''

माधवाचार्याला आपल्या कृत्याची लाज वाटली. झाल्या अपमानाने खरोखरच त्याची अक्कल ठिकाणावर आली. भरपूर पैसा खर्चून त्याने आपल्या मुलीचे लग्न विरूपबरोबर थाटांत करून दिले.



## वाचकांचे ...

**डॉ. सुधीर जोशी, अमेरिका**

१९६२ सालापासून चंदामामा आमच्या कुटुंबाचा सदस्य आहे. मी स्वत: गेली तीस वर्षे चंदामामाचा वाचक व संग्राहक आहे. जुने अंक काढून मी ते वरचेवर चाळतो. जुन्या वेताळ कथा व अरबी कथा किती वेधक होत्या! 'भयंकर घाटी' पुन्हां सुरुं झाली त्याचा आनंद वाटला. गोष्टी संक्षिप्त स्वरूपांत देऊं नयेत. चित्रेही तशीच व त्याच आकाराची ठेवावीत. प्रदीर्घ मालिकांमधे एक संपूर्ण पानावर चित्र असे, ते पुन्हां बघण्याची संधी वाचकांना मिळेल कां? 'शिलारथ' व 'शिथिलालय' या कथामालिका कृपया पुन्हां सुरुं कराव्यात ही आग्रहाची विनंती! ''अमर वाणी'' ही परत एकदा सुरुं करावी.

**परमानंद जैन, उज्जैन**

पन्नास वर्षे चंदामामा वाचणाऱ्या अनेक वाचकांपैकी मी एक आहे. मध्यंतरी कांही काळ चंदामामाचे प्रकाशन थांबले होते ते वर्तमानपत्रांतून समजले. ''निश्चयाचा पक्का विक्रमार्क'' हे शब्द पुन्हां वाचले आणि माझ्या डोळ्यांतले अश्रू अनावर झाले.

चंदामामा पुन्हां प्रकाशमान झाला होता. मी ६२ वर्षांचा आहे. ''या वयांतही तुही 'चंदामामा' वाचता?'' असे लोक आश्चर्याने विचारतात. मी सांगतो कीं या जन्मीच नव्हे, तर पुढल्या जन्मीदेखील मला ही संधी मिळावी. हे मासिक वाचून मिळणारा आनंद कांही निराळाच आहे. त्यांना माझे बोलणे विचित्र वाटते व ते निमूटपणे परत जातात. आमच्या घरांत माझी पस्तिशींतली मुलेमुलीही हे मासिक आवडीने वाचतात, त्यांतल्या गोष्टींचे मर्म मुलांना सांगतात. भारतांतल्या सर्व मुलांमुलींनी ह्या मासिकाचा आनंद घ्यावा ही माझी परमेश्वरापाशी प्रार्थना आहे. म्हणजे त्यांना ज्ञान व मनोरंजनाचा खजिना मिळेल. हा चंदामामा, आकाशांतल्या चंद्रासारखाच शीतल, मधुर व शाश्वत असो.



# रुचिराजा

नंदनवनच्या जमीनदाराकडे लक्ष्मीपती नांवाचा एक प्रमुख स्वयंपाकी होता. स्वादिष्ट पदार्थ बनविण्यात तो अगदी अजोड आहे, अशी त्याची ख्याती होती. कित्येक वर्षे त्याने जमीनदाराकडे मुख्य आचाऱ्याचे काम केले आणि वय झाल्यावर पत्नीसहित तो त्याच्या गांवी निघून गेला.

तिथे तो अगदी निवांत जीवन जगत होता. परंतु नेहमी जेवताना पत्नीने केलेल्या स्वयंपाकात कधी मीठच कमी आहे, कधी फार तिखट आहे, कधी पदार्थ शिजलाच नाही, अशी कांही ना कांही तक्रार करीत असे. सारखे तिचे दोष दाखवून देई. त्याचा दहा वर्षांचा नातू 'सारस्वत', आजोबांची ही टीकाटिप्पणी लक्षपूर्वक ऐकत असे. कांही दिवसांनी लक्ष्मीपतीचे निधन झाले. आता घरी लक्ष्मीपतीची पत्नी आणि तिचा नातू सारस्वत, असे दोघेच उरले. भाजीत थोडे मीठ कमी असले तरी सारस्वत लगेच म्हणायचा, ''आजी, ही भाजी इतकी बेचव आहे की तोंडात घालवत नाही.'' त्याच्या आजीला वाटायचे, ''हा अगदी आपल्या आजोबांवर गेला आहे.' सारस्वतचे आई-वडील देवाघरी गेले होते. त्यामुळे त्याची आजी त्याला न रागवता रोज वेगवेगळे स्वादिष्ट पदार्थ बनवून, त्याला कौतुकाने खायला घालत असे. पण त्यामुळे तो अगदी कुचकामी बनला. खाण्याशिवाय त्याला दुसरे कोणतेच काम जमत नसे.

गावांतील लोक त्याला खादाडखाऊ म्हणत असत. ते म्हणायचे. 'याच्याइतका आधाशीही कुठेही सांपडायचा नाही आणि याच्याइतका मठ्ठ माणूसही कुठे सांपडणार नाही.''

थोडीफार संपत्ती गांठीला असल्याने नंदनवनातील एका भिक्षुकाच्या मुलीशी त्याचे लग्न झाले. लग्नाच्या दिवशी जेवायला बसल्यावर त्याने स्वयंपाकातील उणीवा दाखवून दिल्याच. आपल्या जांवयाला खाण्यापिण्याची आवड आहे, हे लक्षांत आल्यावर लक्ष्मीपतीच्या सासऱ्यांनी त्याला निरनिराळी पक्वान्ने खायला घातली.

दोन आठवड्यांनी बायकोला आणायला



सारस्वत पुन्हां सासुरवाडीला आला. रात्री जेवणाची पंगत बसली होती.

''ही काय वांग्याची भाजी आहे? त्यांत थोडं आलं आणि मिरची ठेचून घातली, तर किती छान चव येईल! तसंच या खिरींत केशर घातलं तर काय मजा आली असती! अरेरे! हा वडा इतका टणक कां आहे?'' असे बोलून सारस्वतने आपले पाकशास्त्रातले ज्ञान पाजळले.

त्याची पत्नी शारदा हिला नवऱ्याचे हे वागणे आवडले नाही. पण ती कांही बोलली नाही. रात्री सारस्वतसाठी ती दूध घेऊन आली, तेव्हां थोडे दूध घेतल्यावर तो म्हणाला, ''या दुधांत वेलदोड्याची पूड घातली असती तर फारच छान चव आली असती.''

हे ऐकून शारदा खूप नाराज झाली. परंतु चेहऱ्यावर तसं न दाखवता शांतपणे म्हणाली, ''तुम्हाला चवीचं खूप चांगलं ज्ञान आहे. पण मग स्वयंपाक करायला येतो?''

सारस्वत गर्वाने म्हणाला, ''स्वयंपाक करायला येत नाही, पण चवी अगदी चांगल्या कळतात.''

शारदानं विचारलं, ''आणखी काय काय येतं आपल्याला?''

यावर सारस्वतनेच तिला प्रश्न केला, ''शेवटी पोट भरण्यासाठीच तर शिक्षण, विद्यार्जन करायचे असते, हे तुला *माहिती नाही?* जर खाण्या-पिण्याची कांही ददात नाही, तर कशाला विद्यार्जन करायचं?''

आता शारदाला नवऱ्याच्या विचारांची दिशा कळली. आईजवळ ती खूप रडली. पण आईने तिला धीर देत समजावले की नवऱ्याला योग्य मार्गावर आणणे हे तुझे कर्तव्य आहे. तेव्हां ती थोडी शांत झाली आणि नवऱ्याबरोबर सासरी जायला तयार झाली.

शारदाला पूर्णपणे कळून चुकले होते की तिच्या नवऱ्याला फक्त खाण्यापिण्याची आवड आहे. बाकी कुठल्याही कामांत त्याला स्वारस्य नाही. एक दिवस सारस्वतच्या आजीजवळ आपल्या मनांतले दुःख तिने बोलून दाखवले.

त्यावर त्याची आजी *असहाय्यपणे म्हणाली,* ''हो बाळा, मी पण यांत कांही करू शकत नाही. लहानपणीच त्याचे आईवडील वारले. जोपर्यंत त्याचे मामा गांवात होते, ते त्याला शिकवत असत, अभ्यास करून घेत असत. व्यापारासाठी ते परदेशी गेल्यावर हा अगदीच कुचकामी बनला. त्याला कांही काम करावंसं वाटतच नाही.''



एके दिवशी जेवायला वाढताना शारदा नवऱ्याला म्हणाली, ''असे नुसते बसून खात राहिलात तर कितीही कमीच पडेल. असा नुसता खर्च करत राहिलात तर असलेली पुंजी कधीच संपून जाईल. कांहीतरी काम करा. त्यांत तुमचा वेळही चांगला जाईल.''

जेवण झाल्यावर सारस्वत म्हणाला, ''मला कोणतंच काम येत नाही. मग नोकरी कशी मिळेल? कोणी नोकरी दिली तर मी ती करायला तयार आहे.''

आपला नवरा निदान कांहीतरी काम करायला तयार आहे, या गोष्टीचा शारदाला खूप आनंद झाला.

दरवर्षीप्रमाणे यावर्षीही शारदाच्या माहेरी रामनवमीच उत्सव होता. त्यासाठी तिच्या वडिलांनी मुलीला आणि जांवयाला निमंत्रण पाठवले. यावर्षी उत्सव नंदनवनच्या जमीन-दाराच्या प्रमुख उपस्थितीत व्हायचा होता.

उत्सवासाठी जमलेल्या सर्वांसाठी स्वादिष्ट जेवणाचाही प्रबंध असे. सारस्वत सवयीप्रमाणे त्या पक्वान्नांमधेही दोष काढू लागला की, ''हे पुरण पुरेसं गोड झालेलं नाही. या आंबट पदार्थांमधे आणखी थोडा हिंग घातला असता तर खूप छान स्वाद आला असता. लाडवांत काजू घालायचं राहूनच गेलंय.''

सारस्वतने केलेली टीकाटिप्पणी जमीन-दाराच्या कानावर गेली. ते खूप नाराज होऊन म्हणू लागले, ''नंदनवनाचे जमीनदार आदरा-तिथ्य करण्याच्या बाबतीत प्रसिद्ध आहेत. आजपर्यंत कोणीही त्यांची उणीव दाखवण्याचे धाडस केलेले नाही. ही धाडसी व्यक्ती कोण आहे?''



शारदाचे वडील यावरून म्हणाले, "जमीनदार साहेब, क्षमा असावी. ती व्यक्ती म्हणजे माझा जांवई सारस्वत. स्वयंपाकाच्या बाबतीत त्याच्या बरोबरीचे कोणी नाही. कोणत्या पदार्थात काय घालायचे, किती घालायचे हे त्याच्याइतके कोणालाच समजत नाही. फक्त त्याची ही कला समजून घेणारा कोणी नसल्याने तो दुरावस्थेत आहे. संधी मिळाली तर तो स्वतःचं कौशल्य सिद्ध करून दाखवेल."

जमीनदार म्हणाले, "कोण, सारस्वत? हा लक्ष्मीपतीचा वंशज तर नाही ना?" शारदाचे वडील म्हणाले, "हो, हो, हा लक्ष्मीपतीचा नातूच आहे."

"वा! फारच छान!" असं म्हणत जमीनदारांनी सारस्वतला लगेच आपल्या वाड्यांत प्रमुख स्वयंपाकी म्हणून नियुक्त केलं आणि म्हणाले, "त्याच्या पाकशास्त्राच्या कौशल्याची आम्ही परीक्षा घेऊ."

हे ऐकून सारस्वत अगदी भयभीत झाला. तो शारदेला म्हणूं लागला, "तुझे वडील हे काय करून बसले? मला फक्त स्वयंपाकातील दोष काढता येतात. प्रत्यक्ष स्वयंपाक करायला येत नाही. इथून पुढे मी कधीही पदार्थातील दोष काढणार नाही. चल, आज रात्रीच आपण गांवी परत जाऊया."

शारदा त्याला धीर देत म्हणाली, "अहो, घाबरू नका. आपण प्रमुख स्वयंपाकी आहात म्हणजे प्रत्यक्षांत कांहीच करायचं नाही. आपल्या हाताखाली अनुभवी स्वयंपाकी असतील. कोणत्या पदार्थात कोणती गोष्ट किती प्रमाणांत घालायची. इतकंच तुम्ही त्यांना सांगायचं आहे. वेळ पडल्यास मीही स्वयंपाकाशी संबंधित अशा गोष्टी तुम्हाला शिकवीन."

सारस्वत दुसऱ्याच दिवशी वाड्यावर गेला. शारदेच्या सूचनांचे त्याने अचूक पालन केले. कांही दिवसांतच तो जमीनदारांच्या कौतुकास पात्र झाला आणि उत्तम स्वयंपाकी म्हणून त्याला नांवलौकिक मिळाला.

जमीनदाराने त्याला 'रुचिराजा' ही पदवी देऊन त्याचा गौरव केला.

नवऱ्यांत घडून आलेल्या बदलामुळे आणि त्याला मिळालेल्या नांवलौकिकामुळे शारदा खूपच आनंदात होती. तिचे आईवडील आणि सारस्वतची आजीही अगदी खूष झाले.







# केल्याने होत आहे रे...

काश्मीर देशाचा राजा विक्रमसेन एके दिवशी आपल्या दरबारांत पंडितांबरोबर चर्चेत रमला होता. त्याच वेळी दुसऱ्या राज्यांतील एक पंडित तेथे आला. राजाची परवानगी घेऊन त्याने एक स्वरचित संस्कृत श्लोक ऐकवला. त्या श्लोकांत एखादे काम त्याची योग्य वेळ आल्यावरच करण्याचे महत्व सांगितले होते.

"एखादे काम योग्य वेळ आल्यावर केले तरच सफल होते, यशस्वी होते. याउलट योग्य वेळ न पहाता केव्हांही काम केले तर ते वायाच जाते."

असा या श्लोकाचा भावार्थ होता. राजाला तो श्लोक खूपच आवडला व तो विचार पटलाही. त्याने त्या पंडिताचा मौल्यवान भेटवस्तू देऊन यथायोग्य गौरव केला.

नंतर राजाने आपल्या दरबारी मंडळींना विचारलं, "एखाद्या कामासाठी कोणती वेळ योग्य आहे, हे कसे ओळखायचे?"

यावर दरबारांत उपस्थित असलेला ज्योतिषी म्हणाला, "त्या वेळेची ग्रहांची स्थिती पाहून हे ठरविता येईल."

दरबारांतील आणखी एक पंडित म्हणाला, "अनुभवी व्यक्तींचा सल्ला घेऊन हे ठरविता येईल."

तिथे उपस्थित असलेल्या सर्व मंडळींनी आपापले मत व्यक्त केले. परंतु विक्रमसेनाला कोणतेच उत्तर समर्पक, समाधानकारक वाटले नाही. "असो, पुन्हा केव्हातरी आपण या विषयावर बोलू", असं म्हणून त्याने त्या दिवशीची सभा बरखास्त केली.

कांही दिवसानंतर विक्रमसेन एका मंत्र्याबरोबर जंगलातून चालला होता. तिथे त्याला एक सुंदर आश्रम दिसला. आश्रमाजवळच एक ऋषी जमीन खोदत होते. राजाने जवळ जाऊन त्यांना नमस्कार केला व विचारले, "मुनिवर्य, आपण तपस्वी आहात, ज्ञानी आहात. तरी कृपया माझं शंकानिरसन कराल का?"

ऋषींनी मान वर करून क्षणभर राजाकडे

भूषण

पाहिले आणि जरा हंसून पुन्हां ते आपल्या कामांत मग्न झाले.

तेव्हां राजा नम्रपणे त्यांना म्हणाला, "एखाद्या कामाची योग्य वेळ कोणती ते समजली पाहिजे. पण ती वेळ कशी ओळखायची?"

ऋषींनी राजाकडे पाहून पुन्हां एकदा फक्त स्मितहास्य केले आणि आपले काम सुरुंच ठेवले. विक्रमसेनास वाटले की आज ऋषींचं मौनव्रत असेल. त्यामुळे पुढे कांहीच न बोलता तो राजवाड्यांत परत आला.

दुसऱ्या दिवशी खूप जोरांत पाऊस आला. त्यामुळे राजाच्या मनांत असूनही त्याला आश्रमांत जाता आले नाही. तिसऱ्या दिवशी पाऊस थांबला. वातावरण अगदी स्वच्छ, सुंदर होते. त्यादिवशी राजा एकटाच आश्रमांत गेला. त्यावेळी ते ऋषी खोदलेल्या जागी माती टाकून छोटी छोटी रोपे लावीत होते.

विक्रमसेनाने ऋषींना नमस्कार करून विचारले, "मुनिवर्य, कृपया आज तरी आपण माझ्या प्रश्नाचं उत्तर द्याल ना? परवाच्या दिवशी मी आपणांस विचारलं होतं कीं एखादं काम करण्याची योग्य वेळ कोणती, हे कसं ओळखायचं?"

ऋषी हातांतलं काम सुरू ठेवीतच राजाला म्हणाले, "महाराज, मी परवाच आपल्या प्रश्नाचे उत्तर दिले आहे. पण ते आपल्या लक्षांत आलेले दिसत नाही." विक्रमसेन गोंधळून म्हणाला, "मुनिवर्य, माझ्या खरंच लक्षात आलेलं नाही. कृपया नीट सांगाल का?"

"हे त्याचं स्पष्टीकरण आहे" असं म्हणत ऋषी आपले काम करीत राहिले.

ऋषींच्या बोलण्या-वागण्यातून, कृतीतून राजाला त्याच्या प्रश्नाचं उत्तर मिळाले. योग्य वेळ आली आहे किंवा नाही, असा विचार करत व्यर्थ वेळ दवडण्यापेक्षां कामाला सुरवात करावी. ज्याप्रमाणे ऋषींच्या वृक्षारोपणाला पावसाने साथ दिली, त्याप्रमाणे आपण मनापासून हाती घेतलेल्या कामाला वेळेची साथ मिळतेच! हेच अंतिम सत्य आहे!

ऋषींना नमस्कार करून समाधानी मनाने राजा आपल्या प्रासादांत परतला.







# भयंकर घाटी

## 12

(क्षत्रिय युवकांच्यासारखे वेषांतर करायचे ठरवून केशव व जयमल्लाने ब्राम्हदंडी मांत्रिकाच्या गुहेतले सोने चोरले. त्याचवेळी ब्राम्हदंडी ओरडत आपल्या दालनांतून बाहेर पळायला लागला. त्याला पहारेकऱ्यांनी पकडले, व इतर पहारेकऱ्यांनाही बोलावले. त्यानंतर...)

**भाल्याचे** टोक आणि शिपायांचा ओरडा पाहून ब्राम्हदंडी मांत्रिकाची झोप उडाली. तितक्यांत तिथे दोनतीन शिपाई पळतपळत आले आणि त्याच्याभोवती कोंडाळे करून उभे राहिले.

"हा पाखंडी पळून जाणार होता. अरे बघता काय, भाला फेका ना!" असं म्हणून शिपायांनी भाला उचलला. ब्राम्हदंडीचा जीव थोडक्यांत वांचला. थोडा वेळ त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. नंतर जरा धीर करून कांपऱ्या आवाजात तो म्हणाला, "शूर शिपायांनो, मला मारूं नका. मी पळून जायचा प्रयत्न करीत नाही."

"तू पळून जात नव्हतास कां? मग हे काय चाललंय? तू खोटं सांगतो आहेस कीं नाही?" असं म्हणून त्या पहिल्या सैनिकाने भाला उलटा करून त्याला जोराने मारला.

ब्राम्हदंडीला त्यामुळे जखम झाली व तो खाली पडला. लटपटत तो म्हणाला, "अरे, शूर मर्दांनो, मला मारूं नका. मी झोपलो होतो तेव्हां मला एक वाईट स्वप्न पडले आणि मी त्या स्वप्नांतून जागा झालो आणि बाहेर पळत आलो.

पूर्वीच म्हातारा चिडून, ओरडला, "बाबा... नाही... गुरु....!"

केशव व जयमल्ल त्याला घेऊन निघाले. केशवने पित्याचा हात पकडून एक पाऊल पुढे टाकत म्हटले, "गुरु, चला आता निघूं या. अंधार होण्यापूर्वी एखाद्या गांवात शिरायला हवं. रात्रीं तिथे राहून सकाळी आपण घोडे विकत घेऊन पुढे जायला निघू. जर राजकुमार व त्यांचे गुरु यांना पायी प्रवास करताना लोकांनी पाहिलं तर ते काय म्हणतील?" "त्यांना संशय येईल. कांहीतरी अफवा पसरतील, आणि आपल्याला नव्या अडचणींशी सामना करावा लागेल."

ते दोन प्रहर चालत राहिले, आणि अंधार होताहोता एका गांवात पोंचले. जेव्हां ते एका वाटेवरुन जात होते, तेव्हां तिथे पारावर बसलेल्या लोकांचे बोलणे त्यांच्या कानावर पडले, त्यामुळे त्यांना भीती व आश्चर्य वाटले.

"ब्राम्हदंडी मांत्रिक दोन अंगरक्षक बरोबर घेऊन विंध्याचलाच्या दिशेने जातो आहे. तिथे एक औषधी वनस्पती आहे, त्या औषधीने तो राजगुरुचे फोड बरे करील. आजपर्यंत कुणीही वैद्य [illegible] तो मांत्रिक विंध्याचलला जातो आहे.

"यांत कांहीतरी धोका आहे. पण आपण राजकुमार आहोत, गांवगप्पांकडे आपण लक्ष देता कामा नये" जयमल्ल म्हणाला आणि त्याने केशवला खूण केली व पारावरच्या लोकांना विचारले, "इथे कुठे कांहीतरी जेवायला मिळेल कां?"

एका वृद्धाने सांगितले, "इथे जवळच एक खानावळ आहे. पण तिथे आज तुम्हाला बहुधा कांहीही मिळणार नाही. कारण ब्राम्हदंडी हा मोठा वैद्य व त्याचे अंगरक्षक तिथे आज रात्री राहाणार आहेत. हे ऐकून केशव व जयमल्ल स्तंभित झाले. केशवने निराश चेहऱ्याने जयमल्लाकडे बघितले. जयमल्ल विचारांत पडला. पण म्हातारा चटकन म्हणाला, "अरे, तसं असेल तर देशाटन करायला निघालेल्या राजकुमारांनी खानावळींत कशाला राहायला हवं? शिष्यांनो, चला, जाऊं या!" असं म्हणून तो पुढे निघाला. *(अपूर्ण)*





वेताळ-कथा

# दोन सुंदरी

शब्दाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला; त्याने झाडावरून शव खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. नंतर तो स्मशानाच्या दिशेने चालायला लागला. तेव्हां शवांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन्, मध्यरात्रीं ढगांचा गडगडाट होतो आहे, विजा चमकत आहेत, भुतेप्रेते ओरडत आहेत, तरीही तू बेडरपणे पुढे चालतो आहेस. तुझे हे असे वागणे मला तरी अयोग्य वाटते. मी तुला नेहमी सावध करतो, व तुला सांगतो कीं तू एक श्रेष्ठ राजा आहेस, आणि राजाची कांही निश्चित कर्तव्येही असतात. पण या कर्तव्यांना तू



विसरलेला दिसतोस; हे तुला शोभत नाही. तुझे उद्दिष्ट साध्य झाले तरी तुला त्याचे फळ मिळेलच, याची काय खात्री आहे? मला तर वाटतं कीं ते फळ तू दुसऱ्या कुणाच्या हाती सुपूर्द करशील आणि तू मात्र रिकाम्या हाती परत जाशील. उदाहरण म्हणून मी तुला युवराज जयंतची कहाणी सांगतो. त्याला फळ मिळाले खरे, पण चंचल मनामुळे त्याने ते हातचे गमावले.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

चंद्रगिरीचा महाराज सज्ञान झाला होता. त्याचे लग्नाजोगे वय झाले, तेव्हां त्याला तीव्रपणे वाटले कीं त्याला आवडेल अशा मुलीशीच लग्न करावे. त्याच्या मातापित्यांनी अनेक मुलींची नांवे सुचवली, पण त्याने सर्वांना नकार दिला.

एक दिवस फिरायला जाऊन परत आल्यानंतर जयंतच्या आईने त्याला एक तसवीर दाखवून सांगितले, ''ही प्रतापगडची राजकन्या आहे, राजाची एकुलती एक मुलगी आहे. माझ्या वहिनीच्या माहेरच्या लोकांना ही मुलगी फार आवडली. त्यांना वाटतं कीं ही मुलगी सर्वप्रकारे तुला साजेशी आहे.''

जयंतने ती तसवीर धडपणे पाहिलीदेखील नाही आणि तो म्हणाला, ''ही कन्या मला मुळीच आवडली नाही.''

आणि तो तिथून निघून गेला त्या रात्री जयंतला बराच वेळ झोप लागली नाही. त्याला वाटलं कीं राजवाड्यांत राहून मनपसंत बधू शोधता येणार नाही. राज्यांत हिंडून फिरून बघायला हवं. वेषांतर करून तो घोड्यावर बसला आणि तिथून निघाला.

सूर्योदय होईपर्यंत, तो एका दाट अरण्यां-तल्या डोंगरी भागांत पोंचला. तिथे डोंगरावरुन एक मनमोहक धबधबा खाली दगडगोट्यांवर कोसळत होता.

त्या धबधब्यापासून जरा दूर अंतरावर एक सुंदर कुटीर होते. घोड्यावरुन खाली उतरून तो त्या कुटीराजवळ गेला.

तिथे अंगणांत रंगीबेरंगी फुलांच्या झाडांमधे दोन सुंदर मुली फिरत फुले तोडत होत्या. अशा देखण्या मुली जयंतने आजपर्यंत बघितलेल्या नव्हत्या.

तो त्यांच्याजवळ जाऊन म्हणाला, ''तुम्ही दोघीजणी अप्रतिम सुंदर आहात. पण या अरण्यांत तुम्ही कां राहता, त्याचे कारण मला कळेल कां?''

जयंताला पाहून प्रथम त्या बावरल्या, पण नंतर त्यांनी उत्तर दिले, ''सौंदर्य म्हणजे काय त्याचा अर्थ कुणीच सांगू शकत नाही. बघणाऱ्याच्या नजरेत सौंदर्य असते. आमचे वडील एक श्रेष्ठ ज्योतिषी आहेत. त्यांचे म्हणणे व विश्वास आहे कीं जर आम्ही इथल्या नयनमनोहर वातावरणांत एक वर्षभर राहिलो तर आमचे भविष्य उज्वल व सोनेरी होईल. म्हणून हे स्थान त्यांनी आमच्यासाठी पसंत केले. जवळच्या एका राजाच्या निमंत्रणावरुन ते त्याच्या राज्यांत काल गेले आहेत.''

त्या सुंदर मुलींनी त्याची ओळख विचारण्या-पूर्वीच जयंतने सांगितलं,

''मी मनपसंत बधू शोधण्यासाठी राजवाड्यांतून कुणाला न सांगता निघालो आहे. याबाबतीत मला माझ्या मातापित्यांचा हस्तक्षेप नको आहे. तुम्हा दोघींपैकी मी एकीशी विवाह करायला मी तयार आहे. तुमचे पिताश्री परत आले कीं मी त्यांच्याशी बोलतो.''

जयंतने आपला विचार स्पष्टच सांगितला, आणि त्या दोघी चकितच झाल्या. त्यांनी एकमेकींशी बोलून नंतर म्हटले, ''आम्ही दोघी जुळ्या बहिणी आहोत. आमच्या वडिलांनी फार पूर्वीच सांगितलं होतं कीं आमचा दोघींचा विवाह एकाच पुरुषाशी होणार आहे.''

''तर मग मी तुमच्या दोघींशी विवाह



करायला तयार आहे. जरी तुमचे दोघींचे रूप सारखे असले, तरी तुमचे गुण वेगवेगळे असूं शकतील. मी कोण आहे हे तुम्हाला आत्तापर्यंत कळलेलंच आहे. तुमची मनस्थिती काय आहे त्याबद्दल थोडे कांही सांगा.'' शेजारच्या एका दगडावर बसत जयंतने त्यांना सांगितलं.

दोघींनी हंसतच उत्तर दिलं, ''आम्ही दोघीही जिद्दी आहोत, अतिशय हट्टी आहोत. जे मनांत येतं, ते करून दाखवल्याखेरीज आम्हाला शांत-पणा नसतो. कोणत्याही कामाला किंवा त्यागाला आम्ही केव्हांही तयार तयार असतो.''

''असं होय? पण तुम्ही खरंखरं सांगा कीं माझ्याबद्दल तुम्हा दोघींचं काय मत आहे?'' पुन्हां त्यांनी आपसांत बोलून जयंतला सांगितले, ''वडिलांनी फार पूर्वी आम्हाला सांगितलं होतं



कीं आमचा पती अतिशय बुद्धिमान आणि विचारी असेल. आमची नांव आहेत मंदा आणि चंपा. आमच्यापैकी मंदा कोणती आणि चंपा कोण, हे तुम्ही सांगू शकाल?''

कांही वेळ विचार करून जयंतने मंदा कोणती व चंपा कोणती हे अगदी बरोबर सांगितले. त्या दोघीही आश्चर्यचकित झाल्या व त्यांनी विचारले, ''हे आपल्याला कसं समजलं?''

जयंत म्हणाला, ''तुम्ही जुळ्या बहिणी आहात. पण साम्य असलं तरी एकीची कांति गुलाबी आहे आणि दुसरीची पिवळसर! त्यावरुन एकीचे नांव मंदा व दुसरीचे चंपा ठेवले असावे. अर्थात, ही माझी कल्पनादेखील असू शकते.''

''आमच्या वयांतही कांही क्षणांचा फरक आहे. आमच्यांतली थोरली कोण, ते तुम्ही सांगू शकाल कां?''

दोघींनी विचारले. क्षणभर विचार करून जयंत म्हणाला, ''त्याच्यासाठी मला संध्याकाळपर्यंत वेळ हवा.'' दोघींनी ह्याला संमती दिली.

संध्याकाळी त्या दोघींनी त्याला केळीच्या पानावर दोन भाज्या, चटण्या व खिरीसकट स्वादिष्ट जेवण वाढलं. जेवल्यानंतर जयंत त्यांना म्हणाला, ''तुमच्यापैकी मंदा मोठी आहे आणि चंपा धाकटी!''

''वा, अगदी बरोबर ओळखलंत. पण हा निर्णय कसा काय घेतलात?'' मंदाने विचारलं.

''बहुतेक ठिकाणी थोरली बहीण स्वयंपाक व घरकामांत लक्ष देते आणि धाकटी घरांतली बाकी लहानमोठी कामें सांभाळते. मंदाने स्वयंपाक केला, आणि चंपाने पाने मांडून जेवण वाढले. ते मी लक्षपूर्वक बघितले होते म्हणून मी हा निर्णय घेतला.'' जयंतने खुलासा केला.

दोघीजणींनी कुजबुजत कांहीतरी चर्चा केली आणि नंतर जयंतजवळ येऊन त्या म्हणाल्या, ''तुम्ही बुद्धिमान आहात आणि तुमच्यांत तार्किक विश्लेषण करण्याची एक असामान्य शक्ती आहे, हे आम्हाला मान्य आहे. पण आम्ही दोघींच्य पालन-पोषणाची आर्थिक शक्ती तुमच्याकडे आहे कां?''

त्यावर जयंत जोराने हंसला आणि त्याने आपली ओळख त्यांना दिली. नंतर त्याने



विचारले, ''अजून कांही शंका असेल तर आत्ताच विचारुन घ्या.''

त्यावर मंदा लगेच म्हणाली, ''जन्मपत्रिकेनुसार आमचा विवाह एकाच पुरुषाशी होणार आहे, आणि आम्हाला दोघींना एकाच दिवशी मुलगे होणार आहेत. पण छोट्या चंपाचा मुलगा कांही क्षण आधी जन्मेल आणि माझा मुलगा कांही क्षणांनंतर. अशा परिस्थितींत, आमच्यापैकी कुणाच्या मुलाला आपण राजा म्हणून घोषित कराल?''

जयंतने उत्तर दिलं, ''ह्या प्रश्नाचे उत्तर द्यायला मला थोडा अवधी हवा.'' ''ठीक आहे. रात्रीं नीट विचार करा आणि मग सकाळी आपला निर्णय ऐकवा.'' दोघी बहिणींनी एकदम म्हटले.

त्या रात्रीं जयंतची झोपायची व्यवस्था एका वेगळ्या खोलींत केली होती. दुसऱ्या दिवशीच पहाटे मंदा व चंपाचे वडील परत आले. मंदाने पित्याला सारी कहाणी सांगितली आणि चंपाने जयंतच्या खोलींत वांकून बघितले. जयंत तिथे नव्हता.

ती परत आली आणि म्हणाली, ''ते त्या ठिकाणी नाहीत. भावी राजाची आपण एक दिवस सरबराई केली, एवढीच आपली कुवत!''

या घटनेनंतर कांही महिन्यानंतर जयंतचा विवाह त्याच्या मातापित्यांनी निवडलेल्या तरुणीशी झाला.''

वेताळाने ही कहाणी सांगितली व म्हटले, ''राजन्, मंदा व चंपा या दोघी सुंदरींशी जयंतचे



वागणे अगदीच न शोभणारे, अव्यवहारी व उद्धटपणाचे वाटते. आपली भावी पत्नी स्वतःच निवडण्याचा निश्चय करुन तो घरांतून बाहेर पडला. त्याच्याशी लग्न करण्यासाठी दोन सुंदरी तयार झालेल्या होत्या. तरीही त्याने त्यांचा स्वीकार केला नाही. आणि मातापित्यांनी निवडलेल्या मुलीची विवाह करायला संमती दिली. हा त्याचा निर्णय अयोग्य नव्हता कां? त्याची मनीषा पूर्ण झाली होती, पण त्याने भलतेच कांहीतरी ठरवले. ही त्याची चूक व लहरीपणा, विक्षिप्त व विचित्र नाही कां वाटत?

माझ्या या शंकांचे समाधानपूर्वक उत्तर तुला माहीत असूनही जर तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील.''

विक्रमार्क म्हणाला, ''मंदा व चंपाने जयंतचे सामर्थ्य, बुद्धिमत्ता व तर्कज्ञान जाणून घेण्यासाठी कांही कठीण प्रश्न विचारले. ते प्रश्न व त्यांची स्वतःबद्दल सांगितलेली माहिती ऐकल्यावर जयंतला समजले कीं या दोघी हट्टी, अहंकारी, व वाजवीपेक्षां जास्त दुराग्रही आहेत. कोणत्याही परिस्थितींत त्या स्वतःचे म्हणणे खरे करणाऱ्या आहेत.

असल्या स्वभावाच्या स्त्रिया कुणालाही कधीही सुख देत नाहीत. हे सत्य जयंतला उमगले. या दोघी जर त्याच्या राण्या झाल्या तर आपलाच पुत्र वारस व्हावा, म्हणून त्यांनी गंभीर समस्या निर्माण केली असती. त्याच्यामुळे राजमहालांत शांती राहिली नसती व राज्यही सुरक्षित राहिले नसते. देशाची सुरक्षा, व प्रजेचा संतोष हे राजाला स्वतःच्या इच्छेपेक्षां जास्त महत्वाचे व आवश्यक असायला हवे. असा चांगला विचार करूनच जयंतराजाने आईवडिलांनी निवडलेली वधू योग्य मानली, आणि ते न्यायी बुद्धीचे लक्षण आहे.

त्यांत त्याची विचाराची पद्धत व तर्कशक्ती स्पष्ट समजते. त्यांत लहरीपणा किंवा चुकीचा निर्णय काडीमात्र नाही.''

राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला. *(के. सुचित्रादेवींची रचना)*








## नऊ वर्षांचा चित्रपट दिग्दर्शक



कांही वर्षांपूर्वीच नऊ वर्षांच्या किशनने चोवीस कन्नड चित्रपटांतून आणि पांच टीव्हीवरच्या महामालिकांतल्या १००० भागांमधून कॅमेऱ्यासमोर उभे राहून कामें केली होती.

पण आता तो दिग्दर्शक बनला आहे, त्यामुळे तो कॅमेऱ्यामागे जास्त दिसतो. त्याने दिग्दर्शन केलेला पहिला चित्रपट C/o. फूटपाथ, हा लौकरच पडद्यावर झळकेल. त्याने सेटवर काम करताना आपल्या दिग्दर्शकांकडून पद्धती शिकल्या व कॅमेरामनना त्यांची कला शिकवायची त्याने गळ घातली. एक दिवस त्याला रस्त्यांत कांही मुले किरकोळ वस्तू व वर्तमानपत्रें विकताना दिसली. ती मुले अनाथ होती असे त्याच्या वडिलांनी सांगितले. किशन घरी गेला आणि त्याने शाळेंत जाण्याची इच्छा असलेल्या एका अनाथ मुलाची कथा लिहिली. त्यावर त्याने चित्रपट करावा असे वडिलांनी सुचवले, आणि त्याच्या आईने या चित्रपटाची निर्मिती करायची तयारी दर्शविली. यांतल्या भूमिकांसाठी जॅकी श्रॉफ, सौरभ शुक्लासारखे जाणकार कलावंत, व राष्ट्रीय पारितोषिक मिळवणारी कन्नड अभिनेत्री तारा, हे किशनला मिळाले आहेत.

त्याचे कोवळे वय त्याच्या दिग्दर्शनाच्या आड आले नाही. ''प्रत्येकजण इतर दिग्दर्शकांप्रमाणेच माझ्याशी वागतो.'' किशनने सांगितलं. जगांतला सर्वांत लहान वयाचा दिग्दर्शक बनण्याची त्याची इच्छा आहे. 'गिनेस'कडे त्याचे नांव व कागदपत्रें गेलेली आहेत. नेदरलंडच्या तेरा वर्षे वयाचा सिडनी लींग याने १९६३ मधे एका चित्रपटाचे दिग्दर्शन केलेले होते. हा आजपर्यंतचा विक्रम मानला जातो. किशनचा जन्म ६ जानेवारी १९९६ मधे झाला असून तो गातो व संगीतही देतो. त्याच्या पहिल्या संगीत आल्बमच्या १५,००० प्रती खपल्या आहेत.

उद्देशून कठोर शब्द उच्चारले. कारण ती कांही साधीसुधी तलवार नव्हती, ती हिंदुस्तानच्या इंग्लिश गव्हर्नर-जनरलने राजाला भेट दिलेली तलवार होती. ती राजाच्या प्रतिष्ठेची बाब होती. राजाच्या आरडाओरड्याचा स्वामींच्यावर काडीमात्र परिणाम झाला नाही. राजा ओरडत होता,

"अरे देवा! कसला हा वेडा साधू! माझी सर्वात श्रेष्ठ दौलत बुडाली. आता मी काय करणार?"

नाव किनाऱ्याला लागली. तेलंगास्वामींनी उथळ पाण्यांत सहज हात बुडवला आणि दोन तलवारी बाहेर काढल्या. ते पाहून राजा चक्रावला. स्वामींनी राजाला त्यांतली आपली तलवार ओळखून [illegible] अगदी तंतोतंत सारख्या होत्या.

गोंधळलेल्या राजाला स्वामींनी विचारले, "ही तलवार तुमची दौलत आहे ना? मग तुमची दौलत तुम्हाला ओळखून घेता नाही कां येत?" स्वामींनी त्यांतली एक तलवार पाण्यांत टाकली आणि दुसरी तलवार, जी राजाची होती, ती राजाच्या हातांत दिली.

अवाक् झालेल्या राजाला आपला मूर्खपणा समजला. माणसे आपले म्हणून जे मानतो ते किती फोल असते हे राजाला कळले. त्याचबरोबर खऱ्या योगीच्या हातांत सारे कांही असूनही त्याच्या मालकीचे एक बोटभर वस्त्रदेखील नव्हते.

*(एम्.डी.)*

### चन्दामामा प्रश्नावली स्पर्धा - ६ (जुलै २००६)

| | |
|---|---|
| अनिकेत लहू हिरवे<br>C/o. प्राथमिक आरोग्य केंद्र,<br>ओतूर, ता. जुन्नर, जि. पुणे<br>महाराष्ट्र - ४१२ ४०९. | कु. तेजल देवदत्त बडगावे<br>C/o. बडगावे किराणा स्टोअर्स,<br>मु.पो. सातारा रोड, पिनकोड - ४१५०१०.<br>ता. कोरेगाव, जि. सातारा. (महाराष्ट्र) |

**'चांदोबा' - प्रश्नावली-६ची उत्तरे (जुलै'०६चा अंक)**

१. कोरिया देशाच्या दंतकथेतील राजा. 'राजा धडा शिकला'.
२. दिग्बोई (आसाम).
३. चौदा.
४. गोदावरी.
५. १६ ऑक्टोबर.
६. पर्शिया (हल्लीचा इराण).
७. मि. बद्रुद्दिन तय्यबजी.
८. चांगला कोण, वाईट कोण? (गुजरातची लोककथा).



# गारुडी राजा

महेंद्रपुरी राज्यांत सर्पवर नांवाचे एक गांव होते. त्या गांवात सांबशिव नांवाचा एक गारुडी रहात असे. साप पकडून त्यांना गरळ (विष) ओकायला लावण्यांत तो अगदी निपुण होता. सर्पदंशावर इलाज करण्यांतही त्याचा हातखंडा होता.

बऱ्याच वर्षानंतर त्याला मुलगा झाला. त्याने मुलाचे नाव ठेवले 'नागराज'. तो त्याचे संगोपन करूं लागला. सांबशिवच्या बायकोचा ज्योतिष, जन्मकुंडली, यांच्यावर खूप बिश्वास होता. एकदा तिने एका प्रसिद्ध ज्योतिष्याला नागराजची जन्मकुंडली दाखवली.

ज्योतिष्याने ती जन्मकुंडली लक्षपूर्वक पाहिली आणि तो एकदम आश्चर्याने सांबशिव दाम्पत्याला म्हणाला, "अरे वा! अगदी विलक्षण गोष्ट आहे. तुमचा मुलगा राजा होईल. याच्या नशिबांत राजयोग आहे."

सांबशिव म्हणाला, "माझा मुलगा राजा होणार? उगीच चेष्टा करू नका. खरं काम ते सांगा."

त्याच्याकडे नागराजची कुंडली परत देत ज्योतिषी म्हणाला, "चेष्टा करीत नाही. अगदी खरे सांगतो आहे. तुमचा मुलगा राजा झाल्यावर मात्र मला विसरूं नका."

सांबशिवला हळूं हळूं वाटायला लागले की कदाचित ज्योतिष्याच्या भाकितामधे तथ्यही असू शकेल. मग त्याने बिचार केला, आपला मुलगा राजा झाला तर तो अशिक्षित असणे योग्य होणार नाही. म्हणून त्याने मुलाला शाळेत घातलं.

आता नागराज दहा वर्षांचा झाला. वडिलां-प्रमाणेच साप पकडण्यांत तोही अगदी निपुण बनला. शिक्षणांतही तो खूप हुशार होता. संपूर्ण वर्गात त्याच्याइतका हुशार कोणीच नव्हता. सगळे वर्गमित्र त्याचा खूप हेवा करायचे. त्यामुळेच ते नागराजच्या पत्रिकेतील राजयोगावरुन त्याला टोमणे मारायचे आणि 'गारुडी राजा' असे म्हणून त्याची टर उडवायचे.

नागराज वयांत येईपर्यंत सांबशिव म्हातारा झाला होता. तोपर्यंत नागराज सापांच्या विषयात सर्वज्ञ झाला होता. सर्पदंशावर तो अगदी अचूक




इलाज करायचा. सांबशिवच्या मनांत आता सारखे येत होते कीं एकदा आपल्या मुलाला सिंहासनावर आरूढ झालेलं पाहिलं की आपण सुखाने मरायला मोकळे! पण अजून तसं काहीच घडत नव्हतं. नागराजचं लग्नाचं वयही झालं होतं. पण सांबशिवला वाटायचं, आत्ताच नागराजचं लग्न करण्यापेक्षा तो राजा झाल्यावर धूम-धडाक्यांत त्याचे लग्न लावून द्यावे आणि तो सोहळा पाहून आपण धन्य व्हावे. त्याला या संदर्भात पुन्हां एकदा त्या ज्योतिष्याची भेट घ्यायची होती, पण वर्षभरापूर्वीच त्यांचे निधन झाले होते.

इतक्यांत अनपेक्षितपणे एक घटना घडली. राजाचा एक सैनिक घोड्यावरून सर्पवरमधील एका गल्लीतून जाताना नागराज त्याच्या वाटेत आला. सैनिक गुरकावून त्याला म्हणाला, ''तू कोण आहेस? बेअकली आहेस कीं घमेंडखोर? आधी माझ्या वाटेतून दूर हो.''

हे सगळी ऐकून तेथील एक ग्रामस्थ सैनिकाला म्हणाला, ''आमच्या नागराजला आदराने वागवा. तो होणारा राजा आहे.''

सैनिकाने आश्चर्याने त्या दोघांकडे पाहिले आणि तो तेथून निघून गेला. परंतु एका आठवड्यानंतर कांही सैनिक सर्पवर गांवात आले आणि नागराजला राजा विजयवर्धनकडे घेऊन गेले.

या घटनेच्या संदर्भात गांवात तरतऱ्हेच्या अफवा पसरल्या. एकजण म्हणाला, ''आपण नागराजला 'भावी राजा' असं संबोधतो हे खऱ्या राजाला कळल्यावर तो कसा गप्प बसेल? नागराजचा शिरच्छेद करण्यासाठीच घेऊन गेले असतील.''

हे ऐकून सांबशिव भीतीने थरथर कापूं लागला. त्याला नैराश्याने घेरून टाकले आणि ज्योतिष्याच्या भाकितावरचा त्याचा विश्वास पार उडून गेला. तो कालीमातेच्या मंदिरात गेला आणि हात जोडून प्रार्थना करूं लागला, ''हे माते, माझा मुलगा राजा नाही झाला तरी चालेल. फक्त तो सुखरूप घरी परत येऊं दे. एवढीच कृपा कर.''

परंतु, कांहीही विपरीत घडलं नाही. उलट, राजा विजयवर्धनने जाहीर केले की आपली मुलगी नागम्मांबा हिचा विवाह नागराजशी होईल. हे ऐकून सर्व प्रजाजन खूपच आश्चर्यचकित झाले आणि उपरोधाने म्हणूं लागले, ''वा! छान! राजकुमारीचा विवाह एका गारुड्याशी!''

सांबशिवचा आनंद मात्र गगनांत मावेना. ज्योतिष्याचे भाकित आता खरे ठरणार होते. सर्पवरमधील सगळ्या ग्रामस्थांच्या आनंदालाही पारावार उरला नाही. आपल्या गांवचा एक रहिवासी आत्ता राजा होणार, याचा त्यांना खूप अभिमान वाटू लागला.

लवकरच राजकुमारी नागम्मा आणि नागराजचे लग्न अगदी थाटामाटात झाले. राजाने नागराजच्या आईवडिलांचे स्वागत आणि मानपान अगदी चांगल्या प्रकारे केला.

एके रात्री नागराज आणि राजकुमारी नागम्मांबा बिछान्यावर झोपले असताना नागराजाला सापाचा फुत्कार ऐकू आला. त्याक्षणी तो डोळे उघडून पहातो तो एक साप फडा काढून नागम्मांबाच्या दिशेने येताना त्याला दिसला. नागराज पटकन बिछान्यावरून उतरला. त्याने सापाला शेपटी धरून हवेत फिरवून जोरात जमिनीवर आपटले. तडफडत सापाने तिथेच प्राण सोडले.

इतक्यांत राजकुमारीलाही जाग आली आणि नागराजने तिला संपूर्ण हकीकत सांगितली. तिने नागराजच्या धाडसाचें खूप कौतुक केले. लगेचच ही गोष्ट राजाच्याही कानावर गेली. राजा विजयवर्धनने अत्यानंदाने नागराजला मिठी मारली आणि तो म्हणाला, ''मुला, तुझ्यामुळेच माझ्या एकुलत्या एका मुलीला जीवदान मिळाले.'' नंतर त्याने सविस्तरपणे नागराजला राज-कुमारीचा विवाह त्याच्याशी करण्याचे कारण. सांगितले.

विजयवर्धनचे आजोबा अजयवर्धन यांनी खूप वर्षे राज्य केले. म्हातारपणी त्यांनी आपला मुलगा जयवर्धन याला गादीवर बसवले आणि उर्वरित आयुष्य देवपूजेत घालवावे, आध्यात्मिक











प्रगती साधावी, म्हणून जवळच्या जंगलातील एका ऋषींच्या आश्रमांत जाऊन ते राहू लागले.

कांही दिवसांनंतर जयवर्धन शिकारीसाठी जंगलात गेला असताना विषारी साप चावून त्याचा मृत्यू झाला. त्यानंतर विजयवर्धन महेंद्रपुरीचा राजा झाला. त्यानंतर सहा वर्षांनी राणीच्या पोटी सुंदर कन्यारत्न जन्माला आले. अरण्यांत ऋषींच्या आश्रमांत रहाणाऱ्या आपल्या आजोबांचा आशीर्वाद घ्यावा म्हणून विजयवर्धन छोट्या बाळीला घेऊन आश्रमात गेला.

अजयवर्धन पणतीला बघताक्षणीं एकदम दचकले. डोळे बंद करून थोडा वेळ त्यांनी ध्यान लावले आणि नंतर डोळे उघडून विजयवर्धनला म्हणाले, "तुझ्या वडिलांचा मृत्यू साप चावून झाला होता आणि तुझ्या मुलीलाही सापापासूनच धोका आहे. या मुलीचं नाव नागम्मांबा ठेव आणि रोज श्रद्धापूर्वक सर्पदेवतेचे पूजन कर. त्यामुळे धोका टळेल आणि सर्व कांही चांगले होईल. इतकेच नाही तर ही मुलगी मोठी झाली, लग्नाची झाली की हिच्यासाठी मुलगा निवडतानाही योग्य ती खबरदारी घ्यायला पाहिजे. निर्णय घेताना विचारपूर्वक घे, अजिबात गडबड करू नको. हिचा नवरा धाडसी, पराक्रमी आणि धीट असणे अगदी गरजेचे आहे."

राजकुमारी वयांत आल्यावर विजयवर्धन तिच्यासाठी वरसंशोधन करू लागला. पण त्याचवेळी तिला सापापासून असलेल्या धोक्याचे विचारही त्याला सतावत होते. नेमक्या याच वेळी एका सैनिकाने राजाला येऊन सांगितले की सर्पवरचा ग्रामस्थ नागराज याला 'भावी राजा' असं संबोधतात. राजाने लगेचच नागराजला बोलावून घेतले. त्याची सर्व माहिती मिळवली. नागम्माबा आणि नागराज यांच्या जन्मकुंडली छानच जमत होत्या. राजाला कळलं की नागराज साप पकडण्यांत निपुण आहे, आणि सर्पदंशावर इलाज करण्यातही त्याचा हातखंडा आहे. हा सगळा दैवी योगायोग मानून राजा विजयवर्धनने आपल्या मुलीचे लग्न नागराजशी करायचे ठरवले.

वृद्ध झाल्यावर विजयवर्धनने नागराजचे नांव बदलून नागराजवर्धन ठेवले आणि त्याचा राज्याभिषेकही केला. परंतु सर्पवरचे गांवकरी मात्र त्याला कौतुकाने 'गारुडी राजा' असंच म्हणायचे.



# चांदोबा प्रश्नावली-८

Co-sponsored by
Infosys FOUNDATION,
Bangalore

बरोबर उत्तर देणाऱ्यांपैकी एकाला रु.२५०/- दिले जातील.

*या प्रश्नावलीत विचारलेले सर्व प्रश्न २००५ मधे जानेवारी ते डिसेंबर या अंकांत असलेल्या गोष्टींवर आधारित आहेत. तुम्ही त्या वाचलेल्या आहेत. जर तुम्हाला त्या आठवत असल्या तर तुम्ही लगेच उत्तरे देऊं शकाल. लक्षांत नसतील तर बाराही अंक पुन्हां नजरेखालून घाला. म्हणजे उत्तरे शोधताना मजा वाटेल.*

**अचूक उत्तरे देणाऱ्यांची संख्या एकापेक्षां जास्त असेल तर बक्षिसासाठी सोडत काढण्यांत येईल व पांच विजेत्यांना समान रकम वाटून दिली जाईल.*

<u>त्यासाठी :</u> १. उत्तरे लिहा. २. आपले नांव, वय (१६ वर्षांखालील मुलांसाठीच ही स्पर्धा आहे) व पिनकोडसहित पत्ता. ३. एका कुटुंबातून एकाच व्यक्तीला भाग घेता येईल. ४. वर्गणीदार असलात तर तो क्रमांक. ५. पाकिटावर चांदोबा प्रश्नावली-८ असे लिहा व चंदामामाचा संपूर्ण पत्ता लिहून आम्हाला पाठवा. ६. सप्टेंबर महिना अखेरपर्यंत आपली प्रवेशिका आम्हाला मिळाली पाहिजे. ७. नव्हेंबरच्या अंकात निकाल जाहीर होईल.

१. एक मानव आणि एक देवता यांचा आनंदात सुरुं झालेला परिचय, त्याचा गर्विष्ठ व आततायी स्वभाव, या कारणामुळे या विदेशी कथेचे शेवटी विषादांत रूपांतर झाले. त्या मानवाचे नांव काय? या देवतेचे नांव काय?

२. २०५० सालापर्यंत भारताची लोकसंख्या किती होईल ते सांगू शकाल?

३. "योग्यता नसलेल्या व्यक्तीला मदत करणे हे सर्वांत मोठे पाप आहे." कोणत्या गृहिणीने हा धडा भुताला शिकवला? तिचे नांव काय? ही कोणती गोष्ट आहे?

४. चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या काळांत कोणत्या चिनी प्रवाशाने आपल्या देशांत प्रवास केला?

५. 'पोलो' या खेळाची सुरवात आपल्याच देशांतल्या एका नगरांत झाली असं म्हणतात. त्या शहराचे नांव काय?

६. ह्या गोष्टींत सांगितलंय कीं सुखी जीवन घालवण्याचा मार्ग म्हणजे परिश्रमांखेरीज दुसरे कांहीही नाही. ही गोष्ट कोणती आहे?

७. हे चित्र कोणत्या गोष्टीत आहे?












# अतिप्राचीन चित्रकला

**म**ध्य प्रदेशची राजधानी भोपाळपासून सुमारे चाळीस किमी अंतरावर भीमबेटका आहे. तिथल्या जवळजवळ ६०० गुहांतली भित्तीचित्रे ही एक अद्‌भुत प्राचीन देणगी आहे.

पृथ्वीवर मानवाचे अस्तित्व जाणवून देणारी ही जगांतली सर्वांत जुनी चित्रें मानली जातात. ही एक लाख वर्षांची जुनी भित्तीचित्रें प्रेक्षकांना मुग्ध करून सोडतात.

पशुपक्षी, मानवाकृती यांच्या प्रमाणबद्ध चित्रांतल्या सरळ रेषा, वर्तुळें, त्रिकोन, चौकोन, षटकोन इत्यादिंचा वापर थक्क करणारा आहे. मानवाच्या दैनंदिन कामांची चित्रें आपल्याला शिकार, स्वयंपाक, लांकडे फोडणे किंवा पाणी आणणे यासारख्या आकृतींमधून दिसतात.



या चित्रांतून मानवाची उत्क्रांति व शिकाऱ्यापासून शेतकऱ्यांत झालेला बदल समजतो.

स्त्रिया व पुरुष हातांत हात घालून नृत्य करीत आहेत, मिरवणुका काढीत आहेत, वगैरे उत्सवी प्रसंग साजरे करताना चित्रित केले आहेत.

भीमबेटकाच्या या गुहांचा शोध आपल्याला फक्त पन्नास वर्षांपूर्वी लागला, हे विशेष !



# इच्छापूर्ती

**रा**मापुरच्या राममंदिरात 'रंगनाथ' नांवाचा पुजारी होता. त्याच्या बायकोचे नांव होते जानकी. लग्नानंतर दहा वर्षांनी त्यांना एक मुलगा झाला. त्यांनी मुलाचं नांव ठेवलं 'सुंदर'. अगदी प्रेमाने ते दोघं सुंदरचे लालनपालन अगदी प्रेमाने करू लागले.

लहानपणापासून सुंदर खूप खादाड होता. तो सतत कांहीतरी चरत असायचा. मंदिरातील निम्म्याहून जास्त प्रसाद तोच फस्त करायचा. त्यामुळे तो खूपच लट्ठ आणि आळशी बनला. त्याला कांही काम करावेसे वाटतच नसे.

पूजेसाठी आवश्यक असणारे मंत्र व श्लोक सुंदरला शिकवावेत असे रंगनाथला खूप वाटायचे. परंतु त्याची ही इच्छा अपूर्णच राहिली. कितीही प्रयत्न केले तरी सुंदरचे ते श्लोक पाठ होत नव्हते. तो नुसता तब्येतीनेच धडधाकट होता. वीस वर्षांचा होऊनही त्याच्या अंगात काडीचेही धाडस नव्हते. स्वतःच्या सावलीलाही तो घाबरत असे. रंगनाथला सुंदरची खूप काळजी वाटू लागली. तो म्हणायचा, ''बाळा सुंदर, तू कधीच मंदिराचा पुजारी होऊ शकणार नाहीस. काय होणार तुझ्या आयुष्याचं?''

काळजीने रंगनाथ असे बोलू लागल्यावर सुंदर त्याला म्हणायचा, ''बाबा, आपल्या गांवात मिठाईचं एकही दुकान नाही. आपल्या गल्लीच्या कोपऱ्यावर मला मिठाईचं दुकान घालून द्या. ते संपूर्ण काचेचे, काचेच्याच भिंती, दारे असलेले असे पाहिजे. मग त्या सुंदर दुकानांत पायावर पाय टाकून आरामांत मी मिठाईचा व्यापार करीन. धंद्यात खूप पैसा मिळवीन.

सुंदरच्या असल्या वक्तव्यावर रंगनाथ चिडून म्हणत असे, ''हे बघ, मिठाईच्या व्यापारासाठी खूप पैसा लागतो. माझी तेवढी कुवत नाही. माझ्या लहान बहिणीचे लग्न अजून व्हायचेय. ती जबाबदारी माझ्यावरच आहे. त्यापेक्षा माझं ऐक. पूजापाठ, मंत्र, श्लोक शिकून घे आणि भावी काळांत मंदिरात पुजाऱ्याचे काम कर. पुरुषोत्तम श्रीरामच तुझं रक्षण करेल. तुला तारून नेईल.''

यावर सुंदर लगेच म्हणायचा, ''ते मंत्र वगैरे



शिकणं कांही मला जमायचं नाही. लहानपणा-पासूनच मी भित्रा आणि मठ्ठ आहे. तुम्ही शिकवलेला हनुमान चालिसा पाठ करायला मला दहा वर्षे लागली. मग इतके मंत्र शिकायला किती वेळ लागेल?''

अशांतच रंगनाथच्या लहान बहिणीचं लग्न ठरलं. रंगनाथ लग्नखरेदीसाठी शहरांत आला असताना त्याने बहिणीसाठी दहा साड्या घेतल्या. साड्यांचा बस्ता घेऊन तो दुकानांतून बाहेर पडला. इतक्यांत रस्त्यांतून चाललेल्या एका परिचिताने त्याला अगदी त्याच्या जवळच्या नातेवाईकाचं निधन झाल्याचं सांगितलें. रंगनाथ तसाच परत दुकानांत गेला आणि दुकानदाराला म्हणाला, ''आत्ताच माझ्या अगदी जवळच्या एका नातेवाईकाचं निधन झालं आहे. मला तिकडे जायलाच हवे. तेव्हां मी साड्यांचे हे गाठोडे आत्ता इथेच ठेवतो. नंतर येऊन घेऊन जातो.''

नातेवाईकाच्या अंत्ययात्रेहून रंगनाथ घरी येईपर्यंत खूप रात्र झाली होती आणि त्याची तब्येतही ठीक नव्हती. हळूं हळूं त्याला ताप चढूं लागला. दुसऱ्या दिवशीही त्याला बरे वाटत नव्हते. तेव्हां त्याने सुंदरला बोलावून सांगितले, ''तू त्या कापडदुकानात जाऊन साड्यांचं गाठोडं घेऊन ये. मात्र अंधार पडायच्या आत घरी परत ये. वाटेत चोरीमारीचा धोका आहे. तेव्हां सावध रहा.'' त्याने सुंदरला गाडीभाड्यासाठी म्हणून वीस रुपये दिले.

सुंदर शहरात पोचल्यावर त्या कापड दुकानात गेला. त्याला बघताक्षणीच दुकानदार म्हणाला, ''साड्यांचे गाठोडें न्यायला आलास वाटतं? हे घे गाठोडे. महागड्या साड्या आहेत. तेव्हां सांभाळून जा.''

गांठोडे डोक्यावर घेऊन सुंदर बाहेर पडला. त्या गल्लीतच पुढे एक मिठाईचं दुकान दिसल्यावर त्याने विचार केला, ''गाडीभाड्यांत वीस रुपये घालवण्यापेक्षां त्याची मिठाई घेऊन खावी आणि मग आरामांत चालत घरी जावे.''

मिठाई खरेदी करुन ती खात खात तो पायीच घराकडे निघाला. आता चांगलाच अंधार पडू लागला होता. एका झाडाखाली पांच हडळी गप्पा मारत बसल्या होत्या. सुंदरला येताना पहाताच त्यांनी स्त्रीरूप धारण केलं आणि टाळ्या वाजवून त्यांनी सुंदरला आपल्याजवळ बोलावले.

सुंदर मनांतून चांगलाच घाबरला होता. पण त्याने विचार केला, ''मला वाटलं चोर आहेत. पण पुरुष चोर असतात, या तर बायका



आहेत.'' असा विचार करेपर्यंत त्या बायका त्याच्याजवळ येऊन म्हणाल्या, ''आमच्या एका नातेवाईकांकडे लग्नसमारंभ आहे. तिकडे चाललो असताना आम्ही रस्ता चुकलो. अरे, या गाठोड्यांत काय आहे?''

सुंदर धीटपणे म्हणाला, ''हे साड्यांचं गाठोडे आहे. माझ्या वडिलांनी आपल्या बहिणीसाठी या साड्या घेतल्या आहेत.''

''आम्हालाही पाहू दे ना. बघू या कशा आहेत साड्या ते'' असं म्हणत त्यांनी सुंदरच्या हातातून गांठोडं काढून घेतलं.

सुंदरने जवळच पडलेली एक झाडाची फांदी उचलली आणि त्यांच्यावर उगारून म्हणाला, ''तुम्ही बायका चोर आहात वाटतं. खबरदार साड्यांना हात लावाल तर.''

इतक्यांत त्या बायकांनी एक छोटा बटवा सुंदरला देऊं केला आणि म्हणाल्या, ''या बटव्यांत एकशे सोळा मोहरा आहेत, त्याही सोन्याच्या. आम्ही लग्नाला जाताना नवरीला भेट द्यायला घेतल्या होत्या. पण आम्ही मुहूर्ताच्या वेळेत तिथे कांही पोचू शकणार नाही. तेव्हां या तुलाच घेऊन टाक. आम्हाला फक्त या साड्या पाहूं दे.''

सोन्याच्या मोहरा म्हटल्यावर सुंदरचे डोळे लकाकले. तो लगेच फतकल मारून जमिनीवर बसला आणि त्या मोहरा मोजूं लागला. दोन-तीन मिनिटांनंतर सुंदरला त्या हडळींचा विचित्र प्रकारे हंसण्याचा आवाज आला. त्याने मान वर करून पाहिलं तर त्या हडळी साड्यांचे गाठोडे सोडून त्यांतील साड्या नेसण्याच्या तयारीत होत्या.

सुंदरला कांहीतरी शंका आली. तो एकदम भयभीत झाला. त्याला वाटलं या बायका नाहीत, हडळीच असणार. त्याने मोठ्या आवाजात हनुमान चालिसा म्हणायला सुरवात केली. दुसऱ्याच क्षणी त्या हडळी किंचाळत किंचाळत लिंबाच्या झाडावर जाऊन बसल्या.

हनुमान चालिसा म्हणत म्हणतच सुंदरने सगळ्या साड्या गोळा करून गाठोडं बांधलं आणि मोहराही बरोबर घेऊन तो सकाळी घरी पोचला.

अशा प्रकारे, हडळींच्या कृपेने, सुंदरच्या आत्याचे लग्न धुमधडाक्यात झाले. त्याच्या वडिलांनी त्याच्यासाठी काचेचे छानसे मिठाईचे दुकान घालून दिले. आणि सुंदरची मिठाईच्या दुकानाची इच्छा एकदाची पूर्ण झाली.





# दुःखाचं मूळ-लोभ

काशी येथे ब्रह्मदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला दोन मुलगे होते. उतारवय झाले तेव्हां राजाने आपल्या थोरल्या मुलाचा राज्याभिषेक करून धाकट्याला सेनापती म्हणून नेमण्याचे ठरविले. अगदी राज्याभिषेकाच्या वेळी मोठा राजाला येऊन म्हणाला - "मला हे राज्य नको, धाकट्यालाच राज्य करू दे!"

तो काशीचे राज्य सोडून दूर एका सामंत राजाच्या राज्यात गेला. तेथे तो एका श्रीमंत माणसाच्या घरी नोकरी करू लागला. दिवसभर तो त्या श्रीमंताच्या घरांत गड्याचे काम करी.

कांही काळ लोटल्यावर काशीच्या राज्याचे कांही अधिकारी, जमिनीची मापे वगैरे घेत, व त्यावरचा राज्य कर ठरवीत, त्या सामंत राजाच्या राज्यांत येऊन पोंचले. त्यांनी त्या श्रीमंताच्या घरी काम करणाऱ्या युवराजाला पाहिले व त्याच्यावरची आपली भक्ति व श्रद्धा दर्शविली. ते कळतांच त्या श्रीमंत माणसाने युवराजाकडे येऊन विनंती केली की "आपण आपला धाकटा भाऊ काशीचे महाराज यांना पत्र लिहून माझ्यावर लागणारा कर थोडा कमी करावा!" युवराजाने तसे पत्र लिहिले व काशीच्या राजाने कर कमी केला.

ही गोष्ट सर्वांस कळल्यावर गांवातील अनेक लोक युवराजाकडे आले व त्यांच्यावरचा कर कमी करण्यासंबंधी राजाला लिहिण्यास विनंती करू लागले. सर्वांच्यातर्फे युवराजने आपल्या धाकट्या भावाला पत्र लिहिले आणि सर्वांनी इच्छिल्याप्रमाणे जमिनीवरचा कर कमी करण्यास राजाने मंजुरी दिली.

पुढे तर राज्याच्या खजिन्यांत भरावयाचे कर लोक युवराजाकडेच येऊन भरू लागले. युवराजाने नको म्हटले तरी प्रजा त्यालाच येऊन कर देऊ लागली. त्यामुळे भावाच्या मनांतले वैराग्य कमी होऊ लागले आणि राज्यप्राप्तीचा मोह वाढू लागला.

त्यानंतर तो एकेका सामंत राजाला आपल्याकडे वळवून घेऊन, किंवा त्याला जिंकून आपली सत्ता वाढवू लागला. त्या गोष्टीची माहिती आपल्या धाकट्या भावालाही युवराज देऊं लागला. तरी धाकट्या भावाने, मोठ्या भावाने जे केले त्याचा विरोध तर केलाच नाही, उलट त्याला आपली मान्यताच दिली. शेवटी युवराजाच्या मनांत काशीचे राज्यच हस्तगत करण्याचा मोह होऊ लागला. एके दिवशी त्याने आपल्या धाकट्या भावाकडे निरोप पाठविला - "तू आपले सर्व राज्य मुकाट्याने मला द्यावे, नाहीतर युद्धाला सिद्ध रहावे."

धाकट्या भावाने उत्तर पाठविले - "हे राज्य तर आपलेच आहे. आपल्याला वाटेल तेव्हां येऊन स्वीकारावे." त्यानंतर युवराजाने आपला राज्याभिषेक करवून घेतला व धाकटा भाऊ सेनापती झाला.

काशी राज्य मिळाले तरी तेवढ्यावर थोरल्या भावाच्या मनाचे समाधान झाले नाही. तो एकामागून एक लहानलहान राज्ये जिंकून राज्याचा विस्तार करू लागला. त्याच्या मनाचे समाधान झाले नाही.

देवेंद्र भूलोकांतील विविध राज्यांसंबंधी चर्चा करीत असतां काशी राज्याचा उल्लेख झाला व याविषयी दुर्लक्ष केले, तर सर्व लोकांवरच संकट येण्याची शक्यता दिसली. म्हणून थोरल्याची कानउघाडणी केली पाहिजे, असे देवेंद्राला वाटले.

हा संकल्प करून देवेंद्र एका तरुणाचे रूप घेऊन काशीला राजाच्या दर्शनासाठी आला. एक महत्वाची गोष्ट सांगून निघून जाणार असल्याचे त्याने सांगितले. राजा त्याला आपल्या अंतःपुरात बोलावून घेऊन गेला.

"राजा! माझ्या माहितीप्रमाणे एक जागी तीन मोठी महानगरे आहेत. ती सर्व संपत्ती व वैभवयुक्त अशी आहेत. हत्ती, घोडे, रथ व पायदळ, असे



चतुरंग सैन्य त्यांच्याकडे आहे. मी ती तीन शहरे जिंकून तुला देतो." असे सांगून तरुणाच्या वेषांत असलेल्या देवेंद्राने राजाला खूप प्रोत्साहन दिले. राजा त्या गोष्टीस तयार झाला. तितक्यांत देवेंद्र अंतर्धान पावला.

राजाने त्या तरुणाचा खूप शोध केला, परंतु तो सांपडला नाही. तेव्हां राजाला कांही सुचेना. त्याने आपल्या सर्व प्रमुख अधिकाऱ्यांना बोलावून हुकूम दिला की आत्तां थोड्या वेळापूर्वी एका तरुणाने येऊन तीन महानगरे जिंकून देण्याचे वचन मला दिले होते. तरी तुम्ही त्याला लवकर हुडकून काढा."

राजाच्या खास अंगरक्षकांनी व इतर अधिकाऱ्यांनी सैनिकांच्या मदतीने खूप शोध काढला, परंतु त्या तरुणाचा कांही शोध लागला नाही. तेव्हां राजाला वेड तर लागले नाही असे वाटू लागले. त्याच मानसिक आजाराने राजा

आजारी पडला. वैद्याने अनेक उपचार केले, परंतु सर्व निरुपयोगी ठरले.

त्याच वेळी समस्त शास्त्रांत प्राविण्यसंपादन करून बोधिसत्व तक्षशिलेहून काशीला परतले. त्यांना महाराजांच्या विचित्र आजाराची माहिती कळली. त्यांनी राजाकडे निरोप पाठविला की राजाचा आजार बरा करण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी आहे. तरी एक संधी द्यावी.

राजाने बोधिसत्वांना राजवाड्यात बोलावून घेतले. बोधिसत्वांनी राजाला विचारले, "महाराज, आपल्या आजाराचे कारण काय?"

त्याचे उत्तर म्हणून राजाने त्याला एका तरुणाने तीन महानगरें जिंकून देण्याचे जे वचन दिले होते ते सांगितले, आणि म्हणाला, "त्या दिवसापासून माझ्या मनाला धक्का बसला आहे. ही व्याधी तुम्हाला दूर करतां आली तर प्रयत्न करून पहावा."

बोधिसत्वांनी राजाला विचारले - "समजा, आपण या आजारातून बरे झालात तर ती तीन महानगरें जिंकू शकाल का?"

"नाही, ते शक्य नाही!" राजा लगेच उत्तरला.

"तर मग त्या नगरांची फिकीर करीत बसण्यांत काय अर्थ आहे? जगांतली प्रत्येक वस्तू थोड्याच दिवसांत पाहता अदृश्य होते. म्हणजे ती क्षणभंगुर आहे, होय की नाही?" बोधिसत्वांनी विचारले.

राजा म्हणाला - "होय!"

"हेही तितकेच खरे आहे, की प्रत्येक जीवधाऱ्याला प्राण गेल्यावर हे जग सोडून जावे लागते. म्हणून हे राजा! तीनच काय, तीस महानगरे जिंकली तरी आपल्याला जास्त सुख मिळणे शक्य नाही. या जगांत कोणीतीही वस्तू किंवा प्राणी शाश्वत नाही. मोह नांवाचे एक मोठे भूत आहे! लोभाला अंतच नसतो. कोणी माणूस लोभाला बळी पडतो, तेव्हां त्याला मानसिक व्याधी होते. तिच्यापासून मुक्ती हवी असेल, तर मनांतील आशा व आकांक्षा काबूत राखल्या पाहिजेत. चांभार जसा पायाचे माप पाहून चामडे कापतो, तसेच आपल्याला इच्छा व कामना आपल्या उपयोगी पडतील, तेवढ्याच वाढविल्या पाहिजेत." बोधिसत्व म्हणाले. बोधिसत्वांचा उपदेश ऐकून राजाच्या मनाला शांति मिळाली व त्याची मानसिक व्याधि नाहीशी झाली. त्यानंतर बोधिसत्वांनी राजाला उपदेश केला व आजीवन बोधिसत्वांच्या मार्गदर्शनाप्रमाणे तो राज्यकारभार पाहू लागला.







# रामायण

लक्ष्मणाने भावा-भावजयीचे बोलणे ऐकले. तो नम्रपणे रामाला म्हणाला, "दादा! तूं रानांत जायचा पक्का निश्चय केला आहेस, तर मलासुद्धां बरोबर घेऊन चल."

रामाला ते बरोबर वाटले नाही. तो म्हणाला, "तूं सुद्धां जर माझ्याबरोबर गेलास तर वृद्ध बाबा व आई यांची काळजी कोण वाहणार? तुला त्यांच्यासाठी तरी अयोध्येला रहावेच लागेल."

पण लक्ष्मण कां ते कबूल करणार? तो म्हणाला, "मला हे कांहीं कळत नाही. ही जबाबदारी ज्याची त्याने घ्यावी. मी अयोध्येला राहणार नाहीं. जिथे तूं तिथे अयोध्या!"

राम निरुत्तर झाला. त्याने वशिष्ठांच्याकडे जाऊन दिव्य अस्त्रें, अक्षय भाता धनुष्य वगैरे मागून घेऊन यायला सांगितले. लक्ष्मण त्याचे सखे, मित्र, सर्वांचा निरोप घेऊन व वशिष्ठ मुनींकडून शस्त्रास्त्रे घेऊन आला. नंतर रामाने वनयात्रेस निघण्यापूर्वी दानधर्म केला.

वशिष्ठ मुनींचा मुलगा सुमंत्र व त्याची पत्नी यांना बोलावून सीतेकडून तिची रत्ने व आभूषणे, पलंग, गाद्या-गिर्द्या, यांचे दान करविले, व शत्रेजय नांवाचा आवडता हत्ती व अनेक हत्ती यांचे स्वतः दान केले.

अगस्त्य, कौशिक, वगैरे ब्राह्मणवृंदाला, कौसल्येच्या सेवेस असलेल्या एका वृद्ध पुरोहिताला, दशरथ राजाच्या विश्वासपात्र चित्ररथ नांवाच्या सारथ्याला व ब्रह्मचाऱ्यांना, असंख्य गाई, सोनें, चांदी, मणि, माणिक्यें व वस्त्रें दान केलीं.

अयोध्येपासून जवळ रानांत त्रिपक नांवाचा एक वृद्ध ब्राह्मण रहात असे. त्याचे कुटुंब फार मोठे होते.



आपल्या या कुटुंबाचा भार त्याला कठीण वाटूं लागला होता. कंदमुळे आणि फळे खाऊन तो मोठ्या कष्टाने रहात होता.

राम वनगमनास निघाल्याचे ऐकून तो रामाकडे आला व म्हणाला, ''युवराज! मी गरीब आहे. माझे कुटुंब मोठे आहे. बायकापोरें उपाशीं मरण्याची पाळी आली आहे. तूं दया केलीस तर कदाचित वांचतील!''

रामानें त्याच्या हातांत एक काठी दिली व म्हणाला, ''ही काठी फेंका! ही जितक्या दूर जाऊन पडेल, तितक्या अंतरावर जितक्या गाई मावतील तितक्या मी तुम्हाला देईन.''

म्हाताऱ्या त्रिपकाने काठी फेकली. ती सरयू नदीच्या पैलतीरावर जाऊन पडली. रामानें प्रणाम करून स्मित केले व म्हणाला, ''तुमच्या तपश्चर्येची शक्ती किती आहे, हे पाहण्यासाठी मी ती सूचना केली होती. मी शब्द दिल्याप्रमाणे तितक्या गाई देईनच, व जास्त देखील देईन. आणखी कांही मागावयाचे असेल तर मागून घ्या!''

त्रिपकाने रामाला आशीर्वाद दिला व रामाने दिलेल्या गाई घेऊन तो आपल्या घरी परत गेला. अशा प्रकारे दानधर्म करून राम, सीता व लक्ष्मणा-सह वडिलांचा निरोप घ्यायला निघाला.

त्या तिघांना पायी चालत जात असलेले पाहून लोक गर्दीत व सज्जांत उभे राहून दशरथ व कैकेयी यांची निंदा करूं लागले.

ते म्हणत होते, ''तो पहा राम, बायकोबरोबर व धाकट्या भावाबरोबर पायी चालला आहे. या दशरथ राजाच्या मानेवर भूत बसले आहे कीं काय म्हणावे, ते कळत नाहीं. राजा किती दुष्ट व अत्याचारी झाला तरी निरपराध प्रजेला इतकी कडक शिक्षा देणार नाहीं; पण ह्याने तर स्वतःच्या मुलालाच वनवास दिला आहे! चला, आपण सुद्धां जाऊं रानांत! असल्या राजाच्या राज्यांत कशाला राहायचे?''

प्रजेचे हे शब्द रामलक्ष्मणांच्या कानांवर पडत होते. परंतु रामाने तिकडे लक्ष दिले नाही. त्याने सुमंत्राकरवी निरोप घ्यायला आलो आहे असे कळविल्यावर दशरथाने रामाला आंत बोलावून घेऊन यायला सांगितले.

राम, लक्ष्मण व सीतेसह आल्यावर राजा दशरथ व अंतःपुरांतील स्त्रिया सर्व उठून उभे राहाले. दशरथ रामाला भेटायला म्हणून पुढे गेला. पण दुःखावेगाने भोवळ येऊन खाली पडला. रामाने त्याला हात देऊन पलंगावर बसविले.



दशरथ राजाला शुद्ध आल्यावर राम म्हणाला, ''महाराज, मी वनांत जात आहे, आपला आशीर्वाद घ्यायला आलो आहे. मी पुष्कळ समजावून सांगितले, पण सीता व लक्ष्मण दोघांनी हट्ट धरला आहे कीं मी त्यांना बरोबर न्यावे. त्यांनासुद्धा परवानगी द्यावी.''

दशरथ रामाला म्हणाला, ''बाळा! मी कैकेयीला वर देण्याचे वचन देऊन फसलो. पण तूं माझी आज्ञाभंग करून राज्याभिषेक करून घ्यावास.''

''महाराज! दिलेले वचन मोडल्याचे व असत्याचरणाचे पण करणे बरोबर होणार नाही. रानांत जायला मी तयार आहे. चौदा वर्षे रानांत राहून तुमची सेवा करण्यास मी पुन्हां परत येईन.'' राम म्हणाला.

''पण आजच गेले पाहिजे असे कोठे आहे? आजचा दिवस रहा. उद्यां सकाळी जायचे तर जा!'' दशरथ म्हणाला.

''बाबा! तुमच्या आशीर्वादाने मला काय नाही मिळाले? व पुढे तरी काय मिळणार नाही? आशीर्वाद द्या. रानांत आम्हाला कष्ट वगैरे कांही होणार नाहीं. उलट दऱ्याखोऱ्यांत निसर्गाचे सौंदर्य पहात आम्ही आनंदाने हिंडू फिरूं!'' राम म्हणाला.

राम वनांत जाणार व दशरथ पुत्रविरहाने मरणार, हे ओळखून सुमंत्राला अत्यंत राग आला. दांत ओठ चावून रागाने तो कैकेयीला म्हणाला, ''दुष्टे! तुला प्राणापेक्षां जास्त मानत येणाऱ्या आपल्या पतीला दुःखी करून, स्वतः त्याला मृत्युमुखांत ढकलीत आहेस. तुला लाज वाटत



नाही कां? या कुळाचा नाश करून तुला काय सुख मिळणार आहे. हे तरी कळूं दे. राम सर्वांत मोठा आहे. तो युवराज आहे. तो राजा झाला तर तुझ्या पोटांत कां दुखावे? भरत गादीवर बसला तर, तुला काय वाटते कोणी या अयोध्येत राहील? अयोध्या ओसाड होऊन जाईल. शेवटी तूं आपल्या आईचें नांव राखलेस म्हणावयाचे. जशी आई तशी मुलगी! तुझे वडील अश्वपति यांना एका मुनींकडून एक मंत्रशक्ति प्राप्त झाली होती. त्या शक्तीमुळे त्यांना पशुपक्ष्यांची भाषा कळूं लागली.

एकदां अश्वपति पलंगावर झोंपला असतां जृंभ नांवाची मुंगी कांहीतरी बोलली व ते ऐकून अश्वपति हंसला. तुझ्या आईने हंसण्याचे कारण विचारले.

पण तुझे वडील म्हणाले - ''मी कारण सांगून



टाकले तर मला मरण येईल.'' तेव्हां तुझी आई हट्ट करून म्हणाली, ''मला ते कांही माहीत नाहीं. तुम्ही मला पाहून हंसला नाही कशावरून? म्हणून मला कारण सांगितलेच पाहिजे. तेव्हां ज्या मुनींनीं ती मंत्रशक्ति दिली होती. त्या मुनींकडे जाऊन तुझ्या वडिलांनीं विचारले. मुनी म्हणाले, ''तुझ्या बायकोने प्राण दिला तरी तूं हंसण्याचे कारण सांगू नकोस. तेव्हां तुझ्या वडिलांनी तुझ्या आईलाच निघून जायला सांगितले. पुढे त्याला कधी त्रास झाला नाही. तुझे हे काम तरी तसेच आहे. राम वडिलांना सोडून बनांत गेला तर राज्यावर केवढे मोठे संकट येईल, सांगता येईल कां? म्हणून तू हा हट्ट सोडून दे व रामाचा राज्याभिषेक करायला कबूल हो!''

परंतु ते ऐकून कैकेयीला लाज तर नाहीच वाटली, उलट तिला राग आला व ती तोंडाला आले ते बोलली. म्हणून तिचा नाद सोडून सुमंत्र दशरथाकडे वळला. दशरथ म्हणाला - ''बाबा रे! एकदां माणसाची बुद्धी फिरली कीं त्याबरोबर त्याची माणुसकीपण जाते. लाजलज्जा, दया, संकोच, प्रेम हे मानवोचित गुण नाहीसे होतात. तू रामाबरोबर माझी चतुरंग सेना, दासदासी, सर्वांना पाठव. रामाला राज्याभिषेक न झाल्याची जाणीव होतां कामा नये.''

सुमंत्राच्या बोलण्याकडे कैकेयीने दुर्लक्ष केले होते व तिला त्यांचा राग पण आला होता. त्यानंतर राजाचे तें बोलणे ऐकून ती म्हणाली - ''मी सांगून ठेवते, मला हे सर्व नाटक आवडत नाही. हे सर्व रानांत पाठवून तुम्ही सुद्धां रानांत जाल. मला ते खपणार नाही. भरताला असल्या राज्याची गरज नाही. तो गादीवर बसणार नाही. मी सांगून ठेवते!''

राजा म्हणाला - ''दुष्टे! तूं वर मागितलेस ते मी दिले. राम बनांत जायला तयार झाला. तूं भरताचा राज्याभिषेक कर आणि रहा सुखाने! मी रानांत जायचे नाही हा वर कां नाही मागून घेतलास? एकदां माझा गळा दाबून जीव घे! म्हणजे तुझ्या मनासारखे होईल.''

कैकेयी त्याहून जास्त रागाने म्हणाली - ''बनांत जायचा अर्थ आहे, सर्व सोडून जाणे. जर चतुरंग सेना रामाबरोबर जाणार असेल व तुम्ही पण जाणार असाल तर? भरताला राज्य देण्याचे नुसतें सोंग कशाला? तुमचे पूर्वज सगर महाराज यांनीं आपला मुलगा असभेज याला रानांत पाठविले तेव्हां बरोबर सैन्य पण पाठविले होते वाटते?''

तें ऐकून सिद्धार्थ नांवाचा मंत्री म्हणाला - ''त्या असभेजाची गोष्ट येथे कशाला सांगतां? तो दुष्ट होता. तो मुलांना उचलून नेत असे व सरयू नदीत फेंकून देत असे. मुलें बुडूं लागलीं कीं त्या राक्षसी आनंदांत तो हंसत असे. म्हणून प्रजेने सगर राजाकडे तक्रार केली. प्रजेने सांगितले की तुम्ही असभेज याला तरी राज्याबाहेर काढा, नाहीतर आम्हांला राज्य सोडून जायला परवानगी द्या. म्हणून सगर राजाने आपल्या दुष्ट व प्रजाद्रोही मुलाला त्याच्या बायकोबरोबर सर्व नोकरां-चाकरांसह राज्याबाहेर काढवले. तो प्रजाद्रोही होता आणि राम प्रजाप्रिय आहे!''

परंतु ते सर्व पालथ्या घागरीवर पाणी पडल्या-सारखे होते. दशरथ म्हणाला, ''तुझे हिताहित कळण्याची शक्ति तुझ्यांत उरली नाहीं. तूं काय वाटेल ते कर, मी रामाबरोबर वनांत जातो.''

राम दूर उभा राहून सर्व ऐकत होता. तो म्हणाला, ''बाबा! मी स्वतः सर्व सोडून जायला तयार असताना ही सेना कशाला माझ्याबरोबर? आम्हाला वल्कलवस्त्रें द्या. त्यांवर रानांत आमचे काम भागेल.''

कैकेयीला लाजलज्जा उरलीच नव्हती. ती म्हणाली, ''ही पहा वल्कल वस्त्रें!'' आणि एका तबकांत ती घालून आणून दिली. राम लक्ष्मणांनी वल्कलवस्त्रें परिधान केली.

सीतेनें पण वल्कलवस्त्रें उचललीं. पण ती कशी नेसायची हे तिला कळले नाहीं. फक्त खांद्यावर ठेवून ती उभी राहिली. तेव्हां रामानें हंसत जवळ जाऊन तिच्या रेशमी साडीवरच ती गुंडाळून घ्यायला सांगितले.



तें पाहून कौसल्या व सुमित्रा पुढें येऊन म्हणाल्या, ''रामा! वडिलांच्या आज्ञेने तूं रानांत निघालास हे कबूल! पण सीतेला बरोबर जायची काय गरज? तिला वनवास झेपायचा नाहीं. तिला आमच्याजवळ ठेवून जा. तिच्याकडे पाहून तरी आम्ही चार दिवस जगूं!''

इतका वेळ वशिष्ठ मुनि कांहीच बोलले नव्हते. ते पुढे येऊन म्हणाले - ''तूं आपल्या हातांनी सीतेला वल्कल वस्त्रें देतेस? तुला जनाची नाहीं तर मनाची तरी कांही लाज आहे की नाही? सीतेला रानांत पाठविण्यास तुझा दुजोरा? तिला रानांत कां पाठवतेस?''

''रामाचा राज्याभिषेक करण्याची जी तयारी झाली आहे, ती तयारी सीतेचा राज्याभिषेक करायला पुरी आहे, हे तुला कळले नाहीं वाटते? सीतेला या वल्कल वस्त्रांची जरूर नाहीं. एवढेच

नव्हे तर तिच्याबरोबर वाहने, वस्त्रे आभूषण, दासदासी, तिला जे हवे ते वनांत पाठवतां येईल.

''आणखी तुला वाटत असेल कीं तूं राज्य मिळवून दिलेस म्हणून भरत तुझे गोडवे गाईल व आभार मानील. पण त्याचा स्वभाव मी ओळखतो. त्याला हे बिलकुल पसंत पडणार नाहीं. एकाच बापाची ही मुलें परस्परांविरुद्ध कधी उलटणार नाहीत.'' वसिष्ठ मुनि एवढे बोलून गप्प झाले.

दशरथाने पाहिले की, राजवाड्यासमोर प्रजेची गर्दी जमा झाली आहे. त्यांनी सीतेला जवळ बोलावून म्हटले, ''बाळे! तूं का रानांत जाणार? या वयांत मुनिपत्नींसारखीं वल्कल वस्त्रे धारण करून तुला कसे राहवेल मुली?'' नंतर तो कैकेयीला म्हणाला - ''नाहीं नाहीं! सीता वल्कल वस्त्रें धारण करणार नाहीं.''

राम वडिलांना म्हणाला, ''बाबा, आतां मी येतो!'' आणि पायां पडून निघाला. दशरथाने सुमंत्राला जवळ बोलावले आणि म्हणाला, ''मित्रा! या सर्वांना रथांत बसवून गांवाबाहेर रानांत पोंचवून ये.'' आणि कोशाधिकाऱ्याला बोलावून म्हणाला, ''सीतेला चौदा वर्षे पुरतील इतक्या साड्या व दागिने बरोबर दे!''

कौसल्या व सुमित्रा यांनीं सीतेला सर्व दागिने घातले व म्हणाल्या - ''बाळ! तुझा पति आज गरीब झाला आहे. त्याची काळजी घे.'' रामाने आपल्या वडिलांना व आईला नमस्कार केला. राम आईला म्हणाला - ''आई! तूं माझी किंवा सीतेची अगदी काळजी करूं नकोस. चौदा वर्षे संपतांच मी परत येईन. तूं बाबांची मात्र काळजी घे. चौदा वर्षांचा काळ म्हणजे मोठा नाही. तो सुखांत जाईल.''

लक्ष्मणाने पण आपल्या आईला, कौसल्येला व वडिलांना नमस्कार केला. सुमित्रा त्याला म्हणाली - ''बाळ! रामच आतां तुझा पिता व सीताच तुझी माता. त्यांची सेवा हाच तुझा यापुढचा धर्म आहे! अरण्यच अयोध्या आहे.''

तिघे बाहेर आले. सीतेला रामाबरोबर वनवासास जायला मिळाल्याचा इतका आनंद झाला कीं ती सर्वांच्या आधी रथांत जाऊन बसली. नंतर राम लक्ष्मण रथांत बसल्यावर सुमंत्राने सीतेसाठी राजाने दिलेलीं वस्त्राभूषणें आणि रामाने सांगितलेली शस्त्रास्त्रें वगैरे ठेवली व रथ हांकला.







# जादूचा देव

कोणे एके काळी विदर्भात महेन्द्र नावाचा एक प्रसिद्ध जादूगार होऊन गेला. त्याच्या कलेवर प्रसन्न होऊन मोठमोठ्या राजा-महाराजांनी त्याला अनेक किताब व भरपूर द्रव्य दिलं होतं. परंतु तो खूप दानशूर असल्याने त्या मिळकतीतील बराचसा भाग खर्च होऊन गेला होता.

महेन्द्रचा मुलगा जितेन्द्र जादुगारीमधे त्याच्यापेक्षा तरबेज होता. परंतु त्याच्या वेळे-पर्यंत जादूच्या कलेचं महत्व खूप कमी झालं होतं. त्यामुळे त्याची मिळकतही महेन्द्रपेक्षा कमी होती. पण वडिलांचा दानशूरपणा त्याच्यातही पुरेपूर उतरला होता. त्यामुळे कमी मिळकतीतही दानधर्म करून तो निर्धन बनला.

जितेन्द्रला दोन मुलगे होते. जादूगारी हा पिढीजात व्यवसाय असल्याने व पुन्हा जादूला चांगले दिवस येतीलही, असे वाटून जितेन्द्रने आपल्या दोन्ही मुलांनाही ती कला शिकवली.

लहानपणी वडिलांकडून न मागता पैसे मिळत असल्याने जितेन्द्रचा मोठा मुलगा रामभद्रला पैशांच्या उधळपट्टीची संवय लागली होती. आता मात्र परिस्थिती बदलल्यामुळे त्याने मागूनही वडिलांकडून पैसे मिळत नसत, मग तो चोरी करू लागला. ही गोष्ट कळल्यावर जितेन्द्रने रागाच्या भरात रामभद्रला खूप मारले. त्यामुळे रागाने रामभद्र घरांतून निघून गेला.

रागाच्या भरात रामभद्रला मारले असले तरी जितेन्द्रचे त्याच्यावर खूप प्रेम होते. त्यामुळे तो घरांतून पळून गेल्यावर त्याच्या काळजीतच जितेन्द्र व त्याच्या बायकोचा अंत झाला. आता जितेन्द्रचा धाकटा मुलगा लक्ष्मीचंद एकटाच राहिला.

लक्ष्मीचंद मनान खंबीर होता, चिकाटीचा होता. तो गांवोगावी, गल्लोगल्ली फिरून आपली जादू दाखवून थोडेफार कमावू लागला आणि अल्पसंतुष्ट राहून समाधानाने जगू लागला.

एके दिवशी एका गल्लीत छोट्या मुलांसमोर

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



लक्ष्मीचंद आपली जादू दाखवत होता. त्याला कल्पना होती की या छोट्या मुलांकडून त्याला फारसे पैसे मिळणार नाहीत. तरीही आपल्या जादूने तो मुलांना आनंद देत होता.

इतक्यांत त्याला शेजारच्या घरांतून एका मुलाचा अगदी किंचाळून रडण्याचा आवाज ऐकू आला. लक्ष्मीचंदने लगेच आपली जादू थांबवून त्या घरी धाव घेतली. पाहतो तो एक बाई आपल्या चार वर्षांच्या मुलाला खूप मारत होती.

लक्ष्मीचंदने तिला मुलाला इतके मारण्याचे कारण विचारल्यावर तिने सांगितले, त्या मुलाचे वडील कांही दिवसांपूर्वी बरेच आजारी होते. त्यावेळी ती देवाला नवस बोलली होती की ते लवकर बरे झाले तर घरातील सगळीजण एक आठवडा दुपारपर्यंत उपवास करून देवदर्शन घेतल्यावरच जेवण करतील. परमेश्वरकृपेने आजार लवकर बरा झाला. नवसाचे सहा दिवस झालेत. आज मात्र दुपारपर्यंत न जेवता रहाणे त्या छोट्या मुलाला सहन होईना. भुकेने कळवळून तो रडत होता. त्याच्या आईला तर देवदर्शनासाठी जायचे होते. कितीही समजावले तरी तो मुलगा ऐकेना, म्हणून ती त्याला मारत होती.

लक्ष्मीचंदला वाटले, मुलाला उपाशी ठेवायचे, मारायचे हा तर अन्याय आहे. तो म्हणाला, ''बाई! असं म्हणतात की लहान मुले ही देवा-समानच असतात. मला कळत नाही, की या छोट्या मुलामधे आपल्याला देव दिसत नसेल, तर कोणत्या देवाला भेटायला आपण जाणार आहात?''

यावर त्राग्याने ती स्त्री लक्ष्मीचंदला म्हणाली, ''म्हणूनच तू असले जीवन जगत आहेस. जर तुला खरोखरीच मुलांत देव दिसत असेल तर सांभाळ ह्याला. मी देवदर्शन करून आल्यावर त्याच्याबरोबर तुलाही जेवायला वाढते.''

लक्ष्मीचंदने गोड बोलून, जादू दाखवून त्या मुलाला गुंगवून ठेवलं. त्या स्त्रीने परत आल्यावर लक्ष्मीचंदचे कौतुक करून त्यालाही जेवायला वाढले.

जेवणानंतर लक्ष्मीचंदने त्या स्त्रीला विचारले, ''बाई, स्वतःच्या मुलापेक्षाही प्रिय असणारा आपला देव कुठं आहे? त्याला बघायची माझी खूप इच्छा आहे.''

ती स्त्री हंसून म्हणाली, ''देवाचा अर्थ तुला



देवळांतली मूर्ती वाटली होय? हा तर खराखुरा देव आहे! प्रत्यक्ष आपल्याशी बोलतो, आपल्या प्रश्नांची उत्तरं देतो. आपल्यावर प्रेमाचा वर्षाव करून आपल्या सगळ्या चिंता दूर करतो.''

आता लक्ष्मीचंदची उत्सुकता खूपच वाढली. त्या गृहिणीने असा चालता-बोलता, शरीररूपांतील देव ज्याठिकाणी असल्याचे सांगितले, तिकडे तो त्वरेने गेला. तिथे खूपच गर्दी होती. पण सगळे शांत बसले होते. समोर एका आसनावर दाढी-मिशीवाला साधू बसला होता. तो लोकांना सन्मार्गाचा अवलंब करण्याचा उपदेश देत होता. जे लोक संकटात होते, दुःखी होते त्यांना आपल्याजवळ बोलावून समजावत होता की, लोकांचे दुःख दूर करण्यासाठीच त्याने हा अवतार घेतला आहे. मधूनच तो साधू हवेतून भस्म काढून लोकांवर फुंकत होता. थोड्याथोड्या वेळाने सारखा हवेत कांही क्षण अधांतरी राहात होता. तेव्हां सर्व भक्तमंडळी जोरात म्हणत होती, ''हे परमात्मा, आमचा उद्धार कर.''

लक्ष्मीचंदला हा सगळा प्रकार खूप विचित्र वाटला. साधूने जे प्रकार करून दाखवले, ती विद्या त्यालाही अवगत होती. तरी तो एक साधा जादूगारच राहिला आणि हा साधू मात्र लोकांसाठी देव बनला होता. या रहस्याचा उलगडा करण्या-साठी तो मध्यरात्री एकटाच साधूकडे गेला.

त्याला पाहून साधूने विचारले, ''तू कोण आहेस?'' लक्ष्मीचंद म्हणाला, ''मी एक जादूगार आहे. मी आपली जादू बघितली आहे. लोकांना



तो दैवी चमत्कार वाटतो आहे. पण त्याच गोष्टी मी जादूच्या प्रयोगांत करूनही मला पोटभर अन्नाची ददात आहे. लोक तुम्हाला देव मानतात. त्याचं रहस्य शोधण्यासाठीच मी आलो आहे.''

त्यावर साधू म्हणाला, ''मी परमेश्वराचा अवतार आहे, यांत कोणतेही रहस्य नाही! तुला प्रयत्नांनी जी विद्या प्राप्त करावी लागली ती मला सहज अवगत आहे. माझ्याकडे दैवी शक्ती आहे. तुला प्रयोगांसाठी उपकरणांची आवश्यकता आहे. मला मात्र त्याची जरूर नाही.''

यावर लक्ष्मीचंदने विचारलं, ''असं आहे तर! मग मी माझे एक बोट कापतो. आपण ते परत जोडू शकाल?''

साधू म्हणाला, ''हो तर, नक्कीच जोडूं शकीन.'' पटकन लक्ष्मीचंदनं आपले एक बोट

चाकूने कापले. त्यावर साधूने ते तुटलेले बोट मूळच्या जागेवर ठेवून कांहीतरी मंत्र म्हटला. लगेच रक्त वाहायचं थांबलं आणि बोट पूर्ववत झालं.

लक्ष्मीचंद आश्चर्याने म्हणाला, "हे अगदी अशक्य आहे. कारण माझ्या कुटुंबियांशिवाय ही विद्या कोणालाच येत नाही."

साधूने चमकून विचारलं, "तुझं नाव लक्ष्मीचंद आहे ना?"

"हो, पण आपल्याला कसे कळले?"

"मी तुझा मोठा भाऊ रामभद्र आहे!" असं म्हणून साधूने लक्ष्मीचंदकडे प्रेमळपणे पाहिले. लक्ष्मीचंद एकदम आश्चर्यचकित झाला.

साधू लक्ष्मीचंदला म्हणाला, "आता मी तुझ्या प्रश्नांचे खरे उत्तर देतो. तू एका छोट्या मुलाला आपली जादू दाखवून त्याला भूक विसरायला लावलीस. तो छोटा मुलगा तुला देवासमान मानेल. पण मोठ्यांचं असं नसतं. मी स्वतः दैवी अवतार असल्याचं सांगून जादू केली. मग लोकांनी मला देव बनवलं. तू स्वतः जादूगार असल्याचं सांगून जादू दाखवतोस, म्हणून जादूगारच राहिलास. लोक आपल्या दोघांचीही जादू बघतात, पण त्यांना अजिबात शंकासुद्धा येत नाही. या जगांत आरामांत जगायचं असेल तर केवळ विद्या अवगत असून चालत नाही. लोकांना भूलथापा देणे, गोड गोड बोलून भुलवणे हे जमले तरच आपली कला लोकप्रिय होते. मी दैवी अवतार असल्याचे खोटे सांगणे, हे माझे उपजीविकेचे साधन असल्यासारखे आहे. जोपर्यंत लोक मूर्खपणे माझ्या बोलण्याला भुलतील, तोपर्यंत मला कशाचीच कमतरता भासणार नाही. आता तुझे शंकानिरसन झाले ना? ये तर मग."

लक्ष्मीचंद तिथून निघाला. त्यानंतर त्याचा ठावठिकाणा कोणालाही कळला नाही. पण वणव्याच्या वेगाने एक बातमी सर्वत्र पसरली की विदर्भ देशात पूर्वेला एका छोट्या गांवात देवाने अवतार घेतला आहे. तो अनेक दैवी चमत्कार दाखवतो. लोक मोठ्या प्रमाणात, समूहाने तो दैवी अवतार पहायला, दर्शनाला जात आहेत.





# अजिंक्य गरुड




रविंद्रदेव वज्रपुरीच्या प्रधानमंत्र्याला भेटतो.

तो इथे राजाचा दूत बनून आला आहे.

विक्रमसिंहाला तुझ्या पित्याचा संदेश मिळाला आहे. राज्याभिषेकासाठी चंद्रपुरीला आण्यापूर्वी त्यांनी मला इथे पाठवले आहे.

आपण आलात, आनंद वाटला. त्यापेक्षांही माझ्या वडिलांच्या सन्मानाची चाव आहे, पण...




पुत्रा, तुला असं वाटलं तरी मला खात्री आहे कीं परिस्थिती लौकरच पालटेल.

चंद्रपुरीत काय झालं ते आम्हाला ठाऊक नाही. आमचे महाराज आपल्याला ह्यांत निश्चित मदत करतील.



## वाचकांची पत्रे

***कच्छहून तन्वी डी. गोर लिहितात,***

गेली कित्येक वर्षे 'चंदामामा' आमच्याकडे येतो आहे. त्यांतल्या गोष्टी वाचून विचारशक्तीला चालना मिळते. आमच्या कलागुणांचा विकास होतो. त्यांतली रंगीत चित्रेही आवडतात. चंदामामा आमचे आवडते मासिक आहे.

***मेरठहून श्री. करणचंद लिहितात,***

साठीचा चंदामामा जीवनरंगामुळे शोभायमान झालेला आहे. भारतीय संस्कृतीचे वैभव सोप्या भाषेत हे मासिक आम्हाला देते. पौराणिक, ऐतिहासिक काळांत आम्हाला घेऊन जाते, व आश्चर्यचकित करुन सोडते.

वाचणारे आबालवृद्ध आनंदसागरांत डुबकी घेतात; याचा प्रकाश भावी काळांत आणखी दूरवर पसरो. यांतल्या गोष्टी वाचल्याशिवाय राहावत नाही. महिन्याच्या सुरवातीला इतर मासिके आली तरी प्रथम धाड पडते चंदामामावरच, आणि वाचल्यावर समाधान होते. केवळ मुलांसाठी एक खास अंक काढावा, ही उत्कट इच्छा आहे.

***श्री. राहुल, हुबळीहून लिहितात***

खरोखरीच चंदामामा हे सर्वांत जुने व श्रेष्ठ मासिक आहे. मुले व प्रौढ मंडळी सारख्याच आवडीने वाचतात. लहान मुलांमधे वाचनाची गोडी वाढते आणि ज्ञानांत भर पडते. चंदामामाची वाटचाल अशीच शानदार व सदाबहार राहो. त्याच्यामुळे जगांत बंधुभाव व देशाभिमान जागृत राहण्यास निश्चित मदत होते आहे.

***रामहरी उ. धोळवे, लोणावळ्याहून लिहितात***

ऑगस्टच्या चंदामामात पंतप्रधानांचा संदेश वाचून माझी मुले रजनी व रोहित, फार प्रभावित झाली. त्यांना डॉ. मनमोहन सिंगांना सांगावेसे वाटले कीं कोणत्याही राष्ट्रीय व परदेशी हल्ल्याला तोंड देताना ही मुले त्यांच्या बरोबर आहेत. चंदामामासारखे मासिक मुलांच्या मनांत राष्ट्रीय भावना व जनकल्याणांची वृत्ती रुजवत आहेत हे अभिमानास्पद आहे.



## प्रसादची देवभक्ती

लहानपणापासून प्रसादमध्ये पुरुषी अहंकाराचे प्रमाण जरा जास्तच होते.

प्रसाद रोज देवळांत जात असे. मोठ्या माणसांकडून चौकसपणाने विचारुन देवा-धर्माच्या गोष्टी ऐकत असे. आपल्या समवयस्क मुलांबरोबर तो विशेष बोलतही नसे. देवाधर्मांच्या कामाचीच त्याला खास आवड होती. गांवामध्ये जी कथा पुराणे चालत, ती तो मन लावून ऐकत असे सवड सांपडताच गीतेची पारायणे करी. पण ह्या सगळ्यांबरोबरच तो विद्याभ्यास लक्ष देऊन करीत असे. वयाच्या अठराव्या वर्षापर्यंतच त्याने सर्व विद्याभ्यास पूर्ण केला होता.

प्रसादच्या परमेश्वरभक्तीची प्रशंसा त्याच्या लहानपणापासूनच सर्वजण करीत असत. परंतु त्याची देवभक्ति हट्टीपणांत बदलत गेली. त्यामुळे मोठी माणसेही त्याच्यापासून जरा दूर राहू लागली. भल्या सकाळी उठून तो पूजेअर्चेत गढून जाई. नंतर घरांतील लोकांसाठी विविध पकान्ने बनवून त्यांना ती खाण्याची तो जबरदस्ती करत असे.

त्याचे आजी आजोबा म्हातारे झाले. आई वडिलांच्याने काम होईनासे झाले. त्याचा मोठा भाऊ सूरज, त्याच्यापेक्षा दोन वर्षांनी मोठा होता. तो एकटाच घरादाराची व शेतीवाडीची कामे संभाळी. प्रसादला एखादे काम करायला सांगितले की तो लगेच चिडत असे. त्याचे सर्व लक्ष देवपूजेतच काय ते एकवटलेले होते. प्रसादचे वडील एक दिवस ह्याचविषयी इतर लोकांशी बोलत होते. तेव्हां सूरज आपल्या भावाचेच समर्थन करीत म्हणाला, "हे पहा, त्याच्यात अहंभाव, हटवादीपणा, जरा जास्त आहे इतकंच. त्यावर कोणाची टीका त्याला सहन होत नाही. त्याचे सर्व काम मी करत जाईन. त्याबाबत तुम्हाला चिंता करण्याचे कांही कारण नाही."

कालांतराने छाया नांवाच्या मुलीशी सूरजचे लग्न झाले. सासरी आल्यावर सुरवातीला कांही काळ ती प्रसादबरोबर चांगलेपणाने वागली. परंतु जेव्हां तिच्या लक्षांत आले की प्रसाद घरांतील कोणतीच जबाबदारी उचलण्यास तयार नाही,



तेव्हां ती छोटीमोठी कामे त्याच्यावर सोपवूं लागली. प्रसादने कामाला नकार देताच ती त्याच्याबरोबर भांडू लागे. प्रसादने छायाबाबत आपल्या मोठ्या भावाकडे तक्रार केली.

तेव्हां सूरज त्याला समजावणीच्या स्वरांत म्हणाला, ''अरे, छाया दिवसभर घरच्या कामात गढलेली असते. तिचं बोलणं कांही मनावर होऊं नकोस. तू आपलं स्वतःच खाणंपिणं आणि देवाधर्माचं बघत जा.''

प्रसादला वाटले की मोठ्या भावाने आपल्या तक्रारीची विशेष दखल घेतली नाही. तेव्हा त्याने तीच गोष्ट पुन्हां घरांतल्या वडील मंडळींसमोर मांडताच त्यांनी म्हटले, ''अरे भाऊ अन् वहिनी आपल्या कामांत व्यग्र असतात. वाईट वाटून घेऊ नकोस.''

मग प्रसादने सरळ सांगितले, ''तुम्ही वहिनीला स्पष्ट सांगा की ह्यापुढे तिने माझ्या कामांत कांहीही हस्तक्षेप करू नये.''

छायाला हे समजले, तेव्हां तिने प्रसादला म्हटले, ''हे बघ, अंगात जोर होता तोवर तुझ्या आजोबांनी अन् वडलांनी भरपूर कष्ट केलेले आहेत. घाम गाळून कमावलेल्या, आपल्याकडे सोपवलेल्या ह्या मालमत्तेचं रक्षण करणं, ती वाढवणं, हे खरं तर तुझं काम आहे. तुझा मोठा भाऊ सुद्धां खूप मेहनत करून ती संपत्ती जपायचा प्रयत्न करतो. हाच तर खरा पुरुषार्थ. कांहीच काम न करता निरुद्योगीपणे बसण्याला कांही पुरुषार्थ म्हणत नाहीत.''

''पण मी कुठे निरुद्योगी बसतो? सतत भक्त प्रल्हादाप्रमाणे, ईश्वरभक्तित मग्न तर असतो. हिरण्यकश्यिपूसारखे मला उगीच त्रास देऊं नका. देव तुम्हाला शिक्षा करेल.'' असे म्हणून त्याने वहिनीस सावधगिरीचा इशारा दिला.

''मी सुद्धा आपला पति, सासू सासरे, त्यांचे आई वडील, सर्वांची सेवा करत असते. तू तर कसल्याच कामाचा नाहीस, तरी तुला शिजवून खाऊं पिऊं घालते. परमेश्वर माझीच स्तुती करेल अन् कांही झालं तरी मला शिक्षा देणार नाही. जर तू खरोखरीचा प्रल्हादाच्या तोडीचा भक्त असशील, तर देवाकडे प्रार्थना कर. की त्याने मला शिक्षा द्यावीच. जर तू असे करुं शकला नाहीस, तर मात्र आपल्या भावाबरोबर, घरा-दाराची जबाबदारी संभाळायला लागेल.'' वहिनीने त्याला आव्हानच दिलं. प्रसादने ते स्वीकारलं.

नंतर रोजच तो जेव्हां जेव्हां मंदिरात जाई,





त्यावेळी वहिनीला शिक्षा देण्यासाठी, तो देवास आळवू लागला. ह्याबाबत जेव्हां त्याच्या आजीस समजले, तेव्हा त्याला फटकारत तिने म्हटले, ''अरे, वहिनी ही आईसमान असते. तिला शिक्षा देण्याविषयी देवाची प्रार्थना करणे, म्हणजे तुझा निव्वळ मूर्खपणा आहे.''

''वहिनी नेहमी माझ्या देवाधर्माच्या कार्यात अडथळे आणते. ती महापापी आहे. ज्याने आपल्या पापी पित्यास घोर शिक्षा देऊन अद्दल घडवली, तो भक्त प्रल्हाद माझा आदर्श आहे. जो पर्यंत परमेश्वर तिला शिक्षा देत नाही, तोपर्यंत मी अशीच प्रार्थना करत राहीन'' हटवादीपणे प्रसादने म्हटले.

आजी, आजोबा, त्याचा मोठा भाऊ, सारेच प्रसादच्या ह्या कडवट बोलण्यावर नाराज होऊन म्हणाले, ''वहिनीची क्षमा माग, नाहीतर ह्या क्षणी घर सोडून चालता हो.''

''प्रल्हादला तर त्याचे वडील हा एकमेव शत्रू होता. इथे घरातील सर्वचजण माझे शत्रू आहेत. तुमच्या सांगण्यानुसार ह्या क्षणी मी हे घर सोडून जात आहे. जोवर तुम्ही होऊन मला परत बोलावणार नाही, तोपर्यंत मी ह्या घरी पाऊलही ठेवणार नाही.'' एवढे बोलून तो घरांतून बाहेर पडला व मंदिराच्या मंडपात येऊन बसला.

मंदिराचे पुजारी रामशास्त्री ह्यांना जेव्हां समजले की प्रसाद घरातून रागावून आला आहे, तेव्हा ते त्याला समजावीत बोलले, ''अरे तू तर फार मोठी चूक केलीस. तुला माहित नाही कां की आई वडील देवासमान असतात? त्यांच्यावर रुसणे म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वरावर रुसण्यासारखे आहे. जा, आत्ताच परत जा अन् त्यांची क्षमा माग.''

''मी जर आत्ता असाच परत गेलो, तर सर्वांचा देवावरचा विश्वास उडेल. देवाने आता माझ्या वहिनीला अगदी कडक शिक्षा देऊन माझी देवभक्ति सिद्ध केली पाहिजे. तोपर्यंत मी सतत देवाचे नामस्मरण करत तुळशीचे तीर्थ पिऊन मंदिरातच राहणार आहे'' प्रसादने म्हटले.

रामशास्त्री कांही न बोलता गप्प बसले. प्रसादने तीन दिवस व फक्त तुळशीचे तीर्थ घेतले. त्यामुळे तो अशक्त व कमजोर झाला.

तिसऱ्या दिवशी संध्याकाळी जेव्हां तो परमेश्वर चिंतनात मग्न होता, तेव्हां त्याने स्वप्नांत वैकुंठात बसलेल्या भक्त प्रल्हादास प्रत्यक्ष बघितले. त्याने प्रल्हादास म्हटले, ''पहा माझी दुस्थिती. त्यावेळी आपले पिता हिरण्यकश्यपूच

आपले एकमेव शत्रू होते. पण माझ्या घरी मात्र घरांतील प्रत्येकजण माझ्या परमेश्वरभक्तींत अडथळा आणतो आहे. आपणच माझे आदर्श आहात; तर माझ्या वहिनीला अद्दल घडवण्यासाठी आपण मला मदत केली पाहिजे.''

मंदस्मित करत प्रल्हादाने म्हटले. ''मित्रा, तू काय बोलतो आहेस? माझ्या वडिलांनी माझा द्वेष केला? कधीच नाही. त्यांनी जर द्वेष केला असेल तर स्वतःच्या शत्रूचा, विष्णूचा. मला जो काय त्रास दिला, तो केवळ, मी त्यांच्या शत्रूच्या आश्रयास गेलो म्हणून. मनुष्य जन्म घेतल्यावर प्रत्येकाचीच कांही ना कांही कर्तव्ये असतात, ती त्यास पार पाडावी लागतात. त्याबाबत बेपर्वा राहून मोठ्यांना त्रास देणे, त्यांचा द्वेष करणे योग्य नव्हे. ज्या वहिनीने तुला आपले कर्तव्य पार पाडायला सांगितले, योग्य मार्गदर्शन केले, त्या वहिनीलाच तू शिक्षा द्यायला सांगतोस? धर्म तर असं शिकवत नाही. भक्ति नेहमी प्रेमाची शिकवण देते, द्वेषाची नाही. दुराग्रही भक्ती व मूर्ख वागणूक सर्वांनाच त्रास देते माझ्या बोलण्यावर गंभीरपणे विचार कर. ज्यावेळेस तुझ्यांत परिवर्तन होईल, त्यावेळेस तुझ्या घरचे लोक तुला परत घरी न्यायला येतील.'' गोड स्वरांत प्रल्हादने बोलणे संपवले.

''मी आता समजून चुकलो आहे कर्मकांडी अन् दुराग्रही भक्ति त्रासदायक, ठरते! अहंकारापोटी मोठ्यांचा अनादर करणे, हे पाप आहे. आपण माझे चांगलेच डोळे उघडलेत. मी आपला ऋणी आहे.'' प्रसाद हात जोडत बोलला.

''प्रसाद, तुला शोधत कोणीतरी आले आहे, ते पहा'' पुजाऱ्याने चेहऱ्यावर पाणी शिंपडत म्हटले.

प्रसाद खडबडून उठून बसला. त्याला समजेना की हे स्वप्न आहे की सत्य! समोर भाऊ व वहिनी उभे होते. त्यांनी म्हटले, ''अरे, न खाता पिता, असा इथे किती दिवस राहणार? चल घरी चल'' प्रेमभराने सूरजने म्हटले.

''वहिनी, मला क्षमा कर.'' असे, म्हणत प्रसाद वहिनींच्या पायावर कोसळला. ''मी परमेश्वर भक्तिचा खरा अर्थ आपल्या आदर्श भक्त प्रल्हादाकडूनच जाणून घेतला आहे.'' त्यामध्ये झालेला बदल पाहून सर्वचजण अतिशय खूष झाले.







# गाय-वासरूं

राघव आणि नारायण दोघांची घरे आणि शेते एकमेकांना लागूनच होती. त्या दोघांच्या घरांच्या मधे भिंत नव्हती. राघवची बायको कांता आणि नारायणची बायको शांता दोघींचाही देवावर फार विश्वास होता. दोघांकडेही दोन दोन बैल होते. म्हशीही होत्या, पण दोघांपैकी कुणाकडेच गाय तेवढी नव्हती. आपापल्या बायकांची इच्छा पुरी करण्याच्या उद्देशाने दोघेही एकदा बाजाराला गेले आणि एक एक गाय खरेदी करुन आले. त्यामुळे कांता व शांता दोघी खूष झाल्या, कारण आता त्या गोमातेचं पूजन सहज करुं शकणार होत्या. त्या मोठ्या प्रेमाने अन् श्रद्धेने गायींचे लालनपालन करुं लागल्या.

कालांतराने नारायणच्या गायीने पाठोपाठ दोन वासरांना जन्म दिला, तर राघवच्या गायीने मात्र दोन्ही वेळां कालवडीला जन्म दिला. राघवला एक आशा होती की बैल जन्माला आला तर शेतीवाडीच्या कामाला उपयोगी होईल. आता परत तिसऱ्यांदा गायी गाभण होत्या. राघवची मनापासून इच्छा होती की निदान या खेपेस तरी त्याच्या गायीने बैलाला जन्म द्यावा. ह्याच सुमारास नारायणच्या कोणा आप्तेष्टांकडे लग्न असल्याने त्याला परगावी जाणे भाग पडले. जाण्याआधी, गायीच्या देखरेखीची सर्व जबाबदारी राघववर सोपवून तो सर्व कुटुंबियांसमवेत लग्नासाठी निघून गेला.

इकडे राघवच्या, मनांत एक वेगळाच, विचार आला. त्याले वाटले की त्याच रात्री दोन्ही गायी व्यायल्या तर किती बरे होईल. त्यानंतर काय करायचं हे त्याने उत्साहाने बायकोला सांगितले. त्याचं 'बोलणं' ऐकून शांता थक्क झाली. आपल्या नवऱ्याशी थोडे फटकून बोलत तिने विचारले, ''अहो, काय झालंय तरी काय तुम्हाला? त्यांच्या गायीला जर खोंड जन्मला, तर तो आपण घ्यायचा? अन् आपल्या गायीला कालवड झाली तर त्यांच्या गायीजवळ ठेवायची? हा तर सरळ अन्याय आहे. जनावरें आपल्या पिलांची देखरेख अन् सांभाळ, माणसांपेक्षांही जास्त सावधतेने

.राम गोपाल

करतात बरं! तुम्ही कुत्र्यामांजरांचे वा माकडांचे वागणे बघितले असेलच. किती प्रेमानी ती आपल्या पिल्लांचा सांभाळ करतात. तुमच्या इच्छेप्रमाणे जरी आपण गायीच्या पिल्लांची अदलाबदल केली, तरी गाय दावे नि दोर तोडून आपल्या पिल्लाजवळ जाईलच बघा.'' आपल्या नवऱ्याला सावध करत शांता म्हणाली.

राघवने बायकोचे बोलणे कांही विशेष मनावर घेतले नाही. त्याच्या अपेक्षेप्रमाणेच दोन्ही गायींनी पाडा व कालवडीस जन्म दिला. नारायणच्या गायीने बैलास तर राघवच्या स्वतःच्या गायीने कालवडीस जन्म दिला. शांताने नवऱ्यास रोखण्याचा खूप प्रयत्न करूनही राघवने वासरांची अदलाबदल केलीच. नंतर रात्रीं तो झोपायला गेला.

थोड्याच वेळांत गुरांच्या गोठ्यांतून खुडबूड ऐकू आल्याने राघव व शांता तेथे गेले. त्यांनी बघितले की त्यांची गाय तिच्या स्वतःच्या कालवडीला चाटते आहे. तिच्या गळयांत दाव्याची अर्धवट तुटलेली दोरी आहे. तो लगेचच नारायणच्या घराकडे, गोठ्यांत गेला, तर त्याची गाय तिच्या बछड्यास चाटत होती. ते बघताच तो मनोमन समूजन चुकला की पशु सुद्धा आपल्या पिल्लांवर खूप प्रेम करतात. त्याला पश्चाताप झाला. राघवने नारायणाच्या गायीला व तिच्या पिलाला त्यांच्या गोठ्यांत बांधले, तर स्वतःच्या गायीस व तिच्या पिलास आपल्या गोठ्यांत बांधले.

दुसऱ्याच दिवशी नारायण अन् त्याची बायको गांवाहून परत आले. राघवने, रात्री घडलेल्या घटनेबद्दल सर्व कांही नारायणला सांगून, पश्चाताप व्यक्त करत म्हटले, ''माझ्या मनांत अशी दुर्बुद्धी निर्माण झाली, त्याबद्दल मला माफ कर.''

''अरे काय बोलतोस राघव! ह्यात दुर्बुद्धी कसली? तीन तीन बैलांना घेऊन मी तरी काय करणार आहे? त्यांतला एक तू घे ना.'' ''नारायण खरंच तू फार मोठ्या मनाचा आहेस. हो, पण मग माझ्याकडची एक कालवड मात्र तुला घ्यावीच लागेल.'' राघव आग्रहाने ठासून म्हणाला नारायणाने ही ते मान्य केले. बाजूला उभ्या असलेल्या कांता आणि शांता, त्या दोघांचे हे बोलणे लक्षपूर्वक ऐकत होत्या. दोघींनी मोठ्या प्रेमभराने एकमेकींना मिठी मारली.





# भयंकर घाटी

## 13

*(केशव, जयमल्ल व म्हातारा पिता ज्या दिवशी गुहा सोडून बाहेर पडले, त्या दिवशी ब्राम्हदंडी मांत्रिक दोन अंगरक्षकांच्याबरोबर विंध्याचलच्या दिशेने निघाला. केशव वगैरे अंधार पडायच्या वेळेपर्यंत एका गांवात पोंचले. तिथे त्यांना कळले कीं त्याच गांवात ब्राम्हदंडीदेखील येणार आहे. ते तिथून पुढे निघाले. त्यानंतर...)*

केशवच्या म्हाताऱ्या पित्याने मार्ग दाखवला. तो म्हणाला, ''आता आपण एक क्षणभरदेखील या गांवात थांबता कामा नये. ब्राम्हदंडी कदाचित आपल्याला या वेषांत ओळखणार नाही. पण कांही नवीन समस्या नको. त्यालाही या गांवात यायला आजचाच दिवस मिळाला. जाऊं द्या, हरकत नाही. आपण आपला मार्ग बदलूं या, प्रथम आपण लवकरांत लवकर या गावांतून बाहेर पडायला हवं, घाटीमधे तावडतोब पोचायला हवं!'' ते गांव ओलांडून लौकरच जंगलात शिरले. तोपर्यंत चांगलाच अंधार झाला होता. वाट नीट दिसत नव्हती. झाडांच्या फांद्या बाजूला सारीत ते पुढे जाऊं लागले. पक्ष्यांचे आवाज, प्राण्यांचे आवाज, चीत्कार, हे ऐकू येत होते. कांही लहान प्राणी घाबरून पळत जाताना मधूनच दिसत होते. अंधारात मोठेमोठे वृक्ष राक्षसासारखे वाटत होते.










सरळ त्या बाजूलाच जाऊं या. तिथे लपता येईल कां ते पाहूं या. जरी घोडे सोडून द्यावे लागले तरी सोडून देऊं या.''

तिघांचे घोडे त्या उजेडाच्या दिशेने जाऊं लागले. तेव्हां झाडीतून दोन आवाज आले. ''कोण येत आहे? थांबा.''

हे ऐकून म्हातारा घोड्यावरून उतरून म्हणाला, ''आपण कोण आहात हे आम्हाला ठाऊक नाही, आम्ही प्रवासी आहोत. आम्हाला लुटण्यासाठी डाकू आमचा पाठलाग करीत आहेत, म्हणून आम्ही इकडे पळालो. त्यांच्या मशाली, लाठ्या, तुम्ही पाहिल्या असतीलच.''

म्हाताऱ्याचे बोलणे संपले तोच दिवा विझून गेला. एक जाडजूड उंचापुरा माणूस भाला घेऊन तिथे पळतपळत आला. केशव व जयमल्लाला पाहून त्याने विचारलं, ''तुम्ही खालच्या गांवा-कडूनच आला आहात कां? त्या गांवातल्या निम्म्या लोकांचं काम आहे वाटसरूंना लुटणं, आणि करमणूक म्हणून बाकीचे गांवकरी लोकांची डोकी उडवतात. तुम्ही घाबरू नका. तुम्हाला वांचवणं ही माझी जबाबदारी आहे.'' आणि त्याने एका [illegible] त्या मशालवाल्यां[illegible] एक पाऊलदेखील पुढे येणार नाहीत.''

इतका वेळ शांत असलेला तो प्रदेश आता अशांत वाटायला लागला. वन्यवासी तरुण ग्रामवासी तरुणांवर झाडींतून नेम धरून बाण सोडूं लागले. थोड्याच वेळांत तिथे रणभूमी निर्माण झाली. गांवकऱ्यांना अर्धे राज्य मिळवण्याची हांव होती आणि वन्यवासी तरुणांना आपल्या नेत्याचे आज्ञापालन करायचे होते. सारेजण त्वेषाने लढायला लागले. जे गांवकरी बाणांच्या वर्षावातून वांचले, त्यांना लाठीचा प्रसाद मिळूं लागला.

त्या वन्य नेत्याने ते पाहून म्हटले, ''हे लोक दुष्ट आहेत, ते आमचा हल्ला थांबवू शकणार नाहीत. पण रात्रीच्या वेळी, ही जागा चांगली नाही. मी तुम्हाला एक गुप्त प्रदेशांत पाठवतो आहे, चला.'' केशव, जयमल्ल आणि म्हातारा त्याच्या पाठीमागून, घोड्यांचा लगाम पकडून जायला लागले.

*(क्रमशः)*





वेताळ कथा

# खड्ग महिमा

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, झाडावरुन त्याने शव खाली उतरवले आणि ते खांद्यावर घेऊन त्याने स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने विचारलं, ''राजन्, विषारी सर्प, भुतेखेते असलेल्या स्मशानांत तू निर्भयपणे जातो आहेस. मला तर वाटतं की भीतीही तुला घाबरत असावी. कोणत्यातरी महान कार्यासाठी प्राणांचा मोह न ठेवता तू निष्ठेने झटतो आहेस. तुझ्यांत प्रचंड आत्मविश्वास आहे हे उघडच आहेस. तुझे ध्येय साध्य होण्यासाठी, कोणतीही किंमत देण्यासाठी तू तयार आहेस. मला अद्याप हे समजत नाही कीं शेवटी तुला काय हवंय? तुझे हे



कष्ट पाहून मला तर शशिकांत नांवाच्या एका ग्रामीण तरुणाची आठवण येते. त्याने आपल्या ध्येयपूर्तिसाठी कठोर परिश्रम सहन केले होते. तुझा थकवा दूर करण्यासाठी तुला मी त्याचीच गोष्ट सांगतो.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

फार पूर्वीची गोष्ट आहे. कनकवर गांवात शशिकांत नांवाचा एक युवक राहात होता. तो अनेक विद्यांमधे प्रवीण होता. विशेषतः खड्गविद्येमधे त्याची बरोबरी करणारा कुणीची नव्हता. त्याचा पिता एक प्रसिद्ध व्यापारी होता. दुर्दैवाने तो व्यापारी आणि त्याची पत्नी जहाजावरच्या एका दुर्घटनेत मरण पावले. पित्याने जे धन मागे ठेवलं होतं, त्याने इतर व्यापाऱ्यांबरोबर धंद्यात गुंतवले. पण या अननुभवी तरुणाला व्यापारी मित्रांनी फसवले. त्याची सारी धनदौलत त्यांत संपली.

या दुरावस्थेंत शेजारच्या गांवातला जयानंद नांवाचा एक मित्र त्याला भेटायला आला. निराश शशिकांतला धीर देत त्याने म्हटले, ''शशिकांत, खड्गविद्येंत तुझे नैपुण्य अजोड आहे. तू या गांवातच राहिलास, तर या विद्येचा तुला कांहीही उपयोग होणार नाही. तू करिवीरपुरला, आपल्या राजधानीला जा. तिथे लौकरच विजयादशमीच्या सुमारास स्पर्धा होतील. त्यांत भाग घे आणि तुझी शक्ती त्यांना दाखव. त्यांतून तुला राजाकडे नक्कीच नोकरी मिळेल. आणि तुझे भविष्य उजळेल.''

जयानंदाचा सल्ला शशिकांतला योग्य वाटला व पटला. दुसऱ्याच दिवशी तो राजधानीला जायला निघाला. वाटेत तो एका घनदाट अरण्यांतून जात होता, तेव्हां जरा विश्राम करण्यासाठी तो एका झाडाच्या सांवलीत बसला होता. तेवढ्यांत त्याला आवाज ऐकूं आला, ''वाघ, वाघ, वांचवा, वांचवा'' असे कुणीतरी ओरडत होता.

शशिकांतने झटकन म्यानांतून तलवार काढली, आणि तो आवाजाच्या दिशेने पुढे सरसावला. एका मुनीवर एक वाघ झेप घ्यायच्या पवित्र्यांत होता, तेवढ्यांत शशिकांतने मुनी आणि वाघ यांच्यांमधे उडी मारुन तलवारीने वाघावर वार केला. त्या वाराने वाघ घायाळ होऊन खाली पडला, पण नेमकी त्याच वेळेला शशिकांतच्या हातांतून त्याची तलवार निसटली.

तितक्यांत वाघ गुरगुरत उठला. शशिकांतने



मोका साधून वाघाच्या पोटावर जोराने लाथ मारली. वाघ लटपटत उठला आणि पुन्हां शशिकांतकडे येण्यासाठी वळला. शशिकांतने वाघाचे मागचे पाय पकडून त्याला दूर फेकले. जखमी वाघ तडफडत जमिनीवर पडला.

तो मुनी हे सर्व लक्षपूर्वक पहात होता. तो शशिकांतला म्हणाला, ''हे वीरयुवका, तू फारच शूर आहेस. तुझ्यासारखे निस्वार्थी वीर क्वचित असतात. स्वतःच्या प्राणाची पर्वा न करता तू माझे रक्षण केलेस. मी हा प्रदेश सोडून हिमालयांत जाणार आहे.'' आणि त्याने जवळच्या झाडांतून एक तलवार बाहेर काढली, व म्हटले.'' हे अत्यंत शक्तिशाली शस्त्र आहे. पण याचा अर्थ असा नव्हे, कीं कोणतेही साहस करायला तू पुढे व्हावेस. जेव्हां तुझ्यांत धैर्य व साहस असेल, खड्ग चालवण्यांत नैपुण्य असेल, तेव्हांच हे शस्त्र तुला मदत करील.'' असे सांगून मुनीने ती तलवार त्याच्या हातांत दिली.

शशिकांतने मुनीचे पाय धरुन वंदन केले आणि तो आपल्या वाटेला लागला. राजधानीला पोंचेपर्यंत अंधार पडला होता. त्याने एका खाणावळींत मुक्काम करायचे ठरवले. ती खाणावळ एका म्हातारीच्या मालकीची होती. विजया-दशमीचा उत्सव दुसऱ्याच दिवशी सुरुं झाला. राजाच्या एका जवळच्या नातेवाईकाने खड्ग-युद्धांत सर्वांना हरवले. त्याचे नांव होते चक्रधर. त्याच्या शौर्याबद्दल राजाला फारच समाधान वाटत होते, राजा त्याला खड्गवीर ही पदवी देणार होता, पण त्यापूर्वीच शशिकांत तिथे येऊन



म्हणाला, ''महाराज, क्षमा असावी. मला यायला थोडा उशीर झाला'' आणि त्याने म्यानांतून तलवार बाहेर काढली.

त्याला पाहून चक्रधर चिडला आणि बोलूं लागला, ''हा कोण आहे? दिसायला गांवरान वाटतोय. आणि खड्गयुद्धांत माझ्यासारख्या शूराला आव्हान देण्याचे धाडस करतोय? याने जर मला हरवलं तर मी हे राज्य सोडून निघून जाईन.''

असं म्हणून त्याने म्यानांतून शस्त्र बाहेर काढले. तिथे उपस्थित असलेले लोक डोळे फाडून बघायला लागले. राजाच्या जवळ त्याची एकुलती एक मुलगी, मनकर्णिका, बसलेली होती, तिलाही हंसू आले.

दोघांमधे खड्गयुद्ध सुरुं झाले. शशिकांतने अगदी सहजपणे चक्रधरचे वार उलटवले. अर्ध्या



घटकेतच शशिकांतने त्याला हरवले. त्याने श्रद्धापूर्वक आपले अस्त्र डोळ्यांना लावले.

चक्रधरची अशी हार होईल, ही कुणालाच कल्पना नव्हती. प्रेक्षकांसह राजा आणि राजकन्या आश्चर्यचकित झाले. बोलल्याप्रमाणे चक्रधर त्याच वेळी तिथून चालता झाला. चक्रधर हा अजिंक्यवीर मानला जात होता. तो हारल्यामुळे प्रथम सारेजण थक्क झाले, पण लगेच सर्वांनी मोठ्या उत्साहाने टाळ्या वाजवून शशिकांतचे कौतुक केले.

राजाने "खड्गवीर" ही पदवी शशिकांतला दिली आणि संध्याकाळी उद्यानवनांत येऊन राजाची भेट घेण्याचे निमंत्रण दिले.

राजा, राजकन्या, प्रधानमंत्री व दरबारी पंडित जेव्हां राजभवनांत पोंचले तेव्हां राजाने त्या सर्वांना सांगितले, "तो दिसायला चांगला देखणा आणि सुशील वाटतो. धडधाकट आहे. कुठल्यातरी गांवाहून आलाय असं म्हणतो. पण मला वाटतंय कीं तो शिकलेला नसावा."

मंत्र्याने म्हटले, "महाराज, हा तरुण एका खाणावळींत राहातो. आपल्या गुप्तहेरांनी त्याची संपूर्ण माहिती काढली आहे. हा शशिकांत पूर्वी संपन्न परिवारांतला होता, पण परिस्थितीमुळे तो अनाथ झाला. आपले खड्गविद्येतले कौशल्य दाखवून आपल्या कार्यालयांत नोकरी मिळवावी या इच्छेने तो इथे आलेला आहे. इतर कला व विद्यांमधे तो प्रवीण आहे असंही कळलंय."

राजकन्या लक्ष देऊन ही माहिती ऐकत होती. मंत्र्याकडे बघून तिने स्मितहास्य केले.

या स्पर्धा सुरु होण्यापूर्वीच राजाने घोषणा केली होती कीं जो सर्वांना हरवेल, त्याच्याशी राजकुमारीचा विवाह होईल. राजाला पूर्ण खात्री होती कीं चक्रधर विजयी होईल. परंतु, असे कांही निराळे घडेल, याची कुणालाही कल्पना नव्हती.

संध्याकाळीं, जेव्हां राजा, मनकर्णिका, मंत्री, पंडित व शशिकांत, उद्यानवनांत होते, तेव्हां गुप्त हेरांचा प्रमुख तिथे आला आणि त्याने सांगितलं, "महाराज, चक्रधर आता राज्याच्या सीमेवर लोकांना गोळा करून आपल्याविरुद्ध बंड करणार आहे, अशी माहिती झाली आहे. त्याचा आरोप आहे कीं शशिकांतकडे जादूची तलवार आहे, म्हणून चक्रधरचा पराभव झाला. अशा अनोळखी माणसाशी राजकन्येचा विवाह होणे योग्य नाही, असा प्रचार करून तो लोकांना चिथावतो आहे. तो सांगतो कीं मी बंड करीन, स्वतः राजा बनेन आणि राजकन्येशीच विवाह करीन."

हे ऐकून राजा चकित झाला. "माझाच नातेवाईक, आणि त्याने माझ्याविरुद्ध उठाव करायचा?"

दरबारी पंडिताने हंसत म्हटलं, "महाराज, आपण अगदी निश्चिंत राहा. आमच्याविरुद्ध हा जो विरोधी प्रचार होतो आहे, त्यामुळे आपला फायदाच होणार आहे. जेव्हां आसपासच्या शत्रू राज्यांना कळेल कीं भावी राणीच्या पतीकडे जादूची तलवार आहे, तेव्हां ते आपल्याविरुद्ध कधीही जाणार नाहीत." नंतर मनकर्णिका व शशिकांतकडे पाहून तो पुढे म्हणाला, "मी काय म्हटलं, ते समजलं ना?"

दोघांनी खुषीने मान डोलावली.

गोष्ट संपल्यावर वेताळाने विक्रमार्काला विचारले, "दरबारी पंडिताने जे सांगितलं, त्यांत युक्ती व चातुर्य दिसलं. वस्तुस्थिती दिसली नाही. शशिकांतकडे जादूचे शस्त्र आहे, हे चक्रधरला कसं कळलं? माझ्या शंकेचे उत्तर माहीत असूनही तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील." विक्रमार्क म्हणाला, "दरबारी पंडिताच्या बोलण्यांत युक्ति किंवा चातुर्यापेक्षां वस्तुस्थितीच जास्त आहे. चक्रधरने घोषणा केलेली होती की हारलो तर राज्य सोडून जाईन. पण त्याला पराभव सहन झाला नाही. म्हणून त्याने प्रचार केला कीं शशिकांत त्या जादूच्या तलवारीमुळे जिंकला, शौर्यामुळे नव्हे. हे खऱ्या वीराचे लक्षण नव्हे. शिवाय, चक्रधरने राजाचा विरोधात बंडाची तयारी करायला सुरवात केली. त्यामुळे त्याची बुद्धि कुटिल आहे हे स्पष्ट दिसते. दरबारी पंडिताने सांगितले ते योग्यच होते. चक्रधरच्या प्रचारामुळे राज्याला लाभच झाला असता. मुनीने शशिकांतला स्पष्ट सांगितले होते की हे महिमावान शस्त्र तुला मदत करेल. पण त्यावेळी तू स्वतः धाडसी व धैर्यवान असला पाहिजेस. शशिकांतमधे हे गुण पुरेपूर भरलेले आहेत. त्यांच्या हारण्याचा प्रश्नच उद्भवत नाही."

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

***(सुचित्राच्या रचनेवर आधारित)***






# वायनाडची जैनमंदिरे



केरळमधल्या कालिकत व कॅननोर हे जिल्हे, व तमिळनाडच्या निलगिरीलगतच्या वायनाड, या डोंगराळ भागांत कित्येक जैन मंदिरे आहेत, आणि त्यांतली बरीचशी भग्नावस्थेत आहेत. त्याला एकच अपवाद म्हणजे 'सुलतानाची बॅटरी' इथे असलेले मंदिर. हे आता पुराणवस्तू खात्याच्या ताब्यांत आहे. हे मंदिर १२ व्या ते १४ व्या शतकांपर्यंत बांधले गेले होते. त्याचे नूतनीकरण झाले असून आता पर्यटक, यात्रिक व संशोधकांना ते दाखवण्यांत येईल.

दक्षिण भारतांतल्या जैन संस्कृतीचे अवशेष म्हणून या मंदिराचा विचार केला जातो.

ह्या मंदिरात टिपू सुलतानच्या सैन्याचा शस्त्रसांठा ठेवला होता असा ऐतिहासिक दस्तावेज आहे. प्रथम गणपतीवाड्डोम असे मंदिराचे नांव होते पण नंतर मात्र 'सुलतान बॅटरी' असे नांव पडले. नुकतेच इथे मंदिराचे नूतनीकरण चालू असताना दोन मूर्ती सांपडल्या आहेत - एक पांढरी संगमरवरी महावीर जैनांची, आणि दुसरी आहे काळ्या संगमरवरांतले एक कोरीव मस्तक!

## तुम्हाला माहीत आहे कां?

जिराफ हा सर्वांत उंच प्राणी आहे. त्याची उंची अठरा फुटापर्यंत असते. त्याची एकवीस इंच लांब जीभ कान साफ करण्यासाठी तो वापरतो. त्याची खरी जीभ झाडांच्या फांद्या पकडून ओढते आणि त्यांची पाने ओरबाडून काढते.





# शेवटी नशीब उघडले!

वीरभद्र हा एक दयाळू राजा होता. गरजू लोकांना मदतीचा हात देताना तो कधीही मागेपुढे पहात नसे. कुणाला नवीन व्यापार सुरु करायचा असो, कुणाला तीर्थयात्रेला जायचे असो, कुणी आजारी असो, किंवा औषधोपचाराची मदत असो, राजा मदत करील असे.

आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे मदत घेणारे कृतज्ञतेने राजाला भेटण्यासाठी पुन्हा परत जात व राजाची मदत घेतल्यानंतर त्यांना यश कसे मिळत गेले हे ते सविस्तर सांगत. कुणाचा धंदा चांगला चालला, आजारी माणूस बरा झाला आणि यात्रा पूर्ण होऊन साधुसंतांचे आशिर्वाद पदरांत मिळवले; घेणाऱ्याला लाभ होत होता. राजाला हे ऐकून फार समाधान होत होते कीं त्यांची मदत सत्कारणी लागत होती.

पण त्याला एक खंत होती. त्याचा एक दूरचा भाऊ वीरमूर्ती हा गरीब होता. राजाने त्याला मदत करण्याचे निरनिराळे प्रयत्न केले, पण वीरमूर्तीला त्या मदतीचा फायदा कधीही मिळाला नाही. तो चांगला शिकारी होता, चांगल्या कविता करण्याचा त्याला नाद होता. सुरेख कवने रचून तो ती वीरभद्र राजाला ऐकवत असे. राजाला काव्याची जाण होती. दरवेळी राजा वीरमूर्तीला कांहीतरी रक्कम बक्षीस देत असे. पण त्या पैशाचा कांहीतरी चांगला उपयोग करण्यापूर्वी ते पैसे चोरीला तरी जात किंवा वीरमूर्तीच्या हातून हरवत असत. कितीही मदत मिळाली तरी वीरमूर्तीची दरिद्री अवस्था कांही कधी संपली नाही. तो नेहमी उपाशी किंवा फाटक्या कपड्यांमधे, अशा अवस्थेत राजाला दिसत असे.

एकदा वीरमूर्तीने शिकार करून बरेच प्राणी मारून आणले. वीरभद्र राजाला फार आनंद झाला. आपल्या सर्व दरबाऱ्यांच्यासमोर वीरमूर्तीचा सन्मान करायला हवा, असे राजाने ठरवले. म्हणून राजाने दरबार भरवला. आणि सांगितले, ''माझा चुलतचुलत भाऊ वीरमूर्ती,





हा तुम्हाला माहीत आहेच. त्याने शिकारीला जाऊन आज कितीतरी जनावरे मारून आणली आहेत ती पाहा! त्याने आज आपले शौर्य गाजवले आहे, म्हणून तुम्हा सर्वांच्या साक्षीने मी त्याला इनाम देणार आहे.'' असं म्हणून राजाने वीरमूर्तीच्या हातांत एक तुकतुकीत नारिंगी रंगाचे संत्रे दिले, आणि प्रसन्नपणे वीरमूर्तीला निरोप दिला.

दरबारांत किंचितशी कुजबूज झाली. त्या गरीब भावाची राजा मस्करी तर करीत नव्हता ना? राजाला ती कुजबूज ऐकू आली, पण त्याने तिकडे लक्ष दिले नाही. वीरमूर्ती किंवा दरबारांतल्या मानकऱ्यांना माहीत नव्हते, कीं ते साधेसुधे संत्रे नव्हते. त्यांत हिरेमाणके लपवलेली होती.

राजाने वीरमूर्तीचे कौतुक दरबारांत सर्वांच्यासमोर केले, त्यावरच वीरमूर्ती खूष होता. त्या संत्र्याचे त्याला कांही विशेष वाटले नाही. राजाने बोललेले स्तुतिपर शब्द हे वीरमूर्तीला जास्त महत्वाचे वाटले होते. त्याने ते संत्रे पिशवींत ठेवले आणि तो घरी परत गेला.

वाटेत त्याला एक भिक्षेकरी भेटला. त्याने आपला भिक्षेचा कटोरा वीरमूर्तीसमोर धरला. वीरमूर्तीच्याकडे एकही पैसा नव्हता. म्हणून त्याने ते संत्रे पिशवीतून काढले आणि त्या कटोऱ्यांत टाकले. ''तुला भूक लागली असेल. तेव्हां तू हे संत्रे खा.'' संत्रे देऊन वीरमूर्ती आपल्या वाटेने गेला.

ते संत्रे नेहमीपेक्षां जरा जड असलेले पाहून त्या भिक्षेकऱ्याला आश्चर्य वाटले. ते संत्रे इतके सुरेख आणि चकचकीत दिसत होते की त्याने ते राजाला नजर करायचे ठरवले. राजवाड्यावरच्या पहारेकऱ्यांना राजाच्या दिलदार स्वभावाची चांगलीच माहिती होती. म्हणून त्यांनी या भिक्षेकऱ्याला आंत जाऊं दिले.

जेव्हां तो भिक्षेकरी साधू दरबारांत शिरला, तेव्हां राजाने त्याचे आदराने स्वागत केले, व त्याला बसायला सांगितले. राजा कांही बोलणार, पण त्यापूर्वीच भिक्षेकरी साधूने ते सोनेरी संत्रे काढून हातांत घेतले व तो राजाला म्हणाला, ''महाराज, गरिबाची ही भेट आपण स्वीकारावी. याबरोबर माझे आशिर्वादही आपल्यासाठी आहेत. आपल्याला दीर्घायुष्य लाभो!''

वीरभद्राने ते संत्रे एकदा पाहिले आणि त्याला कळले कीं वीरमूर्तीने त्या संत्र्याची किंमत ओळखली नव्हती व पुन्हां एकदा त्याचे दुर्दैव आड आले. राजाने ते संत्रे त्या भिक्षेकऱ्याकडून घेतले व त्याला चांदीच्या नाण्यांनी भरलेली एक थैली दिली. भिकाऱ्याने राजाचे आभार मानले आणि तो निघून गेला.



शिकारीला जाण्यासाठी राजाची स्वारी तयार झाली, आणि वीरमूर्ती त्या जथ्यामधे सामील झाला. या शिकारीमधेही वीरमूर्तीने बरीच जनावरे मारली. राजाने यावेळीदेखील त्याला बक्षीस म्हणून तेच संत्रे दिले. वीरमूर्तीला मात्र वाटले कीं हे दुसरे संत्रे असावे. त्याने ते पिशवींत टाकले आणि तो दरबारांतून निघून गेला. तो वाड्याच्या प्रवेशद्वारापर्यंत पोंचला, तेव्हां तिथे एक सरदार विडा खाताना त्याने पाहिला. ''तुमच्याकडे आणखी एक विडा आहे कां हो?'' वीरमूर्तीने त्याला विचारले. विडा घेऊन वीरमूर्तीने त्याबद्दल त्या सरदाराला ते संत्रे दिले.

सरदाराने हंसून ते संत्रे स्वीकारले. नंतर काय करायचे ते त्याला माहीत होतेच. तो लागलीच परत दरबारांत गेला आणि त्याने राजाला ते संत्रे देऊन म्हटले, ''महाराज, आपण दोनदा हे संत्रे आपल्या भावाला दिलेत खरे, पण त्याने ते जवळ ठेवले नाही. मला तर त्याने ते एका विड्याच्याबदली दिले. त्याला मदत करण्यांत कांहीही अर्थ नाही. तो आयुष्यांत कधीही यशस्वी होणार नाही.''

पुन्हां एकदा शिकारीचा बेत ठरला. वीरभद्र राजाने आपल्या या भावाला तिसऱ्या खेपेला तेच संत्रे बक्षीस दिले. यावेळी मात्र राजाने मनांत शपथ घेतली कीं वीरमूर्तीला मदत देण्याची ही शेवटचीच वेळ असेल. वीरमूर्तीला राजाने ते संत्रे दिले. ते घेत असताना वीरमूर्तीच्या हातांतून ते खाली पडले आणि फुटले. त्यांतून आंत दडवलेली रत्ने बाहेर पडली व सर्वांना दिसली.

वीरमूर्तीने खाली गुडघे टेकून ती रत्नें गोळा करायला सुरवात केली. तो आश्चर्याने थक्क झाला होता. रत्नें उचलून त्याने राजाकडे बघितले. राजाच्या चेहऱ्यावर प्रसन्न हास्य होते. ''मला क्षमा करा, महाराज.'' वीरमूर्ती ओशाळून म्हणाला. ''हे बघ भाऊ, आता यापुढे तुझे नशीब पालटले आहे. दर वेळेला मी तुला मदत करायचा प्रयत्न केला होता, पण तुला ती मदत घेता आली नाही. तू हे संत्रे दुसऱ्यांना देऊन टाकलेस. पण आता मात्र तुझी भरभराट नक्की होईल.''

वीरभद्राने त्याला आयुष्यभर पुरेल इतकी संपत्ती दिली. लौकरच वीरमूर्ती एक श्रीमंत गृहस्थ बनला. पण यानंतर मात्र व्यवहार सांभाळून आपल्या दिलदार राजाप्रमाणेच इतरांना मदत करण्याचे त्याने ठरवले.





# व्यापारांत व्यवहार

धर्मकटक एक लहानसे राज्य होते. धर्मराज हा तिथला राजा होता. प्रजेला तो मुलांसारखा मानत असे. शेजारच्या राज्यांशी त्याचे मैत्रीपूर्ण संबंध होते. पण त्याच्या स्वभावांत एक दोष होता. आपले मंत्री व कर्मचारी यांच्यावर त्याचा अतिविश्वास होता.

त्यामुळे कधीकधी त्रास होत असे. धर्म-कटकमधे विविध हस्तकला आणि तलम रेशमी साड्यांचे उत्पादन होत हाते. तिथल्या साड्या आणि रत्नजडित शालींना इतर राज्यांतून मागण्या येत.

एकदा धर्मराज राणीबरोबर रथांत बसून नगरांत फिरायला जात होता. नागरिकांनी त्यांना पाहून आनंदाने स्वागत केले. नगरांतल्या लहान रस्त्यांवरुन ते जात असताना रत्नाचारी नांवाच्या व्यापाऱ्याच्या दुकानांत टांगलेल्या शाली व रेशमी साड्या राणीला दिसल्या.

महालांत परत गेल्यानंतर राणीने राजाला त्या दुकानांतल्या साड्या आणि शाली मागवण्याची विनंती केली. राजाने प्रधानाला बोलावून राणीची इच्छा सांगितली व म्हटले, "कुणालातरी पाठवून त्या मागवून घ्या आणि लगेच त्यांची किंमतही चुकती करण्याची व्यवस्था करा."

"महाराज, मी लगेच ह्या कामाची व्यवस्था करतो." आणि प्रधानाने खजिनदाराला बोलावून ही जबाबदारी त्याच्यावर सोंपवली.

खजिनदाराने लागलीच हे काम व्यापार विभागाच्या अधिकाऱ्यावर करवसुली करणाऱ्या अधिकाऱ्यावर सोंपवले.

रत्नाचारीच्या दुकानांत राजाचे शिपाई गेले आणि ही माहिती त्यांनी त्याला सांगितली. रत्नाचारी म्हणाला, "महाराजांची इच्छा असेल तर हे दुकानच त्यांच्या स्वाधीन करीन." आणि त्याने पंचवीस उत्तम साड्या व पंचवीस शाली निवडल्या आणि सैनिकांच्या हवाली केल्या. त्याशिवाय त्या सैनिकांच्या बायकांसाठीदेखील प्रत्येकाला दोनदोन साड्या दिल्या.

"तुम्ही आमच्या बायकांसाठीसुद्धां दोनदोन साड्या दिल्या आहेत. पण आमच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांसाठी तुम्ही काय देणार?" सैनिकांनी विचारले.

बिचाऱ्या रत्नाचारीने त्या व्यापार अधिकारी व करवसुलीच्या अधिकाऱ्याच्या बायकांसाठी देखील साड्या व शाली दिल्या.

त्या रात्री रत्नाचारीला झोंप लागली नाही. एकेका शालीची किंमत कमीतकमी हजार रुपये तरी होती. कांही दिवस पैसे मिळतील म्हणून त्याने वाट पाहिली. पण कांही फायदा झाला नाही. त्याला वाटले की या सैनिकांना किंवा अधिकाऱ्यांना सांगून कांही उपयोग होणार नाही. त्याने आपल्या एका विश्वासू नोकरामार्फत खजिनदाराला त्या सर्व कपड्यांच्या किंमती-विषयी एक सविस्तर विनंतीपत्र लिहीले.

खजिनदाराने ते पत्र व्यापार विभागाच्या अधिकाऱ्याकडे दिले. त्याने करवसुली अधिकाऱ्याला बोलावून त्याची चांगली कानउघाडणी केली.

रत्नाचारीला वाटले होते कीं दुसऱ्या दिवशी त्याला पैसे मिळतील. पण तसे कांही घडले नाही. हा त्याला अपमान वाटला.

व्यापारविभागाच्या अधिकारीमहाशयांनी आपले गुप्तहेर दुकानांत पाठवले. त्यांनी दुकानाची संपूर्ण तपासणी केली व निकाल दिला कीं पूर्ण कर दिलेला नाही. रत्नाचारीकडे दडवलेली बरीच संपत्ती असून त्याची माहिती खजिनदाराकडे सादर केलेली नव्हती. त्या आरोपाखाली त्यांनी रत्नाचारीला कैद केले आणि तुरुंगात डांबले.

रत्नाचारीची बायको व मुलें यामुळे फारच



हवालदिल झाली. काम करावे ते त्यांना समजेना. आपल्या दुर्दैवावर, आपल्या असहाय स्थितीबद्दल तो कासावीस झाला. नेमका त्याच संध्याकाळी, काशीयात्रेला गेलेला रत्नाचारीचा पिता, माणिक्याचारी घरी परत आला. सारी हकीकत समजल्यानंतर तो त्याच्या बालमित्राला, खजिनदाराच्या मामाला जाऊन भेटला. त्याला घेऊन तो खजिनदाराकडे गेला आणि त्याने आपल्या मुलाच्या वतीने क्षमा मागितली. त्याने खजिनदाराला सांगितले, "माझा मुलगा रत्नाचारी ह्याच्याकडे जी भरपूर संपत्ती आहे, ती कांही त्याची स्वतःची कमाई नव्हे; ती वडिलार्जित संपत्ती आहे. माझा मुलगा न चुकता कर भरतो आहे." आणि त्याने तसे कागदपत्रदेखील दाखवले. शेवटी आपल्या मुलाला त्याने तुरुंगातून बाहेर काढले.

विद्योगी



हे सगळे होईपर्यंत एक महिना गेला. तेवढ्यांत रत्नाचारीचा व्यापार कोसळला. रत्नाचारीवर झालेला अन्याय पाहून रत्नाचारी फारच दुःखी झाला, शेवटी कंटाळून एक दिवस तो पित्याला म्हणाला, ''आपल्यावर जो अन्याय झाला, त्याबद्दलची तक्रार मी स्वतःच महाराजांकडे करीन.''

हे ऐकून त्याचा वडिलांनी एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि म्हटले, ''तू एका व्यापाऱ्याचा मुलगा आहेस, इतकी वर्षे तू व्यापार करतो आहेस, पण तू अजून व्यवहार शिकला नाहीस, नीट व्यवहार सांभाळलेला नाहीस म्हणून हे सगळे रामायण घडले. जो व्यापार सहजपणे तुला करता आला असता, त्याचा तू एक गुंता बनवलास. राणीसाहेबांना तू ज्या शाली आणि साड्या पाठवल्यास, त्यांची किंमत वसूल, करण्यासाठी तू खजिनदाराला बिनंतीपत्र पाठवायला नको होतंस. पैसेही गेले, आणि अब्रूही गेली.''

''अहो, हजारो रुपयांच्या किंमती वस्तू मी अशाच कशा सोडून देऊं? आपल्याला एवढी रक्कम कोण देणार आहे?'' त्रस्त झालेल्या रत्नाचारीने विचारले.

''तू हजारो नव्हे, लाखो रुपये कमावू शकला असतास. महाराजांचा थोडा विश्वास जरी तू कमावला असतास तरी हे सहज शक्य होतं.'' वडिलांनी सांगितलं.

''म्हणजे याचा अर्थ असा आहे कां, की आपली बाकी मिळायची, ती आपण मागायचीच नाही? आपला काय गुन्हा आहे?'' रत्नाचारीने चिडून विचारले.

''मागणे हा गुन्हा नाही. मागण्याची पद्धत जी होती, त्यांत व्यवहार सांभाळला गेला नाही. त्यामुळे आपले पैसे गेले, इज्जतही गेली.'' पिता म्हणाला.

''तुम्हाला काय म्हणायचंय तेच मला समजत नाही.'' रत्नाचारी केविलवाणा झाला होता.

''महाराज चांगले आहेत, पण याचा असा अर्थ नाही कीं त्यांच्या कचेरीतले सगळेच सदस्य चांगले आहेत. व्यापाराचे मर्म ओळखून व्यवहार सांभाळायचा असतो. वस्तुस्थिती एका बाजूला आणि व्यापार दुसऱ्या बाजूला. दोघांमधे आकाश-पाताळाचे अंतर आहे. अजूनही अनुभवांत तू कचाच आहेस.'' पित्याने समजावले.

''बरं तर, त्यावेळी मी काय करायला हवं होतं, असं तुम्हाला वाटतंय? स्पष्टच सांगा ना!'' रत्नाचारीने विचारले.

''सुरवातीलाच तुझी फार मोठी चूक झाली. तू ज्या साड्या व शाली राणीसाहेबांसाठी दिल्यास, त्याच्याबरोबर तू सैनिकांनाही साड्या दिल्यास. दुसऱ्या उच्च अधिकाऱ्यांसाठीही दिल्यास. तुला वाटलं कीं ते खूष होऊन तुझे काम करतील, तारीफ करतील. त्या ऐवजी साड्या घेऊन तूच राणीसाहेबांना दाखवायला गेला असतास तर तुला पैसेही नीट मिळाले असते आणि तुझ्या नांवाचाही बोलबाला झाला असता. राणीसाहेबांच्या साड्या तुझ्या दुकानांतून घेतल्या आहेत याची जाहिरात झाली असती. तुझा व्यापार वाढला असता, जास्त कमाई झाली असती. समजलं?'' पिता म्हणाला.

''होय, आपण अगदी बरोबर बोललात.'' रत्नाचारीची पत्नी सासऱ्याच्या बोलण्याला दुजोरा देत म्हणाली.

ह्या घटनेनंतर दहा दिवसानंतर रत्नाचारीच्या पित्याला खजिनदाराने बोलावणे पाठवले. खजिनदार म्हणाला, ''तुमच्या मुलावर जो अन्याय झाला होता, ते मी महाराजांना सांगितलं, त्यांनी चौकशी केली, चुकी करणारांना शिक्षा केली आणि त्यांनी आज्ञा केली आहे की रत्नाचारीच्या दुकानांतून आपलेल्या सामानाच्या दुप्पट किंमत त्याला दिली जावी.''

एकदी मोठी रकम पाहून रत्नाचारी व त्याची पत्नी फारच खूष झाले.





# मागीलदारचे रोपटे

वल्लभसेठ हा रामपुरांतला प्रसिद्ध दागिन्यांचा व्यापारी होता. गांवातली सर्व श्रीमंत कुटुंबे त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवून अनेक प्रकारचे दागदागिने त्याच्याकडून खरेदी करीत असत. वल्लभसेठला रामदेव व वासुदेव असे जुळे मुलगे होते. बऱ्याच वर्षांनंतर त्यांच्या घरांत पाळणा हलला होता. म्हणून सेठ दंपतींनी मुलांचे पालनपोषण मोठ्या लाडाकोडांत केले होते. त्यामुळे त्यांना शिक्षणाची आवड निर्माण झाली नाही. पहावे तेव्हां ते मित्रांबरोबर उनाडक्या करताना दिसत.

त्यांचा हा स्वभाव पाहून वल्लभसेठला त्यांची फारच काळजी वाटायला लागली. एके दिवशी तो पत्नीला म्हणाला, ''हे दोघेजण अगदी बेज-बाबदार निघाले आहेत. तू त्यांचे सारखे लाड करीत बसलीस म्हणून ते उडाणटप्पू बनलेत. आपल्यानंतर हा व्यापारधंदा हे कसे काय सांभाळणार आहेत?''

''आपल्याजवळ भरपूर संपत्ती आहे. चार पिढ्या आरामांत बसून खाऊं शकतील. आपली सोन्यासारखी नवसाची मुले आहेत ती. नाही त्यांनी काम केलं तर काय बिघडणार आहे? त्यांना पैसे मिळवण्याची कांही जरूरी आहे कां?'' सेठजींच्या पत्नीने म्हटलं.

सेठला वाटलं कीं या विषयावर तिच्याशी बोलणे निरर्थक, आहे म्हणून तो गप्प बसला.

दोन दिवसानंतर सेठने आपल्या दोन्ही मुलांना बोलावले आणि त्यांना म्हटले, ''माझे मित्र विजय हे कानपुरांत राहातात. त्यांच्या नांवाने एक महत्वाचे पत्र मी देतो आहे. तुम्ही दोघे तिथे जा आणि ते पत्र त्याला समक्ष द्या. हे खाजगी व गुप्त असे काम आहे, म्हणून ते तुमच्यावर मी सोंपवतो आहे. कानपूर मोठे शहर आहे. तेही पाहून या.'' दोघे भाऊ त्याच दिवशी कानपूरला जायला निघाले.

पत्र वाचल्यानंतर विजयने निमूटपणे मान डोलावली. त्यानंतर, मित्राच्या दोन्ही मुलांचे आगतस्वागत केले व त्यांना गांव दाखवण्याची योग्य ती व्यवस्था केली. विजच्या पत्नीने त्यांचे प्रेमाने स्वागत केले. विजयला दोन जुळ्या मुली होत्या, श्रेष्ठा आणि श्वेता. दोघीही सुंदर व हुशार होत्या. वासुदेव व रामदेवला त्या आवडल्या.

एका आठवड्यानंतर, वल्लभसेठकडून विजयच्या नांवावर एक पत्र आले, त्यांत त्याने आपल्या मुलांना उद्देशून मजकूर लिहिला होता, ''मुलांनो, चार दिवसांपूर्वी रात्रीच्यावेळी दुकानावर दरोडा पडला, आणि त्यांनी सारे सामान लुटले. जे दागिने लोकांनी दुरुस्तीसाठी दिले होते, तेही चोरांनी नेले. गिऱ्हाईके आता त्यांचे दागिने परत मागत आहेत. नाहीतर ते मला राजाकडे घेऊन जाणार आहेत. साहजिकच मला कडक शिक्षा होईलच. हा अपमान मला सहन होणार नाही. म्हणून तुमची आई व मी हे गांव सोडून जात आहोत. परमेश्वराची कृपा असली तर आपली पुन्हां भेट होईल.'' हे वाचून दोघे मुलगे हताश झाले.

परिस्थिती बदलल्यावर विजयच्या वागण्यांत-देखील बराच बदल झाला. त्याने कठोरपणे दोघांना सांगितले, ''हे पहा, निरुद्योगी माणसांना आयते बसून जेवूं घालायला मी कांही तुमच्या बापासारखा करोडपती नाही. तुम्ही कांहीतरी कामधंदा मिळवा आणि पोटापुरते कमवायला लागा.''

दोघांनाही हा अपमान झोंबला, पण करणार काम? त्यांना कोणतेही काम येत नव्हते, तेव्हां पोट तरी कसे भरणार? दोघांनीही तो अपमान गिळला आणि विजयला त्यांनी काकुळतीने विनंती केली की त्यानेच त्यांना चरितार्थापुरते मिळेल, असे कसलेही काम सांगावे. विजयने



दोघांच्यासाठी कामाची तजवीज केली. रामदेवला आपल्याच कापडदुकानांत हिशेब लिहिण्याचे काम दिले, आणि वासुदेवला घरांतल्या बागेत माळीकाम सांगितले. काम झाले कीं त्याने बागेतली भाजी तोडून ती बाजारांत नेऊन विकायची होती. सुरवातीला ही कामे करताना दोघांनाही फार त्रास झाला.

एक दिवस रामदेवने वासुदेवला म्हटले, ''बघितलंस ना, हे विजयकाका किती कठोरहृदयी आहेत ते! हिशेबांत दहा रुपये कमी आले तर काल त्यांनी मला जेवणच दिले नाही.''

''हो रे भाऊ, भरलेल्या टोपल्यांतून भाजी घेऊन मी चारचार मैल पायी चालत बाजारांत जातो, पण ते कांही माझ्यासाठी गाडीची व्यवस्था करीत नाहीत. त्यांना आपली दया येत नाही.'' वासुदेवने आपले दुःख उगाळले.

लक्ष्मीकांत

"अरे, जे झालं ते विसरून जा. आपले बाबा नेहमी म्हणत असत कीं जो कष्ट सहन करतो, त्याला कधी ना कधी त्याचं फळ हे मिळतंच. आपल्यालाही चांगले दिवस येतील." रामदेवने भावाला धीर दिला.

जसे दिवस जात होते, तसे दोन्ही भावांमधे काम करण्याची इच्छा व ईर्षा निर्माण होत गेली. व्यापारांतले बारकावे त्यांना समजायला लागले. विजयच्या मुली, श्रेष्ठा आणि श्वेता, त्या दोघांकडे आदराने पाहूं लागल्या. विजय त्यांना जो पगार देत होता, त्यांतून दोघांनीही थोडीथोडी रक्कम वांचवली होती.

सहा महिन्यांनंतर वल्लभसेठ पत्नीसह कानपुरला आला. आईवडिलांना भेटल्यावर दोघां मुलांचे डोळे पाणावले. जबाबदारीने वागणारी मुले पाहून वल्लभसेठ व त्याच्या बायकोला फारच आनंद वाटला. वल्लभसेठने विजयला म्हटले, "मित्रा, जी संपत्ती लुटली गेली होती, ती मिळाली. आता आम्ही परत जाऊं. तुझ्या मदतीबद्दल व मेहनतीबद्दल माझे मनःपूर्वक धन्यवाद." सेठच्या बोलण्यामागे जे गुपित होतं, ते विजयला समजलं आणि तो प्रसन्नपणे हंसला.

"तुझ्या मुलांना घेऊन जातो आहेसच, त्याबरोबर आपल्या सुनांना पण घेऊन जा ना! त्यांना सुयोग्य पती मिळाले हे माझं सुदैव आहे." विजय म्हणाला.

वल्लभने विजयचा प्रस्ताव आनंदाने स्वीकारला. विवाहाच्या दुसऱ्या दिवशी विजयने वल्लभसेठला एकांतात विचारले, "माझ्या कापडाच्या व्यापारापेक्षां तुझा व्यापार बराच मोठा आहे. तू माझ्याहीपेक्षां व्यापारांत कितीतरी पटीने वरचढ आहेस. तुझ्या मुलांना तू स्वतःच मार्गावर आणूं शकला असतास. चोरीचा बहाणा करून, तू त्यांना माझ्याकडे नोकर म्हणून कां ठेवलेस?"

"असं म्हणतात कीं मागीलदारचे रोपटे औषधाला निरुपयोगी ठरते" माझ्या लक्षांत आलं, कीं जोपर्यंत माझे मुलगे माझ्याजवळ राहात आहेत, तोपर्यंत ते मेहनत करणार नाहीत. जरूर पडली तरच ते काम करतील. माझी ही अडचण तू त्यांना सांभाळून निवारलीस, त्याबद्दल मी तुझा आभारी आहे." वल्लभसेठने स्पष्टीकरण दिले.

लौकरच, रामदेव व वासुदेव या दोघांनी रामपुरांत आपले बस्तान बसविले, आणि वडिलांना शोभेसे मुलगे म्हणून नांव कमावले.





# पटवणारा

एक दिवस कांही गांवकरी पारावर बसून शिळोप्याच्या गप्पा मारीत होते, बाळकृष्ण नांवाचा एक मुलगा अचानक शिंकायला लागला. कामेशने त्याला सल्ला दिला, "मलादेखील नुकतीच सर्दी झाली होती. गोळ्या घेतल्या आणि सर्दी पळाली. जा, माझ्या बायकोकडून त्या गोळ्या घेऊन खा." तो मुलगा 'हो' म्हणून तिथून निघून गेला.

"बाळकृष्ण कधी कुणीचे ऐकत नाही. तुम्ही तर त्याला सहज राजी केलंत की, "एक म्हातारबाबा तारीफ करीत म्हणाला. कामेश खूष झाला आणि मोठ्या उत्साहाने म्हणाला, "या मुलालाच नव्हे तर अत्यंत हट्टी माणसालादेखील मी माझ्या बोलण्याने समजावीत त्याचे मत बदलू शकतो."

शेजारीच रामेश बसला होता, तो म्हणाला, "इतरांची गोष्ट कशाला सांगतोस? दृष्टीसमोर असलं की मी तेच खरं मानतो. पण ते दिसत नाही तोवर मी ते मानायला तयार नसतो. आता उदाहरण म्हणून माझ्या पाठीमागे वडाचे झाड आहे. तो निंब आहे हे मला पटवून दे बघू."

रामेशच्या पाठीमागे खरोखरीच एक निंबाचं झाड होते, म्हणून कामेश रामेशला म्हणाला, "तुझ्यामागे तर निंबाचेच झाड आहे; त्याला तू वड कां म्हणतो आहेस?" असे म्हणून त्याने निंबाची पाने तोडून आणली आणि रामेशला दाखवली. रामेशने ती पाने बघून म्हटले, "कबूल, ही निंबाची पाने आहेत. पण ती ह्याच झाडाची आहेत, हे कशावरुन?"

कामेश उपस्थित मंडळीची ग्वाही देऊं लागला. तेव्हां रामेश म्हणाला, "त्यांना कां विचारतोस? माझे डोळे पाहू शकतात कीं. मला दुसऱ्यांचे ऐकायची काय जरूर?"

"ठीक आहे, मागे वळून बघ. तुझे डोळे चांगले असले तर ते निंबाचेच झाड आहे हे तुला पटेल." कामेशने चिडून म्हटले.

"मी मागे बघणार नाही. तुला वाटलंच तर ते झाड माझ्यासमोर आणून ठेव. नाहीतर मला ही गोष्ट पटवून देण्यांत तू यशस्वी झाला नाहीस." रामेशचे बोलणे ऐकून सारे हंसायला लागले. कामेश पुन्हां एकदा रामेशकडून हरला.

- बाबा





# राजाचे वाईट स्वप्न

दुर्मक देशाचा राजा दुर्मुख गाढ झोपेत होता. त्याला एक भेसूर आवाज एकूं आला. ''अरे राजा, रोज सूर्योदय पाहाण्याची तुझी संवय आहे. आज शुक्रवार आहे. परवां रविवारी सूर्योदयाच्यावेळी तुझा मृत्यू होईल. जर ती वेळ टळली तर मात्र तुझा मृत्यू होणार नाही.''

एका धीरगंभीर आवाजांत कुणीतरी राजाला धोक्याची सूचना दिली होती. राजा दचकून उठला. तो घामाघूम झाला होता. त्याने राणीला उठवले आणि आपले स्वप्न सांगितले. राणीने राजाला धीर देत म्हटले.'' अहो, ते स्वप्न होतं ना? ते कांही सत्य नव्हे. तुम्ही शांतपणे झोपून जा आणि ते स्वप्नबिप्न विसरून जा.''

पण राजाची भीती कांही दूर होईना. तो गप्प बसूं शकला नाही. त्याने लागलीच सेनाधिपतीला आणि विवेकवर्धन मंत्र्याला बोलावून घेतले. त्यांना आपल्या स्वप्नासंबंधी सांगितले व त्यांना आज्ञा केली की या संकटातून वाचण्यासाठी त्यांनी कांहीतरी उपाय सुचवावा.

मंत्र्याला कांही निर्णय घेता आला नाही. त्याने विचार केला कीं जे राजाने स्वप्नांत ऐकलं, ते जर खरं ठरलं तर कांहीच करता येणार नाही. होणारे टळणार नाही. परंतु राजाची अवज्ञादेखील करता येणार नाही. त्याने राजपुरोहित व राजवैद्यांना बोलावून घेतले. राजाची जन्मपत्रिका पुन्हां एकदा नीट तपासून बघितली. राजपुरोहितांनी सांगितल कीं राजाला धोका नसून चांगले दीर्घायुष्य आहे व तो सुरक्षित राहील. राजवैद्याने नाडीपरीक्षा करुन म्हटले कीं राजाची प्रकृति अगदी उत्तम होती. तितक्यांत सेनापतीने येऊन सांगितले, ''महाराज, आम्ही सारा राजवाडा व अंत:पुर शोधून पाहिले. कुणीही परके लोक सांपडले नाहीत. नगरांत रस्त्यांवरून जाणाऱ्या कांही माणसांची आम्हाला शंका आली, म्हणून आम्ही त्यांना पकडले. पण नंतर कळले कीं ते चांगले लोक आहेत.''

तरीही राजाला चैन पडत नव्हते. तो वारंवार मंत्र्याला सूचना करीत होता, कीं रविवारच्या सकाळपर्यंत अशी कोणतीही दुर्घटना घडूं नये, कीं ज्यामुळे राजाच्या मृत्यूची शक्यता होती. राजाची भीती दूर करण्यासाठी मंत्र्यानी प्रसिद्ध भूतवैद्याला बोलावले. त्याने जमिनीवर यंत्र आंखले, त्यावर पिठाच्या मूर्ती करून ठेवल्या, आणि निरनिराळे आवाज काढीत त्यांची पूजा केली. मग तो म्हणाला, ''महाराज, कोणतीही दुष्ट शक्ती आपल्याला स्पर्शदेखील करूं शकणार नाही. आपण निर्धास्त राहावे.''

तरीही राजा दिवसभर अस्वस्थच होता. क्षणोक्षणी त्याची भीती वाढत होती.

शनिवार उजाडला. दिवसभरांत राजाने कांहीही खाल्ले वा प्यायले नाही. त्याला रविवारचा सूर्योदय पाहायची इच्छा होती. त्याने पुन्हां मंत्र्याला बोलावून म्हटले, ''तुम्ही घोषणा करा कीं जी व्यक्ती उद्याचा सूर्योदय थांबवू शकेल, त्याला मी अर्धे राज्य द्यायला तयार आहे.''

मंत्री स्तंभित झाला. त्याने शांतपणे राजाला विचारले, ''सूर्योदय कसा कुणी थांबवू शकेल?'' मंत्र्याच्या मनांत विचार आला कीं राजाची बुद्धि सैरभैर झाली आहे. तरीही राजाज्ञेप्रमाणे त्याने तशी दवंडी पिटवली.

त्या संध्याकाळी, ज्ञानशेखर नांवाचा एक तरुण राजाकडे आला आणि म्हणाला, ''महाराज, मी आपली घोषणा ऐकली. मी सूर्योदय थांबवीन आणि आपल्याला मृत्यूच्या दाढेतून वांचवीन.''



राजाचे डोळे विस्फारले. त्या तरुणाला राजाने विचारले. ''सूर्योदय कसा काय तू थांबवणार?''

''आमच्या देशांत आम्ही हे काम परंपरागत करतो आहोत. या रहस्यमय विद्येत आम्ही निपुण आहोत. परंतु, त्यासाठी आपल्याला एक काम करावे लागेल.'' युवकाने म्हटलं.

राजाने अस्वस्थ मनाने विचारलं, ''सांग पाहू, ते कोणतं काम आहे?''

''आपण उद्या पहांटे उठावे, राजभवनांतल्या आपल्या शयनकक्षांतली फक्त पूर्वेची खिडकी तेवढी उघडी ठेवावी. बाकी सगळी दारे खिडक्या बंद राहिली पाहिजेत. आकाशाकडे आपले लक्ष केंद्रित करावे. आपल्याला सूर्योदय दिसणार नाही.

स्वर्णकुमारी अहुजा

नगरांत अशा प्रकारची घोषणा करवावी की जोपर्यंत घंटेचा आवाज ऐकू येत नाही, तोपर्यंत कोणत्याही नागरिकाने घराबाहेर पडता कामा नये. आपण आता अगदी निश्चिंत व निर्धास्त राहावे.'' असे आश्वासन देऊन तो युवक तिथून निघून गेला. राजाच्या मनावरचे दडपण जरा कमी झाले.

दुसऱ्या दिवशी सकाळीच दुर्मुखराजा आपल्या शयनकक्षांच्या पूर्वेकडील खिडकीजवळ बसला आणि श्वास रोधून आकाशाकडे बघत राहिला. पूर्वेकडला पर्वतावरच्या घनदाट अरण्यांतून काळ्या ढगांसारखा धूर आकाशांत पसरला होता; कित्येक घटकांपर्यंत हा धूर जसाच्या तसाच होता. तेवढ्या वेळांत सूर्योदयाची वेळ होऊन गेली. जेव्हां राजाची खात्री झाली कीं तो आता संकटात नाही व मरणाच्या दाढेतून तो बांचला होता, तेव्हांच तो शयनकक्षाच्या बाहेर आला. कांही वेळानंतर धूर नाहीसा झाला. आणि सूर्याचे स्वच्छ दर्शन झाले. त्याबरोबर लागलीच नगरांतल्या घंटा वाजायला लागल्या आणि आपापल्या घरांतून नागरिक बाहेर आले. परंतु अर्धे राज्य मिळण्याची शक्यता असलेला ज्ञानशेखर मात्र तिथे आला नाही.

फक्त विवेकवर्धन मंत्र्याला माहीत होते की हा ज्ञानशेखर परत येणार नाही. कारण राजाला त्या वाईट स्वप्नाच्या भीतीपासून वांचवण्यासाठी मंत्र्यानेच ज्ञानशेखरला राजाकडे पाठवले होते, आणि राजाच्या मनांत त्याच्याविषयी विश्वास निर्माण झाला. नंतर हजार विश्वासू अनुयायांना हजार बैलगाड्यांमधे गवताचे भारे देऊन पूर्वेकडच्या अरण्यांत धाडले. त्या गवतावर गार पाणी शिंपडले, आणि सूर्योदयापूर्वी एक प्रहर आधी त्याला आग लावली. त्यामुळे धूर झाला व सगळीकडे पसरला. त्या धुरामुळे राजाला सूर्य दिसलाच नाही. मंत्र्याने चतुराईने राजाची भीती दूर केली आणि त्याचवेळी कुणाला कांहीही न समजता, राजाचा मान राखला गेला. नाहीतर 'घाबरट राजा' म्हणून लोकांनी राजाची टर उडवली असती.

विवेकवर्धनचे हे विवेकपूर्ण काम खरोखरच कौतुकास्पद होते.







# श्वेत गजराज

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असताना काशी नगरीपासून थोड्या अंतरावर लांकूडतोडे व सुतारांची एक वस्ती होती. तेथे सुमारे पांचशे सुतार राहात असत. ते लहानलहान होडक्यांतून जंगलात जात व तेथून त्यांना लागणारे इमारती लाकूड तोडून ते आपल्या होडक्यांत भरून आपल्या गांवी आणीत. ते लांकूड संपले म्हणजे पुन्हां होडक्यांतून जंगलात जाऊन लांकूड तोडून आणीत.

त्या जंगलाच्या एका कोपऱ्यांत एक हत्तीण रहात असे. एकदां तिच्या पायांत लाकडाचे एक पाचर बोंचले, त्यामुळे तिचा पाय सुजला आणि दुखूं लागला.

अनेक प्रयत्न करूनही तिला ते पाचर पायांतून उपटून काढतां येईना. त्याच वेळी तिला झाडे तोडण्याचा आवाज ऐकू आला. हत्तीण लंगडत त्या दिशेला गेली.

हत्तिणीला पाहतांच सुतारांना तिला कांही तरी होत असल्यासारखे वाटले. ती हत्तीण त्यांच्यासमोर बसली व पाय वर करून पायाला कांही तरी झाल्यासारखे तिने खुणावले. सुतारांनी जवळ जाऊन पाय पाहिला, आणि त्यांनी क्षणार्धात ते पाचर काढून तिच्या पायाला मलम लावून पट्टी बांधली.

थोड्याच दिवसांत हत्तिणीची जखम भरून आली व ती हिंडू फिरूं लागली. सुतारांनी केलेल्या उपकाराची फेड करण्याच्या हेतूने ती त्यांना मदत करू लागली.

ती पडलेली झाडे ओढून सोयीच्या जागी आणून देई. ओंडके उचलून होडक्यांत ठेवी. असा तऱ्हेने हत्तीण व सुतार यांची परस्परांशी मैत्री जमली. सुतार आपल्या खाण्यांतला वांटा तिला देऊं लागले.

कित्येक दिवस लोटले. हत्तिणीला एक पिल्लूं



झाले. तो ऐरावत जातीचा पांढरा हत्ती होता. हत्तीण वृद्ध होत गेली व तिने तिचे ते पिलू सुतारांवर सोडून दिले व ती खोल जंगलात निघून गेली. हा श्वेत हत्ती सुतारांना मदत करी. सुतार जे खायला घालीत, ते तो खाई. त्यांच्या मुलांबाळांना आपल्या पाठीवर बसवून खेळवी. त्यांना नदींत आपल्याबरोबर नेई व आनंदाने तो त्यांच्याबरोबर राहू लागला. सुतार हत्तीला आपल्याच मुलासारखा मानीत, व ते तसे त्याच्याशी प्रेमाने वागत.

ब्रह्मदत्त राजाला जंगलात पांढरा हत्ती असल्याची बातमी कळली, तेव्हां तो ससैन्य त्या हत्तीला धरुन न्यायला आला. सुतारांना वाटले की राजाला इमारती लाकूड हवे आहे. त्यांनी राजाला नम्रपणे निवेदन केले -

''महाराज, आपणांस इमारती लाकडाची गरज होती तर आमच्याकडे निरोप पाठविला असतात, तरी आम्ही लांकूड आणून आपल्याकडे नसते का पोंचविले? आपण सैन्य घेऊन येण्याची विनाकारण तसदी घेतलीस.''

राजा त्यांना म्हणाला, ''मी लाकडासाठी आलो नाही. मी या पांढऱ्या हत्तीला धरून नेण्यासाठी आलो आहे.'' त्याने आपला खरा हेतू उघड सांगून टाकला.

''तर मग आपण हत्तीला आपल्याबरोबर अवश्य घेऊन जावे.'' सुतार नम्रपणे म्हणाले. परंतु खूप प्रयत्न करूनही हत्ती जागचा हलला नाही. हत्ती जागचा हालत नसलेला पाहून राजाच्या एका अधिकाऱ्याने हत्तीच्या मनांतली गोष्ट ओळखली व तो राजाला म्हणाला -

''महाराज, हा हत्ती फार विवेकशील व शहाणा आहे. आपण या हत्तीला घेऊन गेलात तर या सुतारांचे फार नुकसान होईल. त्यांना होणाऱ्या नुकसानाची भरपाई आपण करूं शकलात, तर हा हत्ती येथून हालेल.''

राजाने हत्तीच्या चारही पायांजवळ प्रत्येकी एकेक लाख सुवर्णमुद्रा ठेवल्या व त्या सुतारांना वाटून देण्यास सांगितले. तरी हत्ती जागचा हलला नाही. त्यानंतर राजाने सुतारांच्या बायकामुलांना वस्त्रदान केले.

तेव्हां कोठें हत्ती जागचा हलला आणि राजाच्या पाठोपाठ निघाला. त्यानंतर राजाने वाजतगाजत श्वेत गजराजाला राजधानीत आणले. राजधानीभर त्याची मिरवणूक काढण्यांत आली. त्यानंतर त्याच्यासाठी योग्य गजशाला तयार करण्यात आली. तो हत्ती राजाची स्वारी नेणारा मुख्य हत्ती झाला. त्याच्यावर राजाशिवाय इतर कोणालाही स्वारीचा अधिकार नव्हता.

तो श्वेत हत्ती आला, त्या शुभघटिके पासून काशीराज्याची भरभराट होऊ लागली. कोणी शत्रू राज्यावर स्वारी करायला येई, त्याचा पराभव होई. राज्याचा विस्तारही झपाट्याने वाढू लागला. कांही दिवसांनी काशीच्या राणीला दिवस राहिले. बोधिसत्वांनी तिच्या पोटी अवतरण्याचे ठरवून तिच्या गर्भात प्रवेश केला. प्रसवकाळाला एक आठवडा उरला होता आणि काशीचा राजा एकाएकी परलोकी गेला. ती संधी साधून कोशल देशाच्या राजाने काशी राज्यावर स्वारी केली. मंत्र्यांनी बराच वेळ खलबत करून कोशल-राजाकडे एक संदेश पाठविला - ''आमच्या राणीचा प्रसवकाळ एका आठवड्यावर येऊन ठेपला आहे. राणीच्या पोटी कन्या जन्मली तर आपण काशीराज्य काबीज करावे आणि जर पुत्ररत्न जन्मले तर आम्ही आपणांशी युद्ध करायला सिद्ध राहू.''

कोशलराजाने एका आठवड्याचा अवधी मान्य केला.

बरोबर एका आठवड्याने बोधिसत्वांचा जन्म झाला. काशीराज्याचे सैन्य कोशलच्या सैन्यावर चालून गेले.

परंतु त्या युद्धांत काशीराज्याचा पराभव होणार असे वाटू लागले.



परिस्थिति ओळखून मंत्र्यानी राणीजवळ निवेदन केले, "महाराजांच्या हत्तीने रणांगणावर पाय टाकला तरच आपणांस विजयप्राप्ती होईल. परंतु महाराज परलोकवासी झाले, त्या दिवसापासून श्वेत गजराजाने अन्नपाणी सोडले आहे. काय करावे, हे आम्हालाही कळेनासे झाले आहे."

मंत्र्यांच्या तोंडी ते शब्द ऐकून राणी आपल्या शिशूला राजपुरुषालायक पोशाख चढवून श्वेत गजराजाजवळ घेऊन आली.

मुलाला हत्तीच्या पायाजवळ ठेवून ती त्याला प्रेमभराने म्हणाली - "गजराज, मालक गेल्याचा शोक आवर. आतां या नव्या मालकाच्या रक्षणाची जबाबदारी उचल. शत्रू चालून आला आहे. शत्रूचा गर्वभंग करणे एकट्या तुझ्या हातांत आहे. तुला ते मान्य नसेल तर आपल्या या मालकाला आपल्या पायांखाली तुडवून याचा शेवट कर."

राणीच्या तोंडी ते शब्द निघतांच श्वेत गजराज आपला अनावर झालेला शोक आवरून उठला आणि त्याने युवराजाला अलगद उचलून आपल्या मस्तकावर ठेवले आणि राणीच्या हातांत युवराजाला देऊन रणांगणाकडे प्रस्थान केले.

श्वेत गजराजाला उग्ररूप धारण करून येत असलेला पाहून कोशल राजाच्या सैन्याच्या थरकांप उडाला, आणि वाट फुटेल तिकडे ते पळू लागले.

हत्तीने सरळ कोशल राजाला आपल्या सोंडेने उचलून आणून शिशु युवराजांच्या पायासमोर आणून फेंकले.

कोशल राजाने माफी मागितली आणि काशीराजाच्या मंत्र्याच्या अनुमतीने कोशल देशी प्रयाण केले.

बोधिसत्वांना सातवे वर्ष लागले तोपर्यंत गजराजाने काशीराज्याचे रक्षण केले. बोधिसत्वांचा राज्याभिषेक यथासमयी झाला आणि गजराज त्यांच्या सेवेत आनंदाने राहू लागला.







# रामायण

अयोध्येहून रामलक्ष्मण सीतेसह निघाले ते करुण दृश्य हृदयाला विदीर्ण करणारे होतें. सारी अयोध्यानगर रडत होती. दुतर्फा लोक उभे होते. कांही लोक रथामागून धांवत होते. कांही रथा-समोर येऊन सुमंत्राला म्हणत होते -

"सुमंत्रा, रथ सावकाश हांक रे! ह्या तिघांना पाहण्याचे भाग्य पुन्हां या जन्मी मिळते कीं नाही कोणास ठाऊक!"

तिकडे राजवाड्यांत दशरथ एकदम जागा झाल्यासारखा उठला व म्हणाला,

"मला रामाला भेटावयाचे आहे." असे म्हणत तो राजवाड्यांबाहेर आला. कौसल्या व सुमित्रा, अंतःपुरांतील सर्व स्त्रिया दशरथापाठोपाठ राजवाड्याबाहेर आल्या.

राजा दशरथ ओरडून म्हणाला, "सुमंत्रा, रथ थांबव!" रामाने पित्याचा आवाज ऐकून मागे पाहिले.

त्याचे हृदय कळवळून आले. पण हृदय कठोर करून म्हणाला,

"सुमंत्रा! मला हे दृश्य पाहवत नाही. जोराने रथ हाक!"

सुमंत्राने रथाचा वेग वाढवण्याचा यत्न केला. पण घोडे पुढे पाऊल टाकीत नव्हते. त्या जनावरांनासुद्धां रामाचा वियोग असह्य वाटूं लागला.

दशरथ राजाला त्याचे मंत्री म्हणाले - "महाराज! रामाने लवकर परत यावे असे वाटत असेल, तर आमच्या मते महाराजांनी निरोप द्यायला जास्त पुढे जाऊं नये."

दशरथ राजा उभा होता तिथेच बसला. सर्व



मंत्रीही बसले. रथ दृष्टीआड होईपर्यंत सर्वजण तेथेच बसून राहिले.

राम बनवासाला निघून गेल्यानंतर अयोध्यानगरी ओसाड पडल्यासारखी झाली. सर्व नगरावर जणुं कांही प्रेतकळा दिसूं लागली.

दशरथ कांही अंतर रामाच्या मागे चालत गेला व हताश होऊन त्याने उभे करण्याचा प्रयत्न केला. दशरथ कैकेयीला म्हणाला - ''माझ्या अंगाला तूं स्पर्शदेखील करूं नकोस. आजपासून तूं माझ्याशी बोलूं नकोस व आपले तोंड दाखवूं नकोस. तुझा माझा संबंध कायमचा तुटला. डोळ्यासमोरून चालती हो. तुझ्या मुलाने माझे जरी श्राद्ध केले तरी मी त्याने केलेल्या पिंडदानाला हातदेखील लावणार नाही.'' असे सांगून दशरथ कौसल्येच्या महालांत निघून गेला.

सूर्यास्ताच्या सुमारास रामाचा रथ तमसा नदीच्या काठी येऊन पोंचला. अयोध्येचे नागरिक रथामागोमाग तेथपर्यंत येऊन पोंचले. रामाने त्यांना अनेक प्रकारे समजावून सांगितले. पण त्यांनी रामाबरोबर रानांत राहण्याचा हट्ट सोडला नाही. ते म्हणाले - ''जेथे राम तेथे अयोध्या!''

सुमंत्राने रथाचे घोडे सोडले व त्यांना पाणी पाजले. पण ते घोडे चरत नव्हते, किंवा पाणी पीत नव्हते. जनावरांच्या मनाचीच जर ही स्थिति झाली होती, तर रामाचे आप्तेष्ट व नागरिक यांच्या मनाची काय स्थिति झाली असेल हे सांगायलाच नको.

लक्ष्मण व सुमंत्र दोघांनी मिळून सीतारामांसाठी पानांचा बिछाना तयार केला. दोघे झोपल्यावर सुमंत्र व लक्ष्मण एका बाजूला बसून रात्रभर बोलत बसले.

रामाबरोबर जे नागरिक आले होते, ते दमून भागून गेल्यामुळे नदीकाठी झोंपी गेले. पहाटे रामाने उठून सुमंत्राला बोलाविले आणि म्हणाला, ''लोक उठण्याच्या आधी रथ दूर घेऊन चल. नाही तर हे सर्व रानांत येतील. त्यांच्या हालअपेष्टा मला पाहवणार नाहीत.''

सुमंत्र रथ तयार करून आला. राम रथांत बसल्यावर त्याला म्हणाला,

''बाबा रे! रथ पाचोळ्यावरून हांक. म्हणजे रथ कोठे गेला हे कळणार नाही. नाही तर लोक पाठोपाठ येतील.''



रामाने सांगितल्याप्रमाणे सुमंत्राने केले. रथ कोठे गेला हे कळणे शक्य नव्हते.

उजाडल्यावर लोकांना कळले कीं राम त्यांना सोडून निघून गेला. आपल्या दुर्दैवाला बोल लावीत ते अयोध्येला परतले.

उजाडण्याच्या सुमारास रथ पुष्कळ दूर निघून गेला. कोशल राज्याच्या दक्षिणेकडील प्रदेश पार करून गंगा नदीच्या कांठावर येऊन पोंचला. श्रृंगबेरपुरानजिक एका वडाच्या झाडाजवळ सुमंत्राने रथ थांबवला. घोडे सोडले. त्यांचे दाणापाणी उरकून राम, लक्ष्मण व सीता वडाच्या झाडाखाली बसले होते तेथे सुमंत्र आला.

इतक्यांत रामाचा सखा व गंगेकांठच्या रानाचा निषादराजा गुह, राम आल्याचे कळल्यावर त्याला भेटण्यासाठी आला. त्याला येत असलेला पाहून राम आनंदाने त्याला भेटायला सामोरा गेला.

गुह रामाला गदगदलेल्या स्वराने म्हणाला - ''रामा, माझ्या या गरीब वनालाच अयोध्या मानून तूं सुखाने इथे रहा. आज माझे केवढे भाग्य, कीं तूं माझा पाहुणा म्हणून आलास!''

नंतर गुहाने रामलक्ष्मण व सीतेसाठी स्वयंपाक करावयास सांगितले. गुह रामाला म्हणाला, ''रामा, तूं इथेच राहा. माझ्या या राज्याचे तूंच रक्षण कर. हे तुझेच राज्य आहे, व माझी प्रजा ही आजपासून तुझी आहे.''

गुहाला गाढ आलिंगन देऊन राम म्हणाला, ''सख्या मित्रा! तू मला भेटण्यासाठी पायी चालून



आलास, ह्याहून जास्त मला काय हवे? आपले हे राज्य तूंच संभाळ. मला वल्कल वस्त्रे धारण करून वनवास करावयाचा आहे.''

रात्री लक्ष्मण व निषादराजा गुह, या दोघांनी मिळून कोंवळी पानें अंथरून सीतारामांची शय्या तयार केली, व दोघे एका बाजूला जाऊन बोलत बसले.

कांहीं वेळाने गुह म्हणाला, ''बाळा लक्ष्मणा, तूं सुद्धां आतां झोंपलास तरी चालेल. मी रात्रभर पाहारा देतो. आम्हाला रात्रभर जागण्याची संवय आहे.'' पण लक्ष्मण म्हणाला,

''मी व्रत म्हणून सीतारामांच्या रक्षणाची जबाबदारी स्वतःवर घेतली आहे. तेव्हां मी झोंपणार नाहीं.'' म्हणून गुह लक्ष्मणाच्या सोबतीला रात्रभर त्याच्याशी बोलत बसला.

अयोध्येला जे कांहीं घडले ते ऐकून गुहाला फार वाईट वाटले.

सकाळी पक्ष्यांचा कलरव ऐकून सीता व राम जागे झाले. रामाने लक्ष्मणाला बोलाविले आणि तो म्हणाला, "चला, लवकर गंगेपार गेले पाहिजे." लक्ष्मण, निषादराजा गुह व सारथी सुमंत्र या दोघांना बोलावून घेऊन आला. राम गुहाला म्हणाला, "सख्या मित्रा! गंगा पार करून जावयाचे आहे." गुहाने आपल्या मित्रांना बोलावून नावा तयार करण्यास सांगितले.

रामानें सुमंत्राला बोलावून म्हटले - "तुम्ही मला वडिलांसारखे आहात. तुम्हांला अयोध्येला परत जायला सांगताना मला फार वाईट वाटते आहे. पण तुम्ही गेला नाहीत, तर बाबांना आमची जास्तच काळजी वाटेल. त्यांना आमचा सर्वांचा साष्टांग प्रणाम सांगून आमच्या वतीने सांगा की आम्हाला रानांत कसलाही त्रास नाही. आम्ही सर्व खुशाल आहोत. चवदा वर्षे पुरी होताच आम्ही त्यांच्या दर्शनास धांवत येऊं. भरताला आजोळाहून बोलावून घ्या व त्याचा राज्याभिषेक करून टाका. कारण कोणी राजा नसेल, तर प्रजेला फार कष्ट सोसावे लागतील."

सुमंत्र म्हणाला - "हा रिकामा रथ परत आणतांना पाहून मला राजा व प्रजा पाहतील व मला नांवे ठेवून तोंड फिरवून बसतील. त्यांना मी काय उत्तर देऊं? सारथी रणांगणावरून रथ रिकामा घेऊन आला, तर त्याचा मान राहील का? कौसल्या मातेला मी कोणत्या तोंडाने जाऊन सांगूं कीं मी रामाला सुखरूप रानांत पोंचवून आलो? त्यापेक्षां रामा, मला आपल्याबरोबर घेऊन चल. मी शिकार करून घेऊन येत जाईन, व तुला देत जाईन."



"सुमंत्रा! तूं परत गेला नाहीस तर मी रानांत गेलो आहे कीं नाही हे कैकेयी मातेला तरी कसे कळणार? बाबांनी दिलेले वचन पुरे झाले कीं नाही, याची खात्री नको कां त्यांना पटवून द्यायला?" राम म्हणाला.

शेवटीं सुमंत्राला परत जावे लागले. तो गेल्यावर रामाच्या सांगण्यावरून गुह वडाचा चीक घेऊन आला. रामाने केसांना तो चीक लावून वैराग्यांसारख्या जटा बांधून घेतल्या.

नंतर रामलक्ष्मण व सीता नावेत बसली. रामाने गुहराजाचा निरोप घेतला व नाव सोडण्यास सांगितले. नाव चालूं लागली. सीतेने नावेत बसूनच गंगेला नमस्कार केला, व म्हणाली - "गंगे भागीरथी! मी चवदा वर्षे रानांत राहून परत येईन तेव्हां तुझ्या नांवाने ब्राह्मणांना एक लक्ष गाई व अन्नवस्त्र दान करीन. तुझ्या तीरावर जी देवळे आहेत, त्यांचे दर्शन करून दानधर्म करीन. आम्हाला सुखरूप परत येण्यासाठी तूं आशीर्वाद दे."

नाव दुसऱ्या तीरावर पोंचली. रामाने, लक्ष्मण व सीतेसह वत्स देशांत पाऊल टाकले. तिथे पायी चालूं लागली. पुढे लक्ष्मण होता, त्याच्या मागे सीता व शेवटी राम चालत होता.

गंगेपलीकडे उभा राहून सुमंत्र तिघांकडे पहात होता. त्याच्या डोळ्यांतून सतत अश्रुप्रवाह चालू होता. तिघे दृष्टीआड होईपर्यंत तो टक लावून पहात होता.



राम लक्ष्मण शिकार करीत पुढे जात होते. त्या रात्री ते एका झाडाखाली उतरले. वनवासांतली ती पहिली रात्र होती. कारण आता बरोबर सुमंत्रदेखील नव्हता. दोघांनी मिळून सीतेचे रक्षण करावयाचे होते. राम व लक्ष्मण, ह्या दोघांच्या मनांत निरनिराळ्या विचारांनी काहूर माजला होता.

"बाबा किती दुःखी असतील? आणि कैकेयी माता! मुलाला राजा करण्याच्या प्रयत्नांत पतीचा घात करायला तयार झाली. धर्म, अर्थ व काम यांपैकी, काम हाच सर्वांत सामर्थ्यशाली आहे असे म्हटले पाहिजे. नाहीतर बाप स्वतःच्या

मुलाला कधी रानांत धाडील का? भरताला तरी राज्याचे सुख लाभेल का? कैकेयी मातेच्या हट्टामुळे राज्यावर केवढे हे संकट आले आहे? तिच्यामुळे पिता-पुत्रांची, माता-पुत्रांची ही ताटातूट झाली. हे अयोध्येचे राज्यच काय, सारे जग स्वत:च्या पराक्रमाने जिंकणे शक्य आहे. वडिलांच्या इच्छेकरितां तर आपण सिंहासनाचा त्याग केला आहे.''

रामाला झोंप आली नाही. त्याच्या डोळ्यांतून सारखा अश्रुप्रवाह चालू होता. लक्ष्मणाने ते पाहिले व त्याचे सांत्वन केले. तेव्हां रामाच्या मनाला जरा धीर आला. बनवास करण्याचे त्याने स्वत: होऊन कबूल केले होते, ही गोष्ट त्याला आठवली.

सकाळी तिघांनी गंगेवर स्नान केले, व गंगा, यमुना व सरस्वती या तीन नद्यांच्या पवित्र संगमावर ते येऊन पोंचले. जवळच भरद्वाज मुनींचा आश्रम होता. ते आश्रमांत पोंचले तोपर्यंत काळोख पडूं लागला होता. रामाने बनवास करण्याचे कारण सांगून त्यांना विनंति केली कीं, कोणाला त्रास होणार नाहीं व ऋषीमुनींची सेवा होऊं शकेल, असे रानांत राहण्यास सोयीस्कर स्थान सांगावे.

''तुला तुझ्या वडिलांनी निष्कारण रानांत पाठविले, हे मला पूर्वीच कळलेले आहे. पण त्यामुळे अनायासे तुझे दर्शन घडले. या आश्रमांतच तू एक पर्णकुटी करून चौदा वर्षे राहिलास, तरी मला आनंदच होईल.''

त्यांच्या सूचनेला नम्रपणे नकार देत राम म्हणाला, ''मुनिवर! आम्ही आपल्या आश्रमांत आहोत हे कळले तर सारी अयोध्या नगरी येथे येईल. म्हणून दूर कोठे तरी रहायला स्थान सांगावे. सीतासुद्धां बरोबर आली आहे. ती जनक राजाची लाडकी कन्या आहे. तिचे मन लागेल असे रमणीय स्थान सांगावे.''

त्यावर भरद्वाज त्याला म्हणाले - ''रामा, येथे राहणे तुला पसंत नसेल, तर येथून दहा कोसावर चित्रकूट नांवाचा एक सुंदर पर्वत आहे. तेथे जाऊन तूं राहा. त्या पर्वतावर सहस्त्रावधी वर्षांपासून मुनींचा वास होत राहिला आहे. तेथे आश्रम करून तूं राहावेस.''







# जुळ्या राजकन्या

कर्मपूरचा राजा बोपदेव याला दोन जुळ्या मुली होत्या. एकीचा रंग गोरा होता, तिचे नाव श्वेता होते. दुसरी सांवळी होती तिचे नांव कृष्णा होते. रंगात जरी फरक असला तरी नाकीडोळी व अंगापिंडाने त्या अगदी एकसारख्या दिसत होत्या. दोघी लाडाकौतुकात मोठ्या होत. हळूं हळूं दहा वर्षांच्या झाल्या.

एक दिवस श्वेता बागेंत फिरत असताना झाडावरून एका पक्ष्याचे घरटे खाली पडले. ते पाहून दोघी मुली घाबरून जोरजोरांत रडूं लागल्या. त्यांचे रडे ऐकून दासी धांवत तिथे आल्या. त्यांनी पक्ष्याचे पडलेले घरटे पाहिले. त्याच्यांत दोन अंडी होती. दासींनी अंड्यासकट ते घरटे चमेलीच्या झुडुपांत टाकून दिले. आणि राजकन्यांना घेऊन त्या महालात निघून गेल्या. पण घाबरल्यामुळे दोघी राजकन्यांना खूप ताप आला. औषध देऊन सुद्धां ताप उतरेना.

एक दिवस राजाला एक विचित्र स्वप्न पडले. स्वप्नांमधे त्याला एक पंचरंगी पक्षी दिसला. तो पक्षी मनुष्यवाणीत राजाला म्हणाला.

''हे राजा! मी देवपक्षी आहे. मी आपल्या बागेत एक घरटे करून त्यांत दोन अंडी घातली होती. त्यांना उबवून जन्मलेले पक्षी मी राजकन्यांना भेट म्हणून देणार होतो. पण आपल्या महालांतल्या मूर्ख दासींनी ती अंडी चमेलीच्या झुडुपांत टाकून दिली.''

''मी ताबडतोब ती अंडी तुला शोधून देतो.'' राजा म्हणाला.

''आता ते शक्य नाही. कारण ती अंडी फुटून त्यांत होती ती पिलें तर उडून गेली. ती पिलें आता राज्यांतल्या पश्चिमेकडील डोंगराच्या शिखरावर आहेत. तू स्वतः त्या शिखरावर जाऊन त्या पिल्लांना इकडे आणून त्यांना स्वादिष्ट दाणापाणी दिलंस, तर ते प्रसन्न होऊन तुला दोन

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



अंडी देतील. पांच वर्षांनंतर त्यांचे रत्नांत रुपांतर होईल. त्या पक्ष्यांना तुमच्याकडे आणल्याबरोबर तुझ्या मुलींचा ताप उतरुं लागेल.'' पक्षी म्हणाला.

''त्या पर्वताचे शिखर दुर्गम आहे. ते चढून जाणे अशक्य आहे. आजपर्यन्त कुणीही तिथे पोचलेले नाही.'' राजा म्हणाला.

''तू तिथे कसा जाशील हे कांही मला माहीत नाही. पण एवढे नक्की माहीत आहे, कीं जोपर्यन्त तू त्या पक्ष्यांना इथे आणणार नाहीस, तोपर्यन्त तुझ्या मुलींचा ताप कमी होणार नाही. आणखी एक गोष्ट ऐक. त्या अंड्यांची जेव्हां रत्ने होतील, तेव्हां त्यांतले एक पांढरे आणि दुसरे गुलाबी रंगाची असेल. श्वेताला गुलाबी रंगाचे रत्न हातांत घ्यायला लागेल. कृष्णाला पांढरा हिरा घेऊं दे. तुम्ही असं केलं नाहीत तर त्याचा त्या दोघींनाही फार त्रास होईल.'' असं सांगून पक्षी अदृश्य झाला.

राजा बोपदेव जागा झाला आणि त्याने राणीला सविस्तर आपल्याला पडलेल्या स्वप्नाबद्दल सांगितले.

दुसऱ्या दिवशी सकाळी लवकरच राजाने आपल्या मंत्र्यांना बोलावून आपल्या स्वप्नाविषयी सांगितले. पण मंत्री कांहीच सल्ला देऊं शकले नाहीत. त्यावर राजाने देवळांत जाऊन देवाची प्रार्थना केली.

अचानक देवाच्या मूर्तीखालून एक घोरपड बाहेर आली, आणि भिंतीवरुन सरपटत राजाजवळ येऊन थांबली.

त्यावर राजपुरोहित म्हणाले ''महाराज, देवाने आपल्यावर कृपा करून या घोरपडीला पाठवले आहे.''

''ही माझी कशी मदत करणार?'' राजा म्हणाला.

''देवानेच मार्ग दाखवला आहे. कारण डोंगराचा कडा घोरपडीइतके दुसरे कुणीच चांगल्या रीतीने चढू शकत नाही. तिची दगडावरची पकड अतिशय मजबूत असते. तिच्या कंबरेला दोरी बांधून डोंगराच्या शिखराबर पाठवा. मग दोर पकडून आपण व्यवस्थितपणे वर चढूं शकाल.''

राजपुरोहितांनी मार्ग सांगितला, पण सुरक्षेसाठी कड्याखाली मजबूत जाळी लावली. म्हणजे राजा पडला तरी जखमी होणार नाही. नंतर



घोरपडीला चांगले शक्तीवर्धक अन्न खायला दिले. एक दिवस राजा आपली तलवार व खाणेपिणे घेऊन डोंगरावर गेला. घोरपडीच्या कमरेला एक लांबलचक मजबूत दोर बांधून तिला डोंगराच्या शिखरावर राजाने पाठवले.

ती वर पोचल्याबरोबर दोन सैनिकांनी दोर घट्ट पकडला, घोरपड दगडाला चिकटून बसली. दोघांनी दोर खेचून बघितला. पण घोरपड जागची हलली नाही. त्यानंतर राजाने देवाची प्रार्थना केली आणि तो वर चढू लागला.

कुटुंबातली इतर मंडळी, मंत्री, सरदार आणि राणी काळजी करीत खाली उभे होते.

राजा शिखरावर पोंचला तेव्हां सूर्यास्त होत होता आणि चंद्र वर येऊं लागला. राजाने घोरपडीच्या कंबरेचा दोर सोडून तो एका खडकाला भक्कम बांधला. चांदण्यात राजाला एक छोटे झाड दिसले. त्याच्याजवळ गेल्यावर त्यावर बसलेले दोन पक्षी दिसले.

झाडाच्या खोडाला एक दोन डोकी असलेला सर्प वेढून बसला होता. राजाला बघताच आपले दोन्ही फणे काढून साप राजाकडे येऊं लागला. राजाने एका घावांतच सापाला मारले. साप खाली मरून पडला.

राजा बोपदेव ते पक्षी आणि घोरपडीला घेऊन जेव्हां खाली उतरला, तेव्हां सकाळ होत होती. घोरपडीला खाली उतरवताच अचानक तिने आपले पंख पसरले, आणि ती आकाशांत उडून गेली.



पक्षी घेऊन राजा महालांत येताच मुलींचा ताप उतरला. दुसऱ्या दिवशी पक्ष्यांनी दोन अंडी दिली आणि ते निघून गेले.

राजाने ती अंडी चांदीच्या टोपलीत ठेवून ती टोपली एका लोखंडी पेटीत घालून ठेवली.

बघता बघता पांच वर्षे झाली. श्वेता आणि कृष्णा आता पंधरा वर्षांच्या झाल्या होत्या. राजाने ती लोखंडी पेटी उघडली, तर सगळीकडे किरणांची प्रभा फाकली. त्या पेटीत अंड्यांऐवजी दोन सुरेख, तेजस्वी रत्ने झळाळत होती. एक पांढरे आणि दुसरे गुलाबी रंगाचे होते.

राजाने पेटी उघडली तेव्हां दोन्ही राजकन्या पण तिथे हजर होत्या.

राजा मुलींना म्हणाला, ''मुलींनो, ही रत्ने तुमच्यासाठीच आहेत. यांच्यामुळे तुमचे नशीब

उजळेल. कुठले रत्न कुणाचे आहे याची काळजी तुम्हाला नको. आज संध्याकाळी तुम्हाला दोघींना फुलदाणीमधे मी पांढऱ्या चाफ्याची फुले घालून देईन. तुम्ही त्यांच्यावर नजर ठेवा म्हणजे त्यांतले कुठले रत्न कुणाचे आहे, हे तुम्हाला आपोआप समजेल.''

त्याच दिवशी राजाने जादुगार मायापालला खाजगी सभागृहांत बोलावून घेतले आणि तो म्हणाला,

''मायापाल, रत्नें आलेली आहेत. आता तुला तुझ्या जादूचा वापर करावा लागेल.''

''महाराज, हे काम तर आपणही करूं शकता. ही इतकी अवघड गोष्ट थोडीच आहे? श्वेताला दिल्या जाणाऱ्या पांढऱ्या चाफ्याच्या फुलदाणीं-तल्या पाण्यांत लाल शाई मिसळा आणि फुलांचे देंठ पाण्यांत बुडून रहातील अशी काळजी घ्या.''

हळूंहळू फुलांच्या सर्व पाकळ्या आपोआप गुलाबी रंगाच्या होतील. ही गोष्ट मी आपणाला अगोदरच सांगितली आहे.'' मायापाल म्हणाला.

''तू सांगितलं आहेस खरं, तरीसुद्धां हे काम जोखमीचं आहे, ते तुझ्या हातूनच होऊं दे.'' राजा म्हणाला. आणि ते दोघे हसूं लागले.

त्या रात्री श्वेता आणि कृष्णाला पांढऱ्या चाफ्याची फुले असलेल्या फुलदाण्या मिळाल्या. दोन्ही फुलदाण्यांवर त्यांची नांवे लिहिलेली होती. त्या आपल्या महालात ठेवून त्या दोघीजणी अधूनमधून फुलांचे निरीक्षण करुं लागल्या. कृष्णाला दिलेली फुले तशीच पांढरी राहिली पण श्वेताची फुले मात्र गुलाबी रंगाची झाली.

ही बातमी ऐकून राजा बोपदेव खुष झाला. लवकरच तो मुलींच्या महालात गेला आणि त्यांना प्रेमाने म्हणाला,

''मुलींनो कुठले रत्न कुणाचे आहे हे तुम्हाला समजले असेलच.''

राजाने रत्नें ठेवलेली थाळी त्यांना दाखविली. श्वेताने गुलाबी रंगाचे रत्न उचलले. तर कृष्णाने पांढरे रत्न घेतले.

मायापालला राजाने मोठे बक्षिस दिले.




















## वाचक

मी १९६५ सालापासून चंदामामाचा वाचक आहे. १९८४ पासून मी चंदामामासाठी लिहितो. त्या वयांत घराच्या ओसरीवर बसून मी बहिणीबरोबर चंदामामा वाचत असे, ते दिवस अजून आठवतात. तो अनुभव सुखद होता. माझी पहिली गोष्ट प्रसिद्ध झाली तो माझ्या आयुष्यांतला एक मधुर क्षण होता. चंदामामाने मला वाचक व लेखक बनवले व प्रोत्साहन दिले.

आपल्या संस्कृतीची उजळणी चंदामामामुळे होते. मध्यंतरी या प्रवाहात कांही काळ जरी खंड पडला होता, तरी ईशकृपेने ही जीवननदी पुन्हां सुरुं झाली.

रामायणांत बालक रामाने चंद्रासाठी हट्ट धरला तेव्हां दशरथाने त्याला आरसा दाखवून त्याचा हट्ट पुरवला. आज तसा हट्ट असलाच तर त्याच्या हातांत हे मासिक ठेवता येईल. तो चंद्र आकाशांतले आकर्षण आहे, तर हे मासिक भूमीवरचे एक वरदान आहे. हा प्रकाश असाच अक्षय राहो ही माझी मन:पूर्वक इच्छा आहे.

*- रामानंद शर्मा, पाटणा*

चंदामामाशी माझी ओळख १९५६ पासूनची! तेव्हां त्याची किंमत ६० पैसे होती. वेताळ, बोधिसत्व, मांत्रिक व पौराणिक कथांनी भरलेले मासिक फार आकर्षक वाटत असे. आजही मुलांमुलींचे हे आवडते मासिक आहे. पूर्वी कोडीं नव्हती. आज ती बुद्धीला चालना देणारी आहेत.तेव्हां अधिक पाने होती. शंकर यांची चित्रेही मन मोहवत असत. चंदामामाचा प्रभाव नेहमी पडतो.

*-बालकृष्ण, मेरठ*

ऑगस्टचा अंक पाहून खूप आनंद वाटला. कारण आता गोष्टींना प्राधान्य मिळालेले आहे. त्याखेरीज इतक्या प्रदीर्घ काळानंतर वीरा, सीताराम, यांच्या चित्रांना स्थान दिले आहे.

*- वै. गोपाल, हैदराबाद*





# आदर

श्रीधाम हा जनकपुरीतला एक संपन्न रहिवासी होता. त्याला मदन व मंगल असे दोन मुलगे होते. दोघांचे शिक्षण पूर्ण झाले होते व दोघेही चांगले समजूतदार होते. श्रीधामने त्यांचे विवाह करून दिले, पण संपत्तीचा कारभार तो स्वतःच सांभाळत होता.

श्रीधामची पत्नी रमादेवीने त्याला एकदा सुचवलं, "आपले दोन्ही मुलगे समजूतदार आहेत, पण एकदा हातांत संपत्ती आली कीं त्यांची वृत्ती बदलूं शकेल. आपल्याविषयी त्यांच्या मनांत असाच आदर असेल कीं नाही या विषयी आपणच त्यांची परीक्षा घ्यायला हवी." पत्नीची सूचना मानून श्रीधामने घराची तीन भागांत वाटणी केली.

मधल्या भागांत तो स्वत: राहायला लागला आणि दोन्ही बाजूच्या भागांत दोन्ही मुलगे सपत्नीक राहूं लागले.

मालमत्तेबद्दलचे कामकाजही श्रीधामने मुलांच्यावर सोंपवले आणि ते कसे सांभाळतात त्यावर त्याने लक्ष ठेवले.

मदन नेहमी संपत्तीची वाढ कशी होईल याचा विचार करून पित्याशी चर्चा करीत असे. पित्याने होकार दिला कीं मग तो त्याची कल्पना अंमलात आणीत असे. तो यशस्वी होऊं लागला. तेव्हां तो समर्थ व योग्य आहे असे लक्षांत आले.

मंगल रोज सकाळी उठून श्रीधामचे वडील सुदामा यांच्या तसबिरीला नमस्कार करीत असे. सुदामाच्या नांवावर तो दानधर्म करीत होता, पण त्यासाठी वडिलांची अनुमती घेत नव्हता. तो स्वतःला सुदामाचा नातू म्हणवीत असे. आपले नांव सांगत नसे.

वर्षभरानंतर श्रीधाम पत्नीसह तीर्थयात्रेला निघला. तेव्हां त्याने आपली मालमत्ता दोन भागांत वाटली. लहान हिस्सा थोरल्या मदनला दिला आणि मोठा हिस्सा धाकट्या मंगलला दिला. मदनला वाईट वाटले. त्याची बायको त्याला म्हणाली, "दोघा भावांना सारखी वांटणी करायला हवी. नाहीतरी तुम्ही थोरले आहात, तेव्हां संपत्तीचा



मोठा हिस्सा तुम्हालाच मिळायला हवा. पण तुमच्या वडिलांनी तसं नाही केलं. आता तुम्हीच त्यांच्याजवळ तक्रार करा.'' मदनने बायकोची सूचना ऐकली.

श्रीधामने मदनची ही तक्रार ऐकून म्हटले, ''ही माझी कमाईची संपत्ती आहे. मला हवी तशी त्याची वांटणी करीन. तुझ्या आजोबांच्याबद्दल, म्हणजे माझ्या वडिलांबद्दल माझ्या मनांत अत्यंत आदर व श्रद्धा आहे. मंगल त्यांचे नांव राखतो आहे, म्हणून मी त्याला जास्त हिस्सा दिला. आणि ही वांटणी तात्पुरती आहे. तीर्थयात्रेहून परत आल्यानंतर तुझ्यांत मला बदल जाणवला, तर कदाचित माझ्या संपत्तीचा मोठा हिस्सा तुझ्या वाट्याला येईल.'' आणि तो पत्नीसह तीर्थयात्रेला निघून गेला. मंगल सुदामा आजोबांचा इतका आदर ठेवतो, हे कळल्यानंतर मदनला आश्चर्य वाटले.

त्याने धाकट्या भावाला म्हटले, ''आजोबा वारले तेव्हां तर तू तीन वर्षांचा होतास, आणि मी सहा वर्षांचा होतो. त्यांचा मोठेपणा मला ठाऊक नव्हता. पण त्यांच्याविषयी इतकी माया तुझ्या मनांत कशी काय निर्माण झाली?''

''ते आपल्या वडिलांचे वडील, हेच मुख्य कारण व मोठेपणा नाही कां? आपल्या वडिलांना संतुष्ट राखणे हे आपले कर्तव्य आहे.'' मंगलने सांगितले.

त्यानंतर मदनने याच्यावर खूप विचार केला. त्याने आजोबांच्या दोन तसबिरी बनवल्या. मंगलने केलेल्या तसबिरीपेक्षां त्या बऱ्याच मोठ्या होत्या. त्याने एक घरांत लावली व दुसरी गांवातल्या देवळांतल्या मंडपात लावण्यासाठी शंभर रुपयेही देवळांत दिले. सुदामाआजोबांचा मोठेपणा तो सर्वांना सांगायला लागला.

सीतापुर गांवात शंभू हा शेतकरी राहात होता. त्यावर्षी पीक चांगले आले नाही, तो कर्जबाजारी झाला आणि आत्महत्या करण्याखेरीज त्याला दुसरा कोणताही मार्ग सुचेना. तो आत्महत्या करण्याच्या तयारीने निघाला, तेव्हां वाटेत मंगल त्याला भेटला व त्याने त्याला वांचवले. त्याची चिंता समजल्यावर मंगल शंभूला म्हणाला, ''माझे आजोबा सुदामा यांच्या नांवाने मी तुला दहा मोहोरा देतो. त्या पैशांतून तू शेती कर. माझ्या आजोबांच्या पुण्याइने तुझी काळजी दूर झाली कीं माझी रक्कम मला परत कर.''

शंभू रक्कम घेऊन गांवी परत गेला. दुसऱ्या



दिवसी जेव्हां तो शेत नांगरत होता, तेव्हां त्याला जमिनींत पुरलेले गुप्तधन मिळाले. ते त्याने ग्रामाधिकाऱ्याला दाखवले. त्याच्यावर लिहिलेले शब्द वाचून तो शंभूला म्हणाला, ''तुझ्या पूर्वजांचेच हे धन त्यांनी तुझ्यासाठी सुरक्षित म्हणून पुरुन ठेवलेले होते. ते तुझेच आहे.''

आता शंभूचे भाग्य उजळले. तो जनकपुरीला गेला आणि त्याने मंगलला त्याचे पैसे परत दिले. त्यावर मंगलने सांगितले, ''यांत माझा कांहीही मोठेपणा नाही. ही सारी माझ्या सुदामा आजोबांची कृपा आहे.'' शंभू हात जोडून म्हणाला, ''सुदामजींची लोकप्रियता सर्वांना माहीत आहेच. म्हणून मी आमच्या गांवातल्या मंदिरात त्यांची तसबीर लावीन. त्यावेळी समारंभ करूं या. तुम्ही त्याचे अध्यक्ष व्हायला हवं. तेव्हां तुम्हाला आलंच पाहिजे.''

तीर्थयात्रा पूर्ण करून चार दोन दिवसांत गांवी परत येत आहोत, असा निरोप श्रीधामने मुलांना पाठवला. पण हा निरोप मिळण्यापूर्वीच शंभूच्या गांवी उत्सवाला येण्याचे निमंत्रण मंगलला मिळाले होते. वडील येईपर्यंत आपण परत येऊं असे मोठ्या भावाला सांगून मंगल सीतापुरला गेला.

जेव्हां श्रीधाम जनकपुरीला परत आला, तेव्हां मंगल गांवात नव्हता. मदनने आईवडिलांचे स्वागत केले. जेव्हां त्यांनी मंगलची चौकशी केली, तेव्हां मदनने त्यांना शंभूची कथा सांगितली व पुढे म्हटले, 'तुम्ही येणार आहात हे माहीत असूनदेखील मंगल सीतापुरला निघून गेला.'' आईवडील परत आले म्हणून मदनने गांवाला जेवण दिले. लोकांनी त्याबद्दल त्याचे कौतुक केले.



त्याच वेळी एक इसम तिथे येऊन विचारायला लागला, ''इथे मदन कोण आहेत?'' मदनने पुढे होऊन म्हटले, ''मीच मदन आहे. काय पाहिजे?'' त्यावर तो इसम म्हणाला, ''सीतापुराहून सुदामाच्या नातवाने मला निरोप द्यायला पाठवले आहे. ते उद्या संध्याकाळपर्यंत इथे येऊन पोंचतील.'' श्रीधामने हे ऐकून त्या इसमाजवळ सीतापुरांतल्या उत्सवाबद्दल सविस्तर माहिती विचारून घेतली आणि म्हटले, ''छान छान, आमचा मंगल वाडवडिलांचा आदर राखतो हं!''

गांवकरी घरोघरी परत गेल्यानंतर मदनने नाराजीच्या सुरांत म्हटले, ''जो आदर मंगलने तुमच्याबद्दल दाखवला, आणि मी जो तुम्हाला मानसन्मान दिला, त्यांतला मोठा फरक अगदी स्पष्ट दिसतोय. आजोबांचा मान म्हणाल तर



मंगलने त्यांच्या नांवाने दिलेले पैसे परत घेतले. शंभूने सुदामा आजोबांची तसबीर देवळांत लावली, ती बघायला तो सीतापुरला गेला. मी ही भरपूर पैसे खर्च करून आजोबांची तसबीर देवळांत लावली आहेच की! पण तुम्ही फक्त त्याचेच कौतुक करता आहात.''

श्रीधामने हंसून म्हटलं, ''अरे, तू कोणतेही काम केलेस तरी तुझ्या नांवाने करतोस, आणि तो जे कांही करतो ते आजोबांच्या नांवाने करतो. त्यांचा मान आणखी वाढवतो. तरीसुद्धा तू त्याच्या मनाचा मोठेपणा मान्य करीत नाहीस. आदर म्हणजे काय हे जर शिकायचं असेल तर दंडकारण्यांतल्या गुरुकुलांतल्या आचार्य सुमेध यांना जाऊन भेट. मंगल आला कीं तुम्ही दोघेही एकत्रच जा. म्हणजे तुझी शंका दूर होईल.''

दुसऱ्याच दिवशी संध्याकाळी मंगल परत आला. दोन दिवसानंतर दोघेही भाऊ आचार्य सुमेध यांच्याकडे गेले. मदनची तक्रार ऐकल्यानंतर सुमेध यांनी म्हटलं, ''तुम्ही दोघेजण कांही दिवस माझा शिष्य सुनाथ याच्याकडे राहा. तो जसे सांगेल तसे वागा.'' असं म्हणून आचार्यांनी त्या दोघांना सुनाथच्या हवाली केले.

दुसऱ्या दिवशी सुनाथने सूर्योदयापूर्वीच त्यांना उठवले, थंडगार पाण्याने स्नान करायला सांगितले आणि त्यानंतर जिथे सुमेध शिष्यांना शिकवीत होते, तिकडे ते तिघेजण गेले. त्या दिवशीचा पाठ पूर्ण झाल्यानंतर सुमेध त्यांना म्हणाले, ''आता तुम्ही रानांत जा आणि जी फळे जमिनीवर पडली आहेत, ती गोळा करा. झाडावरची फळे अजिबात तोडू नका. हिंसा करू नका. मिळालेले अन्न एकत्र करा, आणि सर्वांनी ते वांटून खा.''

मदन, मंगल व सुनाथ रानांत गेले. वाटेत सुनाथने त्यांना झाडावर चढून फळे तोडण्यास सांगितले. मदनने फळे तोडण्यास नकार दिला व म्हटले ''मी गुरुंच्या सांगण्याप्रमाणेच वागेन.'' मंगल झाडावर चढणारच होता, तेवढ्यांत एक वानर झाडावर लोंबकाळत होता. सुनाथने सांगितले म्हणून मंगलने वानरावर एक लहानसा दगड फेकून मारला. वानर तिथून पळून गेला. तो झाडावर चढला आणि सुनाथने सांगितली तेवढी फळे मंगलने तोडली. ''आपण ही फळे तोडण्यासाठी भरपूर त्रास घेतला आहे. तेव्हां आता ही इतरांना द्यायची नाहीत. फक्त आपणच खायची.'' सुनाथ म्हणाला. मंगलनेही मान डोलावली. पण,



गुरुजींच्या आज्ञेविरुद्ध कांहीही करायला मदन कांही तयार नव्हता. तो पळतच सुमेधकडे गेला आणि जे घडलं ते सविस्तर सांगितलं. त्यांनी मंगलला बोलावलं आणि खुलासा विचारला.

''गुरुजी, आपण सांगितलं होतं कीं जोपर्यंत आश्रमांत राहातोय, तोपर्यंत सुनाथच्या आज्ञेप्रमाणे करायचं. मी आपल्या आदेशाप्रमाणे वागलो.'' मंगलने खुलासा केला.

त्यावर मदनने म्हटलं, ''जेव्हां गुरुजी पाठ शिकवत होते, तेव्हां त्यांनी कोणता आदेश दिला होता? ते तू पाळलेस कां?''

त्यावर सुमेधनी हंसत म्हटलं, ''मी जे आदेश दिले होते, ते फक्त माझ्या शिष्यांसाठीच होते, तुमच्यासाठी नव्हते. तुम्ही दोघे इथे विद्यार्थी म्हणून आला नाहीत. मी तर तुम्हाला इतकेच म्हटले होते कीं सुनाथ सांगेल त्याप्रमाणे करा. जर सुनाथ माझे आदेश पाळत नसेल, तर त्याचा अर्थ असा होतो की त्याने माझा अनादर केला आहे. तेव्हां आता तूच सांग, मोठ्यांचा आदर मंगलने ठेवला आहे कीं तू?''

मदन गोंधळून गेला. त्याने म्हटलं, ''वास्तविक सुनाथने आपला अनादर केला, म्हणून हा घोळ निर्माण झाला.'' त्यावर सुमेधनी उत्तर दिलं, ''यांत सुनाथची कांहीही चूक नाही. तुम्हा दोघांची परीक्षा घेण्यासाठीच तसे करायला मी त्याला सांगितले होते. जर माझ्या शिष्यांच्या वागणुकीत कांही अर्थ लपला असेल, आणि जर तो तुम्हाला समजला नाही, तर माझ्याबद्दलही तुमच्या मनांत आदर नाही हे स्पष्ट आहे. मी बरोबर सांगतोय ना?''

आता मदनला उलगडा झाला कीं मालमत्तेची वांटणी करताना पित्याचा अंतस्थ विचार त्याला प्रथम नीट समजला नव्हता. त्याने लगेच सुमेधचे पाय धरले व त्यांची क्षमा मागितली. नंतर दोघे भाऊ जनकपुरीला परत गेले. मदनने पित्याजवळ आपली चूक मान्य केली.

त्यावर श्रीधामने मदनला सांगितलं, ''मला वाटलं होतं कीं माझ्या निर्णयाविरुद्ध तू आपले मत देणार नाहीस. आणि मालमत्तेची तशी वांटणी करणे हे माझ्या दृष्टीने देखील ठीक नव्हतेच.'' नंतर श्रीधामने दोघांना समान वांटणी दिली आणि आपले उर्वरित आयुष्य देवधर्मात घालवले.



       

तेवढ्यांत पुढे असलेली नाव बोगद्याच्या कडेवर खरंच आपटून फुटली, आणि ज्या नावेत केशव वगैरे बसलेले होते तिच्यावर आदळून त्यांची नाव पाण्यांत उलटली.

जे नावेत होते, ते नदीत पडले. ''ज्येष्ठा, कनिष्ठा, तुम्ही ठीक आहात ना? आपले वन्यवासी मित्र सुखरूप आहेत ना?''

केशवच्या पित्याने जोरांत ओरडून विचारले. त्याला उत्तर देण्यासाठी चौघेही एकदम ओरडले.

''अहो बाबा, तुम्हाला पोहायला येतंय कां? कीं आम्ही तुम्हाला मदत करूं?'' केशव पित्या-जवळ जाऊं लागला.

''कनिष्ठा, इथे बाबा कोण आहे?'' म्हातारा खेकसला.'' शिष्यांनो, गडेजंगच्या सहकाऱ्यांनो, तुम्ही बोगद्यांच्या दगडी कपारीपासून स्वतःला वांचवा. हा मीनानंद उत्तम पोहणारा आहे. तुम्ही आपापली काळजी घ्या. त्या वन्य मित्रांकडे लक्ष ठेवा. माझी चिंता मुळीच करूं नका.'' तो पुढे म्हणाला.

थोड्या वेळांतच ते बोगद्यांत वेगाने पोहायला लागले. अ[illegible]

''इथेही [illegible] असला पाहिजे. आपण खूप उंचीवरून खाली नदीच्या पाण्यांत पडणार आहोत. केशव, सावधान, वन्य साथींनो, सांभाळा ... साव...'' जयमल्ल ओरडला.

बोगद्यांतले पाणी तीसचाळीस हातांच्या उंचीवरून खाली नदींत पडत होते. केशव व इतर सारेजण त्या प्रवाहांतून खाली नदींत पडले.

सर्वांनाच क्षणभर वाटले कीं आपण आता मेलो आहोत. नंतर भानावर येऊन त्यांनी एकमेकाला हांका मारायला सुरवात केली. सुदैवाने ते खाली एखाद्या खडकावर न पडता सरळ खोल पाण्यांतच पडले होते. सारे सुरक्षित होते, हे पाहून ते नदी पार करण्यासाठी जोराने पोहायला लागले.

पांचीजण थकले भागलेले होते आणि आता किनाऱ्याला लागणार तितक्यांत तलवारी, खंजीर घेतलेले कांही रानटी लोक त्यांना नदीकांठावर हिंडताना दिसले.

*(क्रमशः)*





वेताळ कथा

# चंदनाची बाहुली

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, झाडावरून त्याने शव खाली उतरवून खांद्यावर घेतले, आणि त्याने स्मशानाकडे जाणारा रस्ता धरला. तेव्हां शवामधे लपलेल्या वेताळाने म्हटलं, ''राजन्, ज्या महान लक्ष्यासाठी तू एवढे कठोर परिश्रम करतो आहेस, ते मिळवण्यासाठी अपार कष्ट व चिकाटीची आवश्यकता आहे. हे दोन्ही गुण तुझ्यांत आहेत. पण जेव्हां भाग्यदेखील जोडीला असते, तेव्हांच मनुष्य यशस्वी होतो. तेव्हां इच्छा पूर्ण होतात, लक्ष्यप्राप्ती होते. परंतु कधीकधी परिश्रम कारणी लागतात, अपेक्षेपेक्षां जास्त फळ मिळते, पण कांहीजण जाणूनबुजून ते यश हातांतून निसटूं देतात.



तुला सावध करावे म्हणून मी एका तरुण शेत-कन्याची गोष्ट तुला सांगतो. ऐकताना तुझा थकवाही दूर होईल.'' आणि वेताळाने गोष्ट सांगायला सुरवात केली.

शृंगवर जमीनदारीमधे साकेतपुरी गांव होते. त्या गांवात दिलीप हा एका संपन्न शेतकऱ्याचा मुलगा होता. शेतीच्या कामांत त्याला फारसा रस नव्हता, पण हस्तकलांच्यामधे तो हुशार होता.

कोणतीही कला एकदा बघितली की तो लगेच ती चांगली शिकत असे. चिकण माती, चुना दिसला कीं त्यांतून तो सुरेख फुलदाणी किंवा बाहुली बनवत असे. हातात वेळू मिळाला की त्यांतून सुरेल बांसरी तयार होत होती. एखादे सुंदर दृश्य पाहिले कीं ते चित्र पुरे होईपर्यंत तो झोंपू शकत नसे. एकलव्याप्रमाणे दिलीपने या कलांचे शिक्षण स्वतःच घेतले होते.

त्यावर्षी शृंगवर जमीनदाराची मुलगी मणिमाला हिचा अठरावा वाढदिवस मोठ्या धामधुमीत साजरा होणार होता. जमीनदारांनी दवंडी पिटवून सर्व जनतेलाच उपस्थित राहाण्याचे निमंत्रण दिले होते. साकेतपुरीच्या गांवकऱ्यांनी दिलीपला विनंती केली कीं ह्या शुभप्रसंगी एखादी अद्भुत व अनुपम वस्तू जमीनदारकन्येला भेट द्यायला तयार करावी. अशी वस्तू कशी असावी त्यावर दिलीपने बराच विचार केला, आणि अखेरीस लालचंदनाचे सिंहासन बनवायचा त्याने निर्णय घेतला. दुसऱ्याच दिवशी रक्तचंदनाची लांकडे मागवण्यांत आली. कामाला सुरवात झाली.

सिंहासनाच्या हातांची रचना राजहंसाच्या पंखांसारखी केली होती व हरीणांच्या पायांसारखे पाय केले. मागच्या प्रभावळीवर रंगीत दगड बसवले, व फुलवेलींची नक्षी कोरली. जेव्हां काम पूर्ण झाले, तेव्हां उरलेल्या चंदनाच्या लांकडातून त्याने एका लहानशा सुंदर बाहुलीची मूर्ती कोरली. ती मूर्ती अतिशय मनमोहक होती. ती त्याने स्वतःसाठी सुरक्षित ठेवायचे ठरवले. तिला सुरेखशी रेशमी साडी बनवली व अलंकारांनी ती मूर्ती सजवली.

सिंहासन व ती चंदनी बाहुली पाहून गांवकरी फारच खूष झाले. त्यांनी शृंगवरला जाऊन ते सिंहासन जमीनदाराच्या मुलीला भेट दिले. ते सुंदर सिंहासन पाहून ती बेहद्द खूष झाली. त्या



कलाकाराला भेटायची इच्छा तिने पित्याजवळ प्रकट केली. दिलीपला बोलावणे गेले.

दिलीपने येताना ती चंदनी बाहुलीदेखील आणली होती. मणिमालाला ती बाहुली खूप आवडली. तो कलाकारही तिला खूप आवडला.

''पिताश्री, ही अतिसुंदर बाहुली मला हवी.'' मणिमालाने सांगितलं.

''सरकार, क्षमा असावी. मी ही मूर्ती माझ्यासाठीच बनवली आहे. ती देता येणार नाही.'' दिलीपने स्पष्टच सांगितलं.

''मागशील ती किंमत मिळेल. सांग, किती हवेत?'' जमीनदाराने विचारलं.

''सरकार, ही बाहुली म्हणजे माझी कला आहे, माझा प्राण आहे. ती मी कुणालाही देणार नाही.'' दिलीपने निश्चयी स्वरांत सांगितलं.

''ही प्राणहीन बाहुली तुझा प्राण आहे? ही मणिमाला तुझी व्हायला तयार आहे. पण ती बाहुली माझ्या स्वाधीन कर.'' मणिमालाने म्हटलं. तिच्या मनांत दिलीप व त्याच्या कलेबद्दल प्रेम निर्माण झाले होते.

''ही बाहुली म्हणजे माझ्या मनांतल्या सुंदरीची प्रतिमा आहे. अशीच पत्नी मला हवी आहे. माफ करा, मी आपल्या इच्छेला होकार देऊं शकत नाही.'' दिलीपने गंभीरपणे सांगितलं.

त्याचा निश्चय आणि खंबीरपणा पाहून अहंकारी मणिमाला दुखावली गेली. पण आपला राग बाहेर न दर्शविता तिने पित्याकडे पाहिले. जमीनदाराला मुलीचे मन समजले. तो दिलीपला



म्हणाला, ''दिलीप, तू एक अद्वितीय कलाकार आहेस हे मान्य आहे! त्याबद्दल तुझं अभिनंदन! मी तुला सहा महिन्यांचा अवधी देतो. त्याकाळांत तुला तुझ्या इच्छेप्रमाणे अनुरूप मुलगी मिळाली तर ठीक. नाहीतर तुला ही बाहुली माझ्या मुलीला द्यावी लागेल आणि तिची इच्छा पूर्ण करावी लागेल. जर तू तसं केलं नाहीस, तर तुला माझ्या जमीनदारीमधून बहिष्कृत करीन.'' जमीनदाराने रागावून म्हटलं.

''आपली इच्छा!'' असे उत्तर देऊन दिलीप तिथून निघाला आणि आपल्या कल्पनेमधली सुंदरी शोधत गांवोगांवी हिंडत राहिला. त्याला कांही तशी गुणसुंदरी कुठे दिसली नाही. निराश होऊन एक दिवस थकलेल्या अवस्थेत तो अरण्यांतून जात होता. भुकेने कळवळला होता,



आणि उपाशी असल्यामुळे बेहोष होऊन खाली पडला. जेव्हां त्याला शुद्ध आली, तेव्हां आपण एका झोपडीत आहोत असे त्याला दिसले.

त्याच्यासमोर एक सामान्य रुपाची भिल्ल युवती होती. दिलीपने जेव्हां डोळे उघडले, तेव्हां त्या युवतीने त्याला प्यायला पाणी दिले आणि म्हटले, ''तुम्ही रानांत बेशुद्ध पडला होतात. त्या पर्वतदेवीची कृपा म्हणून आत्ता शुद्धीवर आला आहात. मला वाटतं डोंगरी लिंबाच्या सरबतात मद्य घातला होता, त्याचा प्रभाव तुमच्यावर पडला असावा. थांबा, मी आत्ताच वडिलांना बोलावते.''

असं म्हणून ती बाहेर पळाली. तिचं नांव मंगला होतं. तिचा पिता तिथल्या लोकांना जडीबुटीची औषधे देऊन उपचार करीत असे.

तो मुलीच्याबरोबर झोंपडीत आला व त्याने दिलीपची नाडी पाहिली व विचार करून म्हटले, ''तुम्ही फार अशक्त झाला आहात. चार दिवस इथे राहा आणि आराम करा. माझी ही मुलगी, मंगला, तुमची सेवा-शुश्रूषा करील.''

दिलीप कबूल झाला. चारी दिवस तो मंगलाकडे नीट बघत होता.

एका दिवशी एक वाघ शिकाऱ्याच्या हातून वांचला, पण जखमी झाला होता. त्याच्या पायातून रक्त वाहायला लागले. मंगलाने त्याच्या पायावर मलमपट्टी केली.

''तो क्रूर पाणी तुला खाऊन टाकील याची तुला भीती नाही वाटली?'' दिलीपने आश्चर्याने विचारले.

''नाही, ते क्रूर प्राणी आहे खरा, पण भूक लागेल तेव्हांच तो कुणावर तरी हल्ला करतो. आपल्या डोळ्यांमधे जर त्याला प्रेम, दया, दिसली तर तो क्रूर प्राणी आपल्याला त्रास देणार नाही.''

मंगलाने हंसून सांगितले. ती झाडपाला आणून बारीक वाटत होती, गरम काढे करून देत होती आणि वडिलांना मदत करत होती. सगळे घरकाम स्वतः करीत होती. गोड आवाजांत छान गाणीदेखील ती गात असे. कुणाला कसलीही मदत हवी असली तर ती पुढे होऊन मदत करीत असे.

चार दिवसानंतर निघण्यापूर्वी ती चंदनी बाहुली दिलीपने तिला देऊं केली व पुढे म्हटले,



''तुझी मदत मी कधींच विसरूं शकणार नाही. त्याची आठवण म्हणून ही बाहुली मी तुला भेट देतो आहे. घे.''

''नको, माझी मनोमन इच्छा आहे कीं या बाहुलीसारखी सुंदर पत्नी तुम्हाला मिळावी. तुम्ही सुखरूप घरी पोंचलात, तर तेवढे मला पुरेसे आहे.'' आणि तिने बाहुली घ्यायला नकार दिलाच, व आंतून रानांतल्या मधाची बुधली घेऊन तिने ती दिलीपला दिली.

''तुझा मधच नव्हे, तर त्यापेक्षा जास्त गोड तुझे मन आहे. तू माझ्याशी लग्न करशील कां?'' दिलीपने आपल्या मनांतली गोष्ट तिला विचारली.

मंगला लाजली व हंसतच झोंपडीत गेली. आठवडाभरांतच मंगलाच्या वडिलांनी त्यांचे लग्न लावले आणि मंगलाची दिलीपबरोबर पाठवणी केली.

दिलीप पत्नीसह शृंगवरला गेला आणि जमीनदाराला भेटून त्याने सांगितलं, ''मालक, आपल्या कन्येने चंदनाची बाहुली मागितली होती, ती घ्यावी. मी ही बाहुली त्यांना देतोय. आपण स्वीकार करावा.''

''त्याची काय किंमत देऊं?'' जमीनदाराने विचारले.

''मी त्याची किंमत मागत नाही. मी ही त्यांना भेट देतो आहे.'' दिलीपने अत्यंत नम्रपणे सांगितले. त्याच वेळी तिथे आली आणि म्हणाली, ''ही भिल्ल तरुणी तुझ्या कल्पनेतली सुंदरी आहे कीं काय? बाहुली इतकी सुंदर आहे.



त्यामानाने ही कांहीच नाही. ही माझ्यापेक्षां सुंदर आहे वाटतं? पिताश्री, दिलीप हारला आहे. त्याची बाहुली घेऊन टाका आणि त्याला कठोर शिक्षा द्या.''

जमीनदाराने एकवार आपल्या मुलीकडे बघितले आणि नंतर दिलीपला म्हटले, ''दिलीप, मला माफ कर. माझ्या मुलीच्या अहंकारी आणि गर्विष्ठ स्वभावाची मला लाज वाटते. या बाहुलीची किंमत म्हणून नव्हे, परंतु तुझ्या विवाहाची भेट म्हणून मी तुला ही हजार नाणी देतो आहे. त्याचा स्वीकार कर.'' दिलीपने भेट स्वीकारली. जमीनदाराला प्रणाम केला आणि मंगलासह तो आपल्या गांवी जाण्यास निघाला.

वेताळाने ही गोष्ट सांगितली आणि राजाला विचारले, ''राजन्, दिलीपने एका बाहुलीसाठी

जमीनदाराची मुलगी आणि त्याची अपार संपत्ती स्वीकारायला नकार दिला. आणि शेवटी अशी भिल्ल मुलगी त्याने निवडली. ती सुंदरही नव्हती, किंवा संपन्नही नव्हती. हे त्याचे अज्ञानच नाही कां?

ठीक आहे, त्याने मंगलाशी लग्न केले. मग त्याने तिला घेऊन आपल्या गांवी परत जायचे. सरळ जमीनदाराकडे जायची काय जरूर होती? जर जमीनदाराने त्याला कडक शिक्षा दिली असती, तर मंगलावर अन्याय झाला नसता कां? त्याचा हा स्वभाव तिरकस नाही वाटत? हे पाहून असं वाटतं कीं दिलीप हा केवळ एक कलाकार आहे, त्याला विद्वत्ता, व्यवहारज्ञान हे मुळीच नाही.

असल्या मूर्खाची जमीनदार क्षमा मागतो आणि वर त्याला इनामही देतो. हे तुला विचित्र वाटत नाही कां? माझ्या शंकांची उत्तरे तुला माहीत असून तू मौन पत्करलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील हे लक्षांत ठेव.''

विक्रमार्कांनी म्हटले, ''दिलीप केवळ एक निपुण कलाकार नाही, तर तो प्रामाणिकही आहे. सुंदर रूप असून भागत नाही, मनही सुंदर असावे लागते.

जमीनदाराच्या मुलीला पाहून हे सत्य त्याला उमजले. मंगलाला पाहून त्याला आंतरिक सौंदर्य कसे असते ते समजले. आणि त्याने तिच्याशी विवाह केला. जे इतरांचा मान राखत नाहीत, ज्यांच्यामधे अधिकाराचा दर्प भरलेला असतो, जे स्वार्थी असतात, ते माणूस म्हणवून घेण्याच्या योग्यतेचे नसतात.

मणिमाला त्याचे जिवंत उदाहरण आहे. दिलीपच्या वर्तणुकीत अविचारी किंवा अव्यवहारीपणा नाही. जमीनदाराला भेटायला जाणे ही त्याच्या सज्जनपणाची खूण आहे. ते पाहून जमीनदाराचेही डोळे उघडले आणि त्याने दिलीपची क्षमा मागितली.''

राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावरून जाऊन बसला.

*(आधार : पद्मलता यांची रचना)*






## स्थापत्यशास्त्रांतले आश्चर्य



मुघल साम्राज्याच्या ऐन उत्कर्षाच्या काळाचे उदाहरण म्हणजे आग्र्याचा किल्ला. हा शहाजहान बादशहाने इ.स. १६३८-४८ या दरम्यान बांधला. याच्या भिंती कठीण दगडांच्या बांधलेल्या आहेत. शत्रूंना रोखण्यासाठी दोन भिंती बांधलेल्या आहेत. बाहेरची भिंत ७० फूट उंच असून आंतली ३० फूट उंच आहे. या दोन्ही भिंतींमधे खंदक आहे. त्यांत पूर्वी सुसरी असत आणि दोन भिंतींमधल्या जमिनीच्या पट्ट्यावर हिंस्र वाघांचे वसतीस्थान होते. दिवाण-इ-आमच्या प्रशस्त इमारतीत बादशहा काळ्या संगमरवरी सिंहासनावर बसून जनतेला दर्शन देत असे. दिवाण-इ-खास हा खाजगी दरबार पांढऱ्या संगमरवरी दगडांचा आहे. जवळच्याच चमेली मनोऱ्यांत शाहजहानची बेगम मुमताजमहल राहात असे. तिने चौदाव्या अपत्याला जन्म दिला आणि ती वारली. याच जागेवर कांही वर्षांनंतर शाहजहानला कैदेत ठेवण्यांत आले होते. तिथल्या सज्जांतून तो यमुनेच्या पैलतीरावरच्या ताजमहालकडे पाहात आपले दिवस घालवीत होता.

### तुम्हास माहीत आहे कां?




२४ कॅरट सोने असले तरी ते सर्वस्वी शुद्ध नसते. त्यांत थोडेसे तांबे मिसळलेले असते. शुद्ध सोने इतके नरम असते कीं साध्या हाताच्या



# नुपुरांची छमछम

जयंत गंगवर जमीनदाराच्या कचेरीत काम करीत होता. तो फार हुशार व सुस्वभावी होता. म्हणून कचेरींत लागल्यानंतर थोड्याच दिवसांत त्याने चांगले नांव कमावले. प्रथम त्याचे आईवडील ललितपुरांत राहात होते. त्याला नोकरी लागल्यावर तेही गंगवरला आले, व मुलाबरोबर राहूं लागले. शहरांत असला तरी जयंतला आपल्या गांवाची आठवण येत होती. त्याची तिथल्या मित्रांशी मैत्री कायम होती. संधी मिळेल तेव्हां तो त्यांना भेटायला जात असे.

दिवाळीच्या सणानिमित्त जयंत कांही दिवस ललितपुरला राहायला आला. महेंद्र, शिवदास, गुणशेखर आणि मनोहर, हे त्याचे जानी दोस्त होते. तो गांवी आल्यामुळे ते बेहद्द खूष झाले. त्यांची घरे एकमेकांशेजारीच होती. जयंत चार दिवस राहाणार होता, म्हणून त्याने एकेक दिवस प्रत्येक मित्राकडे राहायचे ठरवले.

पहिल्या दिवशी जयंत महेंद्रच्या घरी राहिला. जेवण झाल्यानंतर हे मित्र लहानपणीच्या आठवणींत रंगले होते. गांवातल्या गप्पा व देशांतली राजकीय परिस्थिती यांचीही चर्चा झाली. त्यानंतर इतर तिघे आपापल्या घरी गेले.

रात्री झोंपण्यापूर्वी महेंद्रने अत्यंत भक्तीभावाने हनुमानाचे स्मरण केले व हनुमान चालिसाचे पठण केले. जयंत हंसत म्हणाला, ''अरे वा, तुझी देवभक्ती बरीच वाढलीय. बैरागी वगैरे होण्याचा बेत नाही ना?''

''नाही रे, एकूण वातावरणांत भीती वाढते आहे. म्हणून रक्षण करण्यासाठी हनुमानाची प्रार्थना मी करतो, तो संकटमोचन आहे ना?'' महेंद्र म्हणाला.

''कां?'' जयंतने विचारलं.

''ती एक मोठी कथा आहे. रात्र फार झालीय, झोप आता.'' असं म्हणून महेंद्रने विषय टाळला व कारण सांगितले नाही. जयंत कांही न बोलता झोपी गेला.

मध्यरात्रीनंतर जयंतला जाग आली. त्याला नुपुरांचा छमछम असा मंद आवाज ऐकूं आला. त्याने वळून पाहिलं तर महेंद्रने पांघरूण ओढून घेतलं होतं, तो भीतीने थरथर कांपत होता आणि कांहीतरी मंत्र पुटपुटत होता. थोड्याच वेळांत नुपुरांची छमछम बंद झाली.

सकाळी जयंतने महेंद्रला त्या आवाजाबद्दल विचारलं.

''तुलसुद्धां तो आवाज ऐकूं आला कां? काय सांगू? एक महिना झाला, ही कामिनी डाकीण इथे तिथे फिरत असते. घर सोडूनही जाता येत नाही. स्वतःचे घर सोडून कसा जाणार? त्या डाकिणीपासून सुटका व्हावी म्हणून मांत्रिकाची मदत घेतली. गंडादोरा बांधला. त्यासाठी भरपूर खर्च केला. पण कांहीही उपयोग झाला. नाही.''

''अरे मित्रा, हल्लींच्या या दिवसांतदेखील तू भूत, पिशाच. यांच्यावर विश्वास ठेवतोस?'' जयंतने आश्चर्याने विचारलं.

''अरे, नाहीतर काय करूं? जेव्हांपासून त्या नुपुरांचा आवाज कानावर येऊं लागला, तेव्हां-पासून घरामधे सगळं कांही अशुभ होऊं लागलंय.''

महेंद्र म्हणाला. ''पण याबाबतीत तू आपल्या मित्रांशी कांही बोलला नाहीस कां? त्यांनी कांहीतरी उपाय सुचवला असता. ही काय गडबड आहे त्याचा उलगडा झाला असता.'' जयंतने विचारलं.



''ह्याबाबतीत त्यांना कांही सांगितलं तर ते मलाच अंधश्रद्धाळू, गांवढळ, जुनाट, वगैरे म्हणतील, आणि माझी टिंगल करतील, म्हणून मी गप्प बसलो.'' महेंद्र म्हणाला.

दुसऱ्या दिवशी जयंत शिवदासच्या घरी राहिला. त्या रात्रीदेखील त्याला नुपुरांची छमछम ऐकूं आली. इथे तो आवाज जरा मोठा वाटत होता.

दुसऱ्या दिवशी जयंतने याबद्दल शिवदासला जेव्हां विचारले, तेव्हां शिवदासने उत्तर दिले, ''मोठ्याने बोलूं नकोस. ह्या आवाजाबद्दल मी देवळांतल्या पुजाऱ्यांजवळ बोललो, तर ते म्हणाले कीं ही छमछम महालक्ष्मीची आहे, आणि ती घरांत प्रवेश करायला काचकूच करते आहे. तिला प्रसन्न करण्यासाठी त्यांनी माझ्यासाठी खास पूजा व खर्चिक अर्चना केल्या आहेत.''

नागेश्वर गर्ग



त्यावर जयंत कांहीच बोलला नाही. "कांही झालं तरी ही गोष्ट आपल्या मित्रांना मात्र सांगू नकोस हं!" एखादे गुपित सांगावं अशा थाटांत शिवदास बोलला.

तिसरी रात्र जयंतने गुणशेखरच्या घरी घालवली. त्यारात्री तो नुपुरांचा छमछम आवाज जरा मोठ्याने ऐकू येत होता. जयंतने बघितलं तर गुणशेखरही जागाच होता. जयंतने विचारलं, "नुपुरांचा आवाज ऐकू येतोय ना?"

"हो, अरे, कांही दिवसांपासून मीही हा आवाज ऐकतोय. आमच्या घराच्या मागल्या अंगणातल्या जमिनीत गुप्तधन आहे. ते बाहेर येण्यासाठी धडपडते आहे. हा त्याचाच आवाज आहे. म्हणून मी रोज मागल्या अंगणात थोडेफार खणतो. पण अजून ते कांही सांपडलेले नाही. पण हे मात्र कुणालाच सांगू नकोस." गुणशेखरने हळू आवाजांत सांगितले.

जयंत पडल्यापडल्या विचार करीत होता. त्याच्या मित्रांनी ह्या आवाजाची जी कारणे सांगितली, ती कांही खरी नव्हती, पण त्याच्यामागे कांहीतरी वेगळेच कारण असावे असे जयंतला वाटले. प्रत्येकाने आपापल्या स्वभावानुसार कांहीतरी अनुमान काढले होते. खरं काय असेल ते पाहाण्याचा त्यांनी प्रयत्नच केला नव्हता.

चौथ्या दिवशी जयंत मनोहरच्या घरी राहिला, तेव्हां त्या रात्री तर नुपुरांची छमछम फारच जवळून ऐकू येत होती. जयंतने पाहिलं तर जेव्हां आवाज आला तेव्हां मनोहर शेजारच्या खोलींत गेला होता. थोड्या वेळानंतर छमछम आवाज बंद झाला. मनोहर परत आला आणि निमूटपणे पलंगावर झोंपला.

सकाळीं, जयंतने मनोहरला नुपुरांच्या त्या छमछम आवाजाबद्दल विचारले, तेव्हां मनोहरने खाली मान घालून सांगितले, "तुला तर ठाऊक आहे कीं माझं नुकतचं लग्न झालंय. माझ्या बायकोला झोंपेंत चालण्याचा आजार आहे. आता रोज मी जागा राहून तिच्यावर कांही रात्रभर लक्ष ठेवू शकणार नाही. म्हणून मीच तिच्या पायांत नुपूर बांधायची युक्ती केली. जेव्हां ती झोंपेत चालायला लागते, तेव्हां त्या नुपुरांच्या आवाजाने मी जागा होतो. मी उठून तिला परत घेऊन येतो आणि तिला पलंगावर झोपवतो. एकदा ती झोंपली, कीं मग मात्र पुन्हां उठत नाही."

"पण मग तुझ्या बायकोच्या नुपुरांचा आवाज दिवसा कसा ऐकायला येत नाही?" जयंतने शंका व्यक्त केली.

"तिला पायांत नुपुर, सांखळ्या, घालायला मुळीच आवडत नाही. म्हणून ती झोपली की नंतरच मी तिच्या पायांत नुपूर बांधतो आणि ती उठण्यापूर्वी ते काढून ठेवतो. आत्ताच तर आमचं लग्न झालंय. हळूंहळूं तिला समजावून सांगेन, आणि मग तिला नुपुर घालायची संवय करायला लावीन." मनोहर म्हणाला.

नुपुरांच्या छमछम आवाजाचे रहस्य आता उलगडले. दुसऱ्या दिवशी जेव्हां सर्वजण एकत्र भेटले, तेव्हां जयंतने त्यांना सांगितले, "तुम्ही जो आवाज ऐकलात, तो ना कामिनी पिशाचिनीचा होता, ना महालक्ष्मीचा होता. तो होता मनोहरच्या पत्नीच्या पायांतल्या नुपुरांचा! आता तरी तुम्ही आंधळेपणाने उगीच पैसे खर्च करू नका. पुन्हां असा कांही प्रसंग ओढवलाच, तर तर्कशुद्ध व संगतवार विचार अगोदर करा, आणि नंतर त्यावर उपाय करा. आता निवांत व शांत मनाने तुम्हाला जगता येईल."

आपल्या अविचारीपणाबद्दल त्याचे मित्र शरमिंदे झाले होते. पण नंतर मात्र एकमेकांकडे बघितल्यावर त्यांना हंसू आवरेना.










# खास बातम्या

## अंतराळवीरांना फिल्म दाखवली



आधुनिक विमानांत प्रत्येक आसनासाठी टीव्हीचा पडदा असतो. यात्रिकांना दिलेल्या यादीतून चित्रपट निवडता येतो. आंतरराष्ट्रीय स्पेस स्टेशनवरच्या वीरांना हॅरी पॉटरचा चित्रपट पाहायची इच्छा होती.

'नासा'ने त्यांना तो दाखवून खूष केले! लक्षांत घ्या, हे स्पेस स्टेशन पृथ्वीपासून ३५४ किमी दूरवर अवकाशात प्रदक्षिणा घालते आहे. आता कांहीही शक्य आहे, नाही कां?

## भारतीय अंतराळ वीरांगना



मलेशियांत स्थायिक झालेली पस्तीस वर्षांची वनजा शिवसुब्रह्मण्यम इंजिनियर आहे. आंतरराष्ट्रीय स्पेस स्टेशनवर पुढल्या वर्षी राहाण्यासाठी तिची निवड झाली आहे.

मलेशियांतल्या तिघा पुरुष उमेदवारांबरोबर प्रशिक्षण घेण्यासाठी व वैद्यकीय व तांत्रिक चांचण्यांसाठी ती सध्यां मॉस्कोतल्या रशियन स्पेस एजन्सीबरोबर आहे.

### न्यूट्रीन कोडे - ३

१. भारतातल्या कोणत्या एकाच राज्यांत हिऱ्यांची खाण आहे?
अ) महाराष्ट्र आ) मध्य प्रदेश
इ) राजस्थान ई) कर्नाटक

२. अरबी समुद्राला खालीलपैकी कोणती नदी मिळते?
अ) नर्मदा आ) गोदावरी
इ) कृष्णा ई) कावेरी



# गोल दगडाची कहाणी

विद्यानंदस्वामी विजयपुरांत आले होते. त्या दिवशी संध्याकाळी ते प्रवचन देणार होते व नागरिकांना भेटणार होते. सुरेख रितीने सजवलेल्या मंचाच्या डाव्या बाजूला एका खास आसनाची व्यवस्था केली होती. जमीनदार जगपती राव यांनी विद्यानंदांचा आपल्या घरी पाहुणचार तर केलाच, त्याशिवाय त्यांच्या प्रवचनासाठी आवश्यक ते धनही दिले होते. त्यांच्यासाठीच ते आसन ठेवले होते. पण जगपती राव तिथे न बसता ते खाली इतर श्रोत्यांच्याबरोबर बसले.

विद्यानंद स्वामी ते पाहून प्रसन्न झाले व म्हणाले, "मानवांत जे गुण असायला हवेत, त्यांत विनय हा प्रमुख आहे. विनय असला की सहनशक्ती, श्रद्धा, हे गुण आपोआप येतात. असं म्हणतात कीं मनुष्याला संपत्ती, पत्नी, घर व संतान जी मिळतात, ती सारी पूर्वजन्मीची पुण्याई असते. पण त्यावर भरंवसा ठेवून गप्प बसणे हा कांही शहाणपणा नसतो. इहलोक व परलोकांतल्या सुखासाठी निरंतर प्रयत्न हवेत. त्यापेक्षांही जास्त हवी परमेश्वरी कृपा. तेव्हांच जीवनाचे ध्येय साध्य होऊं शकते आणि सद्गती प्राप्त होते. तोपर्यंत सहनशक्ती आवश्यक असते. त्यासाठी नम्रपणा हवा. जीवनांत चढउतार असले तरी विनय हा हवाच. त्याची संवय असावी. घमेंड नसावी. उदाहरण म्हणून मी तुम्हाला एक गोल दगडाची कहाणी सांगतो. लक्ष देऊन ऐका." आणि ते सांगू लागले.

गोदावरी नदीच्या कांठावरच्या सुंदर प्रदेशांत आंबे, फणस, नारळ व केळ्यांसारखी फळझाडे होती. एकदा गोदावरीला पूर आला. त्या पुराच्या पाण्यांत गाळाबरोबरच डोंगरातून घरंगळत आलेले कांही दगडही होते. त्या गडगडत येणाऱ्या दगडांच्याबरोबर एक गोल दगड वाहात आला,



आणि कांठावरच्या नारळाच्या झाडांमधे येऊन रुतला. तो नारळाच्या मुळांत अडकला होता त्यामुळे तो पुढे जाऊं शकेना. हळूंहळूं पूर ओसरला. सूर्याच्या किरणांमुळे तो दगड चमकायला लागलेला पाहून नारळाच्या झाडांना आश्चर्य वाटले. एका परिपक नारळाने त्या दगडाला म्हटले, ''अे, कोण आहेस रे तू? कुठून आलास? इथे कां थांबलास?'' त्याने गर्जतच विचारले.

दगड गप्प राहिला. तेव्हां दुसऱ्या झाडावरच्या नारळाने त्याची टवाळी करीत म्हटले, ''ह्याची कथा मला चांगलीच ठाऊक आहे. ह्याचा जन्म पर्वतांत होतो आणि प्रवाहाबरोबर तो खाली येत राहातो. प्रवाहाच्या वेगामधे मोठ्या दगडांचे लहानलहान तुकडे होत राहातात. ह्यादेखील त्या बारीक दगडांपैकीच एक आहे. गडगडत इथे आला, जखमा सोसल्या आणि आता त्याचा गरगरीत गोल आकार झालेला दिसतो आहे. बिचारा पुरामुळे इथे आपल्यांत आला आणि अडकला; नाहीतर आणखी जखमा सोशीत त्याचा एक लहानसा वाळूचा कण झाला असता आणि समुद्राच्या तळाशी जाऊन हा थांबला असता.''

''बिचारे हे गोल दगडगोटे; सहनशक्तीला देखील कांहीतरी सीमा असावी! आता आमचं पहा, आम्ही आत्माभिमानाने भरलेले असतो. आभाळाला स्पर्श करीत आनंदाने आणि अभिमानाने आम्ही जगतो.'' आणखी एका



नारळाने सांगितले. तरीदेखील तो गोल दगड गप्प होता. असाच कांही काल उलटला.

नदीजवळच्या एका गांवात एक शिवालय होते. तिथला पुजारी एका थाळींत नारळ, गंध, फुले, उदबत्ती, देवापुढे ठेवून पूजा करीत होता. नारळाने आपले तिन्ही डोळे उघडले आणि तो देवाकडे पाहूं लागला. तिथे गोल काळा दगड चमकत होता. तो उंचावर ठेवलेला होता. नारळाला झाडांमधे अडकलेल्या त्या गोल दगडाची आठवण झाली. तो नारळ त्या दगडाचा विचार करीत होता. तेवढ्यांत गोल दगड नारळाला म्हणाला, ''अरे मित्रा, त्यावेळची तुमची उच्च स्थिती व स्वाभिमान कुठे गेले? तूच म्हणत होतास की सहनशक्तीला देखील सीमा असावी. माझी चेष्टा करीत म्हणत होतात कीं मला ह्या गोष्टींची माहिती नाही, मला स्वाभिमान नाही, अपमान सोसणे हेच माझ्या भाग्यांत लिहिलेले आहे, वगैरे, वगैरे! माझ्यावर दया दाखवत होतात आणि स्वतःला अमर, अटल समजत होतात. पण आता काय झाले?''

तेवढ्यांत पुजा ाने आ ्या हा ात नारळ घेतला आणि दगडावर आ ून त्य ा दोन तुकडे केले. पश्चात्तापाने ना ळ दगडाला म्हणाला, ''मित्रा, मला क्षमा क त्या दिवशी उंच झाडावर होतो, स्वतःला उ समजत होतो, आणि तुला शिव्या देत होतो. आता माझी वाईट परिस्थिती आहे. मी स्वतःला समर्पित करतो आहे. आमच्यापेक्षांही उंच पर्वतावर तुझा जन्म झाला, पवित्र गोदावरीत राहिलास आणि पूजेसाठी योग्य बनलास. सहनशक्तीपेक्षां जास्त मोठा असा कोणताही गुण नाही, हे तू सिद्ध केलंस.'' त्यानंतर शिवाला अर्पण केलेला नारळही पवित्र झाला व प्रसादरूपाने भक्तांना तो वाटला गेला.''

विद्यानंद स्वामींनी पुढे म्हटलं, ''नदीच्या प्रवाहांत अडकलेल्या गोल दगडाच्या प्रमाणे माणसांनादेखील जीवनामधे उतार-चढावाशी सामना करावा लागतोच. सारे कांही सहन करून जो माणूस सन्मार्गावर चालतो, तो एक दिवस उन्नत स्थिती प्राप्त करतो आणि धन्य म्हणवला जातो.''












# चांदोबा प्रश्नावली-११



देणाऱ्यांपैकी एकाला
रु.२५०/- दिले जातील.

*या प्रश्नावलीत विचारलेले सर्व प्रश्न २००५ मधे जानेवारी ते डिसेंबर या अंकांत असलेल्या गोष्टींवर आधारित आहेत. तुम्ही त्या वाचलेल्या आहेत. जर तुम्हाला त्या आठवत असल्या तर तुम्ही लगेच उत्तरे देऊं शकाल. लक्षांत नसतील तर बाराही अंक पुन्हां नजरेखालून घाला. म्हणजे उत्तरे शोधताना मजा वाटेल.*

**अचूक उत्तरे देणाऱ्यांची संख्या एकापेक्षां जास्त असेल तर बक्षिसासाठी सोडत काढण्यांत येईल व पांच विजेत्यांना समान रक्कम वाटून दिली जाईल.*

त्यासाठी : १. उत्तरे लिहा. २. आपले नांव, वय (१६ वर्षांखालील मुलांसाठीच ही स्पर्धा आहे) व पिनकोडसहित पत्ता. ३. एका कुटुंबातून एकाच व्यक्तीला भाग घेता येईल. ४. वर्गणीदार असलात तर तो क्रमांक. ५. पाकिटावर चांदोबा प्रश्नावली-९ असे लिहा व चंदामामाचा संपूर्ण पत्ता लिहून आम्हाला पाठवा. ६. डिसेंबर अखेर आपली प्रवेशिका आम्हाला मिळाली पाहिजे. ७. फेब्रुवारी '०७च्या अंकात निकाल जाहीर होईल.

१. "बुद्धिमान लोक जेव्हां एखादा अपराध करतात, तेव्हां शिक्षा देणाऱ्याबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त करतात." शिल्पाचार्यांचे बोलणे ऐकून राजाने आपली चूक सुधारली. तो राजा कोण होता? हा कोणत्या गोष्टींतला अंश आहे?

२. आंतरराष्ट्रीय गरिबी निर्मूलन दिवस केव्हां असतो?

३. सिद्धार्थ जेव्हां कठोर तपश्चर्या करीत होते, तेव्हां एका गर्भवती गोपिकाने नवस केला होता कीं जर तिला मुलगा झाला तर ती पुन्हां त्यांच्या दर्शनाला येईल. त्या गोपिकेचे नांव काय?

४. भल्याबुऱ्याचा निर्णय प्रामुख्याने मनांतला उद्देश असतो, त्या व्यक्तीचे कर्म नसते. हे धर्मसूत्र कोणत्या वेताळकथेत सांगितलेले आहे?

५. पिढ्यानपिढ्या चालत आल्या नांवाखाली कांही कायदे डोळे मिटून अंमलात आणले जातात. त्यामुळे अनेकदा अनर्थ होतात. हे करणे चूक आहे, अशी सूचना कोणत्या कथेंत दिलेली आहे?

६. हे चित्र कोणत्या कथेंत आहे?





# न्हाव्याचे नशीब उजळले!

सेवाराम हा एक गरीब न्हावी होता. गरीब म्हणण्याचे कारण की त्याला आपल्या कुटुंबाची साधी गुजराण करण्याइतकी देखील कमाई होत नव्हती. एखाद्या दिवशी डाळ, तांदूळ, भाजी आणण्याइतके पैसे मिळत, तर दुसऱ्या दिवशी फक्त तांदूळ विकत घेण्यापुरतेच पैसे असत. हल्ली तर त्याची बायको शिवानी त्याला रागाने बावळट, नालायक, असेही म्हणायला कमी करत नव्हती. ती माहेरच्या चांगल्या परिस्थितीचे वर्णन करी. तिथे तिला चांगलेचुंगले खायला प्यायला व सुंदर कपडे मिळत होते.

एका संध्याकाळी सेवाराम हात हालवीत घरी परत आला. झोंपी जाईपर्यंत शिवानीने त्याच्यावर आगपाखड केली होती. त्याला बराच वेळ झोंप येत नव्हती. त्याने मनाशी कांहीतरी निर्णय घेतला आणि नंतरच त्याला जरा वेळ झोंप लागली. तो पहाटे उठला, त्याने स्नान केले आणि कंगवे, फण्या, वस्तरे, कात्री, केसाची तेले, वगैरे रोजचे सामान त्याने धोपटींत घातले आणि तो घरांतून निघाला. "आता मी परत येईन, तो पुरेसे पैसे मिळवल्या-नंतरच येईन!"

दारांत उभी राहून बघत राहाणाऱ्या शिवानीला त्याने बजावले. ती पाहातच राहिली. तिने त्याला परत बोलावले नाही. त्या गांवात रोज दाढी करून घेणारे किंवा वरचेवर हजामतीसाठी बोलावणारे सधन लोक नव्हते, ह्याची तिला जाणीव होती. गांवातले गरीब गांवकरी जमेल तेव्हांच आणि जमेल तितकेच पैसे सेवारामला देत होते. पुष्कळदा नंतरचा वायदा करीत होते. साहजिकच, सेवाराम बिचारा सदा गरीब बापुडाच राहिला होता.





गांवातून बाहेर पडल्यावर तो बराच वेळ चालत होता. त्याने डेरेदार वृक्षाखाली जरा आराम केला. कुणीतरी वाटसरू दिसला तर एखादी झटपट दाढी वा हजामत करून पुढचे मोठे गांव गांठता येईल, अशी भाबडी आशा त्याला वाटत होती. पण कुणीच दिसला नाही. रात्र झाली तेव्हां त्याने एका उंच झाडाच्या खाली थकलेले हातपाय पसरले आणि त्याला लगेच झोंप लागली.

त्या झाडावर एक भूत राहात होते. त्याला सेवारामचे जोरदार घोरणे ऐकूं आले. चांगले भोजन मिळणार या आशेने भूत खाली आले. या माणसाला प्रथम घाबरवायचे आणि नंतर पकडायचे, असा भुताने विचार केला. त्याने मोठ्याने आवाज काढले, पण सेवाराम गाढ झोपलेला होता. भुताने सेवारामचे खांदे पकडून त्याला गदागदा हलवले. जेव्हां सेवाराम हळूंहळूं डोळे उघडायला लागला, तेव्हां भुताने वेडीवांकडी भेसूर मुद्रा केली. ''आता मी तुला आनंदाने खाऊन टाकणार आहे!'' असे किंचाळत भुताने सेवारामच्या गळ्याजवळ आपले हात नेले.

खूप लांबवर चालत आल्यामुळे सेवाराम इतका थकला होता, कीं मरणाची त्याला फिकीर नव्हती. जर त्याच्या नशिबांत भुताचे जेवण व्हायचा योग असला, तर तेच होणार होते. पण अचानक त्याला बायकोची आठवण आली. तो जर मेला, तर तिचा सांभाळ कोण करील? त्याला तिची काळजी होती. तिच्यासाठी त्याला जगणे भाग होते. त्याला एक युक्ती सुचली. ''मूर्खपणा करूं नकोस!'' सेवारामने भुतासमोर हात हालवून म्हटले. पण भूत कांही जागचे हलले नाही. ''मी एक भूत पकडून ठेवले आहे, ते तुला पाहायचे आहे कां?'' सेवारामने आपली धोपटी उघडली व त्यांतून हातांत धरायचा आरसा त्याने बाहेर काढला, व भुतासमोर धरला. ''हे बघ-माझ्या या पिशवींत आणखी आहेत झोपलेली!''

आरशांतला भेसूर चेहरा पाहून भूत दचकले. एक चीत्कार काढून ते म्हणाले, ''आऽऽऊऽऽ! मला तुझ्या पिशवींत या भयंकर प्राण्यांबरोबर नको रे ठेवूस!'' त्याने विनवीत सेवारामचे हात धरले.

न्हाव्याच्या हातांत अजून आरसा होताच. तो दरडावून म्हणाला, ''मी नाही ठेवणार, पण त्यासाठी तू पहांट होण्यापूर्वी मला कांही मौल्यवान रत्नें आणून दिली पाहिजेस.''

क्षणार्धातच भूत दिसेनासे झाले. न्हाव्याने आपल्या धोपटीत आरसा परत ठेवला आणि कोंबडा आरवण्याची तो वाट पाहूं लागला. पण पहांटेपूर्वीच एक गठुळें घेऊन भूत परत आले. त्याने ते गठुळे सेवारामसमोर ठेवले, आणि उघडून त्यांतली चमचमणारी रत्ने दाखवली.

''ठीक आहे, मी आता तुला जाऊं देतो. मी गांवात जाईन आणि संध्याकाळी उशीरा इथे परत येईन.'' असं म्हणून सेवारामने मोठ्या गांवाचा रस्ता धरला. त्याला ती रत्ने विकून थोडेफार पैसे कमवायचे होते. त्याच्या खेडेगांवात ती नेऊन त्याला कांहीच उपयोग झाला नसता.

त्याशिवाय ती सगळी रत्ने एकाच वेळेला विकणेही योग्य झाले नसते. म्हणून जवाहिऱ्याकडे जायच्याऐवजी सेवारामने गांवातला वस्तू गहाण ठेवून पैसे देणारा सावकार शोधला. महिनाभरा-साठी ती रत्ने सावकाराकडे ठेवून सेवाराम नंतर ती घेऊन जाणार होता असे ठरले. सावकाराने रत्ने पारखून घेतली. ती खरी होती हे पाहिल्या-नंतर त्याने सेवारामला वाजवी किंमत उसनी दिली.

परत जाण्यापूर्वी सेवारामने चांगली खानावळ कोणती आहे ते सावकारला विचारून घेतले. सेवारामला खूप भूक लागली होती. खानावळ मिळाल्यावर सेवाराम पोटभर जेवला. एका बंद घराच्या रिकाम्या ओसरीवर त्याने दुपारी चांगली





झोप काढली. संध्याकाळपर्यंत तो ताजातवाना झाला आणि ज्या झाडाखाली रत्ने मिळाली होती, त्या झाडा-जवळ तो परत गेला.

एव्हाना अंधार झाला होता. त्याने आपल्या धोपटीवर डोके ठेवले आणि तो लवंडला. त्याला झोप आली नाही. तो भुताची वाट पाहात होता. त्या भुताने जवळच्या दुसऱ्या झाडावर राहाणाऱ्या एका भुताला बोलावले होते आणि आदल्या रात्री काय घडले ते त्याला सांगितलेले होते. दोन्ही भुतांनी मिळून ती दिलेली रत्ने परत कशी मिळवता येतील, त्याची एक योजना आंखली, व तो आरसाही चोरायचा, असे त्यांनी ठरवले. मध्यरात्र झाली तशी दोन्ही भुते सावकाश खाली उतरली, आणि सेवाराम जागा आहे कीं झोपला आहे, तो पाहायला लागली. कारण त्याच्या नकळत ते धोपटी त्यांना पळवायची होती.

सेवारामने झोपेचे नुसते सोंग केलेले होते. तो अगदी सावध होता. त्या दोघांनी त्याची धोपटी जराशी ओढली आणि सेवारामने टुणकन उडी मारली. चटकन त्याने आपली धोपटी उघडली व त्यांतून आरसा आणि कात्री बाहेर काढली. एका हातांत आरसा आणि दुसऱ्या हातांत कात्री पकडून तिची दोन्ही टोके त्या दोघां भुतांच्याकडे त्याने वळवलेली होती. तो कात्रीने कापण्याचा आवाज करीत राहिला. त्याने आरसा भुतांच्यासमोर धरला होता. आता भुतांना आरशाची भीती वाटली कीं कात्रीची वाटत होती, हे सांगणे कठीण होते. ते परत झाडावर चढून बसणार, तितक्यांत सेवाराम ओरडून म्हणाला, "माझं बोलणं पुरे होईपर्यंत हलूं नका. आज तुमच्यापैकी एकजण मला सोन्याच्या मोहरा आणून देईल. पहाटेपूर्वी तुम्ही इथे परत यायला हवे. जर तुम्ही आला नाहीत तर याद राखा - माझ्या पिशवींत असलेल्या इतर भुतांप्रमाणेच तुमची अवस्था होईल."

दुसरे भूत आता भिऊन पळायला लागले. सेवारामला हंसू आले, पण त्याने कात्री व आरसा घेऊन लढायला जाणाऱ्या सैनिकासारखे आपले रणनृत्य तसेच चालू ठेवले. पहिले भूतही आता



पार बावचळून गेले होते. पहांटेपूर्वी जर त्याचा मित्र परत आला तर त्यांना परत झाडावर जाता आले असते.

दुसरे भूत पहांट व्हायच्यावेळी परत आले. त्याने एक लहानसे गांठोडे उघडून त्यांतली सोन्याची नाणी सेवारामला दाखवली. तेव्हां सेवारामला फारसे आश्चर्य वाटले नाही. आपली शस्त्रे हातांत तशीच धरून तो म्हणाला, "आता पहांट झालेली आहे, आणि मला जायला हवे. मी संध्याकाळी पुन्हां येईन, आणि तुम्ही दोघेही जर नीट वागलात, तर मी माझ्या धोपटीतली भेसूर मंडळी तुमच्याजवळ देईन. तेव्हां आत रात्रीपर्यंत थांबा."

त्याने कात्री व आरसा धोपटीत ठेवला व तो निघाला. दिवस उजाडला होता, तेव्हां भुतांना त्याच्याबरोबर जाणे कांही शक्य नव्हते. सेवाराम मोठ्या गांवाच्या दिशेने न जाता, आपल्या खेडेगांची जायला निघाला. त्याला बघून शिवानीला नवल वाटले. तिला वाटलं होतं कीं तो बरेच दिवस बाहेरगांवी जाईल.

दोन दिवसांत कायकाय घडलं ते सेवारामने शिवानीला सांगितलं. शिवानी थक्क होऊन त्याच्याकडे बघतच राहिली. जेव्हां ती भानावर आली तेव्हां ती त्याला म्हणाली, "साऱ्या जगांतले तुम्ही सर्वांत हुशार आणि चतुर पुरुष आहात."

"मी याच शब्दांची वाट पाहात होतो." आता श्रीमंत झालेल्या सेवाराम न्हाव्याने उत्तर दिले.





# मूल्यवान स्मारक

शिववर्मा हा विदिशा राज्याचा शासक होता. त्याच्या राज्यांत प्रजाजन सुखी होते. त्या वृद्ध राजाच्या मनांत एक विचित्र इच्छा निर्माण झाली. त्याने लागलीच आपल्या चारी मंत्र्यांना बोलावून सांगितले, "प्रजेने माझी कायम आठवण ठेवावी अशी माझी इच्छा आहे. म्हणून मला एक स्मारक निर्माण करायचे आहे. ते कसे असावे याबद्दल तुम्ही सल्ला द्या."

विष्णुशर्मा हा वृद्ध मंत्री म्हणाला, "महाराज, किंमती संगमरवरी दगडाचे एक अप्रतिम मंदिर बांधावे."

दुसरा मंत्री अनंतशर्माने सल्ला दिला, "त्या सुरेख संगमरवरी मंदिरात जर मूल्यवान रत्ने लावली, तर जेव्हां प्रजाजन ती पाहातील, तेव्हां त्यांना आपले जुने वैभवशाली दिवस आठवतील, ते आपली प्रशंसा करतील आणि त्यांत धन्यता मानतील."

"त्या मंदिरात जर आपली सुवर्णप्रतिमा विराजमान झाली तर प्रजेला आपण सदैव जिवित आहात असेच वाटेल." तिसऱ्या मंत्र्याने मत दिले.

चौथा मंत्री मणिशर्मा मात्र निमूट बसला होता. तेव्हां शिववर्माने त्याला विचारले, "तुम्ही गप्प आहात. तुमचं याविषयी काय मत आहे?"

"तिघा मंत्र्यांचे अभिप्राय आपले वैभव जरूर दर्शवितात. पण काळ बदलू शकतो. भविष्यांत काय घडेल ते सांगता येणार नाही. आपण त्यांत अनभिज्ञ असतो. त्यांतून हे कलियुग आहे. कांहीजण म्हणतात सत्ययुग होऊन गेले. पण कांहीजणांचा गाढ विश्वास आहे कीं आगामी काल मानवजातीसाठी शुभप्रद आहे. त्यांत काय खरं आहे, ते सांगता येणार नाही. उद्या कांहीही होवो, सामान्य जनतेच्या कल्याणासाठी कोणतेही काम केले तरी ते चांगलेच होईल. प्रजा ते लक्षांत ठेवील. म्हणून माझं मत आहे कीं तिन्ही मंत्र्यांच्या विचारा-प्रमाणे सुंदर मंदिर तर अवश्य बांधावे. पण त्याच्या चारी बाजूंना तऱ्हेतऱ्हेची फुलझाडे व फळझाडे लावावीत व एक उद्यान तयार करावे. त्यांत एक विश्रामगृह असावे. तिथे येणाऱ्या यात्रिकांची थकावट दूर होऊं शकेल." मणिवर्माने स्पष्टपणे आपले विचार मांडले.

महाराजांना ही कल्पना आवडली. ते म्हणाले, "मणिशर्मा, तुम्ही रास्त सल्ला दिलात. जीवन म्हणजे एक बुडबुडा. मी किती दिवस आहे ते मला ठाऊक नाही. प्रजेच्या हिताची कामे लगेच सुरुं केली पाहिजेत. उत्तरेला वाहणारी भवतारिणी नदी आणि नगराच्या मधे रिकाम्या असलेल्या विशाल भूप्रदेशांत एक सुंदर वनराई निर्माण झाली पाहिजे. तिथे रोपे लावण्याचे काम लगेच सुरु करायला हवे" राजाने आनंदाने आज्ञा केली.

दुसऱ्याच दिवशी त्यानुसार काम सुरुं झाले. वर्षभरांतच राजाचे निधन झाले. राजाला वचन दिल्याप्रमाणे त्या वनांत मध्यभागी संगमरवरी दगडाचे सुंदर मंदिर बांधण्यात आले व त्यांत सुवर्ण मूर्तीची प्रतिष्ठापना झाली.

कांही वर्षे गेली. चारी मंत्रीही निर्वतले. त्यानंतर यथावकाश स्मारक मंदिर उजाड झाले. राजाची सुवर्ण प्रतिमा चोरली गेली व मंदिरातली रत्नेही नाहीशी झाली.

पण मणिशर्माने सांगितल्याप्रमाणे तयार झालेले सुंदरवन, अद्यापिही हिरवेगार आहे. त्यांत प्रवाशांसाठी जी लहानलहान विश्रांतिगृहे बांधली होती, त्यांत विसावा घेताना त्यांचा थकवा दूर होतो.

सुंदरवनांतल्या फळाफुलांचा चांगला उपयोग होतो. इतक्या वर्षानंतरदेखील राजा शिवशर्माचे स्मरण प्रजेला होत राहाते.

प्रजेच्या मनांत हा राजा जिवंत आहे व अजूनही प्रजेची काळजी घेतो आहे, ही भावना आहे.

रमेश गर्गी





# उच्चनीच भेद

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असताना बोधिसत्वांनी एका सिंहाच्या रूपे अवतार धारण केला. तो सिंह आपल्या बायकोबरोबर एका पर्वताच्या गुहेत रहात असे. एकदां तो सिंह शिकारीला गेला असतां डोंगरावरून त्याची नजर खाली गेली. एका जागी हिरवेगार मैदान होते व त्यांत कांही ससे व हरणे चरत असलेली त्याला दिसली. हरणे व ससे मधून-मधून उड्या मारीत असलेले पाहून त्यांची शिकार करण्याचा मोह सिंहाला आवरला नाही. त्याने त्यांच्यावर उडी मारली. ती चुकून तो तिथल्या एका तळ्याकांठच्या चिखलांत पडला. सिंहाला पाहून ससे व हरणे पळून गेली. चिखलांतून बाहेर निघण्याचा सिंहाने पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तो जितकी जास्त खटपट करी, तितका जास्त चिखलांत तो रुतत गेला. म्हणून जागचा हलल्या शिवाय पडून राहण्यातच शहाणपण मानून तो पडून राहिला. कोणी आपल्याला वांचवायला येतो कां, याची वाट पाहू लागला.

एक आठवडाभर भुकेतहानेने तडफडत सिंह त्या चिखलांत पडून राहिला होता. एकदां एक कोल्हा पाणी प्यायला म्हणून त्या तळ्याजवळ आला. परंतु सिंहाला पाहून दूर जाऊन उभा राहिला. सिंह कोल्ह्याला पाहून म्हणाला - "कोल्होबा! हे बघ, गेला एक आठवडाभर मी या चिखलांत रुतून पडलो आहे. मेलो नाही, एवढेच. तू कांही तरी करून मला वांचव, तुला पुण्य लागेल." सिंहाने कोल्ह्याच्या विनवण्या केल्या.

"तू तर भुकेलाच आहेस, तू बाहेर पडताच मला खाणार नाहीस कशावरून? तुझा काय विश्वास?" कोल्हा म्हणाला.

"मी तुझ्या जवळ प्राणभिक्षा मागतो आहे, तुला मी खाईन कां? तू मला या चिखलांतून वांचविलेस तर मी जिवंत असेपर्यंत तुझे उपकार मानीन, माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव" सिंह म्हणाला.

कोल्ह्याने सिंहाच्या बोलण्यावर विश्वास ठेवला. त्याने वाळकी लांकडे आणून चिखलांत टाकली. त्यांवर पाय ठेवून सिंह उभा राहिला व चिखलांतून बाहेर आला.

त्यानंतर दोघे मिळून जंगलात शिकारीला गेले. सिंहाने एक जनावर मारले व त्यावर आपली भूक भागविली.

"यापुढे आपण दोघे भाऊ भाऊ बरं का ! तू एका जागी रहायचं आणि मी दुसऱ्या जागी, हे बरोबर नाही! तू आपल्या बायको मुलांना घेऊन ये आपण एकाच गुहेत राहू... सिंह म्हणाला. कोल्ह्याने ते मान्य केले आणि बायको मुलांना घेऊन येऊन सिंहाच्या गुहेतच राहू लागला.

सिंहाच्या बरोबर आपला संसार थाटल्याबद्दल त्याला मोठेपणा मिळाल्याचा परमानंद झाला व तो त्याची बायको व मुलं फार आनंदात होती खरी, परंतु आपण आपल्या जातीच्या लोकांपासून दूर झालो व त्यामुळे कष्ट सुख भोगावे लागेल. ते भोगलेच पाहिजे, हे कोल्हा ओळखून होता. कोल्ह्याने जो त्याग केला होता, तो सिंहाला कळत होता. म्हणून आपल्या मित्राला कोणत्याही प्रकारे त्रास होऊ नये या गोष्टीची सिंह काळजी घेई. दिवसामागून दिवस आनंदाने जात होते. सिंह आपला मित्र कोल्हा याला जितक्या समबुद्धीने पाही, तितक्या समबुद्धीने सिंहाची बायको मात्र कोल्ह्याच्या बायकोला पाहात नसे. तिला वाटे की कोल्हीण ही किती झाली तरी खालच्याच जातीची. कोल्हीण आपली जात खालची आहे हे ओळखून होती म्हणून जास्त भांडाभांड झाली नाही. पुढे कांही काळ



लोटल्यावर सिंहाचे छावे व कोल्ह्याची पिले बरोबर खेळू व बागडूं लागली. सिंहाच्या बायकोला तिच्या मुलांच्या अंगावर कोल्ह्याची पिले चढून खेळत असलेली पाहून राग येई. सिंहाच्या मुलांना उच्चनीच भेद कळत नसल्यामुळे त्यांना कोल्ह्यांची पिलें त्यांच्या अंगावर चढली तरी त्याचे मुळीच गैर वाटत नसे.

परंतु सिंहाच्या बायकोला मात्र हे सर्व मुळीच पाहवले नाही. ती आपल्या मुलांना एका बाजूला बोलावून म्हणे - "अरे आपण कुलीन जातीचे, तुम्ही त्या नीच जातीच्या पिलांशी बरोबरीच्या नात्याने काय खेळता? त्यांच्यापासून चार पावले दूरच रहात जा!"

सिंहाच्या मुलांच्या डोक्यांत आई म्हणाली, ते थोडे थोडे शिरू लागले. ती कोल्ह्याच्या पिलांना तुच्छतेने पाहू लागली. व त्यांच्याबरोबर खेळत असता त्यांच्यावर अन्याय करू लागली. ती

कोल्ह्याच्या पिल्लांना म्हणत - "तुम्ही खालच्या जातीचे आहा. आम्ही तुम्हाला पोसतो आहोत. तुम्ही आमच्याशी बोलतांना उलट बोलता कामा नये. तुम्ही खालच्या जातीचे म्हणून आम्ही कांहीही बोललो, शिव्या दिल्या, तरी तुम्ही मुकाट्याने ऐकून घेतले पाहिजे."

कोल्ह्याच्या बायकोला हे आवडले नाही, व तिने सिंहाच्या बायकोचा भेदभाव नवऱ्याच्या कानावर घातला. दुसऱ्या दिवशी शिकारीला निघण्यापूर्वी कोल्हा सिंहाला म्हणाला, - "सिंहा, तुम्ही मृग-राजाच्या जातीचे, आम्ही सामान्य खालच्या जातीचे. म्हणून आपण एकत्र राहणे बरोबर नाही! आम्ही आपल्या जातीच्या लोकांमध्ये जाऊन रहावे म्हणतो!"

आपल्या मित्राच्या बोलण्यांत अकस्मात् झालेला हा फरक सिंहाने ओळखला व कारण विचारले. त्या दिवशी रात्री सिंह गुहेत परतल्यावर बायकोला म्हणाला - "तू कोल्ह्याच्या पिल्लांना पाहून कांही तरी तोडून बोललीस व वागलीस म्हणे!"

"होय, ती खालच्या जातीची पिल्ले, त्यांनी आपल्या मुलांबरोबर बरोबरीच्या नात्याने खेळणें-वागणें मला मुळीच पसंत नाही. त्या कोल्ह्याने तुम्हांला कोणते औषध पाजले कोणास ठाऊक, तुमच्यांत केवढा बदल झाला आहे! परंतु माझी मुले बिघडलेली मला मुळीच पाहवणार नाही!"

"अस्सं! कोल्ह्याने मला कोणते औषध पाजले ते मी तुला सांगतो, ऐक. मी एकदा आठ-वडाभर घरी आलो नव्हतो, आठवतं का तुला? मी तो आठवडाभर भुकेला तहानेला एका जागी चिखलांत रुतून पडलो होतो. माझा जीव जायची स्थिती होती. त्यावेळी या कोल्ह्याने मला युक्ती करून बांचविले. त्या दिवशी कोल्ह्याने मदत केली नसती तर मी आज दिसलो नसतो व आपली मुलंही नसती. ज्यांनी मला प्राणभिक्षा घातली, त्यांच्याबरोबर उच्चनीच हा भेद कसा मानायचा? हा मूर्खपणाच नाही का? अशा मित्रांचा अपमान करणे म्हणजे रक्ताचा संबंध असलेल्यांचा अपमान करण्यासारखेच आहे!" सिंह म्हणाला.

सिंहाची बायको शरमिन्दी होऊन कोल्ह्याच्या बायकोची क्षमा मागू लागली. त्यानंतर सात पिढ्यांपर्यंत सिंह व कोल्हा यांचे वंशज त्याच गुहेत फार सख्यभावाने राहिले.







# रामायण

पितृवियोगानें दुःखी होऊन भरत बराच वेळ रडत राहिला. नंतर त्याने आईला विचारले - "आई! मरणसमयी बाबा कांही म्हणाले का? काय म्हणाले ते?"

"रामा, लक्ष्मण, सीते! - असे ओरडत त्यांनी डोळे मिटले." कैकेयी म्हणाली.

ते ऐकून भरताला आश्चर्य वाटले. त्याने आईला विचारले - "म्हणजे बाबा वारले तेव्हां राम, सीता किंवा लक्ष्मण यापैकी कोणीच जवळ नव्हते का? कोठे गेले होते?"

"ते वनवासाला गेले आहेत. राम वल्कलवस्त्रे धारण करून वनवासाला निघाला, तेव्हां सीतेने आणि लक्ष्मणाने दोघांनी बरोबर जाण्यासाठी हट्ट केला." कैकेयी म्हणाली.

भरताने जास्तच चकित होऊन विचारले - "राम वनवासाला गेला? कां? त्याने कोणते पाप केले होते? रामाच्या हातून चुकून सुद्धां अपराध होणे शक्य नाही. मग ही वनवासाची शिक्षा त्याला कां दिली? सांगशील की नाही?"

"तसे कांही नाही रे! महाराज रामाला राज्याभिषेक करणार आहेत हे कळल्याबरोबर मीच राजाकडून दोन वर मागून घेतले. एका वराने तुला राज्य व दुसऱ्याने रामाला वनवास. आतां तुझा राज्याभिषेक उरला आहे. वसिष्ठ ऋषी तुझा राज्याभिषेक करणार आहेत. म्हणून तूं लवकर तयार हो!" कैकेयी म्हणाली.

कैकेयीनें अगदी शांतपणाने दिलेले ते उत्तर ऐकून भरताला भयंकर राग आला. तो आईला म्हणाला, "म्हणजे, तूं स्वतःच आपल्या पतीचा वध केलास. रामाला वनवास दिलास. तुझे तोंड



पाहणे म्हणजे एक पाप आहे. क्षत्रिय कुळांत मोठ्या मुलाला गादी देतात, ही साधी गोष्ट तुला माहीत नाही का? राम व लक्ष्मण रानांत, व मी गादीवर बसून राज्य करूं? घात केलास! तुला आतां मी कोणत्या तोंडाने आई म्हणूं? मी स्वत: रानांत जाऊन रामाला बोलावून आणतो व त्याचा राज्याभिषेक करवितो.'' तो पुढे म्हणाला, ''तुला हे आवडत नसेल तर तूं आपले हे काळे तोंड घेऊन वाटेल तिकडे जा.''

इतक्यांत सुमंत्र तेथें आले. भरत त्यांना म्हणाला, ''मला ह्या कुलक्षणी राज्याची गरज नाहीं. मी कधींच त्याची अपेक्षा ठेवली नव्हती. हा माझ्या आईचा हट्ट होता.''

नंतर भरत व शत्रुघ्न कौसल्येच्या महालांत गेले. कौसल्येने भीतभीतच त्यांना आशीर्वाद दिला. आपल्या सांगण्यावरून किंवा आपल्या मतानेच आईने दोन्ही वर मागितले आहेत, असा संशय कौसल्या मातेच्या मनांत असावा, हे भरताला कळले.

म्हणून त्याने तिच्या पायां पडून सांगितले, ''मी रामाला कधी वनवासाला पाठवीन कां? मी आजोळी होतो. माझ्या मागे काय घडले हे देखील मला कळले नाही.''

तेव्हां कौसल्येच्या मनाचे समाधान झाले व तिने भरताला हृदयाजवळ ओढून आशीर्वाद दिला.

तेवढ्यांत वसिष्ठ ऋषी आले व त्यांनी त्याला समजावून सांगितले,

''बाळ उठ! आतां शोक करून कां महाराज परत येणार आहेत? लवकर अंत्येष्टि करून टाक.''

तेलांत बुडवून ठेवलेला दशरथाचा देह पाहून भरताला जास्तच वाईट वाटले. तो शोक करूं लागला - ''बाबा! तुम्ही गेलांत! दादा वनवासाला गेला. हे राज्य संभाळणे माझ्याकडून कसे होणार?''

दशरथाच्या प्रेतयात्रेला सर्व नागरिक आले होते. शव चितेवर ठेवल्यावर भरत व तिघी राण्यांनी चितेला तीनदां प्रदक्षिणा घातली. नंतर भरताने अग्नि दिला.

भरताने दहा दिवस सुतक पाळले. नंतर तेराव्या दिवशीं रीतीप्रमाणे तर्पण, पिंडदान, वगैरे करून ब्राह्मणांना अन्न, वस्त्र व गाई यांचे दान केले.





भरत व शत्रुघ्न अस्थी आणायला गेले तेव्हां दोघांच्या डोळ्यांतून घळघळा अश्रुप्रवाह चालू होता.

चवदाव्या दिवशी भरत व शत्रुघ्न दोघे परस्परांशी बोलत होते. शत्रुघ्न म्हणाला - ''कैकेयी मातेने वर मागून घेतला याचे मला एवढे आश्चर्य वाटत नाही. लक्ष्मण हे सर्व स्वस्थपणे पहात कसा काय बसला, याचे मात्र मला आश्चर्य वाटत आहे.''

तितक्यांत मंथरा हंसत नटूनथटून त्या बाजूला आली. तिचा हात धरून तिला फरफटत द्वारपाल घेऊन आला व म्हणाला - ''सारे कांही ह्या कुबडी-मुळे झाले.''

तिला पाहतांच शत्रुघ्नाच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत गेली व तलवार उपसून तो तिला मारायला धांवला. ते पाहून मंथरेबरोबर आलेल्या दासी घाबरून जाऊन कौसल्येकडे धांवल्या.

मंथरा जोरजोराने ओरडूं लागली. कैकेयीने मधे पडून तिला वांचविले. तेव्हां शत्रुघ्न तिलाच खूप रागावला.

''ह्या कुबडीला तूं डोक्यावर चढवून ठेवले आहेस. तूं पापी आहेस.''

तेव्हां भरत पुढे आला व म्हणाला - ''शत्रुघ्ना! अरे! तूं स्त्रीवध करणार का? जर रामाला हे कळले तर त्याला आवडेल का? रामाला राग येईल, म्हणून मी आईचा शिरच्छेद केला नाही. नाहीतर तिचा शेवट करून केव्हांच मोकळा झालो असतो. सोड त्या कुबडीला.''

दुपारी राजधानीतील प्रमुख नागरिक येऊन भरताला म्हणाले -

''भरता! राज्याचा हा गाडा कोणीतरी सांभाळलाच पाहिजे. सुदैवाने अद्याप राज्यांत अराजकता माजली नाही. राज्याभिषेक लवकर करून घे.''

भरत म्हणाला - ''मी गुरुजनांच्या म्हणण्या-बाहेर कां आहे? पण सूर्यवंशाच्या रीतीप्रमाणें ज्येष्ठ मुलगाच गादीला वारस असतो. म्हणून मला गादीवर बसविण्याचा आग्रह तुम्ही करावा हे बरोबर दिसत नाहीं. माझ्या आईच्या इच्छेसाठीं म्हणून मी गादीवर बसायला मुळीच तयार नाही. मी रानांत जाऊन रामाचा राज्याभिषेक करविणार आहे. त्याचे पाय धरून, विनवण्या करून त्याला



परत अयोध्येला बोलावून घेऊन येणार आहे. तो कबूल झाला नाही तर मी त्याच्याऐवजी वनवास घेईन. राज्याभिषेक रानांतच होणार आहे. म्हणून राज्याभिषेकाला आवश्यक असे सर्व सामान रानांत घेऊन जायची तयारी करा.''

भरताच्या सूचनेप्रमाणे तयारी सुरू झाली. झाडे तोडून रस्ते सारखे करण्यांत आले. ओढ्यांवर पूल बांधण्यांत आले. खांचखळगे भरून काढण्यांत आले.

जागोजागी विहिरी खणण्यांत आल्या. सोईस्कर अशा जागी राहुट्या वगैरे उभारण्यांत आल्या. शरयू नदीपासून गंगेच्या काठापर्यंत जागोजागीं शिबिरें उभारण्यांत आली.

दुसऱ्या दिवशीं पहाटे शंखनाद, शिंगाचा आवाज, स्तोत्रपाठ, वगैरे ऐकून भरत जागा झाला. त्याच्या डोळ्यांत अश्रू आले. तो म्हणाला - ''मी राजा नाही. माझ्या नांवाने हा स्तुतिपाठ कशाला? ही मंगलवाद्यें कशाला? बंद करा सर्व!''

वसिष्ठ मुनींच्या आज्ञेने दरबार भरला. सर्व मानकरी, दरबारी, मंत्री, सरदार व मांडलिक राजे दरबारांत हजर झाले.

वसिष्ठ मुनींनीं भरताला आदरपूर्वक बोलावून राज्याभिषेक करून घेण्यास फार आग्रह केला. म्हणाला -

''महाराज दशरथ प्रजेला स्वतःच्या मुलासारखे वागवीत. तूं सुद्धां राजा झाल्यावर तसेच प्रजेचे पालन कर.''

पण भरत म्हणाला - ''मी ज्या मातेच्या पोटी जन्माला आलो आहे, तिच्या कर्माप्रमाणे मला तुम्ही म्हणतां ते ऐकणे, व त्याप्रमाणे वागणे, भागच आहे. पण मी लहान तोंडी मोठा घास घेत आहे. माझे निवेदन ऐकून घ्या व मग तुम्हाला वाटेल ते करा. मला रामाशिवाय एक क्षणभर देखील अयोध्येला राहणे रुचणार नाही. मी प्रथम रानांत जातो व रामाला भेटतो. त्याला बरोबर घेऊन येतो व त्याचा राज्याभिषेक आपण सर्वच मिळून करूं. तो कदाचित कबूल होणार नाही. म्हणून राज्याभिषेकाची सर्व तयारी करून घेऊन आपण सर्वच रानांत जाऊं या. तो परत आला नाही तर मी लक्ष्मणासारखा रामाच्या बरोबर बनांत जाईन. बाबांना स्वर्गात व रामाला वनवासाला पाठवून मला माझ्या आईनि राज्य मिळवून दिले आहे. याहून जास्त हित माझे कोण करणार आहे? अशा अधम राजाच्या राज्यांत तुम्ही सर्व सुखी व्हाल, असे कां तुम्हाला वाटते?''

एवढे ऐकल्यावर सर्वांच्या मनाचे समाधान झाले. सर्वजण रामदर्शनासाठी आतुरतेने वन-गमनाची तयारी करूं लागले.

दुसऱ्या दिवशी पहाटे उठून भरत वनगमनास निघाला. त्याच्याबरोबर चतुरंग सैन्य होते. नऊ हजार हत्ती, साठ हजार रथ, एक लाख घोडेस्वार व असंख्य पायदळ सैन्य.

कौसल्या, सुमित्रा आणि कैकेयी पण पालखींत बसून निघाल्या. कैकेयीच्या मानेवर बसलेले भूत उतरले होते. तिची चूक तिच्या मुलानेच तिच्या पदरांत बांधली होती. तिला कृतकर्माबद्दल पश्चाताप वाटत होता. तिची पालखीच सर्वांत पुढे होती.

अयोध्यानगरी ओसाड पडली. म्हातारे, व लुळे पांगळे, स्वतःच्या भाग्याला दोष देत अयोध्येला राहिले. तरी कांही लोक रथांत, बैलगाडीत, किंवा इतर वाहनांत बसून निघालेच.

इतके मोठे सैन्य घेऊन भरत गंगेकाठी श्रृंगवेरपुरीं येऊन पोंचला. त्याने नदीकाठी सोईची जागा पाहून राहुट्या उभारण्यास व उतरण्यास सांगितले. तो मंत्र्यांस म्हणाला - ''आजची रात्र आपण नदीकाठीच विश्रांती घेऊं या. मी नदीत उतरून तर्पण करतो.''

महासमुद्रासारखी भरताची सेना गंगेकाठी उतरलेली निषादराज गुह याने पाहिली. त्याने



भरताला रथांतच ओळखले. त्याने आपल्या कांही विश्वासपात्र अनुयायांना जवळ बोलाविले आणि तो त्यांना म्हणाला -

"भरत इतके मोठे सैन्य घेऊन रानांत कां बरे निघाला आहे? राम रानांतून परत येऊन आपले राज्य मागील, म्हणून त्याचा कांटा दूर करण्याचा हेतू तर नसेल? कांही असो, रामाच्या रक्षणाची जबाबदारी आपल्यावर आहे. तो माझा सखा, मित्र आहे. म्हणून पांचशे नावा तयार ठेवा. प्रत्येक नावेंत शंभरजण असले पाहिजेत. वेळ पाहून वागतां येईल. नावेत शस्त्रास्त्रें व रसद भरून घ्या. भरत मैत्रीच्या भावनेने जात असेल तर आपण त्याचे मित्र, व तो शत्रुबुद्धीनें जात असेल तर आपण त्याचे शत्रू."

नंतर भरत कोणत्या हेतूने निघाला आहे हे पाहण्यासाठी बरोबर उपहार म्हणून मासे, मद्य व फळफळावळ घेऊन गुह निघाला. गुह येत असलेला पाहून सुमंत्र पुढे गेला व त्याला आदरपूर्वक भरताजवळ बोलावून घेऊन आला. त्याने गुह राजाची ओळख करून दिली. म्हणाला - "हा रामाचा सखा व मित्र आहे." गुहाने सर्व उपहार भरतासमोर ठेवून त्याला नमस्कार केला व म्हणाला -

"तुम्ही चक्रवर्ती व मी एक गरीब निषादराज. या गरिबाचे आतिथ्य स्वीकार करावे अशी विनंती करण्यासाठीं आलो आहे. पहिल्यापासून माहिती नसल्यामुळे कांही उणीव राहिली तर माफी करावी."

भरताने गुहराजाला सन्मानपूर्वक बसायला सांगून त्याच्या मनाचे सर्वप्रकारे समाधान केले व तो म्हणाला - "राजा! हे रामाचे चतुरंग सैन्य आहे. या सर्वांचे तूं आतिथ्य करणार आहेस. आनंदाची गोष्ट आणखी काय असूं शकणार? परंतु आम्हाला भरद्वाज मुनींच्या आश्रमांत जावयाचे आहे. आम्हाला वाट दाखविलीस तर तुझे आमच्यावर फार उपकार होतील. येथून वाट सरळ नाही असे ऐकतो."

"मी व माझे अनुयायी तुम्हाला वाट दाखवायला येतील. तुम्हाला थोडा देखील त्रास होणार नाही." गुह म्हणाला.







# दुष्टांपासून दूर राहा!

जनार्दनचा पिता एका शहरांत व्यापार करीत होता. त्याने व्यापारांत हजारों रुपये कमावले. जेव्हां त्याचा अंतकाळ जवळ आला, तेव्हां त्याने जनार्दनला बोलावून समजावून सांगितले, "बाळा, माझ्या मृत्यूनंतर तू या गांवात राहूं नकोस. एखादे चांगले ठिकाण शोधून तिथे राहायला जा. मी जे कांही कमावले आहे, ते तुला आणि तुझ्या मुलाबाळांना, आठ दहा पिढ्यांपर्यंत पुरेल. तुला आरामांत आयुष्य घालवता येईल." आणि व्यापाऱ्याने कायमचेच डोळे मिटले.

पित्याच्या निधनानंतर जनार्दनच्यासमोर एक मोठी समस्या निर्माण झाली. ती म्हणजे कोणत्या प्रदेशांत आपण नवीन घर करावे ही! त्याच्या गांवात त्याच्याशी प्रेमळपणे वागणारे लोक बरेच होते, परंतु गांव कांही फारसे सुंदर नव्हते. पाण्याचीही चांगली सोय नव्हती, खडकाळ प्रदेश होता, त्यामुळे निसर्गसौंदर्यही खास नव्हते.

दुसरीकडे जावे असा विचार करून जनार्दनने आपल्या संपत्तीचे रुपांतर रोख पैसे व सोने यांत करून टाकले, आणि एका छानदार स्थळाच्या शोधार्थ तो निघाला. दोन आठवडे शोध केल्यानंतर त्याला एक सुंदर प्रदेश दिसला.

समुद्राच्या किनाऱ्यावर एक लहानशी वस्ती होती. या खेड्याच्या चारी बाजूंना बागबगीचे व वाळूचे डोंगर होते. तिथले थंड शांत वातावरण पाहून जनार्दन त्या गांवाच्या प्रेमांतच पडला. तिथल्या झाडीमधे त्याने एक झोंपडी बांधली आणि तिथे तो राहूं लागला. रोज संध्याकाळीं एका लहानशा होडक्यांत बसून तो समुद्रावर फिरून येत असे.

त्या गांवात मुख्यतः मासेमारी करणारे कोळी राहात होते. त्यांच्या कामासाठी जेव्हां ते किनाऱ्यावर येजा करीत असत, तेव्हां त्यांना जनार्दन दिसत असे. कांहीही कामधंदा न करता हा गृहस्थ

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट

नुसताच आरामांत राहतोय, हे बघून त्या कष्ट करून पोट भरणाऱ्यांच्या मनांत त्याच्याविषयी मत्सर निर्माण झाला. एके दिवशी दुपारच्या वेळी जनार्दन आपल्या झोंपडीसमोरच्या झाडाच्या सांवलीत एका बाजेवर झोपला होता. बाहेर कडक उन होते. पण त्या बनराईत मात्र गारवा होता.

कुणाचीतरी हांक ऐकून जनार्दन दचकून जागा झाला. बाजेजवळ कुणीतरी उभा होता. त्याने तांबूस रंगाची लांब दाढी ठेवली होती. डोके भादरलेले होते. अंगावर लाल रंगाचा सदरा आणि काळे धोतर होते. त्याच्या गळ्यामधे कावळ्याच्या पिसांची माळ होती आणि त्याचे डोळे लालसर होते. त्याने विचारले, "ए तरुण मुला, किती कडक उन पडलंय ते! जा, जरा लोटाभर गार पाणी घेऊन ये." जनार्दन पाणी आणायला झोंपडीत शिरला.

"अरे, जरा थांब बाबा! जरा दाटसर ताकांत थोडेसे मीठ घालून घेऊन ये. तहानेने माझी जीभ कोरडी पडली आहे." त्या आगांतुकाने म्हटलं.

जनार्दनने त्याला उत्तर दिलं, "बरं आहे. मी आधी तुमच्यासाठी ताक आणतो." आणि तो आंत जाऊं लागला.

"जरा ताकांत दोन थेंब लिंबाचा रसही घाल. छान चव येते त्याच्यामुळे!" दाढीवाल्याने फर्मावले. त्याप्रमाणे जनार्दनने एका पेल्यांत पाणी आणि दुसऱ्या पेल्यांत मीठ लिंबू, घातलेले ताक आणले.

तोपर्यंत दाढीवाला त्या बाजेवर ऐटींत बसून गाणे गुणगुणत होता. त्याने ताकाचा पेला रिकामा केला व म्हटले, "वा, हा पेला फार सुरेख आहे. कुणीतरी पळवील हं! घरांत ठेवून ये जा."





जनार्दन पेला ठेवून परत बाहेर आला तो काय, दाढीवाल्याने बाजेवर पाय पसरून ताणून दिली होती. जनार्दन त्याच्याजवळ आल्यावर तो बोलला, "उन्हाची वेळ आहे. झोप येतेय मला. थोडा वेळ झोंपतो मी इथे!" आणि त्याने डोळे मिटले व कांही मिनिटांतच तो घोरायला लागला.

जनार्दनला काय बोलावे ते सुचेना. तो झोपडीच्याबाहेर पडवींत नुसताच बसून राहिला. संध्याकाळ झाली तेव्हां जांभया देत दाढीवाला उठून बसला आणि म्हणाला, "आता अंधार पडेल. मी एकटा जीव! घरांत दिवा लावायला-देखील कुणी नाही." असं म्हणून दाढीदिक्षित सरळ घरांत गेला आणि कोनाड्यांत ठेवलेला दिवा त्याने लावला.

दाढीवाल्याचे हे काम पाहून जनार्दन चांचरत त्याला म्हणाला, "खूप अंधार झाला आहे. आता तुम्ही घरी जायला हवं!"

दाढीवाल्याने जनार्दनला नखशिखांत न्याहाळून विचारले, "अरेच्या, तू रे कोण? माझ्याच घरांत शिरून तू मलाच काय विचारतोस? चालता हो इथून! नाहीतर तुझीच नाचक्की होईल."

हे शब्द उच्चारत त्याने जनार्दनला जबरदस्तीने दाराबाहेर ढकलले आणि दरवाजा आंतून बंद करून घेतला.

रात्रभर जनार्दन दरवाजाच्यावर थाप मारीत झोंपडीबाहेर उभा होता. त्याच्या मनांत विचार आला, "हे चमत्कारिक गांव दिसतंय. माझ्याच घरांतून मला बाहेर काढलंय, आणि हा अनोळखी



आगांतुक माझ्या घरांत मालकासारखा डाराडूर झोंपलाय. हे गांव शांत व सुंदर आहे, पण इथले लोक कांही चांगले वाटत नाहीत." तो दाढीवाला जनार्दनला दरडावून म्हणाला, "माझ्या झोंपडीचं दार जर तुटलं, तर त्याचे पैसे तुला द्यावे लागतील." आणि तो झोपून गेला.

सकाळ झाली. गांवातले लोक मासेमारीसाठी समुद्रावर निघाले. त्यांना बोलावून जनार्दनने ही सारी हकीकत सांगितली, आणि त्यांना विचारले, "तुम्ही मंडळी हा अन्याय पाहाता आहात ना? या माणसाला समजावून सांगत कां नाही?"

तेवढ्यांत दाढीवाला दार उघडून बाहेर आला आणि गांववाल्यांना म्हणाला, "हा कुणीतरी वेडा आहे बरं कां! माझ्या घरांत घुसून दंगा करतोय आणि हे घर त्याचंच आहे असं सांगतोय!"

जनार्दनने रागाने त्यांना म्हटलं, "तुम्हीच










आता सांगा, ही झोंपडी त्याची आहे की माझी! तुम्ही सारेजण रोज इथून जाता, तेव्हा मला बघता की नाही? ह्या भामट्याला चांगला धडा शिकवा, आणि माझ्या घरातून ह्याला बाहेर हाकला!''

गांवकरी जनार्दनकडे टक लावून बघत म्हणाले, ''अरे, तू कोण आहेस? तूच चोरासारखा दिसतो आहेस. हे घर ह्या दाढीवाल्याचंच आहे. आम्ही रोज त्याला इथे पाहातो की! तुला आम्ही कधीही इथे पाहिले नव्हते. मुकाट्याने आल्यास तसा निघून जा, नाहीतर तुझी चांगली कणिक तिंबून देऊन आम्ही!'' आणि त्यांनी जनार्दनलाच भामटा ठरवले.

जनार्दन स्तंभित झाला. ह्या गांवातले लोक कांही चांगले नाहीत, आणि त्याची सगळी संपत्ती हडप करायचा त्यांचा बेत असावा, हे त्याच्या लक्षांत आले.

त्या सर्वांकडे संतापाने वेड्यासारखे बघून त्याने म्हटले, ''छान! तुम्ही आज माझे डोळे उघडलेत. आजपर्यंत मी हे माझंच घर समजत होतो. पण मी जे सोने पेटींत लपवून ठेवले आहे, ते तरी माझं नाही का?'' त्याने भोळेपणाने त्यांच्याकडे पाहिले.

गांवकऱ्यांना वाटले की जनार्दनचं डोकंच फिरलंय. त्या लोकांनी त्याला गंभीरपणे म्हटले, ''तुझे नाही, ते सारे सोने आमचे आहे. लौकर सांग, ते सोने कुठे लपवून ठेवलं आहेस तू?''

जनार्दनने लांबवर दिसणारी वाळूची टेकडी दाखवून जनार्दनने म्हटले, ''सोन्याने भरलेली माझी पेटी मी त्या टेकडीवर पुरलेली आहे.''

मग काय, सर्वजण त्या टेकडीच्या दिशेने धावत सुटले. सर्वांनाच त्या सोन्याची हाव होती. दाढीवाल्यासकट सगळेजण जेव्हां तिथून गेले, तेव्हां जनार्दनने शांतपणे निश्वास टाकला व एका झाडाखाली पुरलेली आपली पेटी बाहेर काढली. त्याच क्षणी आपले सामान घेऊन तो तिथून सटकला.

त्याच्या वडिलांनी सांगितलं होतं की चांगले ठिकाण म्हणजे चांगल्या लोकांची वस्ती! तो त्याच्या मूळ गांवी परत गेला आणि पुन्हा लोकांच्यामधे प्रेमाने व सुखाने राहायला लागला.




















तुमचे विज्ञान

## रंगीन बचाव



जर एखाद्याचे डोळे लाल दिसले, तर इतर सगळेजण त्याच्याजवळ जायचे टाळतात. कारण त्याचे डोळे आलेले असतील ही भिती असते. डोळे येणे हा एक सांसर्गिक रोग आहे. जेव्हां बेडकाचे डोळे लाल असतात, तेव्हां कांही विशिष्ट प्राणीही त्यांना टाळण्याचा प्रयत्न करतात.

लाल डोळ्यांचा बेडूक हा मध्य अमेरिकेच्या पर्जन्य अरण्यांतला रहिवासी आहे. त्याचे भडक रंगांचे अंग व डोळे यांचा उपयोग तो बचावासाठी करतो. या बेडकाचे भडक हिरव्या रंगाचे असते व त्यावर निळ्या व पिवळ्या रंगांचे पट्टे असतात. डोळे लालभडक असतात, आणि त्यावर एक तिसरी पापणी असते, ती नाजूक डोळ्यांचे रक्षण करते.

हे निशाचर आपल्या अंगरंगांमुळे झाडांतल्या पानाफुलांत लपून जातात, आणि त्या पर्णराशीत बराच काळ राहातात. रात्रीचा गडद किंवा सौम्य अंधार जसा असेल, त्यानुसार त्यांच्या कातडीचा रंग फिकट किंवा गडद होतो.

तुमचा परिसर

## भाजीप्रभू



दरवर्षी जगभरांतले शेकडो शेतकरी एकत्र जमतात आणि त्यांचे महाप्रचंड भोपळे ऐटीत दाखवतात. प्रत्येकाला आपल्या ह्या मोठ्या आकाराच्या भोपळ्याचा अभिमान वाटतो. सर्वांत जास्त वजनाचा भोपळा कोणता हे पाहाण्याची ही स्पर्धा असते. अमेरिकेतल्या ऑरॅगॉन इथल्या शेतकरी स्टीव्ह डाल्टेटास हा जगांतला विक्रमी भाजीप्रभू आहे. त्याच्या शेतांतल्या भोपळ्याचे वजन ६२८ किलो होतो. या लॉंग आयलंडच्या वजनदार भोपळा स्पर्धेचा प्रमुख अँड्र्यू सबीन ह्याच्यामते असा महाकाय भोपळा व इतर भाज्या पिकवणे इतके सोपे नसते. त्याच्यामागे भरपूर कष्ट व जिद्द असावी लागते. त्यांची रोज निगराणी करावी लागते. जगांतल्या सर्वांत मोठ्या गाजराचे वजन ९ किलो, सफरचंदाचे २ किलो व कोबीचे वजन ५६ किलो होते.

तुमचे पान

माहीत आहे कां?

## उचक्या



सुहास्य हे सर्वोत्कृष्ट औषध आहे असे म्हणतात. "हास्य उपचार" याचा प्रसार हल्ली होतो आहेच. हंसणे हे व्यक्तीच्या मनावरचा ताण कमी करते. अति खाण्याने जसा माणूस कासावीस होतो, त्याचप्रमाणे अति हंसणे देखील तापदायक ठरूं शकते. कांही वेळा व्यक्तीचा घसा दुखतो व आवाज बंदही होतो. त्यामुळे उचकी लागते. त्यासाठी श्वास रोधून धरणे हा एक सोपा उपाय आहे. त्यामुळे कर्बवायू सांठवून रोखला जातो व उचकी थांबते. अमेरिकेतल्या आयोवा गांवातल्या चार्लस् ऑस्बोर्न याला दर मिनिटाला ४६ वेळा उचक्या येत राहिल्या आणि या उचक्या त्याला ६९ तास येत होत्या. हाही एक जागतिक विक्रम आहे!

भारताची ओळख-प्रश्नावली



### आपल्या कांही नेत्यांची प्रसिद्ध बोधवचने पाहूं या:

१. "शिक्षण म्हणजे माणसा-मधील पूर्णत्व असते." हे कुणी म्हटले होते?

२. "शक्ती म्हणजे केवळ शारिरीक क्षमता नव्हे, तर त्यासाठी दुर्दम्य इच्छाशक्तीही लागते "हे कुणी म्हटले होते?

३. "दुर्बलांना क्षमा करता येत नाही. सबलांनाच क्षमाशील होता येते." हे कुणाचे वचन आहे?

४. "खेळताना खिलाडू वृत्ती बाळगलीच पाहिजे" हा सल्ला कुणी दिला?

५. "ज्ञान म्हणजे मेंदूच्या कोंपऱ्यात बांधून ठेवलेली एखादी वस्तू नव्हे" असे कोणी म्हटले होते?

*(उत्तरे ६६ पानावर)*

### न्यूट्रीन स्पर्धा - ३




मलपृष्ठावरची न्यूट्रीनची जाहिरात नीट पाहा आणि 'न्यूट्रीन' हा शब्द किती वेळा आला आहे ते शोधा. तुमचे उत्तर एका कागदावर लिहा. त्यावर तुमचे नांव, जन्मतारीख, वर्ग, शाळेचे नांव व तुमचा पिनकोडसहित संपूर्ण पत्ता लिहून **चंदामामा इंडिया लि.**, ८२, डिफेन्स ऑफिसर्स कॉलनी, एकादुतांगल, चेन्नई ६०० ०९७ या पत्त्यावर ३१ डिसेंबरपूर्वी पाठवा.

एक आकर्षक बक्षीस* तुमची वाट पहात आहे.



nutrine India's largest selling sweets and toffees.

*Conditions apply

CHANDOBA (Marathi) Dec. 2006 RNI No. 1093/57.
Licensed to post WPP - Inland No.TN/CC(S)Dn/78/06-08, Foreign No. 79/06-08

